हैद्राबाद मुक्तिसंग्रामात

# असे झुंजलो आम्ही

प्रा.डॉ. सतीश कदम

कैलास पब्लिकेशन,
औरंगाबाद

ISBN 978-93-81161-94-4

हैद्राबाद मुक्तिसंग्रामात

# असे झुंजलो आम्ही

प्रा.डॉ. सतीश कदम
Satishkadam28@gmail.com

प्रथमावृत्ती : ३ एप्रिल २०१४ (छत्रपती शिवाजीमहाराज पुण्यतिथी)

संपादकीय मंडळ
श्री.वसंतराव नागदे स्वा.सै.भास्करराव नायगांवकर
श्री.बुबासाहेब जाधव प्राचार्य वसंतराव लांडे
श्री.गोविंदराव मैंदरकर श्री.सुंदरराव बोंदर
सर्व सदस्य इतिहास लेखन समिती, उस्मानाबाद.

मुखपृष्ठ : विराक्षी, सोलापूर
प्रकाशक: कैलास पब्लिकेशन, औरंगाबाद
प्रिसिजन प्रिंटर्स, सोलापूर

ISBN 978-93-81161-94-4

किंमत : ३५०/-

हैद्राबाद मुक्तिसंग्रामात आहुती दिलेल्या
नरवीर स्वातंत्र्यवीरांना-विरांगनांना
कोटी कोटी प्रणाम आणि श्रध्दांजली !
असे झुंजलो आम्ही !



# मनोगत

लहानपणापासून रझाकार हा शब्द ऐकला की ती एक कोणीतरी मोठी व्यक्ती असावी असा समज गेली अनेक वर्षे होता. पुढे इतिहासाचा अभ्यासक म्हणून काम करताना अनेक नवीन संशोधन कार्य केले. परंतु हैद्राबाद मुक्ती संग्रामात मी स्वत: अनभिज्ञ होतो. सुदैवाने याविषयी अभ्यास करण्याचा योग लवकरच जुळून आला. उस्मानाबाद शहरातील स्वातंत्र्य सैनिक भास्करराव नायगावकर यांनी माझ्या कामावर प्रेरित होऊन तत्कालिन जिल्हाधिकारी डॉ. प्रवीण गेडाम, अप्पर जिल्हाधिकारी रामचंद्र फुलारी यांच्याकडे इतिहास लेखनासाठी माझ्या नावाची शिफारस केली. मागील चार वर्षापासून याविषयी काम चालू असूनही विशेष प्रगती होत नव्हती. मध्येच उस्मानाबाद आकाशवाणी केंद्राचे कार्यक्रम अधिकारी श्री. नारायण पवार यांनी हैद्राबाद मुक्तिसंग्रामात काम केलेल्या ज्ञात-अज्ञातांचा इतिहास जगासमोर यावा म्हणून आकाशवाणीसाठी लिखाण करण्याची विनंती केली. त्यातून केंद्र सरकारच्या अनुदानातून 'असे झुंजलो आम्ही' नावाची मालिका तयार झाली.

या मालिकेमुळे हैद्राबाद मुक्तिसंग्रामात घडलेल्या उस्मानाबाद जिल्ह्यातील घटनांचा अभ्यास करण्याचा योग आला. हा अभ्यास करत असताना चिलवडीचे श्री. बुबासाहेब जाधव यांचा जवळून परिचय झाला. बुबासाहेब म्हणजे सर्व विषयातील ज्ञानाचे चालते-बोलते विद्यापीठ. त्यांच्यामुळेच याविषयी अभ्यास करण्याची प्रेरणा मिळाली. याच वेळी प्राचार्य वसंतराव लांडे, ॲड. सुंदर बोंदर, गोविंदराव मैंदरकर यांच्याकडून मानसिक आधार मिळाला. उस्मानाबाद जनता सहकारी बँकेचे व्यवस्थापक मा.ह.भ.प. वसंतरावजी नागदे, मॅनेजर संदिपान साळुंके यांनी अभ्यासदौऱ्याच्याकामी लागणारे आर्थिक आणि मानसिक सहकार्य दिले. अशा या सर्व लोकांच्या

सहकार्यातून हा लेखनप्रपंच आकाराला आला आहे. इ.स. १७२० पासून हैद्राबाद संस्थानावर आसिफजाही घराण्याची सत्ता असून, मराठवाडा, कर्नाटक, आंध्रप्रदेश, तेलंगना या भागातील १६ जिल्ह्यांचा कारभार निजामाकडे होता. ८५% लोकसंख्या हिंदूची असूनही राज्यकारभारात त्यांना मानाचे स्थान नव्हते. उस्मानाबाद हा तर निजामाच्या जहागिरीचा जिल्हा असून, याला सोलापूर आणि नगर जिल्ह्याच्या सीमा लागत असल्याने सीमावर्ती भागात स्वातंत्र्याचे बीज लवकर रुजले गेले. त्यामुळे इतर जिल्ह्यांच्या मानाने उस्मानाबाद जिल्ह्यात हैद्राबाद मुक्तिसंग्रामाचा लढा तीव्रत्तेने लढला गेला.

हैद्राबाद संस्थानाच्या विलीनीकरणाला ६५ वर्षे पुर्ण झाली. याविषयाची दाहकता पुढील पिढीला पटवून देण्याची गरज आहे. आतापर्यंत हैद्राबाद मुक्तिसंग्रामावर भरपूर लिखाण झालेले आहे. मग नवीन काय? हा विषय महत्वाचा आहे. त्यानुषंगाने मी आपणाला मोठ्या आत्मविश्वासाने सांगू इच्छितो की, या पुस्तकाच्या माध्यमातून आम्ही आपणापुढे अत्यंत दुर्लक्षित घटनांचा अभ्यास सत्य पुराव्याच्या आधारे मांडत आहोत. १९४८ ला उस्मानाबादचे कलेक्टर महंमद हैदर यांनी स्वत: उभे राहून चिलवडीसारखे गाव जाळून बेचिराख केले. आपल्या आठ महिन्यांच्या कालावधीत त्यांच्या नावे २७ खून आणि कित्येक लुटीची नोंद झाली. पुढे याचे काय झाले? दुर्दैवाने याचा कोणी अभ्यासच केलेला नाही. आम्ही याचा मागोवा घेतला. त्या वेळची कागदपत्रे तपासली तेव्हा कलेक्टर महंमद हैदरला काही प्रकरणात दहा वर्षांची तर ईटच्या खून प्रकरणात चक्क फाशीची शिक्षा झाली होती. अशा अनेक नावीन्यपूर्ण घटनांचा आधार घेऊन पुस्तकाला सत्यात उतरविले आहे. उपळा खून प्रकरण, गौरचा खून खटला, देवधानोऱ्याचे जळीत प्रकरण यासारख्या अत्यंत दुर्लक्षित घटना पोलीस कागदपत्रांवरून नव्याने पुढे आणल्या आहेत.

मागील वर्षभरापासून रात्रीचा दिवस करूण या पुस्तकाचे लिखान करत असताना स्वातंत्र्य संग्रामाच्या धगधगत्या यज्ञकुंडात ज्यांनी आपल्या प्राणांची बाजी लावली त्यांचे स्मरण करण्याचा योग यादरम्यान आला. भारत स्वतंत्र झालातरी हैद्राबाद संस्थानचा राजा मीर उस्मानअली हा वेगळ्या देशाची कल्पना घेऊन निघाला होता. स्वतंत्र भारताच्या रणसंग्रामात अग्रगण्य राहिलेले गांधी, नेहरु, टिळक, आगरकर इथं चालले नाहीत. लोहपुरुष सरदार वल्लभभाई पटेल, क्रांतीसिंहनाना पाटील, स्वामी रामानंदतीर्थ यांसारख्या नेत्यांच्या

मार्गदर्शनाखाली फुलचंद गांधीच्या नेतृत्वाखाली स्वातंत्र्य सेनानी एकवटले. चिलवडीच्या रामभाऊ जाधवासारख्या एका शेतकऱ्याच्या पोराने कणखर भूमिका घेत रझाकारी वृत्तीला कडाडून विरोध केला. नाईचाकूरपासून ईटपर्यंत स्वातंत्र्य लढ्यातील घटनांचा मागोवा घेतला तर हा लढा या अर्थाने वेगळा आहे की, या लढ्याचे नेतृत्व सर्वसामान्य माणसांनी केले आहे. वरवर पाहता राजाविरुद्ध प्रजा याप्रमाणे या लढ्याचे स्वरूप असले तरी दुर्दैवाने राजा मुस्लिम आणि लढणारी बहुतांश प्रजा हिंदू असल्याने काहींनी या लढ्याला जातीयतेचे वळण देण्याचा प्रयत्न केला आहे. मात्र या लढ्यात अनेक राष्ट्रवादी मुसलमानांनीही भाग घेतलेला आहे हे विसरता येणार नाही. १७ सप्टेंबर, १९४८ ला हैद्राबाद संस्थान भारतात विलीन झाल्यानंतर मुस्लिमांच्याविरुद्ध प्रतिशोध झाला नाही. प्रतिशोध घेण्याचा प्रयत्न व्हायला लागला तेव्हा काँग्रेसचे कार्यकर्ते पुढे आले. उस्मानाबाद या ठिकाणी तर फुलचंद गांधी यांनी आपला राहता वाडा मुस्लिमांच्या स्त्रियांकरिता खुला करून दिला. त्यामुळे हैद्राबाद मुक्तिसंग्रामाचालढा हा स्वातंत्र्याचा लढा होता. हे जाणून घेतले पाहिजे.

हैद्राबादमधील एका अधिकाऱ्याचा शिकलेला मुलगा आपल्याच राजाच्या विरोधात लढण्याकरिता थेट उस्मानाबाद गाठतो आणि एका लढ्यात अपसिंग्यामध्ये शहीद होतो. अशा थोरांची थोरवी मांडण्याचे भाग्य लाभावे हा योगायोग आहे. पुस्तकाकरीता उस्मानाबाद जनता सहकारी बँकेचे मुख्य कार्यकारी अधिकारी मा.श्री.वसंतरावजी नागदे यांचे पुस्तकाला अर्थसहाय्य लाभले. त्यामुळेच माझा प्रयत्न पूर्णत्वास जात आहे. तर, श्री.संजय पाठक, श्री.अरुण खरसाडे व साधिक पटेल यांनी अक्षरजुळवणीच्या कामी मेहनत घेतली. कुटुंबाचे पाठबळ आणि अनेकांचे प्रोत्साहान यांचामुळे लेखनास गती आली. ज्यांनी ज्यांनी म्हणून या कामी मदत केली. त्या सर्वांचे शब्दसुमनाने आभार व्यक्त करतो.

पुस्तकाच्या माध्यमातून उस्मानाबाद जिल्ह्यातील स्वातंत्र्य संग्रामाचा इतिहास ऐतिहासिक दस्ताऐवज आधारित मांडला असून, वाचक म्हणून आपण 'हैद्राबाद मुक्तिसंग्रामात असे झुंजलो आम्ही' या पुस्तकाचे स्वागत कराल अशी अपेक्षा बाळगून पुस्तक आपल्या हाती देताना मनस्वी आनंद होत आहे.

प्रा.डॉ. सतीश सुखदेव कदम
उस्मानाबाद

# अनुक्रमणिका




हैद्राबाद संस्थानचा नकाशा

# स्वातंत्र्यसैनिकांचा इतिहास पुस्तकरूपात

## शासनामार्फत इतिहास लेखनाचे काम सुरू; तीन महिन्यांत होणार पुस्तक पूर्ण

प्रतिनिधी | उस्मानाबाद

लातूर आणि उस्मानाबाद जिल्ह्यातील पराक्रमी स्वातंत्र्यसैनिकांचा इतिहास आता पुस्तकरूपात जनतेसमोर येणार आहे. निजाम सरकारविरुध्द झुंज दिलेल्या स्वातंत्र्यसैनिकांचे कार्य पुढच्या पिढीला माहिती व्हावे. यासाठी शासनाच्या वतीने दोन वर्षांपासून इतिहास लेखनाचे कार्य सुरू आहे.

स्वातंत्र्यलढ्यातील आठवणी, लढ्याची माहिती आणि अनुभव या पुस्तकात असणार आहेत. निजाम राजवटीत लातूर हा उस्मानाबाद जिल्ह्यातला तालुका होता. या दोन्ही तालुक्यांसह मराठवाड्यात निजामांचा प्रभाव होता. निजामांच्या हल्ल्यात अनेक गावे बेचिराख झाली. अनेकांना आपले बलिदान द्यावे लागले. निजाम राजवटीत आपले शौर्य दाखवून विजयाचा झेंडा रोवणाऱ्या शरविरांचा समग्र इतिहास लिहिण्याचे काम गेल्या दोन वर्षांपासून सुरू आहे. दोन जिल्ह्यातील ५०० स्वातंत्र्यसैनिकांची माहिती पुस्तकात देण्यात येणार आहे. तुळजापूर येथील यशवंतराव चव्हाण महाविद्यालयाचे इतिहास विभागाचे प्रमुख प्रा. डॉ. सतीश कदम हे इतिहास लेखन करीत आहेत. या इतिहासामुळे पुढच्या पिढीला स्वातंत्र्य संग्रामाची माहिती लिखित स्वरुपात मिळणार आहे. लढ्यात सहभागी झालेल्या स्वातंत्र्यसैनिकांची भेट घेऊन त्यांचे अनुभव पुस्तकात मांडण्याचे काम सरू आहे.

# १. हैद्राबादच्या निजामशाहीची पार्श्वभूमी

मध्ययुगीन कालखंडात दख्खनचे पठार म्हणून ओळखल्या गेलेल्या मराठवाड्यावर फक्त निसर्गाचीच अवकृपा झाली, असे नाहीतर राजकीय बाबतीतही सुरुवातीपासूनच अन्याय सहन करावा लागल्याचे दिसून येते. तेराव्या शतकात संपूर्ण दक्षिण भारतातील एक वैभवशाली साम्राज्य म्हणून परिचित असलेले देवगिरीचे यादव घराणे अल्लाउद्दिन खिलजीने बुडवून टाकल्यानंतर मराठवाडाही परकीय सत्तेच्या आधिपत्याखाली गेला. आणि यावर कळस म्हणजे त्यानंतर पुढे १९४८ पर्यंत म्हणजे जवळपास ६५० वर्षे आपणास पारंतत्र्यात राहावे लागले.

यात मराठवाड्याचा महत्त्वाचा जिल्हा असलेल्या उस्मानाबादचाही समावेश असून या भागाने अन्य परकीय सत्तेबरोबरच निजामाचे जुलमी शासन अनुभवले. इ.स. १७२० ला सुरू झालेले हे शासन थेट १९४८ ला पायउतार झाले. हिंदुस्थान स्वतंत्र झालातरी हैद्रबादच्या निजामाची सत्ता चालूच होती. यावरून त्याच्या ताकदीचा अंदाज येतो. परंतु हे सर्व काही सहजासहजी घडलेले नाही. कुठलीही बलशाही सत्ता उलथून टाकणे हे आवाहानात्मक काम असून याकरिता अनेकांनी आपल्या प्राणांची बाजी लावली.

हैद्राबाद या ठिकाणाहून सत्ता चालविणाऱ्या निजामाचे साम्राज्य आंध्र, कर्नाटक,तेलंगना आणि मराठवाडा मिळून सोळा जिल्ह्यांत पसरलेले असून हे साम्राज्य उलथून टाकण्यासाठी स्वातंत्र्य सैनिकांनी जो लढा उभा केला, त्याला 'हैद्राबादचा मुक्तिसंग्राम' असे नाव पडले आहे. हैद्राबादच्या रणसंग्रामात ज्यांनी आपल्या प्राणांची बाजी लावली,अशा स्वातंत्र्यवीरांची कहाणी नव्या पिढीसमोर जावी या उद्देशाने उस्मानाबाद आकाशवाणीच्यावतीने 'असे झुंजलो आम्ही ' नावाची मालिका प्रसारित करण्यात आली. या मालिकेला लोकांनी उदंड प्रतिसाद दिला. त्यातूनच पुढे या पुस्तकाला मूर्त स्वरूप आले.

हैद्राबाद मुक्तिसंग्रामाला आपण मराठवाडा मुक्तिसंग्राम हा शब्द वापरून याला छोटे करू नये. कारण आपण ज्या मराठवाड्यात राहतो त्या भागापुरता हा लढा मर्यादित नसून याची व्यापकता ही मराठवाड्याबरोबरच आंध्र प्रदेश, उत्तर कर्नाटकापर्यंत पसरलेली होती. निजामाचे साम्राज्य सर्वदूर पसरलेले असलेतरी त्याची राजधानी हैद्राबाद या ठिकाणी असल्यामुळे निजाम राजवटीला पदच्युत करण्यासाठी जो लढा उभा केला त्याला हैद्राबाद मुक्तिसंग्राम हे नाव अधिक समर्पक ठरलेले आहे. या मुक्तिसंग्रामात अनेकांचा त्याग आहे.

चंदनाने झिजावे, काट्याने रिझावे,
हे ज्याचे त्याचे कामच आहे.
काट्यांवर चालून न विव्हळता पुढे जाणे,
हा तर मानवाचा धर्मच आहे.

या उक्तीप्रमाणे साडेसहाशे वर्षे या परिसरातील मानवाने हालअपेष्टा सोसत आपला धर्म सांभाळला हे त्याचे पहिले आद्य कर्तव्य कौतुकास्पद आहे. कारण हातोड्याप्रमाणे एकामागून एक सत्ता या परिसराच्या मानगुटीवर सतत आक्रमण करत होत्या. अशा प्रसंगी आपला संयम राखत अनेक पिढ्यांच्या पिढ्या गारत झाल्या. परंतु कुठल्याही घटनेसाठी काळ यावा लागतो. नाही तर भिंतीवरील नकाशा फाडून वास्तवातला भूभाग नष्ट होत नाही किंवा एखादा भूभाग नष्ट झालातरी आपोआप नकाशा बदलत नाही. म्हणून वर सांगितल्याप्रमाणे काळ यावा लागतो. हा काळ, १७ सप्टेंबर १९४८ च्या रूपाने अवतरला. परंतु सर्वसामान्यपणे आपली अशी समजूत आहे की, अखिल हिंदुस्थानच्या स्वातंत्र्यानंतर एका वर्षानंतर आपण स्वतंत्र झालो, याला कारण काय असावे ?

स्वातंत्र्याच्या वेळी संपूर्ण भारतात जवळपास ५६५ छोटीमोठी संस्थाने असून हैद्रबादच्या निजामाचे साम्राज्य हे भारतातील सर्वांत मोठे आणि सर्वांत श्रीमंत साम्राज्य होते. अशा या साम्राज्याचा या ठिकाणी विचार करत असताना हैद्राबाद येथून राज्यकार करणाऱ्या निजामशाहीविषयी थोडीफार माहिती असणे आवश्यक आहे. किंबहुना यातूनच आपणांस स्वातंत्र्य लढ्याच्या दाहकतेचा अंदाज येऊ शकतो. आपण नेहमी या भागावर मोगलाईचे राज्य होते असा जो शब्द वापरतो तोही चुकीचा असून येथे राज्य होते मोगलांचा एक सरदार

निजामाचे. याचा अर्थ निजाम हे कोणा व्यक्तीचे नाव नसून ती एक पदवी आहे. मोगल बादशहा औरंगजेबाच्या मृत्यूनंतर त्याच्या मुलाची राजकारणावरील पकड ढिली झाली. त्यामुळे मोगलांचा दक्षिणेतील सुभेदार मिर कमरुद्दीन याने १७२० साली मोगलांच्या सत्तेला जुगारून हैद्राबाद या ठिकाणी स्वतंत्र साम्राज्य निर्माण केले.

त्यानुसार मोगल बादशाहा औरंगजेबाचा एक सरदार मीर कमरुद्दीनने निजाम उल्मुल्क ही पदवी लावून घेतलेली असून निजाम या शब्दाचा अर्थ होतो, विभागाची किंवा देशाची सेवा बजावणारा. त्यानंतर त्याला आसिफजाह हा किताब मिळाला. त्यामुळे पुढच्या सर्वच निजामांनी स्वत:ला निजाम आणि आसिफजाह या पदव्या कायम ठेवल्या. तर या घराण्याला आसफजाही घराणे म्हणूनच ओळखले जाते. आसफजाही घराण्यात एकूण सात निजामांनी आपला राज्यकारभार केला असून पोलीस कारवाईच्या वेळी शेवटचा सातवा निजाम मीर उस्मानअलीखान हा कारभारावर होता. आसफजाही घराण्यातील पहिला ते सातवा निजामाचा कार्यकाल पुढीलप्रमाणे मांडता येईल.

**राज्यकारभाराची पदवी, मूळ नाव व कार्यकाल**

१. निजाम उलमुल्क पहिला

कमरोउद्दीनखान आसफजाह

३१ जुलै, १७२० ते १ जून, १७४८

२. नासिरजंग

मीर अहमंद अलीखान

१ जून,१७४८ ते १६ डिसेंबर,१७५०

३. मुजफ्फरजंग

मीर हिदायत मुहीउद्दीन सालउद्दौला

१६ डिसेंबर,१७५० ते१३ फेब्रुवारी,१७५१

४. सलाबतजंग

मीर सईद मुहम्मदखान

१३ फेब्रुवारी १७५१ ते ८ जुलै, १७६२

५. निजाम उलमुल्क दुसरा

मीर निजाम अलीखान

८ जुलै,१७६२ ते ६ ऑगस्ट, १८०३

६. सिंकदरजाह आसफजाह तिसरा

मीर अकबर अलीखान

६ ऑगस्ट,१८०३ ते २१ मे,१८२९

७. नासिरउद्दौला आसफजाह चौथा

मीर फरकौंदा अलीखान

६ ऑगस्ट,१८०३ ते १६ मे ,१८५७

८. असफउद्दौला आसफजाह पाचवा

मीर तहनियात खान

१६ मे,१८५७ ते २६ फेब्रुवारी,१८६९

९. आसफजाह सहावा

मीर मेहबूब अली

२६ फेब्रुवारी, १८६९ ते  ३१ ऑगस्ट,१९११

१०. आसफजाह सातवा

मीर उस्मानअलीखान सिद्दीकी

३१ ऑगस्ट, १९११ते १७ सप्टेंबर, १९४८

अशा या निजामशाहीची स्थापना १७२० साली मूळचा अफगाणीस्तानातील समरकंद बुखारा येथील रहिवाशी असलेल्या मीर कमरुद्दीनने केली असून तो मोगलांचा दक्षिणेतील सुभेदार होता. १७२० ला सुरू झालेली ही राजवट थेट १९४८ पर्यंत म्हणजे २२८ वर्षे चालली. निजामाचा कारभार सुरुवातीला औरंगाबाद येथून चालत असून त्यानंतर त्याने हैद्राबादेत आपले स्वतंत्र राज्य निर्माण केले. एका बाजूला आपण मोगलांचे सुभेदार म्हणायचे आणि दुसऱ्या बाजूला स्वतंत्र राज्याची निर्मिती करायची ही नीती वापरत निजामाने पुढे इंग्रजांनाही झुलवत ठेवून या देशातील अनेक संस्थाने बुडालीतरी आपले अस्तित्व कायम राखले.

१९४१ च्या जनगनणेनुसार या राज्याचे क्षेत्रफळ ८२ हजार ६९४

चौरस मैल इतके असून त्याची लोकसंख्या २२ हजार ३६० खेडयात मिळून १ कोटी ६३ लाख ३८ हजार ५३४ एवढी होती. यामध्ये ८५ % हिंदू आणि फक्त १२ % मुस्लीम होते. तर बोलीभाषेनुसार हैद्राबाद प्रांतातील लोकांची संख्या याप्रमाणे होती.

तेलगू - ४८.२ %
मराठी - २६.४ %
कन्नड - १२.३ %
उर्दू - १०.३ %

निजामाचे साम्राज्य हे आंध्र, तेलंगणा, मराठवाडा आणि कर्नाटका या तीन भागांत पसरलेले असून महसूल व्यवस्थेकरिता औरंगाबाद, गुलबर्गा, वरंगळ आणि मेदक हे महसुली विभाग पाडून यांची विभागणी १६ जिल्ह्यांत करण्यात आलेली होती. या चार विभागांत जिल्ह्यांची विभागणी पुढीलप्रमाणे करण्यात आलेली होती.

१. औरंगाबाद - औरंगाबाद, बीड, नांदेड आणि परभणी
२. गुलबर्गा - गुलबर्गा, बिदर, उस्मानाबाद आणि रायचूर
३. मेडक - मेहबूबनगर, मेडक, नलगोंडा आणि निजामाबाद
४. वरंगल - अलियाबाद, करीमनगर, वरंगल आणि हैद्राबाद

यात महत्वाची बाब म्हणजे या १६ जिल्ह्यांत १४ जिल्ह्यांचे कलेक्टर हे मुस्लिम होते. तर ७५ % मुस्लिमांची संख्या असलेल्या निजाम लष्करातील एकूण १,७६५ अधिकाऱ्यांपैकी १,२ ६८ अधिकारी मुस्लीम होते. निजामाच्या राज्यात तेलगू, मराठी आणि कन्नड या भाषा बोलल्या जात असल्यातरी एकूण लोकसंख्येच्या फक्त १० % मुस्लीम असलेतरी राज्यकारभाराची भाषा ही उर्दू होती. फक्त हा विषय भाषेपुरता मर्यादित नव्हता तर संख्येने कमी असूनही प्रशासनात मात्र मुस्लिमांना वरचे स्थान होते. निजाम राजवटीतील कर्मचाऱ्यांची संख्या पाहिल्यास याचा अंदाज येऊ शकतो. खातेनिहाय कर्मचारी आणि त्यांचा धर्म याप्रमाणे होता.

| प्रशासकीय विभाग | हिंदू कर्मचारी | मुस्लिम कर्मचारी |
|---|---|---|
| १. सचिवालय | १६ | ५४ |
| २. अर्थविभाग | १५ | २६ |
| ३. महसूल | २० | १९६ |
| ४. न्यायालय | १२ | १३६ |
| ५. पोलीस आणि कारागृह | १३ | ४० |
| ६. शिक्षण | ५३ | १८३ |
| ७. आरोग्य | ४५ | ४१ |
| ८. सार्वजनिक बांधकाम | ३४ | ६२ |
| ९. इतर | ४० | १२६ |

या हिंदूमध्ये पुन्हा ९० % कर्मचारी हे ब्राह्मण समाजाचे होते. त्यामुळे सर्व बाजूंनी इथला बहुजन समाज होरपळून गेला होता. याच निजाम राजवटीत मराठवाड्यातील औरंगाबाद, परभणी, नांदेड, बीड आणि उस्मानाबाद हे पाच जिल्हे होते. पुढे १९३१ च्या जनगणनेनुसार हैद्राबाद संस्थानातील १६ जिल्ह्यांतील लोकसंख्या याप्रमाणे होती.

| | | | |
|---|---|---|---|
| १. | हैद्राबाद शहर | – | ४,६६,८९४ |
| २. | करिम नगर | – | १०,९०३ |
| ३. | मेडक | – | ११,१५६ |
| ४. | महेबुब नगर | – | १३,३०० |
| ५. | औरंगाबाद | – | २९,२८८ |
| ६. | बीड | – | १४,८४० |
| ७. | गुलबर्गा | – | ४१,०८३ |
| ८. | रायचूर | – | २७,९१० |
| ९. | वरंगल | – | ६२,११९ |
| १०. | अलियाबाद | – | ०८,०९६ |
| ११. | निजामाबाद | – | १८,८०९ |

| | | | |
|---|---|---|---|
| १२. | नलगोंडा | – | ०९,७११ |
| १३. | नांदेड | – | २६,९२२ |
| १४. | परभणी | – | १६,८३० |
| १५. | बिदर | – | १५,१९८ |
| १६. | उस्मानाबाद | – | ११,२६६ |

तर १९४१ च्या जनगणनेनुसार मराठवाडा विभागाची लोकसंख्या ही ५२ लाख १९ हजार ५२८ एवढी होती.

अशारितीने या परिसरावर राज्यकारभार करत असताना अगोदरच तेलंगणामध्ये असलेल्या जमीनदारी पद्धतीला उत्तेजन देऊन इतर भागात निजामाने जाणीवपूर्वक जहागिरदारी पद्वत सुरू केली. एकूण क्षेत्रफळापैकी ४२ % क्षेत्र निरनिराळ्या जहागिरदारांनी व्यापलेले असून त्यांची संख्या ही ११६७ एवढी होती. जहागिरदारांना उत्तेजन देऊन आपला राज्यकारभार परस्पर चालावा हा त्यामागचा उद्देश होता. निजाम राजवटीला दोष देत असताना निजामाचे जहागिरदार म्हणून राहणाऱ्या आपल्याच लोकांनी सर्वसामान्यांना कशा प्रकारे छळले याचाही समाचार घेणे गरजेचे आहे. शेवटी राजा हा राजाच असतो. त्याने जर का लोकांच्या इच्छेविरुद्ध कारभार करण्यास सुरुवात केली तर वेळ येताच जनता ही आपली ताकद दाखवत असते. त्यासाठी १७ सप्टेबरची तारीख उजडायची होती.

आपण वर चर्चा केल्याप्रमाणे निजाम राजवटीत एकूण निजामांपैकी सहावा निजाम मीर मेहबूबअली हा काही अंशी उदारमतवादी धोरणाचा असून त्याच्याच कारकीर्दीत राजा किशनप्रसाद, चंदूलाल, राजे रायरायन, सालारजंगसारखे दिवाण होऊन त्यांनी मोठ्या प्रमाणावर सुधारणा घडवून आणल्या. राजा रायरायनचे मूळ नाव शामराज भालेराव हे असून ते मूळचे परंडा तालुक्यातील डोंजा या ठिकाणचे रहिवासी होते. निजामाच्या पदरी सेवा केल्याने त्यांना राजे रायरायन आणि राजे बहाद्दुर हे किताब मिळाले होते. कदाचित त्यांच्याच कालखंडात धाराशिवचे नामांतर उस्मानाबाद झाले. मुंबई, मनमाड, मद्रास यांसारखे रेल्वेमार्ग, हुसेनसागरसह अनेक मोठी धरणे बांधली, न्यायदानखाते, पोस्ट आणि तारखात्याची निर्मिती, स्वतंत्र विद्यापीठ, इंजिनिअरिंग आणि मेडिकल कॉलेज, १८५० ला मुंबई हैद्राबादसारख्या मुख्य रस्त्याची उभारणी असेल किंवा ८ ऑगस्ट, १९४१ ला उभी केलीली स्टेट बँक

ऑफ हैद्राबादची निर्मिती असेल.

कुठल्याही सार्वभौम सरकारप्रमाणे निजामाने २ ऑगस्ट, १८५८ पासून स्वत:चे स्वतंत्र चलन काढून त्याकरिता हैद्राबादेत टाकसाळ काढली. सुरुवातीच्या काळात काढलेल्या नाण्याला हाली सिक्का तर सोन्याच्या नाण्याला अश्रफी म्हणत. त्यांनतर काढलेल्या नाण्यावर चारमिनारचे चित्र असून त्यावर इंग्रजित च आणि ज ही अक्षरे कोरण्यात आली. च म्हणजे महेबूब आणि ज म्हणजे उस्मान.रुपयाचे नाणे चांदीचे असून त्यालाच बंदा रुपया म्हटले जाते. १ रुपयाचा १६ वा भाग म्हणजे १ आणा. याप्रमाणे पैश्यांची मोजदाद व्हायची. या टाकसाळीतून १/२ , १, २, ४, ८ आणे आणि १ तसेच २ पैसे याप्रमाणे नाणी पाडलेली होती. १९१८ साली निजामाने कागदी नोटा चलनात आणल्या. याकरिता भारतीय प्रशासनाकडून नाशिकच्या टाकसाळीचा वापर करण्यात आला. या नोटेवर उर्दू, तेलगू, मराठी, कन्नड आणि इंग्रजी भाषेतून त्याचे मूल्य लिहिलेले होते. याशिवाय नोटेवर सरकार अली हे शब्द लिहिल्याचे आढळून येते. कागदी नोटांत १, ५, १०, १०० आणि १००० यांचा समावेश होता. १ रुपयाचा १६ वा भाग निजाम राजवटीत मोजला गेला. म्हणून पूर्ण काम झाल्यावर 'सोळा आणे काम झाले' म्हणण्याची पद्धत रूढ झाली. याबाबीची चर्चा एवढ्याचकरिता की, निजामाने निर्माण केलेली ही यंत्रणा त्या कालखंडातील अन्य कुठल्याही संस्थानाकडे नव्हती. परंतु यातच हैद्राबाद संस्थानाची वाटचाल म्हणजे एका स्वतंत्र देशाच्या बीजाचे अंकुर होते.

याअगोदरच्या मुस्लिम शासकाच्या कारभारात शिस्त नव्हती म्हणून निजामाने सुरु केलेल्या या शिस्तबद्ध कारभारला जनतेचा सुरुवातीला पाठिंबा लाभला.निजामापूर्वी कधीही आक्रमणे होऊन पिकेच्या पिके नामशेष होत होती, अशा या मोगलांचे शासन जाऊन आता निजामाचे शासन आले होते. एकदा कर भरला की पुन्हा निवांत श्वास घेता येत होता. म्हणून जुन्या कालखंडात निजामाचे शासन बरे असे म्हणणारी माणसे होती. परंतु हा काळ जास्त दिवस चालला नाही. कारण संपूर्ण जग स्वातंत्र्याकडे वाटचाल करत असताना निजाम राजवटमात्र राजेशाहीच्या रूपाने एका स्वतंत्र धार्मिक राज्याचे स्वप्न साकारायला निघालेली होती.

निजामउल्मुल्क आसिफजाह या पदवीने राज्यकारभार करणाऱ्या हैद्राबाद संस्थानात एकूण सात निजामांत सर्वांत जास्त काळ म्हणजे १९११ ते

१९४८ याप्रमाणे राज्यकारभार करण्यास मिळाला तो म्हणजे शेवटचा आणि सातवा निजाम मीर उस्मानअली जंगबहाद्दुरला. मूळच्या हिंदू असणाऱ्या जोहरा बेगमपासून याचा जन्म झालेला असून अतिशय संघर्षातून त्याला हे पद मिळालेले होते. आपला राज्यकारभार सुरळीतपणे चालावा म्हणून आपणाशी एकनिष्ठ राहणाऱ्यांना त्यांने मोठमोठ्या जहागिऱ्या देऊन टाकलेल्या होत्या. त्यामुळेच मराठवाड्यात बऱ्याचठिकाणी हिंदूप्रमाणेच मुस्लिमांतही देशमुख आडनाव लावणारे अनेक जहागिरदार दिसतात. धाराशिवचे उस्मानाबाद हे नामांतर याच उस्मान अलीच्या नावावरून झालेले आहे. निजामाच्या सत्तेपेक्षा जहागिरदारांचा रुबाब मोठा होता. यांच्याकडून मिळणाऱ्या सारा व नजराण्यातून निजामाचे वार्षिक उत्पन्न पंधरा कोटींच्यावर होते.

जहागीरीत सर्फेखास, पायगा आणि जहागिर संस्थान हे प्रकार असून सर्फेखास म्हणजे निजामाच्या स्वत:च्या खाजगी खर्चाकरिता लावून देण्यात आलेले उत्पन्न होय. यामध्ये एकूण जहागिरीच्या १० % अतिशय सुपीक जमीन या सर्फेखासमध्ये मोडत होती. हैद्राबाद संस्थानाअंतर्गत एकूण २२,४५७ खेड्यांपैकी १३,९६१ गावे दिवाणी जहागिरीत तर १९६१ गावे हे सर्फेखास मध्ये मोडत होती. त्यानुसार निजामाच्या जहागिरीत ६,५३५ गावांचा समावेश होता. उस्मानाबाद जिल्ह्यातील एकूण जमिनीच्या ४१% जमीन ही निजामाच्या मालकीची होती. यात औरंगाबाद जिल्ह्यातील खुलताबाद, सिल्लोड आणि पाटोदा तर उस्मानाबाद जिल्ह्यातील उस्मानाबाद, कळंब आणि परंडा या गावातील जमिनीचा समावेश करण्यात आलेला होता. एकंदरच या सर्फेखासमध्ये मराठवाड्यातील सर्वांत जास्त जमिनीचा समावेश करण्यात आला होता. सर्फेखासमधून निजामाला दरवर्षी १५ कोटी रुपयाचे उत्पन्न मिळत होते. दुसरी पायग्याची जहागीर म्हणजे मराठ्यांचा सेनापती धनाजी जाधवाचे वंशज चंद्रसेन पुढे निजामाला मिळाले व त्यांनी स्वत:चे मोठे स्थान निर्माण करून संरक्षणासाठी अनेक ठिकाणी घोड्यांच्या पागा उभा केल्या. परंतु पुढे हीच मंडळी परत एकदा स्वराज्यात दाखल झाली तेव्हा त्यांची ही जहागीर जप्त करण्यात आली. या जहागीरीलाच पायग्याची जहागिर म्हटले जाऊ लागले. या पायग्यात उस्मानाबाद जिल्ह्यातील गुंजोटी, लोहारा आणि लाड सांगवीचा समावेश होता. अर्थातच चंद्रसेन जाधवाची जहागीर म्हणजे पायगा.

या जहागिरीबरोबरच आपल्याशी एकनिष्ठ राहणाऱ्यांना त्याने

वेगवेगळ्या प्रकारची दानपत्रे देऊन टाकलेली होती. यात यौमिया, मामूल, सालाना, वजीफे, रुसूम, तहरीर, चांदरात, सरमदेही, सरीजवाल, दसबंद, खलकाना, मोहराना आणि माफी यांचा समावेश करण्यात आलेला होता. पैकी आपल्याकडच्या देशमुख, देशपांड्यांना रोख स्वरूपात जी रक्कम दिली जात होती त्याला रुसूम म्हटले जात होते. सर्वसामान्याकडून निजामशासन ठरवेल तो महसूल जमा करायचा आणि त्या बदल्यात निजामाकडून ठरावीक रक्कम मिळवायची यातच ही मंडळी स्वत:ला मोठे समजत होती. या महसूलात अनियमितता आल्यास त्यांचे देशमुख देशपांडेपण काढून घेण्यात येत असलेतरी त्या बदल्यात त्यांना ठरावीक रक्कम रुसूम म्हणून देण्यात येत होती. अशा प्रकारची मंडळी पुढे दुसऱ्याकडे कामाला राहिलीतरी आपणाला रुसूम मिळतोय म्हणून मोठ्या अभिमानाने सांगत फिरत होती हे विशेष आहे.

सुरुवातीला राज्यकारभाराची भाषा ही फारसी असलीतरी पुढे निजामअलीच्या काळात फारसीऐवजी उर्दूला राज्य भाषेचा दर्जा देण्यात आला. १९२२ पासून हैद्राबादचा स्वातंत्र्यदिन साजरा करण्यात येऊ लागला. १९२१ पासून निजामाने जनतेवर अनेक कडक निर्बंध घालण्यास सुरुवात केली. त्यानुसार सार्वजनिक सभा संमेलन, प्रवचने, मिरवणुका, व्यायामशाळा, खाजगी शाळा, ग्रंथालये यावर बंदी घालणारा कायदा करण्यात आला. या कायद्याला गश्ती निशान ५२ आणि गश्ती निशान ५३ या नावाने ओळखले जात होते. खरेतर हिंदूच्या दृष्टीने तो एक काळा कायदाच होता. कारण या कायदयामुळे सर्वसामान्यांच्या मुलभूत हक्कावर गदा येणार होती.

राज्यकारभाराबरोबरच शाळेतही उर्दूचेच शिक्षण दिले जाते होते. खरेतर या शाळा म्हणजे मदरसे होते. या शाळेची रचना याप्रमाणे करण्यात आलेली होती.

मदरसे तहतानिया – प्राथमिक शाळा ( १ ते ४ )

मदरसे वस्तानिया – पूर्व माध्यमिक शाळा ( ५ ते ७ )

मदरसे फोकानिया – माध्यमिक शाळा (८ ते १० )

आज आपण पहिली, दुसरी, तिसरी म्हणतो. त्यानुसार निजाम राजवटीत प्रत्येक वर्गाला वेगळे नाव होते. त्याचा वर्ग आणि नाव याप्रमाणे होते. १ ली – म्हणजे अव्वल, दुसरी – दुय्यम, तिसरी – सुअम, चौथी – चहारूम, पाचवी – पंचम, सहावी – शशूम, सातवी – हफ्तूम, आठवी –

हशतूम, नववी – नहूम आणि दहावीला दहूम तर ११ वीच्या वर्गाला साल ए अव्वल आणि १२ वीसाठी साल ए दुवम म्हटले जायचे. यालाच इंटर म्हणजे बारावी म्हटले गेले. त्यानंतर पुढे उच्च शिक्षण घेतले जायचे. कुठल्याही जातीतील मुलाला प्राथमिक शिक्षण हे मोफत देण्याची व्यवस्था करण्यात आली होती. शिक्षणाला महत्त्वाचे स्थान असलेतरी ब्राह्मणाशिवाय इतरांना शिक्षणामध्ये तेवढी रुची नव्हती. फक्त सातवी केलीतरी मास्तरची नोकरी मिळायची. विशेष म्हणजे केवळ सातवी केल्यानंतर कायद्याची पदवी घेऊन वकिली करता यायची. मराठा जातीचाच विचार केला तर नरसिंगराव देशमुख काटीकरांच्या रुपाने पहिला वकील तयार व्हायला १९४० चे साल उजडावे लागले. हा शिक्षणाचा पाया होता.

शाळेत जाण्यासाठी पोषाखही निजामी पद्धतीचा म्हणजे पायघोळ झब्बा आणि डोक्यावर रूमी टोपी घालावी लागायची. एवढेच नाहीतर शाळेत सार्वजनिकपणे जी प्रार्थना म्हटली जात होती , त्याचा आढावा घेतल्यास निजामाच्या राज्यकारभाराचा अंदाज येऊ शकतो. त्यातील शब्दरचना खालीलप्रमाणे होती.

निजामवुल्मुल्क उस्मानअली खाँ आसिफे साबे
सिराजे दिने इस्लामी अमिरे मोमीनां तू हो

याचबरोबर सरकारी नोकरदार आणि शिक्षक आणि पोलिसांनाही मुस्लिम बनावटीचा पेहराव घालावा लागत होता. त्यानुसार लांब झब्बा आणि डोक्यावर तुर्रानी टोपी ही सर्वांच्याच डोक्यावर तुऱ्यासह घातलेली दिसून येत होती. मोहर्रमसाठी आठवडाभराची सुट्टी असायची आणि जर चुकून दसरा किंवा रामनवमी मोहरमच्या दरम्यान आल्यास हिंदूनी आपले सण स्थगित करून ते या सणानंतर साजरे करण्याचा वटहुकूम काढण्यात आलेला होता.

त्याला इंग्रजांची भारताविरुद्ध फूस असल्याने निजाम राजवटीची वाटचाल एका स्वतंत्र मुस्लिम राष्ट्राकडे सुरू झालेली होती. परंतु निजाम राजवटीची उभारणीच मुळी मोगलांच्या फसवणुकीतून झालेली होती. स्वत:ला स्वतंत्र राज्याचे राजे समजणारा निजाम खऱ्या अर्थाने इंग्रजांचा मांडलीक होता. इंग्रजांनी निजामासाठी वार्षिक ५० लाखाचा तनखा ठरवून दिलेला होता. तरीपण इंग्रजांनाही धोका देऊन आपले स्वत:चे स्वतंत्र राज्य निर्माण करण्याचे त्याचे स्वप्न कायम होते. एवढेच नाहीतर उस्मानअलीला युनोत जाण्याची तीव्र

इच्छा होती, ती सरदार वल्लभभाई पटेलांमुळे धुळीस मिळाली होती. १९१४ ते १८ च्या दरम्यान झालेल्या पहिल्या महायुद्वात निजामाने इंग्रजांची बाजू घेत तुर्कस्तानसारख्या मुस्लीम राष्ट्राचाही विचार केला नाही, एवढेच नाहीतर या युद्वात ब्रिटिश सैनिकांसाठी आपल्या मशिदीतून जाहीररित्या प्रार्थना केल्या गेल्या. त्यामुळे इंग्लडच्या पंचम जॉर्जने निजामाला 'हिज एक्झॉल्टेड हायनेस'हा बहुमान दिला. यामागे इंग्रजांची मर्जी संपादन करण्याचा त्याचा डाव होता. परंतु इंग्रज हे शेवटी व्यापारी होते. युद्ध संपताच त्यांनी निजामाकडे लक्ष देऊन त्याच्यावर अंकुश ठेवण्यासाठी राज्यकारभार मंडळ नियुक्त करून त्यावर आपल्या मर्जीतील पंतप्रधान नेमले. त्यामुळेच सर अली इमाम, महाराजा किशनप्रसाद, अकबरहैदरी यांच्यासारखे पंतप्रधान त्याच्यावर लादले गेले.

आज हैद्राबादच्या निजामाचे राज्य कुठपर्यंत होते हे सांगायचे झाल्यास ज्या गावात तुम्हाला राहाट असलेला पाण्याचा आड दिसतो. तो गाव निजामाकडे होता हे समजावे. जवळपास १८८५ साली तयार करण्यात आलेले हे आड आजही अतिशय सुस्थितीत असून निजाम हा दडपशाही करणारा असलातरी सध्याच्या लोकशाहीतील गैरकारभारामुळे जुने लोक आतापेक्षा निजाम राजवट बरी म्हणतात. झटपट कोर्टाचे निकाल लागायचे. कार्यालयात बसणारे कारकून जातीने मुस्लीम असलेतरी येणाऱ्या माणसाला आयो पटेल ! अशा शब्दात बोलायचे. खरेतर हा शब्द आपणाला अंतर्मुख करायला लावणारा आहे. एक पैशाचा भ्रष्टाचार नव्हता,प्रशासनावर अधिकाऱ्याचा धाप होता. त्यामुळे सर्वसामान्य माणसाला न्याय मिळायचा. आजच्या शासनाची यासी तुलना केल्यामुळे म्हातारी माणसं यापेक्षा निजामाचे राज्य बरे होते म्हणतात. हे वाक्य आपणाला अंतर्मुख करायला लावते.

अशा रितीने १७२० सालापासून सुरू झालेली ही निजामशाही भारतदेश स्वतंत्र झालातरी सुरूच होती. आपल्याच देशातील एक भाग पारतंत्र्यात असून लोकशाहीसाठी आसुसलेल्या लोकांना देशपातळीवरील आंदोलनांनी प्रेरणा दिली. एका बाजूला इंग्रजांची निष्ठा ठेवत आपले स्वतंत्र अस्तित्व जपणाऱ्या निजामाने स्वातंत्र्यानंतर युनोपर्यंत जाऊन आपल्या स्वतंत्र देशाची कल्पना चालूच ठेवलेली होती. यातच देशपातळीवर उच्च शिक्षणाचे वारे वाहायला लागले होते. हैद्राबादसारख्या ठिकाणी याची मोठी सोय झालेली असल्याने आपला तरुण त्या ठिकाणी जाऊन शिक्षणाच्या माध्यमातून स्वातंत्र्याचेही धडे

घ्यायला लागला होता. अशाच शिकलेल्या लोकांनी स्वातंत्र्याचे स्वप्न पाहून आपले विचार लोकांपर्यंत पोहोचविण्यास सरुवात केली. याचे लोण प्रत्यक्ष हैद्राबादमध्ये तयार होऊन ते उस्मानाबादपर्यंत यायला वेळ लागला नाही.

एका स्वतंत्र देशाच्या स्वप्नासाठी आपल्याच धर्मातील लोकांचा वापर करून धर्माचे राज्य आणण्याचे अमिष दाखविणारा शेवटचा निजाम मीर उस्मानाअलीखा जंगबहाद्दूरने पोलीस कारवाईनंतर याच धर्मबांधवांना त्याने वाऱ्यावर सोडून दिले. यावरून निजामाची स्वार्थी वृत्ती समजून येईल. धर्माचा आधार घेऊन कुठलेही शासन फारकाळ टिकू शकत नाही याचे हे उत्तम उदाहरण आहे. देशातील सर्वात बलशाही संस्थान निजाम राजवटीला उलथून टाकणे हे महाकाय आव्हान वाटते तेवढे सोपे नव्हते. आईबापांचे स्वप्न साकारण्यासाठी उच्च शिक्षण घेऊन पैसे कमवावे अशी सर्वसामान्यांची भावना असते. मात्र स्वत:च्या घरावर तुळशीपत्र ठेऊन ज्या स्वातंत्र्यवीरांनी अखंड हिंदुस्थानच्या स्वातंत्र्यासाठी आपल्या प्राणांची बाजी लावली त्यांचे स्मरण करणे आपले आद्य कर्तव्य ठरते.

***

# २. सातवा निजाम उस्मानअली

हैद्राबादच्या निजामशाहीची सत्ता ही आसिफजाही घराण्याकडे असून, १७२४ ते १९४८ या कालखंडात या घराण्याने आपली सत्ता राबविली. त्यानुसार आसिफजाही घराण्यात एकूण ७ निजाम झाले. पैकी शेवटचा आणि ७ वा निजाम हा मीर उस्मान अली खान सिद्दीकी असून, उस्मानअलीची कारकीर्द १९११ ते १९४८ अशी जवळपास ३७ वर्षांची असून, त्याची कारकिर्द ही सर्वार्थाने गाजलेली होती. कारण जगातील सर्वांत श्रीमंत व्यक्ती म्हणून त्याची ख्याती झाली, तेवढीच ख्याती त्याच्या कंजूषपणाची झाली. उस्मानअलीच्याच नावाने धाराशिवचे नामकरण उस्मानाबाद असे करण्यात आले तर याच्याच काळात १७ सप्टेंबर, १९४८ ला भारताने पोलीस कारवाई करून निजामशाही संपुष्टात आणली. राजकारणाबरोबरच त्याच्या वैयक्तिक जीवनातील अनेक किस्से ऐकल्यानंतर जगातील मानवजातीत कशा प्रकारचे लोक असू शकतात याचे वेगळे उदाहरण म्हणजे मीर उस्मानअली.

एखाद्या माणसाचे वर्णन हे त्याच्या कौटुंबिक पार्श्वभूमीवर अवलंबून असते, सहावा निजाम मीर महेबूब अलीखान बहादूर याला अनेक बायका असूनही बरेच दिवस अपत्य नव्हते. त्यानंतर जोहरा बेगम नावाची एक हिंदू स्त्री महेबुबअलीच्या जनानखान्यात दाखल झाली. तिच्यापासून ६ एप्रिल, १८८६ रोजी उस्मानअलीचा जन्म झाला. त्यामुळे जन्मापासूनच उस्मानअली हा अनौरस होता. उस्मानअली अनौरस असला तरी नशिबवान होता. कारण युवराज म्हणून त्याला गादीवर बसविण्यापर्यंत सहाव्या निजामाला दुसरा मुलगा झालेला नव्हता. मात्र त्यानंतर पुढे लग्नाच्या बायकोपासून महेबुबअलीला अनेक मुले झाली. परंतु एकदा गादीवर बसविण्यावर त्याला कसे काढावे हा प्रश्न निर्माण झाल्याने आपल्या बापालाच नको असलेला उस्मानअली आपला पिता महेबुबअलीच्या निधनानंतर १९११ साली हैद्राबाद या ठिकाणी निजामशाहीच्या

गादीवर बसून पुढे ३७ वर्षे त्याने निजामशाहीचा गाडा चालविला.

उस्मानअलीचे पहिले लग्न दुल्हनपाशा बेगमसोबत होऊन तिच्यापासून आझम आणि मोझमजहा ही दोन मुले आणि शाहाजादी पाशा नावाची कन्या होती. आपल्या दोन मुलांचे विवाह त्याने तुर्कस्तानच्या खलिफाच्या दोन मुली दुर्देशावर आणि निलोफर यांच्याशी लावून दिले. त्यांच्या माध्यमातून जगातील मुस्लिमांचा खलिफा होण्याचे स्वप्न त्याने बाळगले होते. आपली औरस मुलगी शहाजादी पाशाचे लग्न मात्र शेवटपर्यंत लावून दिले नाही. अर्थात निजाम राजवटीत आपल्या मुलीचे लग्न लावून देण्याची जणू पद्धतच नव्हती. कारण आसिफजाही घराण्यातील सातही निजामाचा असा समज होता की, आपल्या मुलीपासून मूल झाल्यास त्यामुळे आपल्या जिवाला धोका संभवतो. साहजिकच उस्मानअलीने आपल्या औरस मुलीचे लग्न करुन दिले नाही. शिवाय अनौरस मुलीपासून झालेल्या नातवाचेही त्याने तोंड पाहिले नाही. अशा रितीने कुटल्याही निजामाने मुलीपासून झालेल्या नातवाचे तोंड कधीच पाहिले नाही.

दुल्हनपाशा बेगमेबरोबरच निजामाचे इतर ६ विवाह झाले. याशिवाय निजामाच्या जनानखान्यात इतर ४२ स्त्रियांचा भरणा होता. यामध्ये लैला नावाची एक बाई निजामाची सर्वांत लाडकी होती. या बायकापासून उस्मानअलीला ५० मुले, ४६ नातवंडे, १६ सुना आणि ४४ दासीपुत्र झाले. काही पुस्तकात निजामाच्या एकूण मुलांची संख्या १४९ सांगितली आहे. हा गाडा चालविण्याकरिता निजाकाकडे २५ हरकारे म्हणजे वैयक्तिक काम करणारी मुले व १००० नोकरांचा ताफा ठेवलेला होता.

उस्मानअली हा अनौरस असल्याने त्याला स्वकीयांकडून मानाची वागणुक मिळत नसावी. त्यामुळे तो संशयी आणि एकलकोंडा बनला होता. त्याची अशी समजूत झाली होती की, आपली आई जोहराबेगमशिवाय या जगात आपले कोणी नाही. म्हणून तो रोजच्या रोज आईच्या भेटीसाठी जायचा आणि तिलाही मुलाशिवाय इतरांनी सन्मानाची वागणूक दिली नाही. आपल्या आईच्या भेटीसाठी जाण्याचा नित्यक्रम त्याने कधी चुकविला नाही. एवढेच नाहीतर जोहराच्या मृत्यूनंतर तिची छानशी कबर बांधली. या कबरीचे दर्शन घेण्याचे निजामाने कधी चुकविले नाही. त्यामुळे एका अर्थाने तो फार मोठा मातृभक्त होता.

निज़ाम म्हटल्यानंतर आपल्यापुढे फार मोठी प्रतिमा उभी राहते. मात्र

सातवा निजाम प्रकृतीने अत्यंत सामान्य असून, उस्मानअलीची उंची नाममात्र साडेपाच फूट असून, त्याचे वजन ४५ किलो होते. नोकरचाकरांचा ताफा सतत त्याच्याभोवती असायचा. हजारो सरकारी नोकरांबरोबरच निजामाचे काही खास नोकर होते. घरामध्ये बाहेरच्या पुरुषमंडळीला अजिबात प्रवेश नव्हता. याकरिता आपल्या घराचेही त्याने २ भागात विभाजन केलेले होते. किंबहुना हीच पद्धत बहुतेक अमीर उमरावांच्या घरी होती. त्यानुसार घराचे जे दोन भाग केलेले होते, त्याला जनाना आणि मर्दाना म्हटले जायचे तर खाजगीमध्ये काही खास नोकर होते. त्यांची कामे पुढीलप्रमाणे होती.

१. चोपदार – रखवालदारी

२. शागीरपेशा– खाजगी नोकर

३. खासा बारदार – स्वयंपाकी

४. अब खासा बारदार– पाणी देणारा

५. कमलदान बारदार – पैसे वाहतूक करणारा

६. हुक्का बारदार–हुक्का सांभाळणारा

आईच्या कबरीचे दर्शन आणि दर शुक्रवारचा नमाज त्याने कधी चुकविला नाही. आपल्या राज्यातील बहुसंख्य जनता ही हिंदू असल्याची त्याला जाणीव होती. म्हणून तो हिंदूचे सण साजरा करण्याकरिता यायचा मात्र गाडीच्या खाली मात्रकधी उतरायचा नाही.

सत्तेवर आल्यानंतर उस्मानअलीने हळूहळू करून आपली स्थिती मजबूत करायला सुरुवात केली. त्याचे वडील महेबुब अलीचे सरकारी निवासस्थान फलकनुमा पॅलेस होते. त्या ठिकाणी इतरांकडून मिळणाऱ्या वागणुकीमुळे उस्मानअलीने स्वत:चे निवासस्थान किंग कोठी या ठिकाणी ठेवले होते. याच्या नावाचाही काही इतिहास आहे. कमलखान नावाच्या सरदाराने स्वत:साठी एक निवासस्थान बनविले. याचे बांधकाम करताना कमलखानाने स्वत:च्या नावावरून कमलखान म्हणजे K K या शब्दाचा वापर करून खिडक्या, दरवाजे यांचा आकार त्यानुसार केलेला होता. त्यामुळे इमारतीकडे पाहिल्यानंतर आपणास सहजपणे घघ ही अक्षरे दिसतात. ही इमारत निजामशाहा उस्मानअलीच्या दृष्टीस पडली तेव्हा मामुली किंमत देऊन त्याने ती विकत घेतली. परंतु इमारतीवर सर्वच बाजूंनी K K ही अक्षरी असल्याने उस्मानअलीने

या इमारतीचे नाव ठेवले 'किंग कोठी' पहिल्यापासून शेवटपर्यंत उस्मानअली याच इमारतीत वास्तव्याला राहिले. किंग कोठीवर सातव्या निजामाची पूर्ण हयात गेली. याच ठिकाणाहून आला हजरतने आपल्या ताब्यातील १६ जिल्ह्यात असणाऱ्या १,८६,५५,१०८ लोकसंख्येवर अधिराज्य गाजविले. आयुष्यभर संपत्ती जमा करणे एवढाच छंद असणाऱ्या उस्मानअलीने आपल्या हयातीत जवळपास १०० मिलीयन डॉलरची संपत्ती जमा केली. २०१२ च्या डॉलरशी त्याच्या संपत्तीची तुलना केल्यास ती संपत्ती २२,९९,६३ बिलीयन डॉलर होते. त्यामुळे जगातील श्रीमंताच्या यादीत निजामाचा ६ वा क्रमांक लागत होता. त्यामुळे जगातील अनेक मान्यवर निजामाला भेटण्यासाठी येत असत. संपत्ती आणि उपभोग या दोन भिन्न गोष्टी भिन्न असतात. आज निजामाचे ९६ वंशज या संपत्तीचे शापित आहेत. १९४७ साली उस्मानअलीने लंडनमधील नेस्टवेस्ट बँकेत १० लाख पौंड रोख आणि बरेच जडजवाहीर ठेवले होते. त्याची किंमत काढणे कदाचित फार कठीण आहे. निजामाचा नातू मुकर्रम जाह २००७ साली याविषयी पंतप्रधान मनमोहनसिंगाला भेटले होते; परंतु याकरिता भारत आणि पाकिस्तान या दोन्ही देशांच्या पंतप्रधानांच्या सह्या पाहिजे असल्याने निजामाच्या संपत्तीचा प्रश्न मागे पडला. तरीपण निजामाची संपत्ती हा नेहमीच चर्चेचा विषय ठरला आहे.

जुलै, २०१३ मध्ये वर्तमानपत्रात निजामाच्या एका हिऱ्याची बातमी आली होती.त्यानुसार सातवा निजाम उस्मानअलीच्या वापरातील एक हिरा प्रिन्सी त्याच्याच काळात विकला होता. सध्या एका कंपनीकडे असलेला प्रिन्सी नावाचा हा गुलाबी हिरा तब्बल २१२ कोटीला विकला गेला. निजामाच्या वापरात असे कितीतरी हिरे असावेत. अहो! निजामाचा टेबलावरील पेपरवेटही एका हिऱ्याचा होता. हा पेपरवेट जैकब नावाच्या हिऱ्याचा असून, जैकबची आजची किंमत ३५० कोटीपेक्षा अधिक होते. या हिऱ्याची कहाणी मोठी रोचक आहे. अलेक्झांडर मालकम जैकब नावाचा एक व्यापारी मूळचा इटालीचा असून त्याने आफ्रिकेच्या खाणीतून एक हिरा आणला. त्या वेळी त्याचे वचन १८४.७५ कॅरेट म्हणजे ३९.९ ग्रॅम असून त्याची मूळ किंमत १ कोटी २० लाख होती. परंतु इ.स.१८९० साली त्याला कोणी गिऱ्हाईक मिळत नव्हते. त्यामुळे सहावा निजाम महबुबअलीने हा हिरा घ्यावा म्हणून भरपूर प्रयत्न करण्यात आले. त्यामुळे हिऱ्याची किंमत पडली आणि महबुबअलीने फक्त ४६ लाखात

तो हिरा खरेदी केला. परंतु हिरा भारतात आणण्याचा खर्च म्हणून २० लाख रुपये घेण्यात आले. म्हणजे एका अर्थाने हा हिरा अर्ध्या किंमतीत विकला गेला होता परंतु याविषयी बरीच चर्चा झाली आणि इंग्रजांनी याबाबत आक्षेप घेतल्याने हे प्रकरण कलकत्त्याच्या कोर्टात गेले. आणि निजामाला तो हिरा परत मिळाला. सहावा निजाम महबुबअली या हिऱ्याला फारच जपून ठेवत होता. त्याने तो आपल्या बुटात लपवून ठेवल्याने निजाम वारल्यानंतर हा हिरा शोधण्यासाठी बरीच मेहनत घ्यावी लागली होती. अशा या हिऱ्याचे नाव जैकब ठेवण्यात आले होते. सातवा निजाम उस्मानअली जैकबचा वापर आपल्या टेबलावरील पेपरवेटसारखा करत होता. तो आज कुठे आहे याची कल्पना नाही. आज हैद्राबादमध्ये जैकबची प्रतिकृती घ्यायची म्हटल्यास ४०० रुपये मोजावे लागतात असे अनेक हिरे निजामाच्या जवाहीरखान्यात होते. इतर सोन्या-नाण्याची मोजदाद नाही.

भारतातील ५६५ संस्थानात हैद्राबादच्या निजामाचे घराणे सर्वात श्रीमंत असून, २ ऑगस्ट, १८५८ साली निजामाने स्वत:चे चलन सुरू केले होते. त्यात हाली, शिक्का आणि अश्रफी ही नाणी महत्वाची असून, इतर नाणी तांबे, ॲल्युमिनीअम आणि चांदीची तर अश्रफी सोन्याचे नाणे असायचे. इ.स.१९१८ साली निजामाने स्वत:चे कागदाचे चलन सुरू केले. या नोटांची छपाई आपल्या नाशिकमध्ये व्हायची. निजामाच्या प्रत्येक नोटेवर सरकारअली हे शब्द लिहिलेले असायचे. शिवाय नोटेची किंमत तेलगु मराठी, कन्नड, उर्दू आणि इंग्रजी अशा पाच भाषेत लिहिलेली होती. निजामाचे चलन भारतीय चलनाच्या मानाने नेहमीच कमी किंमतीचे असलेतरी शेवटच्या निजामाने १९४७ साली भारताच्या चलनावर बंदी आणली होती. निजाम कालखंडात १ रुपये किंमतीचा चांदीचा बंदा रुपया फारच प्रसिद्ध होता. आपल्या भागात तुळजापूर हे एक असे गाव होते की, ज्या ठिकाणी जवळपास सर्वच संस्थानांचे चलन चालत होते. आपल्या आर्थिक व्यवस्थेकरिता सातवा निजाम उस्मानअलीने ८ ऑगस्ट १९४१ साली स्टेट ऑफ हैद्राबाद नावाने हैद्राबाद संस्थानची स्वतंत्र बँक सुरू केली.

हैद्राबाद संस्थानमध्ये शिक्षणाचे माध्यम हे उर्दू असून, उच्च शिक्षणाकरिता हैद्राबादला जावे लागत होते. उस्मानाबाद जिल्ह्यातील वाशीचे कल्याणराव कवडे हे जहागिरदाराचे पुत्र शालेय जीवनात उस्मानअली खानाचे

मित्र असल्याने सातवे निजाम उस्मानअली वाशीच्या जहागीरदाराकडे आले होते. तसा उस्मानाबाद आणि उस्मानअलीचा संबंध जुनाच आहे. त्याच्या नावावरूनतर धाराशिवचे नामकरण उस्मानाबाद झाले. हा भाग तर आहेच शिवाय तुळजापूरच्या श्री तुळजाभवानी मंदिरात पुजारी पनाचा वाद मिटवून हे मंदिर सरकारी नियंत्रणाखाली आणून २ मार्च, १९०९ ला 'देवल ए कवायत' नावाचा कायदा केला. त्याचाच वारसा सातव्या निजामाने पुढे चालू ठेवला. त्यानुसार तुळजाभवानी संस्थानचा पदसिद्ध अध्यक्ष म्हणून जिल्हाधिकारी काम पाहत असले तरी १९४८ पर्यंत उस्मानाबादचे सर्व कलेक्टर हे मुस्लीम असल्याने मंदिरातील व्यवस्थापक हा धर्माने हिंदू असावा असा कायदा केलेला आहे.

निज़ाम घराण्याने प्रशासनात मुस्लिमांना झुकते माप दिले असलेतरी तुळजाभवानीच्या बाबतीत हस्तक्षेप केल्याचे दिसून येत नाही. उलट चंद्रसेन जाधव, रावरंभा निंबाळकरसारख्या हिंदू सरदारांकडेच तुळजापूरची जहागिरी सोपविली. तुळजापूरमधील भवानी रोड किंवा शिवाजी पुतळ्याकडे जाणारा रोड हा निजाम काळातच तयार झालेला आहे. मंदिर ते शिवाजी पुतळा हा रस्ता तर कदम पाटलांच्या वाड्याच्या अगदी मधूनच तयार केलेला आहे. विशेष म्हणजे कदम घराण्याकडे निजामाची माले पाटीलकी होती. नवरात्र महोत्सवात संपूर्ण तुळजाभवानी मंदिराला रोषणाई केली जायची तर निजामाचा दिवाण चंदूलालच्या नावाने सुरू केलेला दुपारचा नेवैद्य आजही माधवराव कुतवळ यांच्याकडून नियमितपणे दिला जातो. १९४७-४८ ला तुळजापूरचे तहसिलदार सय्यद महंमद काद्री असून, त्यांच्या कालखंडातही देवीच्या पालखीला पहिला खांदा मुसलमानांचा होता तर आजही देवीच्या मस्तकी बसविला जाणारा पानाचा टोप हा तांबोळ्याच्या पानाचा आहे. या प्रथा निजामाच्याच काळात सुरू झालेल्या आहेत. छबिना निघाल्यानंतर व्यवस्थेकरिता निजाम पोलीसही असायचे. लोकांच्या गर्दीला पुढे रेटण्याकरिता ते 'आगे बढियो' असे शब्द वापरायचे. ते आजही वापरतात तर मुख्य भाग म्हणजे स्वातंत्र्यापर्यंत देवीची मुख्य पुजा झाल्यानंतर 'अटलबादशहा की जय' म्हणण्याची पद्धत होती. त्यामुळे निजाम आणि उस्मानाबादचे नाते ध्यानात येऊ शकते. गुंजोटी, लोहारा ही निजामाच्या वैयक्तिक जहागिरीची गावे आहेत.

१९११ साली उस्मानअलीने कारभार हाती घेतल्यानंतर एका स्वतंत्र देशाप्रमाणे कारभार करण्यास सुरूवात केली होती. त्या कालखंडात

महसुलामध्ये जमिनीपासून मिळणारा महसूल हा उत्पन्नाचा मुख्य स्रोत असून, इतरही अनेक खात्याचा कारभार चोख होता. १९३५ ची एक आकडेवारी निजामाच्या कारभारावर प्रकाश टाकण्याकरिता पुरेशी आहे.

| | मुख्य खाती | उत्पन्न (हजारात) | खर्च (हजारात) |
|---|---|---|---|
| १) | महसूल | ३,३५,५७ | ६७.४५ |
| २) | अबकारी | १,९६,१९ | ३६.९० |
| ३) | कस्टम | १,०४,६७ | २०,७४ |
| ४) | वन | १४,०८ | १०,१५ |
| ५) | नोंदणी | ३,३२ | १,७६ |
| ६) | स्टॅम्प | २०,४६ | ९७ |
| ७) | टपाल | १३,२७ | १३,९६ |
| ८) | रेल्वे | १,०४,०० | १,५७ |
| ९) | कायदा न्याय | २,३४ | २३,६५ |
| १०) | पोलीस | २,२६ | ६५,७५ |
| ११) | लष्कर | ७०,३६ | ७१.६६ |
| १२) | शिक्षण | ४,९३ | १,०३,७६ |
| १३) | आरोग्य | ९२ | २८,१७ |
| १४) | प्रशासन | १,०१ | ४,२०० |
| १५) | सार्वजनिक बांधकाम | १,०६ | ६८,२१ |
| १६) | नगरपालिका | ५,७२ | २०.८५ |
| १७) | शेती | ३५ | ८,०६ |
| १८) | पशू वैद्यकीय | ११ | ४.७६ |
| १९) | सहकार | ७ | ४,२२ |
| २०) | औद्यौगिक | ६२ | ३,८८ |
| २१) | खनिज | ३,९५ | ३९ |

उस्मानअलीच्या महसूल व्यवस्थेवर नजर मारल्यास दरवर्षीच्या उत्पन्नाचा अंदाज येतो. तर त्याचे वैयक्तिक जहागिरीतून मिळणारे उत्पन्न हे

जवळपास १५ कोटी रुपयांचे होते. त्यामुळे जगातल्या श्रीमंतात जायला निजामाला विशेष कष्ट घ्यावे लागले नाहीत. महसूल जमा करण्याकरिता निजामाच्या १६ जिल्ह्यांत एकूण ५०० च्यावर जकात नाके होते. त्यापासून मिळणारे उत्पन्न हे करोडच्या घरात असल्याने त्यांना 'करोडगिरी नाके' म्हटले जात होते. या जकातीबरोबरच उस्मानअलीचे सर्वात मोठे उत्पन्नाचे साधन म्हणजे 'सिंदीची बने'. नदीकाठी मोठ्या प्रमाणावर सिंदीची झाडे असायची. तुमच्या वैयक्तिक मालकीच्या शेतात इतर झाडेजरी तुमच्या मालकीची असली तरी सिंदीचे झाडमात्र निजामाच्या मालकीचे होते. त्याचा लिलाव करून मिळणारे उत्पन्न सरकारी तिजोरीत जात होते. त्याचबरोबर अफू, गांजा आणि दारुचे ठेके देण्याची पद्धत उस्मानअलीच्या काळात सुरू असली तरी तो वैयक्तिक सर्व व्यसनांपासून दूर होता. पैशाशिवाय निजामाला कुठलेही व्यसन नव्हते.

शालेय शिक्षणात गावपातळीपर्यंत प्राथमिक शाळांची निर्मिती झालेली होती. त्या कालखंडात प्रत्येक धर्मातील गरिबासाठी प्राथमिक शिक्षण हे मोफत दिले जात होते. शाळेत अभ्यासक्रमाचे माध्यम उर्दु असून बहुसंख्य शिक्षक हे मुस्लिम असले तरी शाळेच्या पहिल्या दिवशी वर्गामध्ये सरस्वतीची पूजा करुन शाळेला सुरुवात व्हायची. शाळा सुरू होण्यापूर्वी उस्मानअली निजामाला दुवा मागणारी प्रार्थनामात्र राजेशाहीचे प्रतीक होते.

एनकेन प्रकारे आपली सत्ता टिकवून ठेवणे हे निजामाचे ध्येय राहिले. १९३९-४५ या दरम्यान झालेल्या दुसऱ्या महायुध्दात निजामाने इंग्रजांची बाजू घेतली. विशेष म्हणजे इंग्रज हे मुस्लिमांचा तुर्कस्तानातील खलिफाबरोबर लढत असतानाही निजामाने इंग्रजांना मदत केली. पैसा, सैन्य आणि आपल्या मशिदीत इंग्रजाकरीता प्रार्थना करून सर्वप्रकारची मदत केली. त्यामुळे निजामाला इंग्रजाकडून 'हीज एक्झालटेड हायनेस फेथफुल अलॉय!' हा सर्वोत्कृष्ट किताब देऊन गौरव केला होता. त्यानंतर दोनच वर्षानंतर हैद्राबाद संस्थानला जगातील एक मुस्लीम राष्ट्र बनविण्याचे स्वप्न याच उस्मानअलीने पाहिले. यावरून त्याचा संधीसाधूपणा ध्यानात येऊ शकतो. तर त्यानंतर जगातील मुस्लिम जगतात आपल्याला सर्वोच्च स्थान मिळविण्यासाठी याच निजामाने खलिफाच्या दोन्ही मुली आपल्या सुना म्हणून घरी आणल्या होत्या.

उस्मानअली हा कट्टर धार्मिक असून दर शुक्रवारी न चुकता नमाज

पठण व्हायचे. आमल्याकडे कितीही श्रीमंती असलेतरी देवापुढे आपण लहानच असल्याची त्याची समज कायम होती. कुठल्याही कार्यालयात गेल्यानंतर निजामाला तोफांची सलामी दिली जायची. १९३५ साली निजाम उस्मानअली गुलबर्ग्याच्या हजरत ख्वाजा बंदे नवाजच्या उरसाला दर्शनासाठी गेले असता तेथील पोलीस सलामी देण्यासाठी पुढे आले असता निजामाने यासाठी मनाई केली आणि त्यांना सांगितले की, अरे मी स्वत:च अल्लाला नमस्कार घालण्यासाठी आलो आहे आणि तुम्ही मला काय सलामी देता आहात? झुकायचे असेल तर त्याच्यापुढे झुका. याप्रकारचे वेगळेपण त्यांच्यात होते.

सातवा निज़ाम उस्मानअली खान आपल्या ३७ वर्षांच्या कारकीर्दीत एका बाजूला जगातील सर्वात श्रीमंत माणूस गाजला तर त्याच वेळी तो आपल्या कंजुषीने सर्वांच्या कुतुहलाचा विषय ठरला. करोडोची संपत्ती बाळगणाऱ्या उस्मानला सर्फेखास म्हणजे वैयक्तिक जहागिरीतून वार्षिक १५ कोटी येत असले तरी त्याचा आठवड्याचा खर्च फक्त २० रुपये होता. आपले जेवण खानेसुध्दा वरच्यावर कसे भागेल यासाठी त्याची खटपट असायची. त्याच्या पूर्वजांनी एकदा अंगात घातलेला कपडा पुन्हा कधी वापरला नाही. मात्र हे अला हजरत एकच शेरवानी कित्येक वर्ष रफु करून वापरायचे. डोक्यावरील काळ्या गोंड्याची व लाल रंगाची फेजची टोपी तर तेलाने काळीकुट्ट झालेली असली तरी ती तशीच वापरायची. पैसे लागतात म्हणून उशिराने केस कापायचे हे नित्याचेच होते. एक साधी लाकडी खुर्ची टाकून तासन्‌तास व्हराड्यांत बसणे हा त्यांचा आवडता छंद होता. स्वत:ची खुर्ची स्वत:च उचलून ठेवणे आणि उचलणे हे वेगळेपण होते. खुर्चीचा दांडा तुटलातरी ती बदलली नाही. तीच अवस्था नमाजाच्या चटईची होती. पायातील चप्पल बिदरमधील मौला नावाच्या चांभाराकडून यायची. त्याला पैसे देण्याचा प्रश्नच नव्हता. पहिले पायतान फाटल्याशिवाय दुसरे घेणे नाही.

सदैव एकाकीपणा हा निजामाचा स्थायीभाव झाला होता. व्हरांड्यात बसून नेहमी राजकारण आणि संपत्तीचा विचार एकटाच करत राहणार. त्यामुळे नाटक, तमाशा यावर जवळपास बंदी होती. तो कधी हसला किंवा चार मित्रांसोबत गप्पागोष्टी करताना दिसला नाही. पुढे-पुढे 'सुबेह देकन' नावाच्या वृत्तमानपत्रात उस्मानअली स्तंभलेखन आणि कविताही करू लागला होता. राजकारण करताना त्याने जनतेवर जास्तीची बंधने घातली. त्यानुसार १९२१ चा

गस्ती निशाण नावाचे एक फर्मान होय. यातील कलम ५२ आणि ५३ नुसार कुठल्याही व्यक्तीला व्यायामशाळा, आखाडे, शाळा, सभा, संमेलन परवानगीशिवाय घेता येणार नाही असा कायदा केला.

वैयक्तिक पातळीवर निजामाचे वर्तन हे वेगळेच होते. निजामाला कुणी उन्हात किंवा पावसात भिजलेले आवडत नव्हते आणि यातून जर कुणी आजारी पडलेच तर त्याला लगेच सुट्टी मिळायची. त्यातही महत्त्वाची बाब म्हणजे जर घरातील कुणी आजारी पडले तर त्याचे जेवण बंद केले जायचे. त्यामुळे निजामाच्या मनात नेमके काय चालले आहे हे कोणालाच कळत नव्हते. असेच एकदा भेट देण्याकरिता म्हणून उस्मानअली खान हैद्राबादच्या उस्मानिया हॉस्पिटलमध्ये गेले असता तेथे त्यांना दोन्ही पायांनी अपंग असणारा एक तरुण दिसला. कुठल्यातरी  अपघातात त्याने आपले पाय गमावले होते. डॉक्टरांची भेट झाल्यानंतर निजामाने डॉक्टरांना त्या तरुणांवर उपचार करण्याची आज्ञा केली. तेव्हा डॉक्टरांनी त्यांना सांगितले की, पर्यायी अवयव बसविण्यासाठी आपल्याकडे कुठल्याही सुविधा नाहीत. हे ऐकून निजामाने त्याच ठिकाणी निर्णय घेतला आणि ताबडतोब ३० लाख मंजूर केले. त्यानुसार हैद्राबादमधील पंजागुजा भागात अपंगासाठी स्वतंत्र हॉस्पिटलची निर्मिती झाली. या दरवाखान्याचे वैशिष्ट्ये म्हणजे इथं अपंगावर मोफत उपचार केले जात होते. हे निजामाचे वेगळेपण पाहायला मिळते.

एका बाजूला उदारता तर दुसऱ्या बाजूला स्वत:साठी कमालीची काटकसर अशा दुहेरी विचारसरणीत निजामाच्या वर्तनाचा अंदाजच येत नव्हता. हिवाळ्याच्या दिवसांमध्ये हैद्राबादमध्ये फारच थंडीचे वातावरण असल्यामुळे निजामाने आपले जुने ब्लँकेट वापरायला काढले. तेव्हा निजामाच्या ध्यानात आले की, आपले ब्लँकेट जीर्ण झाले असून, काही ठिकाणी ते फाटलेले आहे. त्यामुळे नवीन ब्लँकेट घेण्यासाठी त्याने आपला खाजगी सचिव नवाब समदयार जंग बहादूरला रु.१५ दिले. म्हणजे निजामाला बाजारातल्या ब्लँकेटची किंमतही तंतोतंत माहिती होती. १५ रुपये घेऊन सचिव ब्लँकेट खरेदीसाठी बाजारात गेला. त्या वेळी सचिवाच्या ध्यानात आले की, १५ रुपये ही जुनी किंमत असून, सध्या त्याची किंमत १८ रुपये झाली आहे. त्यामुळे ३ रुपये घेऊन जाण्यासाठी सचिव निजामाकडे गेला. तेव्हा निजामाने त्याला सांगितले, बरीच भाववाढ झालेली दिसते त्यामुळे एवढे वर्ष मी आपली जुनीच ब्लँकेट वापरतो. नाहीतरी

या वर्षी त्यामानाने थंडी कमीच आहे. आणि खरंच निजामाने त्याच ब्लँकेटवर भागविले.

एका बाजूला त्याला कुंजूष म्हणता येईल तर दुसऱ्या बाजूला त्याच्या उदार धोरणाचे कौतुकच करावे लागेल. दिल्लीच्या जामा मशिदीचा इमाम उस्मानअलीला भेटण्यासाठी आले. इमामाने निजामाला मशिदीच्या बांधकामाविषयी माहिती देताना सांगितले की, जर आपण ४ लाख रुपये मदत केली तर मशिदीचा चतुर्थांस भाग फरशीने झाकून जाईल. निजामाने इमामाकडे पाहिले आणि त्यांना सांगितले की, आपण १६ लाख रुपये घेऊन जा आणि मशिदीची पूर्ण फरशी करून घ्या असे वेगळेपण त्याच्या वागण्यात होते.

इंग्रजांनी निजामाला नेहमीच आपल्या दबावाखाली ठेवण्याचा प्रयत्न केला. निजामाचे राज्य हे इंग्रजांच्या मेहरबाणीवर चालत असल्याचे त्यांनी वरचेवर दाखवून दिले. त्यामुळे १९४७ ला भारत स्वतंत्र झाल्यानंतर हैद्राबादचा घटनात्मक सल्लागार म्हणून काम करणारा वॉल्टर मॉक्टन हा दररोज १००० रुपये पगार उचलत होता परंतु याच निजामाने पहिल्या महायुद्धात इंग्रजांना आर्थिक मदतही केली आणि कर्जही दिले. त्यामुळे जगावर राज्य करणाऱ्या इंग्रजांना कर्ज देणारा पहिला संस्थानिक म्हणजे निजाम. १९४७ साली पाकिस्तानला तर हातोहात २० कोटी रुपयांची मदत निजामाने केली होती. ज्या इंग्रजांनी अखंड भारतावर राज्य केले त्या इंग्रजांचे क्षेत्रफळ इंग्लंड आणि त्याचा शेजारी देश स्कॉटलंड मिळून जेवढे होते त्यापेक्षा अधिक क्षेत्रफळ निजाम राजवटीचे होते. याचा अहंकार निजामाच्या मनामध्ये कुठेतरी शिल्लक असल्याचे त्यांच्या दैनंदिन वर्तनावरून दिसून येत होते.

निजामाकडे काही शाही पाहुणे आल्यानंतर जेवणासाठी एका विशेष हॉटेलमधून जेवण मागविले जात होते. पार्टी संपल्यानंतर जे शिल्लक राहिले त्याची पुढे विक्री व्हायची. पुढे पुढे तर नजराना घेण्यासाठी निजामाने पदव्या द्यायला सुरुवात केली. त्यानुसार निजामाने काझी अब्दुल गफार नावाच्या माणसाला खास ही पदवी देऊन सोबत जेवणाचे ताट पाठविले. खर तर निजामाच्या पदवीने तो आनंदी व्हायला पाहिजे होता परंतु पदवी घेऊन आलेल्या माणसाने बातमी देताच गफुर आपल्या पत्नीला जोरदार ओरडून म्हणाला, बेगम, जल्दीसे ४ रुपये आणि १ अश्रफी आणा. नाहीतर आपणाला घर सोडून कुठंतरी निघून जावे लागेल. बिचाऱ्याच्या घरात ४ रुपये सापडले परंतु

अश्रफी म्हणजे सोन्याचे नाणे घरात नसले तरी उच्चारीने शेजाऱ्याकडून मागून घेऊन निजामाच्या माणसाला परत पाठवून दिले. त्यानंतर निजामाने पाठवून दिलेले जेवणाचे ताट उघडून पाहिले तर दोन शिळ्या चपात्या आणि दोन नासके आंबे होते. राजाच्यापुढे बोलायचे कुणी? हाच खरा प्रश्न होता.

निजामाच्या हावरटपणाचेही अनेक किस्से आहेत. खरं तर राजाने जनतेला मोठ्या मनाने दान करायचे असते परंतु इथे उस्मानअलीची शिस्तच वेगळी होती. नजराण्याच्या स्वरूपातून जास्तीत जास्त रक्कम मिळावी म्हणून त्याने आपले दौरे काढून जागोजागच्या जहागिरदारांना नजराने देण्यास भाग पाडले. पुन्हा पुन्हा तर छोटेमोठे कार्यक्रम भरवून जहागीरदाराकडून ५ रुपये आणि सामान्य जनतेकडून २ ते ३ रुपये रोख स्वरूपात स्वत:च्या हातात पैसे स्वीकारायला सरुवात केली. एकदा असेच पैसे हातात घेत असताना ते पैसे पडून घरंगळायला लागले तेव्हा निजामाने आपल्या पदाचा विचार न करता गुडघ्यावर रांगत जावून पैसे पकडून शेवटी ते खिशात घातले.

दिसेल ते खिशात घालण्याची पद्धत तशी नेहमीचीच होती. लखनौचा एक व्यापारी असगरअलीने आपल्या शहरात अत्तराचे दुकान टाकण्याचा निर्णय घेतला. आपल्या दुकानाचे उद्‌घाटन निजामासारख्या नामांकित माणसाकडून केल्यास आपला मोठा फायदा होईल म्हणून त्याने निजामाला आमंत्रण दिले. निजामाने येण्याची तयारी दर्शविली तेव्हा एवढा मोठा माणूस आपल्या दुकानाचे उद्‌घाटन करण्यासाठी येताहेत म्हटल्यानंतर व्यापाऱ्याने दुकानाला सोन्याचे कुलूप आणि चांदीची चावी तयार करून ठेवली. चावीने कुलूप उघडून दुकानाचे उद्‌घाटन करायचे असा कार्यक्रम होता. भारतातील सर्वांत श्रीमंत माणूस लखनौ शहरात येताहेत म्हटल्यानंतर उद्‌घाटनासाठी शेकडो लोकांनी हजेरी लावली होती. ठरल्याप्रमाणे उस्मानअलीसाहेब अत्तराच्या दुकानाच्या उद्‌घाटनासाठी आले. निजामाने चांदीच्या चावीने सोन्याचे कुलूप उघडले.परंतु दुसऱ्याच क्षणाला सर्वजण अवाक् झाले होते. कारण कुलूप उघडल्यानंतर निजामाने ते आपल्या खिशात घातले होते. सर्वांना वाटले चुकून झाले असेल. तरीपण एवढ्या मोठ्या माणसाला ते मागायचे तरी कसे? उद्‌घाटन झाल्यानंतर निजामाने चांगले पन्नासएक हजाराचे अत्तर बांधून देण्याची मागणी केली. दुकानदाराला वाटले थोड्या दिवसांनी पैसे मागून घ्यावेत. पुढे अनेक वर्ष प्रयत्न करुनही निजामाने कुलूप सोडाच अत्तराचे पैसेसुद्धा दिले नाहीत. हे प्रकरण शेवटी

इंग्रजांच्या मध्यस्तीने मिटवून आपले पैसे काढून घ्यावेत म्हणून व्यापाऱ्याने भरपूर प्रयत्न केला परंतु निजामाला काही फरक पडला नाही. अशारितीने सर्वप्रकारचे प्रयत्न करूनही शेवटी व्यापाऱ्याला गप्प बसावे लागले. तर इकडे लखनौवरुन आणलेले अत्तर विकून निजामाने आपल्या तिजोरीत भर घातली.

एवढी प्रचंड संपत्ती ठेवायची कशी? हाही मोठा प्रश्न निजामापुढे उभा राहिला. तेव्हा घराच्या कोपऱ्यात भिंतीत आणि मोठ मोठ्या पेट्या करून त्यात ही संपत्ती ठेवली. घराचे मळकट पडदे उडायला लागले म्हणून पडद्यांना खालच्या बाजूला वजन राहावे म्हणून सोन्याचे वजनदार दागिने लटकाविण्यात आले. पैसे आणि दागिने ठेवलेल्या पेट्या कुणी हालवायला भाग नव्हता. त्यामुळे त्यावर धुळीचा थर चढलेला असायचा. पेट्यावरील धूळ हालली तर नाही ना? म्हणत धुळीवरूनच या ठिकाणी कोणी आले नव्हते याची निजामाला खात्री वाटायची. दिवसेंदिवस त्याच्या संपत्तीत वाढ व्हायला लागली तेव्हा ती ठेवण्यासाठी निजामाने एक खास ट्रक तयार करून घेतला. त्या ट्रकला आपल्या नजरेसमोर ठेवून त्यात पैसा आणि इतर जड जवाहीर ठेवले. त्याची चावी नेहमी आपल्या कमरेला अडकावून ठेवली. आपल्या घरातील मोत्यांना कधी हवा मिळाली नसल्याने ते खराब व्हायला लागले म्हणून दरवर्षी त्या मोत्यांना उन्हामध्ये वाळवण्याचा कार्यक्रम आखण्यात आला. त्या वेळी दिवसभर स्वत: उभे राहून छतावर जडजवाहीर वाळविण्याचा एक नवीन उद्योग निजामाने लावून घेतला. या संपत्तीमुळे निजामाच्या अनेक खोल्या भरल्या परंतु त्याचबरोबर त्यातून कोंदट वास फुकट सुरू झाला.

या बाबतीत निजामाच्या कंजूषपणाची पातळी एवढी घसरली की ऐकल्यानंतर आश्चर्य वाटायला नको. एकदा दतियाचा राजा निजामाला भेटायला आला होता. कुठलीही व्यक्ती भेटायला आल्यानंतर त्याने काहीतरी भेटवस्तू द्यावी ही निजामाची इच्छा असायची. आता या राजाकडून काय मागावे हा प्रश्न निर्माण झाला. तेव्हा कुणीतरी सांगितले की, दतियामध्ये गायी भरपूर असल्याने तेथे तूप मोठ्या प्रमाणावर तयार होते. हे ऐकताच निजामाने दतियाच्या महाराजांना तूप पाठवून देण्याची विनंती केली. एवढ्या मोठ्या माणसाचा आदेश असल्याने बिचाऱ्या राजाने मोठ मोठ्या पिंपांत भरुन तूप पाठविले. तूप म्हणजे मोठी किंमती वस्तू असल्याने ती जपूनच वापरावी लागते. उस्मानअलीने ते तूप स्वत: खाल्ले नाही की कुणाला खायला दिले नाही. घरात

ठेवून शेवटी त्या तूपाचा कुमठ वास यायला लागला. येणाऱ्याजाणाऱ्याला याचा त्रास सुरू झाला तरी निजाम निवांतच होता. त्यानंतर कुणीतरी सांगितले की तूप खराब झाले असून, त्याचा वास बाहेरपर्यंत येतो आहे. आता एवढी किंमती वस्तु फुकट फेकून द्यायचे म्हटल्यानंतर निजामाचे मन धजावत नव्हते त्याने आपल्या नोकराला बोलावून ते तूप कुठल्यातरी धार्मिक स्थळामध्ये विकण्यास सांगितले. वास्तविक पाहता त्या तुपाचा एवढा वास सुटला होता की कुणाला विचारायला गेले तरी त्या माणसाने अगोदर कानाखाली वाजविली असती. बिचाऱ्या नोकराची मोठी पंचायत झाली. त्याने संपूर्ण तूप घेऊन ते गावाबाहेर नेऊन गटारात फेकून दिले आणि स्वत:चे पैसे देऊन आपण तूप बाजारात विकल्याचे सांगितले. एवढी खराब वस्तूसुद्धा बाजारात विकून त्याचे पैसे मिळवून देणाऱ्या नोकराविषयी निजामाला मोठी सहानुभूती निर्माण झाली. आणि काय आश्चर्य! निजामाने त्याची बढती केली.

निजामाचा हळवेपणामात्र नेहमीच चर्चेचा विषय ठरला. एकदा तो आपल्या गाडीतून जात असताना त्याच्या गाडीला एका शेळीची धडक बसली. एखाद्या प्रांताचा राजा म्हटल्यानंतर त्याच्यासाठी ही गोष्ट किरकोळ होती. परंतु निजामाने तत्काळ आपली गाडी थांबविली आणि दवाखान्यात पाठवून शेळीवर इलाज केला. एवढ्यावरच ही गोष्ट थांबली नाही तर ही शेळी लंगडी झालीतरी निजामाच्या राजवाड्याभोवती नेहमी चरत असल्याचे अनेकांनी पाहिले. त्यामुळे शेवटपर्यंत रस्त्यावरच्या शेळीची काळजी घेऊन निजामाने आपली वेगळी ओळख दाखवून दिली होती.

झटपट निकाल आणि भ्रष्टाचारमुक्त प्रशासन असल्याने आजही जुनी मंडळी निजामाचे शासन आजच्यापेक्षा चांगलेच होते असे दावा करतात. नाही म्हणायला निजामाच्या कालखंडात खालील प्रेक्षणीय इमारती बांधल्या गेल्या. ज्या आजही हैद्राबादची शान आहेत. चोहमल्ला पॅलेस, पुराणी हवेली, किंग कोठी, हैद्राबाद हाऊस (नवी दिल्ली), महेबुब मेन्सन, फलकनुमा पॅलेस, बेला विस्टा, हिल कोर्ट पॅलेस, चिरान पॅलेस, सैफ्राबाद पॅलेस, आंध्र प्रदेश हायकोर्ट, जुबिली हॉल, असाफिया लायब्ररी, असेंब्ली बिल्डिंग, उस्मानिया आर्टस् कॉलेज, उस्मानिया मेडिकल कॉलेज यांचा समावेश आहे. सालारजंग हा निजामाचा सर्वांत हुशार आणि कर्तृत्ववान पंतप्रधान असून त्याच्याच कारकीर्दीत निजामशाहीत अनेक बदल आणि सुधारणा घडून आल्या.

सालारजंग म्युझियम पाहिल्यानंतर निजामाच्या वैभवाची साक्ष पटते.

शेवटचा निजाम उस्मानअलीच्या सन्माननीय पदव्यांचा अभ्यास केल्यानंतर त्याच्या महत्त्वाकांक्षेचा अंदाज येऊ शकतो. निजाम-उल-मुल्क असफजाह, हीज एझ्कॉलटेट हायनेस फेथफुल अलॉय रुस्तुम-इ-दौरान, अरास्तु-इ-झमान, लेफ्टनंट जनरल मुझफ्फर-उल-मुल्क वल ममालिक, मीर उस्मान अली बहादूर, फतेह जंग, निजाम ऑफ हैद्राबाद आणि बेशर शिपाय सालार याशिवाय अनेक इतरही पदव्या त्याने स्वीकारल्या होत्या. जगातील मुस्लीमांचा मसिहा बनण्याची निजामाची महत्त्वकांक्षा कधी लपून राहिली नाही. त्यामुळे 'मुसलमानो को तेरी सल्तनत मे निशान बाकी..' यासारख्या त्याच्या काव्यपंक्ती निजामाच्या मनोरथाचा अंदाज बांधण्यास पूरक ठरतात.

हैद्राबादच्या निजाम राजवटीचा अभ्यास केल्यानंतर १९३० पर्यंत कुठेही जातीय दंगल झाल्याचे आढळून येत नाही. पिराला मलिदा हिंदूचा, पोळ्याला बैलं पकडावी मुसलमान पोरांनी, डोल्यापुढे नाचावं ते सर्वांनीच.ही जातीय सलोख्याची समीकरण सर्वांनाच ठाऊक होती. नाही म्हटले तरी वर मान करण्यास हिंदूंना वावच नव्हता. एका बाजूला हैद्राबाद संस्थानात हिंदू महासभा आणि आर्य समाज यांच्या चळवळीने जोर पकडताच १९२७ साली बहादूरयार जंगांनी मजलीस तबलिघ-ए-इस्लाम नावाची संघटना स्थापन केली. याचेच रुपांतर त्यानंतर चखच मध्ये झाले. संस्थानात मुस्लिमांचे वर्चस्व वाढविण्यासाठी निजामाने बहादूरयार जंगचा खुबीने वापर करून घेतला. परंतु ज्या वेळी त्याचे वर्चस्व वाढायला लागले तेव्हा त्याच्या हुक्क्यात विष घालून त्याचा काटा काढला. हे काम निजामानेच घडवून आणल्याची सर्वत्र चर्चा झाली परंतु विचारणार कोणाला ?

दुसऱ्या महायुद्धानंतर जगभर स्वातंत्र्याचे वारे वाहत असताना निजामालासुद्धा स्वतंत्र हैद्राबाद देशाची स्वप्ने पडायला लागली. याकरिता त्याने नवनवीन चाली खेळल्या. कधी इंग्रज, कधी पाकिस्तान तर कधी लाचार हिंदूंना हाताशी धरले. दंग्याधोप्यांतून पाकिस्तानची निर्मिती झाली होती. बॅरिस्टर महंमदअली जीनासारखा सर्वसामान्य माणूस स्वतंत्र पाकिस्तानचा पंतप्रधान झाला. मग आपण तर वंशपरंपरेने सत्ताधीश आहोत ही निजामाची भावना होती. त्यामुळे पाकिस्तानला २० कोटी रुपयांची मदत करून त्याचा वापर करून घेण्याचा प्रयत्न केला. भारताचा विलीनीकरणाचा दबाव वाढायला

लागला तेव्हा युनोमध्ये हा प्रश्न उचलून धरण्यासाठी पाकिस्तानने बरीच मदत केली.

याचा अर्थ निजामापेक्षा पंतप्रधान जिना मोठे होते हे मानायला निजाम तयार नव्हता.असेच एकदा बॅरिस्टर महंमदअली जीना निजामाला भेटायला आले तेव्हा पाय पसरून ते सिगारेट ओढत होते. निजामाने जीनाकडे पाहून तीव्र शब्दात नापसंती व्यक्त केली आणि कडक शब्दात सुनावले. आपको मालूम है की, हम कौन है? अशा रितीने राज्य संपायला निघाले असतानासुध्दा निजामाचा रुबाब कायम होता.

पुढच्या माणसाचा वेळेनुसार वापर आणि काम संपल्यानंतर त्याचा काटा काढायचा ही निजामाची नीती होती. खरं तर सत्तेवर येण्याकरिता उस्मानअलीला दिवाण राजा किशन प्रसादांनी मोठी मदत केली होती. परंतु सत्तेवर येताच निजामाने त्यांना काढून टाकले. त्यानंतर १९१२ साली नवाबसाहेब युसूफअलींची आपल्या दिवाणपदी नेमणूक केली. हे युसूफअली म्हणजे तिसरे सालारजंग, सालारजंगाच्या घराण्यात तीन व्यक्ती महत्त्वाच्या पदावर बसल्या. निजामाकडून या घराण्याला सालार-ए-जंग म्हणजे युद्धाचा सेनानी हा किताब दिला होता. विशेष म्हणजे या घराण्याचा आणि तलवारीचा कधी प्रसंग आला नाही तरी बहुमान मात्र सालार-ए-जंग.

तिसरे सालारजंग निजामाचे दिवाण बनले तेव्हा त्यांचे वय फक्त २३ वर्षांचे होते. सचिवपदी नेमताना निजामाने त्यांना शिरपेच-तुर्रा-पगडी आणि पदकाबरोबर सोन्याचा पेन देऊन त्यांचा गौरव केला होता. हैद्राबाद संस्थानातील दोन जिल्हे सालारजंगाची जहागीर होती. त्यात अजिंठा लेण्याचा परिसरही मोडत होता. यातून वार्षिक २० लाख रुपये उत्पन्न मिळत होते. दरवर्षी १५ कोटींचे उत्पन्न मिळविणारा निजाम कंजुषपणाचा कळस होता तर त्याच वेळी सालारजंग तेवढाच उदार व्यक्तिमत्वाच्या.

जातीपातीचा विचार न करता अनेक गरीब विद्यार्थ्यांना त्याने शिष्यवृत्ती दिली. रोज शेकडो लोकांच्या पंक्ती त्यांच्याकडे जेवायला असत. शाही रहनसहन आणि अनेक युवतींचा गराडा त्यांच्याभोवती राहिलातरी बिचारे सालारजंग शेवटी अविवाहितच राहिले. लैला नावाच्या मराठी तरुणीवर निजामाप्रमाणे त्यांचेही प्रेम होते.

आपल्या समवयस्क दिवाणाचा निजामाला हेवा वाटायला लागला

आणि अगदी दोनच वर्षांत म्हणजे १९१४ साली निजामाने तिसऱ्या सालारजंगाला दिवाणपदावरून काढून टाकले. मानसिक स्वास्थ्य बिघडलेल्या या तरुण दिवाणाला डॉ. हंटरसारखा इंग्रज भेटला आणि त्यातून जगासाठी मोठा अनमोल ठेवा बाहेर आला.हंटरने त्याच्यात संग्रहाची आवड निर्माण केली आणि पायात भिंगरी बांधल्यागत सालारजंग नेपाळ, भुतान, ब्रह्मदेश, युरोप असे जगभरात फिरले आणि एक एक वस्तु जमा करुन त्याचा संग्रह करू लागले. निजाम आणि कासिम रझवीचे उद्योग हैद्राबाद संस्थानला बुडविणार असल्याचे त्यांनी ओळखले होते. खर बोलल्यानंतर अवघड असते म्हणून तेही नेहमी दहशतीच्या वातावरणात वावरत होते. भारताचे राजकीय प्रतिनिधी मुन्शींना त्यांनी निरोप पाठवून सांगितले की, हैद्राबादचा प्रश्न सोडविल्याशिवाय आपल्या सेना हटवू नका. वाइटाचा द्वेष करणारा हा अनोखा दिवाण निजामाची गच्छंती पाहिल्यानंतर दुसऱ्याच वर्षी २ मार्च, १९४९ ला वारला परंतु तोपर्यंत जगाला भुरळ घालणाऱ्या अनेक वस्तूंचा सालारजंगाने संग्रह केला. पंडीत नेहरूंनी पुढे याच सालारजंग म्युझियमचे उद्‌घाटन केले. आज ज्या ठिकाणी सालारजंग म्युझियम उभे आहे ते या नवाबसाहेबांचे राहते घर म्हणजे दिवाण देवडी. निजामाच्या द्वेषातून जगाला सालारजंगासारखा अनमोल ठेवा मिळाला.

नेहमी संशयाच्या भोवऱ्यात राहणाऱ्या निजामाला मुलावरही कधी विश्वास नव्हता. आझम आणि मोझमनी आपल्या खानदाणी शौकामुळे उगवता सुर्य कधी पाहिला नाही. दुपारी चार ते पहाटेपर्यंत यांचा कामकाजाचा दिवस राहिल्याने दुर्रेशावरसारखी सौंदर्यवती कायमची बाजूला झाली. निझाम गेला तर आपणही विजापूरच्या बडी बेगमसारखा राज्यकारभार करू असा फाजिल आत्मविसासी निजामाची बेगम दुल्हनपाशाला होता. त्यामुळे आपल्या पोरावरच तिने विषप्रयोग घडवून आणला होता. दुदैवाने काही घडले नाही. अशा प्रकारे बापाचा मुलावर विश्वास नाही तर आईचा नवऱ्यावर भरोसा नाही. अशा विचित्र विश्वासात निजामाचे कुटुंब वाढले. पुढच्या पिढीचा विचारही न करता आपली संपत्ती इंग्लंडच्या नेस्ट वेस्ट बँकेत टाकली. त्यामुळे मुकर्रबझासारखे ८० वर्षांचे अनेक नातू निजामाची संपत्ती मिळविण्याच्या नादात म्हातारे झाले आहेत.

१९४७ पर्यंत निजामाची बनवाबनवी अगदी जोरात चालली. हैद्राबाद स्वतंत्र होण्याची अभिलाषा बाळगत रझाकारांकडे त्याने डोळेझाक केली. पाकिस्तानप्रमाणे जातीय दंगे करून आपणही स्वतंत्र होवू या भावनेने शेवटचे

१३ महिने रझाकारांनी अक्षरश: हैदोस घातलातरी संस्थानातील ८५% हिंदू जनतेने संयम बाळगला. 'निजाम के कदमों में पटेल का शिर झुकवा देंगे',हे मार्चिंग साँग म्हणत रझाकारांची परेड निजामाला भारी वाटायची. भर बैठकीत संस्थानचा सेनापती अॅड्रुसला शिव्या देणाऱ्या कासिम रझवीविषयी त्याला विलक्षण आधार वाटला. संपूर्ण हैद्राबाद संस्थानात रझाकारांनी नंगानाच केला. हैद्राबाद शहरात इमरोजसारख्या पत्रकाराची हत्या निजामाच्या दहशतीचे प्रतीक होते. भारतीय फौजा हैद्राबादपासून ५ किमीवर आल्यातरी निजामाची आकाशवाणी केंद्रे आणि वृत्तपत्रे भारतीय सैन्यांची पिछेहाट होत असल्याच्या बातम्या देत होती. आपल्या हवेलीत बसून अधिकाऱ्यांनी सांगितलेल्या बातम्यावर विश्वास ठेवत निजामाची यद्ध मोहीम चालली होती. परंतु ज्यावेळी त्याच्या लक्षात आले की आपले काही खरे नाही. तेव्हा निजामाने आपला पंतप्रधान लायकअलीला राजीनामा द्यायला भाग पाडले. विशेष म्हणजे भारताशी युध्द खेळण्याकरिता त्यालाच जबाबदार धरण्यात आले. युध्द समाप्तीनंतर भारतीय सेना पुनर्वसनात गुंतली होती तेव्हा निजाम आपली संपत्ती वाचविण्याकरिता वेगवेगळ्या ट्रस्टची स्थापना करण्यात मग्न होता. याच वेळी आपल्या जिवाच्या भीतीने पंतप्रधान लायकअलीला बायकांचा पोषाख घालून पाकिस्तानात पळून जावे लागले. तिकडेच त्याचा अंत झाला. निजाम मात्र निवांतच राहिला.

मदतीच्या सर्व आशा संपल्यानंतर निजामाने आपले रूप दाखवायला सुरुवात केली होती. दिल्लीच्या लाल किल्ल्यावर आसिफजाही झेंडा फडकाविण्याचे स्वप्न बाळगताना रझाकाराचा प्रमुख कासिम रझवी परस्पर आपले काम करतोय म्हटल्यानंतर निजामाने त्याला खुले सोडले. रझाकारांची संघटना शासकीय नव्हती तरीपण प्रत्येक रझाकाराला प्रतिमाह ६० रुपये वेतन मिळत होते. 'दारे-सलाम' म्हणजे शांती सदन या कार्यालयातून कासिम रझवीने संपूर्ण हैद्राबाद संस्थानात अराजकता पसरविली होती. नेहरु आणि पटेलांनाही शिव्या घालायला तो कमी करत नव्हता.

कासिम रझवीचे लाड कशाकरिता सहन केले? तर आपल्या मनातील आकांक्षा तो परस्पर पूर्ण करत होता. परंतु भारताची फौज भुतासारखी मानगुटिवर बसली तेव्हा युद्धबंदी करताना निजामाने कासिम रझवीचा सल्लाही घेतला नाही. निजामाने परस्पर विनाअट शरणागती स्वीकारली. एवढेच नाही तर

युद्धबंदीवर बोलताना निजामाने स्पष्ट शब्दात भाषण ठोकले की, 'कासिम रझवीसारख्या कफल्लक माणसाच्या नादी लागल्याने माझे सुंदर राज्य गमावले'. अगदी आठवड्यापूर्वी स्वत:च्या सैन्यापेक्षा रझाकारांवर विश्वास ठेवणाऱ्या निजामाने वेळ येताच पलटी मारली. हैद्राबाद संस्थानात माजलेल्या अराजकतेला जणू कासिम रझवी पूर्णपणे जबादार असल्याचे जगाला दाखवून दिल्याने हैद्राबाद मुक्तिसंग्रामात कासिम रझवी खलनायक ठरला. तत्पूर्वी त्याला रोखण्यासाठी निजामाने कुठल्याही प्रकारची हालचाल केल्याचे दिसून आले नाही.

स्वत:च्या स्वार्थासाठी उस्मानअलीने कासिम रझवीचे भूत तयार केले, त्याला वाढविले. अंदाज पाहून त्याला वाऱ्यावर सोडून दिले. पंतप्रधान लायकअलीपेक्षा भयानक अवस्था कासिम रझवीची झाली. लातूर शहरातील न्यायालयाच्या बाजूला असलेले घर, पाखरसांगवी आणि खाडगाव शिवारातील जमीन तसेच इतरही भरपूर संपत्ती सोडून त्याला निजामासाठी हैद्राबाद आणि येरवडा या ठिकाणी १० वर्षांची शिक्षा भोगावी लागली. शेवटी शेवटी तर कासिम रझवीने हिंदू आणि मुस्लीम समाजाची माफी मागितली. ज्याच्यासाठी एवढे सारे केले, त्याने वाऱ्यावर सोडून दिले. आपल्या मुलाबाळांचे प्राण वाचविण्यासाठी सिडने कॉटन नावाच्या लष्करी हत्याराच्या तस्कराकडून त्याच्याच विमानातून आपली पत्नी, ५ मुले आणि ४ मुलींना त्याने पाकिस्तानात पाठविले. या सर्व घटना घडत असताना सत्तास्थानी असणाऱ्या उस्मानअलीने कासिम रझवीसाठी काहीच केले नाही. एक मुझाहिदीन म्हणून संपूर्ण आयुष्य त्याने कराचीत घालविले. पाकिस्तानात त्याला ना मान मिळाला ना सन्मान. गरज होती तेव्हा रझवीला डोक्यावर घेतले आणि गरज संपताच पायाखाली घातले. ही निजामाची कूटनीती शेवटपर्यंत त्याला कधीच समजली नाही. पाखरसांगवी ता.लातूर येथील कासिम रझवीची ५ एकर जमीन सरकाने ताब्यात घेतली. तहसीलच्यावतीने दरवर्षी या जमिनीला कसण्याचा लिलाव होतो. या जमिनीला लोक 'एकेरी' म्हणतात. ज्या एकेरीचा लिलाव आज दोन पाच हजारात जातो त्याचा मालक कधी काळी २ लाख रझाकारांचा पोशिंदा होता, हे सांगूनही पटणार नाही. त्यानुसार कासिम रझवीला जे दिवस आले त्याच्यामागे निजामाचे डावपेच होते. इंग्रज, पाकिस्तान, भारत, पोर्तुगीज व आपले सहकारी अशा सर्वांनाच त्याने खेळविले.

राजासाठी युद्ध खेळणाऱ्या प्याद्यांना निजामाने पायाखाली तुडविले. पंतप्रधान लायकअली, दोन लाख रझाकारांचा प्रमुख कासिम रझवी, सेनापती सय्यद अहमद अल ॲड्रुस, परराष्ट्रमंत्री झैनयार जंग, मजलिसचा प्रमुख बहादूर यार जंग, दिवाण किसन प्रसाद, सालारजंग अशा अनेक दिग्गजांना निजामाने आपल्या दिखामदार खेळीने चितपट केले. सरदार पटेल आणि नेहरूंना 'दिल्ली के बदमाश' म्हणणारा निजाम शेवटी त्यांच्यापुढे झुकला.

पटेलांना पुस्तके आवडतात म्हणून ती भेट पाठवून त्यांची सहानुभूती मिळविली. तर त्यांच्या आजारपणाची चौकशी करून हस्तीदंताची काठी बनवून ती पटेलांना भेट म्हणून दिली. असा संधीसाधूपणा त्याच्याकडे होता.

उस्मानअलीने भारत सरकारच्या सुरक्षा फंडासाठी पैशाची मदत केली होती. याकरिता ट्रका भरून पैसे पाठविण्यात आले. बरेच दिवस रिकाम्या ट्रंका परत आल्या नाहीत. तेव्हा त्याने आपल्या अधिकाऱ्याला जोरदार शब्दात खडसावले की, आम्ही तुम्हाला पैशाची मदत करायला सांगितले होते. ट्रंकाची नाही. शेवटी बराच पत्रव्यवहार करुन निजामाने आपल्या ट्रंका परत घेतल्या. स्वातंत्र्यानंतर निजामाने भारताशी केलेल्या एका करारानुसार निजामाचे सोने-नाने व इतर सर्व संपत्ती मुंबईला हलविण्याचे ठरले. उगीच कुणावर भरवसा ठेवायला नको म्हणून निजामाने आल्विन कंपनीला आदेश देऊन विशेष ट्रंका तयार करून घेतल्या. निजामाची संपत्ती वाहून नेण्यासाठी एक विशेष रेल्वेगाडी तयार करण्यात आली. ठरल्यानुसार सर्व संपत्ती मुंबईला पोहोचती झाली. परंतु या वेळी निजामाने रिकाम्या ट्रंकाची चौकशी केली. तेव्हा उगीच कटकट नको म्हणून अधिकाऱ्यांनी आल्विन कंपनीकडून तेवढ्याच ट्रंका घेऊन त्या निजामाला परत दिल्या.

शंभरएक खुर्च्यांना सोन्याचा मुलामा देऊन तयार केलेला जगातील सर्वात मोठा डायनिंग टेबल कदाचित सातव्या निजामाकडेच असावा. परंतु त्यावर तो कधी बसला नाही. फाटलेली चटई, रफु केलेला पायजमा आणि तुटकी खुर्ची ही त्याची वागण्याची रीत होती. एकदा भारताचे दोन वैमानिक सहज भेट द्यावी म्हणून निजामाकडे गेले. पाहुणचार म्हणून त्यांना एक कप चहा आणि एकच बिस्किट देण्यात आले. बिस्किट संपल्यानंतर पुन्हा बिस्किटांची विनंती करण्यात आल्यावर त्यानंतरसुध्दा फक्त एकच बिस्कीट देण्यास नोकराला सांगितले, अशा विचीत्र विश्वात निजाम वाढला.

१९११ ते १९४८ या ३७ वर्षांच्या कालखंडात सातव्या निजामाने हैद्राबादमधील हायकोर्ट, उस्मानिया हॉस्पिटल, हुसेन सागर तलाव आणि उस्मानिया विद्यापीठ यासारख्या अनेक देखण्या योजना निजामाच्या काळात राबविल्या गेल्या. उर्दू भाषेतून वैद्यकीय शिक्षण देण्याची व्यवस्था फक्त हैद्राबारमध्येच होती. रेल्वेचे जाळे, स्वतंत्र चलन, मुंबई–हैद्राबादसारखा मुख्य रस्ता, विज्ञान आणि तंत्रज्ञानातही निजाम राजवट आता अग्रेसर झाली होती. परंतु वैयक्तिक पातळीवर निजामाचे ज्ञान अपूर्ण होते. १६ सप्टेंबर, १९४८ ला जनरल चौधरीच्या नेतृत्वाखाली भारतीय फौजा हैद्राबादमध्ये दाखल झाल्यानंतर निजामाने शरणागतीची भाषा सुरू केली. तेव्हा राजकीय सल्लागार मुन्शी यांनी निजामसाहेबांना सूचना केली की, आपण आपल्या रेडिओ केंद्रावर जावून सर्वांना उद्देशून भाषण द्यावे,जेणेकरून जनतेत संभ्रम राहणार नाही. या वेळी निजामाची अशी समजूत होती की, त्यासाठी मोठ्या रेडिओमध्ये बसून बोलावे लागते की काय? त्याप्रमाणे त्यांनी मुन्शींना प्रश्न केला की, रेडिओवर बोलायचे म्हणजे नेमके काय करावे लागते? तेव्हा मुन्शींनी सांगितले की, आकाशवानी केंद्रात जा त्या ठिकाणी काठीसारखी एक ट्यूब उभी केलेली असते. त्याच्यासमोर उभे रहा आणि जे बोलाल ते रेडीओवर ऐकायला येते, म्हटल्यावर निजामाला त्याचे आश्चर्य वाटले.

१७ सप्टेंबर, १९४८ ला निजामाने एकतर्फी यद्धबंदी जाहीर करून भारतापुढे शरणागती पत्करली. याविषयी जनतेला माहिती देण्याकरिता उस्मानअली जंग बहादूरसाहेब आपल्या दख्खन रेडीओच्या केंद्रावर जाऊन पोहोचले. निजाम रस्त्याने चालले म्हणजे लोक एकतर गुडघे टेकून वंदन करीत किंवा सरळ पाठमोरे तोंड करुन उभे राहत. पुढे सैनिकांचा ताफा आणि पोहोचल्यानंतर तोफांची सरबत्ती असायची. परंतू आता आकाशवाणी केंद्रावर ज्या वेळी हैद्राबादचा हा राजा पोहोचला, त्यावेळी त्यांच्यासाठी कुणी गालीचे अंथरले नाहीत, तोफांचा आवाजतर सोडा, त्या ठिकाणचा साधा शिपाई उठून उभा राहिला नाही. हा काळाचा महिमा असतो. अगदी खिन्न मनाने निजामाने आपले भाषण आटोपते घेतले.

हैद्राबाद मुक्तिसंग्रामात निजामाच्या लालची वृत्तीमुळे हजारोंचे बळी गेले. त्यानंतर किती रझाकार कापले याची गणती कधीच झाली नाही. स्वत:च्या महत्त्वाकांक्षेसाठी त्याने इतरांना पणाला लावले. स्वातंत्र्यानंतर संपूर्ण मंत्रिमंडळ

ते पूर्ण जिल्हाधिकारी बरखास्त करून काहींना तुरुंगात टाकले. तेव्हा त्यांचा प्रमुख निजाम निर्दोष कसा? हे पटत नसलेतरी शेवटी निजामाला दोषी ठरवायची गोष्ट दूरच उलट हैद्राबाद राज्याचे राजप्रमुख म्हणून निजामाची नेमणूक करण्यात आली. वार्षिक ५० लाखांची पेन्शन आणि वर स्वत:ची संपत्ती सांभाळण्यासाठी लोकशाही मार्गाने ५२ विविध ट्रस्टची निर्मिती करून आपली संपत्ती सुरक्षित केली. स्वातंत्र्यापूर्वी आणि स्वातंत्र्यानंतर हैद्राबादचा राजा तोच राहिला.

स्वातंत्र्यानंतर राजप्रमुख करून भारत सरकारने त्यांचा सन्मान केला की, गच्छंती हे समजले नाही. राजा प्रमुख असताना लोकशाही मार्गाने निर्णय घ्यावे लागतात आणि राजाला ते मान्य करावे लागतात. याला सूड म्हणायचे नाहीतर काय? त्यामुळे १९४८ नंतर पुढे मीर उस्मानअली खानाचे लोकांना दर्शन झाले नाही. त्यातच २३ मार्च, १९५२ ला याच निजामसाहेबांच्या हस्ते हैद्राबाद विधानभवनाचे उद्‌घाटन झाले. हुकूमशाहीने राज्यकारभार केलेल्या राजाने आपल्याच राज्यात लोकशाहीचे दालन स्वत:च्या हस्ते उभे करावे याला काळाचा महिमा म्हणतात. खरं तर नियतीने निजामावर हा सूड उगविला होता.

मुलांची व्यसनाधीनता आणि सुनांचे परदेशगमन यामुळे अफु आणि नोकर हेच निजामाचे शेवटचे साक्षीदार. सतत ३७ वर्षे जगाला झुलवीणाऱ्या निजामाने जाता जाता यमराजालाही थोडे चुकविले. २२ फेब्रुवारी,१९६७ ला हैद्राबादचे निजाम मीर उस्मानअलीसाहेब पैगंबरवासी झाल्याची बातमी जगभर वाऱ्यासारखी पसरली परंतु तासभरातच या वृत्ताचे खंडन करण्यात आले. आयुष्यभर चिकाटीने जगलेला हा विचित्र देह जीव सोडायला तयार नव्हता परंतु साऱ्या जगाला फसवलंतरी देवापुढे कुणाचे काही चालत नाही हा निसर्गाचा नियम आहे. पुन्हा एकवार देवाचे बोलावणे आले आणि २४ फेब्रुवारी, १९६७ वार शुक्रवार दुपारी १ वाजून २२ मिनिटांनी जगातील सर्वांत श्रीमंत व्यक्तीने भारतातील शेवटच्या राजाने, आसफजाही घराण्यातील शेवटच्या आणि सातव्या निजामाने आणि जगाला आपल्या तालावर नाचविणाऱ्या एका खेळीयाने अखेर जगाचा निरोप घेतला. ५७ वर्षे हैद्राबादच्या रुपाने उस्मानाबादवर अधिराज्य गाजविणाऱ्या शेवटच्या राजाने अखेरचा श्वास घेतला. निजामशाही संपली, लोकशाही आलीतरी सातवा निजाम उस्मानअलीच्या नावाने उस्मानाबादचे झालेले नामांतर निजामशाहीच्या पाऊलखुणा आहेत.

सातव्या निजामाचे वसतिस्थान किंग कोठी, या ठिकाणी जगातल्या अनेक दिग्गजांनी आपली हजेरी लावली, जगातील सर्व सुखकारी वस्तू या इमारतीत पोहोचल्या. जगातल्या सर्वांत श्रीमंत व्यक्तीच्या पंक्तीत निजामाने आपले नाव कोरले. निजामाच्या वैभवाबरोबरच त्याच्या कंजुषपणाने अनेक विक्रम प्रस्थापित केले. त्यामुळे निजामाच्या ऐश्वर्याची जेवढी चर्चा झाली तेवढीच चर्चा त्याच्या वागण्याची झाली. मुस्लीम राज्यकर्त्यांचा अभ्यास केल्यानंतर असे दिसून येते की, प्रत्येकाने जे मिळविले ते स्वत:च्या कर्तृत्वाने मिळविले. सातव्या निजामाने अतिशय प्रतिकूल परिस्थितीत गादी मिळविली नी ती टिकविली. त्यानंतरच्या वंशजांना हे जमले नाही. त्यामुळे बऱ्याच वंशजांनी परदेश गाठला. तर जे शिल्लक राहिले त्यांनी आपल्या कर्माने बरेच काही गमावले. एवढेच काय तर एकेकाळचा स्वर्ग म्हणून ओळखले जाणारे निजामाचे वसतिस्थान 'किंग कोठी' ला त्यांनी अवकळा आणली. काही भागात मंगल कार्यालय तर काही भागात दुकाने थाटली. फलकनुमासारख्या दुसऱ्या एका राजवाड्यात तिकीट लावून प्रदर्शन भरविले. बापाने मिळविलेल्या संपत्तीचे जतन करायलाही अक्कल लागते. नाहीतर याचा दोष नशिबांवर देऊन माणसं मोकळी होतात. हीच अवस्था निजामाच्या वारसांची झाली.

निजामाचे शासन गेले आणि लोकशाही आली. स्वातंत्र्य संग्रामाचे चटके खाल्लेले लोक होते तोपर्यंत देशाचा गाडा बरा चालला होता, परंतु पुढे लोकशाहीत रझाकारी प्रवृत्ती घुसली. त्यामुळे पुन्हा एकदा लोकांचा असंतोष अनावर झाला आणि यापेक्षा निजामाचे राज्य चांगले होते म्हणण्याची आता वेळ आली आहे. हा स्वातंत्र्य संग्रामाचा नैतिक पराभव आहे. परंतु काळ कुणालाही माफ करत नाही, हे निजामशाहीच्या अस्ताकडे पाहिल्यानंतर ध्यानात येते. कारण 'भगवान के घर में देर है लेकिन अंधेर नहीं है'।

***

# ३. सरहद्दीवरील कँप

देशाला स्वातंत्र्य मिळून आता वर्षभराचा कालावधी उलटून गेलेलला होता. देशभर अहिंसेच्या आंदोलनाचा बोलबाला चालू होता. त्यानुसार हैद्राबादमधील लोकांनी महात्मा गांधींच्या मार्गावर चालत स्टेट काँग्रेसची स्थापना केली. अहिंसेच्या आंदोलनाची भाषा आता निजाम राजवटीला पचायला जड चालली होती. त्यातच स्वत:चे लष्कर कमी आणि रझाकारांची फौज मोठ्या प्रमाणावर वापरून स्वातंत्र्याच्या मागणीला पड्दयाआड करण्याची भूमिका निजामाने घेतलेली होती. राजकीय आश्रयाने बेधुंद झालेले रझाकार दिवसेंदिवस मुजोर होत चालेलेले होते. सरकारमधून त्यांना पैसे, हत्यारे आणि मानसिक बळ मिळत असल्याने त्यांच्या वागण्याला पारावार राहिलेला नव्हता. अहिंसक मार्गाने आंदोलन चालूच होते. परंतु त्यातून पाहिजे त्या प्रमाणात यश मिळत नव्हते. म्हणून स्टेट काँग्रेसने नवीन पवित्रा घेत आंदोलनाची दिशा बदलण्याची भूमिका घेतली.

ज्या वेळी आपण हैद्राबाद संस्थानचा विचार करतो त्या वेळी हा भाग भारताच्या मध्यवर्ती असून भौगोलिक परिस्थितीमुळे अनेक गंभीर प्रश्न निर्माण झाले असते. याचा फायदा स्वातंत्र्य संग्रामाच्या वेळी झाला. हैद्राबाद संस्थानला जोडून असणाऱ्या स्वतंत्र भारतातील भागातून हैद्राबाद मुक्तिसंग्रामाला जबरदस्त पाठिंबा लाभला. ज्या वेळी आपण उस्मानाबादचा विचार करतो तेव्हा आपणास सोलापूर भागातून मिळालेल्या सहकार्याचा आवर्जून उल्लेख करावा लागतो.

हैद्राबाद संस्थानात पोलीस आणि रझाकरांची युती झालेली होती, त्यामुळे अन्यायअत्याचाराने परिसीमा गाठलेली होती. अशा अवस्थेत या परिसरात राहून स्वातंत्र्य आंदोलन करणे वरचेवर अवघड व्हायला लागले होते

म्हणून स्टेट काँग्रेसच्या सांगण्यावरून स्वातंत्र्य सैनिकांनी हैद्राबाद सीमेलगतच्या भागात आपले सुरक्षित स्थळ निर्माण केले. ज्याला सीमावर्ती केंद्र किंवा कँप म्हटले जाऊ लागले. जुलै, १९४७ ते मार्च, १९४८ या कालखंडात उस्मानाबाद परिसरात अशा प्रकारचे कँप गौडगाव, बार्शी, चिंचोली, वाघोली, आंबेजवळगे, कौडगाव, वाघदरी, मुस्ती, ईट आणि पानगाव या भागांत कार्यरत होते. अशा प्रकारचे कँप सरहद्दीवरील सर्वच भागांत असून कर्नाटकातील बिदर आणि उस्मानाबाद जिल्ह्यांतील कँपचे नियंत्रण कार्यालय सोलापूर येथे ठेवण्यात आले होते.

सोलापूर केंद्राची संपूर्ण जबाबदारी फुलचंद गांधींच्या नेतृत्वाखाली बाबासाहेब पराजंपे, व्यासाचार्य संदीकर, बळवंतराव नागणेगुरुजी, विश्वंभरराव हराळकर यांच्यावर सोपविण्यात येऊन त्यांना शस्त्र खरेदीचे अधिकार देण्यात आलेले होते. तर सोलापूर अंतर्गत असणाऱ्या उस्मानाबाद आणि लातूर कँपची जबाबदारी फुलचंद गांधी आणि राघवेंद्रजी दिवाण यांच्यावर होती. सोलापूर केंद्राचे काम फुलचंद गांधींच्या पत्रातालमीतील माणिक ऑईलमधून चालत होते. या ठिकाणी आपण उस्मानाबाद परिसरातील कँपचा आढावा घेणार आहोत.

**गौडगाव कँप**

गौडगावची जबाबदारी चिलवडीच्या रामभाऊ जाधवांवर सोपविली होती. त्यांना नरहरराव मालखरे, राजेंद्र व वसंत देशमुख, दत्तात्रय गणेश, मनोहर टापरे, भगवान तोडकरी, शिवाजीराव नाडे, रामभाऊ सूर्यवंशी, नबी पापा तांबोळी, दासा कांबळे यांसारख्या लोकांनी मोठी साथ दिली. गौडगावसारख्या स्वतंत्र भारतातील गावाने प्रसंगी झळ सोसून हैद्राबाद मुक्तिसंग्रामातील या लढ्याला आपल्यापरिने मोठी मदत केली. गावातील स्व. माणिकराव गणपतराव गरड आणि स्व. श्रीरंग गुंडी काकडे हे याकामी आघाडीवर होते. आजच्या वेशीजवळच्या काकडेच्या वाड्यात या लोकांचा मुक्काम होता. रोजच्या रोज स्टेट काँग्रेसचे आदेश यायचे. त्यानुसार ठरल्याप्रमाणे काम करण्याची जबाबदारी कँपमधल्या लोकांवर सोपविण्यात आलेली होती. या कँपमध्ये अनेक लोक सहभागी असले तरीकाही लोकांची यादी प्राप्त झाली. त्यानुसार गौडगावच्या कँपमध्ये खालीलप्रमाणे लोक सहभागी होते.

श्री. बापूराव गोंविदराव मास्तर, उस्मानाबाद,
श्री. दत्तात्रय यादवराव गणेश, उस्मानाबाद.
श्री. मनोहर शंकर टापरे, उस्मानाबाद.
श्री. गोविंदराव जहागीरदार, उस्मानाबाद.
श्री. मुरलीधर सदाशिव गरड, उस्मानाबाद.
श्री. वसंतराव आंबादास देशमुख, उस्मानाबाद.
श्री. भगवान भीमाशंकर तोडकरी, उस्मानाबाद.
श्री. जयकुमार फु लचंद अजमेरा, उस्मानाबाद.
श्री. ज्ञानोबा एकनाथ भोजगुडे, उस्मानाबाद.
श्री. बाबू तुकाराम माने, उस्मानाबाद.
श्री. दिगंबर शेषाद्री डांगे, उस्मानाबाद
श्री. रामभाऊ दत्तात्रय सूर्यवंशी, सांजा.
श्री. रावसाहेब भाऊराव माने, बेगडा.
श्री. रामभाऊ रघुनाथ जाधव, चिलवडी.
श्री. दशरथ तुकाराम जाधव, चिलवडी.
श्री. शिवाजी बाबूराव माळी, चिलवडी.
श्री. बापू कृष्णा जाधव, चिलवडी.
श्री. बंडू सखाराम जाधव, चिलवडी.
श्री. नागू आप्पाराव जाधव, चिलवडी.
श्री. नारायण नरहरी पोतदार, कनगरा
श्री. दत्तू कृष्णा जाधव, चिलवडी.
श्री. रामलिंग जयवंतराव जाधव, चिलवडी.
श्री. कृष्णा शिवराम जगताप, चिलवडी.
श्री. राजाराम नामदेव जगताप, चिलवडी
श्री. प्रभाकर गणपती जाधव, चिलवडी.
श्री. विश्वनाथ निवृत्ती सावंत, चिलवडी.
श्री.विश्वनाथ गणपती जाधव, चिलवडी.

श्री. चांगदेव दशरथ जाधव, चिलवडी.

श्री. भीमराव भाऊराव जाधव, चिलवडी.

श्री. रामा दत्तू जाधव, चिलवडी.

श्री. विठ्ठल मारुती जाधव, चिलवडी.

श्री. किसन धोंडिबा जाधव, चिलवडी.

श्री. दिगंबर राघोबा जाधव, चिलवडी.

श्री. केशव मारुती जाधव, चिलवडी.

श्री. गणपती निवृती जाधव, चिलवडी.

श्री. भगवान विठ्ठल गुरव, चिलवडी.

श्री. लक्ष्मण धर्मा जाधव, चिलवडी.

श्री.दासा तुका कांबळे, चिलवडी

श्री. मुरलीधर एकनाथ कांबळे, चिलवडी

श्री. बाबू राजाराम जाधव, चिलवडी

श्री. श्रीपती शंकर सुरवसे, चिलवडी

श्री. माणिक शंकर सुरवसे, चिलवडी

श्री. विश्वनाथ दासा वाघ, चिलवडी

श्री. श्रीपती यशवंत माळी, चिलवडी

श्री. रामा शंकर सुरवसे, चिलवडी

श्री. रंगनाथ एकनाथ कुलकर्णी, चिलवडी

श्री. विश्वनाथ रंगराव जाधव, चिलवडी

श्री. केशव सखा मांग, चिलवडी

श्री. बापू रामा सुतार, चिलवडी

श्री. श्रीरंग गुंडी काकडे, गौडगाव

श्री. दगडू केरबा लकडे, सुर्डी

श्री. नागा कृष्णा रोहिले, सुर्डी

श्री. विश्वनाथ श्रीपती कोळगे, रुईभर

श्री. मारुती व्यंका पडवळ, रुईभर

श्री. नबी पापा तांबोळी, रुईभर
श्री. गोविंद नामदेव पवार, रुईभर
श्री. दादाराव श्रीपत कोळगे, रुईभर
श्री. दस्तगिर बाशुमिया खोदे, रुईभर
श्री. माणिक रंगनाथ लोमटे, रुईभर
श्री. माणिक बाबाराव तीर्थकर, रुईभर
श्री. दिगंबर रंगनाथ पाटील, मेडसिंगा
श्री. शेकर नामदेव घेवारे, मेडसिंगा
श्री. वैजिनाथ संभाजी कपाळे, मेडसिंगा
श्री. रामा गोविंद पडवळ, मेडसिंगा
श्री. बाबूराव धोंडिबा आगळे, मेडसिंगा
श्री. भीमराव बाजीराव मोरे, वडगाव
श्री. राजाराम लिंबाजी धनगर, वडगाव
श्री. बुबासाहेब भीमराव पाटील, वडगाव
श्री. सिद्राम राजाराम सुरवसे, वडगाव

या ठिकाणी ज्याचे नाव आवर्जून घ्यावे असे सोलापूरचे कलेक्टर घाडगेसाहेब. आपले बांधव निजामाच्या जोखडाखाली रझाकारांचे हाल सोसताहेत. सरहद्दीमुळे रोज त्यांना नवनवीन गोष्टी ऐकायला मिळायच्या तसे घाडगे साहेब चिडायचे. आपल्यापरीने मदत करण्याकरिता साहेब सदैव तत्पर असायचे. खुलेआम हत्यारे घेऊन जायची परवानगी असायची. एका अर्थाने ते सोलापूरच्या केंद्राचा एक घटकच बनले होते.

एकदा सोलापूर केंद्राचे एक प्रमुख रामचंद्र दिवाणांना घेऊन घाडगे साहेब दौऱ्यावर निघाले. रस्त्यात त्यांना खांद्यावर बंदूक घेऊन चाललेली माणसे दिसली. साहेबांची गाडी थांबली. साहेब जोरात ओरडले, कोण आहात तुम्ही? आन् काय रे, या हत्याराचा परवाना आहे का तुमच्याकडे ? तेवढ्यात त्यातील एकजण धाडसाने पुढे आला आणि म्हणाला, साहेब परवाना आहे की, तो काय तुमच्या बाजूलाच बसलाय. घाडगे साहेबांनी रामचंद्रजी दिवाणाकडे

बघून स्मितहास्य केले. ड्रायव्हर आणि त्या लोकांना एकाच वेळी आदेश दिला चला पुढे. सारे काही मूक समंतीने कळाल्यामुळे सर्वजन गप्प राहिले.

कँप म्हणजे शिस्तबद्ध कार्यकर्त्यांचे जाळे होते. आपापसात विचारांची देवाणघेवाण होती. तर या लोकांना सर्वसामान्यांची साथ होती. आणि आपल्या जिवाची पर्वा न करता कँपमध्ये सामील झालेल्या स्वातंत्र्यवीरांना तर चिंता होती फक्त स्वातंत्र्याची. प्रत्येकासाठी नियोजनबद्ध कार्यक्रम आखून दिलेला असायचा. चिंचोली कँपने पुढे अपसिंग्याच्या कारवाईत मोठी कामगिरी केली. तर गौडगावचा कँप म्हणजे अर्धी चिलवडी सामील. जाधव म्हटलं की, स्वातंत्र्यवीर समजायचाच. सर्वांत अगोदर गौडगावच्या कँपने आपल्या परिसरात स्वातंत्र्याची जणू घोषणाच करून टाकली होती. सारा बंद, करोडगिरी नाका बंद, सिंदीची झाडे भुईसपाट करून टाकली. एवढेच नाहीतर तलाठी असो की पोलीस, सर्वांनाच गावबंदी. अर्थात याचा परिणाम फार भयानक झाला. निजामाने साऱ्या चिलवडीवर वरवंटा फिरविला. तो आपण सविस्तरपणे पाहणारच आहोत.

**मुस्ती कँप**

मुस्ती कँपचे प्रमुख श्रीनिवास अहंकारी गुलबर्ग्याच्या जेलमधून बाहेर पडताना जेलरला ठोकूनच बाहेर पडलेले असल्याने त्यांचा मोठा दरारा होता. मुस्तीचे अण्णाराव पाटील भारदस्त व्यक्तिमत्त्व होते. त्यांनी कँपमधल्या लोकांची राहण्याखाण्याची सर्व व्यवस्था केली. केवळ मुस्ती गावातून ५० ते ६० लोक या कँपवर भरती झाले.

रझाकाराच्या धर्मांध वागण्यामुळे हा लढा हिंदूमुस्लीम वाटायला लागला असलातरी ज्या मुस्लिमांना स्वातंत्र्य संग्रामात उडी घ्यायची आहे त्यांची मोठी पंचायत व्हायची. कसगी, ता. उमरगा येथील करीमसाहेब नावाचा असाच एक देशभक्त. उघडपणे भाग घेता येईना म्हणून त्याने स्वातंत्र्यवीरांना आतून मदत करायला सुरुवात केली. झालं, ही बातमी रझाकारांच्या कानावर गेली. हातात उघड्या तलवारी घेऊन रझाकारांचे पाय करीमसाहेबावर चालून आले. गवत कापावं तसं साऱ्या कुटुंबाची मुंडकी छाटली गेली. तर अजगरअली बिचारा आपल्या गावातील शिवाप्पा बादोलेस जामीन राहिला म्हणून रझाकारांनी त्याच्या घरावर धावा केला. तेव्हा केसरजवळग्याच्या कँपवाल्यांनी

रझकारांना पिटाळून लावले. यात आनंदराव बनशेट्टी शहीद झाले.

**वाघोली व काजळा कँप**

वाघोली कँपवर राजेंद्र देशमुखांनी नियोजनबद्ध कार्यक्रम आखत दारफळ, राजूरी, बेंबळी, माणकेश्वर गावच्या पोलीस ठाण्यावर हल्ला करून सुर्डी, धारूर, ढेकरी इथल्या करोडगिरी नाक्यावर आपला झेंडा लावला. या वेळी विश्वनाथ भिस्यांना वीरमरण आले. तर दादाराव कोळगे, नागा रोहिले, दगडू लेकडे, नामा चांभार, महादेव पडवळ यांनी मोठ्या जोमाने यात आपली कामगिरी पार पाडली. तर काजळ्यात भाई उद्धवराव पाटील यांच्यासह रा. गे. शिंदेगुरुजी, किसन कोळी, कोंडीबा शिंदे हे प्रमूख असून काजळा कँपवाल्यांनी शेंद्रीच्या पोलीस ठाण्यावर हमला केला. स्वातंत्र्यासाठी जशे स्वातंत्र्य सैनिकांचे कँप होते तसे आक्रमण थोपवून लावण्यासाठी निजामाने पोलीसाबरोबच मोक्याच्या गावात रझाकारांचे अड्डे तयार केलेले होते. त्यामुळे ही लढाई रझाकार विरूद्ध कँपवाले सैनिक यांच्यात व्हायला सुरुवात झाली.

कँपवाल्यांना स्वतंत्र भारतातील लोकांचा आणि शासनकर्त्यांचा पाठिंबा होता. तसे रझाकारांना निजामाचे पोलीस आणि राज्यकर्त्यांचा पाठिंबा होता. दोघांनाही रसद मिळायला लागली, तसा संघर्ष वाढत गेला. गट दोन असलेतरी दोघांच्या मानसिकतेत मात्र बदल होता. रझाकारांनी आपल्या ताकतीच्या जोरावर सर्वसामान्यांना वेठीस धरायला सुरुवात केली. खून, बलात्कार, जाळपोळ करून दहशत माजवत निजामाचे राज्य कायम राहावे म्हणून रझाकार झटत होते. तर जुलमी सत्ता उखडून टाकून जनतेचे राज्य यावे म्हणून स्वातंत्र्यसेनानी आपल्या जिवाचे रान करत होते.

कँपवर अनेक लोक स्वयंस्फूर्तीने दाखल होत असून यात आलेले तरुण उच्च शिक्षीत होते. मुंबईच्या मध्यवर्ती केंद्राने दिलेले कार्यक्रम व्यवस्थितपणे पार पाडण्याची जबाबदारी कँपवर होती. स्वातंत्र्यानंतर सापडलेल्या कागदपत्रांनुसार कँपविषयी अनेक उपयुक्त माहिती पुढे आली आहे. त्यानुसार प्रत्येक कँपला जी कार्यवाही करावी लागायची त्याकरिता पूर्व परवानगी आवश्यक होती. केंद्राच्या परवानगीशिवाय कँपने एखादी भूमिका घेतली असे खचितच घडले असेल. पैशाचा हिशोब दर महिन्याला मुंबई केंद्रावर पोहोचविण्याची जबाबदारी प्रत्येक कँपवर बंधनकारक होती.

शस्त्रास्त्रे असूनही ती कुठं आणि कशी चालवायची याविषयी ट्रेनिंग

देण्याची व्यवस्था करण्यात आलेली होती. याचबरोबर स्टेट काँग्रेसने आपल्या लोकांना सक्त आदेश दिलेले होते की, व्यक्तिद्वेषातून अथवा अगर अन्य कुठल्याही कारणास्तव व्यक्तीवर हल्ले करू नयेत. त्यामुळे रझाकार हे जातीने मुस्लिम असलेतरी गावातील एकट्यादुकट्या मुस्लिमांना कँपमधल्या लोकांनी त्रास दिला असे कधी घडले नाही. एवढेच नाहीतर मुस्लिमांना त्रास होऊ नये म्हणून मोठ्या शेतकऱ्यांनी त्यांना आपल्या घरात आश्रय देण्यास सुरुवात केली.

याशिवाय सार्वजनिक ठिकाणांवर हल्ले करताना त्या ठिकाणी मनुष्यहानी अजिबात होणार नाही याची दक्षता घेण्यात येत होती. त्यामुळे पोलीस स्टेशन, रेल्वे यांच्यावर हल्ला करताना कधीही मनुष्यहानी झाल्याचे आढळून आलेले नाही. याकरिता जबाबदार आणि कर्तव्यदक्ष कार्यकर्त्यांची फळी उभी राहिलेली होती. रात्रीबेरात्री रानावनांत भटकणाऱ्या स्वातंत्र्य सैनिकांना किती शस्त्रे आली, किती वापरली याची सविस्तरपणे नोंद ठेवण्याची सक्ती करण्यात आलेली होती.

तसं पाहिलंतर स्वातंत्र्य संग्रामात उडी घेणे फारच जोखमीचे काम होते. गावातील पाटील कुलकर्ण्यांपासून ते रझाकारांपर्यंत आणि त्यानंतर पोलिसांचे शत्रुत्व पत्करून गावकी करणे वाटते तेवढे सोपे नव्हते. त्याकरिता आपली बायकामुले सीमेबाहेरच्या गावात पाठवून हे बहाद्दर स्वत:हून स्वातंत्र्याच्या आगीत उडी घ्यायचे. लोकशाही असूनही आज आपण सरकारच्या विरोधात बोलू शकत नाही. त्याच वेळी रझाकारासारख्या जुलमी सत्तेला टक्कर देणे वाटते तेवढे सोपे नव्हते. परंतु घरावर तुळशीपत्र ठेवून जगाचा प्रपंच करायला निघालेल्या भारतमातेच्या या भक्तांना कशाचीच पर्वा नव्हती.

वाघाला ट्रेनिंग दिली म्हणजे तो आगीतूनसुद्धा उडी घ्यायला कमी करत नाही. तीच गत हैद्राबाद संस्थानातील स्वातंत्र्य सैनिकांची झालेली होती. वाघाला शिकवायला वाघाचंच काळीज लागतं. तशा काळजाचा माणूस महाराष्ट्राला मिळालेला होता. त्याचं नाव होतं क्रांतिसिंह नाना पाटील ! नाना गावात येणार म्हटलं की, त्या परिसरातील लोक बैलगाड्या जुंपून झुंडीच्या झुंडीने गर्दी करत. नानांचे भाषण म्हणजे आगीचा भडीमार असायचा. नाना बोलायला लागले म्हणजे 'भारतमाता की जय'म्हणत डोक्यांवरील फेटे आणि टोप्या हवेत असायच्या.

असेच एकदा नाना माडजच्या सभेला आले होते. माणसाला पाय

ठेवायला जागा नाही. गावच्या पटांगणात नाना बरसायला लागले. नानांनी थेट निजामाला आवाहान देत डरकाळी फोडली आणि म्हणाले, अरे निजामा! तू स्वत:ला राजा म्हणवून घेतोस अन् माझ्या गोरगरीब जनतेला छळतोस काय? अरे हिंमत असेल ना? तर या पठ्ठ्याबरोबर लढून दाखव. त्याच वेळी ते कासिम रझवीला उद्देशून म्हणायचे, कशाला तू नादाला लागलायस ? आरे भारतीय जनतेने नुसते फुकलेतरी तू अन् तुझी फौज वाऱ्यासारखी उडून जाईल. आवरतं घे, नाहीतर हा नाना भीमासारखा तुझ्या छाताडावर बसून तुझ्या नरडीचा घोट घेईल.

नानाच्या सभेने आपले वीर पेटून उठायचे. आणि त्यानुसार गोंदिराव पवार, शाहूराज जाधव, लक्ष्मण वाघमोडे आणि हडोळतीचे मोहनराव पाटलांनी मिळून नाई चाकूरचे पोलीस ठाणे लुटून त्याला आग लावून टाकली. अशा कितीतरी घटना घडल्या. ज्या स्वातंत्र्य वीरांच्या पराक्रमाने गाजलेल्या होत्या.

सध्याच्या जमान्यात शिकलेला माणूस म्हटलं की, तो पांढरापेशा म्हणून ओळखला जातो. परंतु स्वातंत्र्य संग्रामात उडी घेतलेल्या नरवीरांचा ज्या वेळी आपण अभ्यास करतो तेव्हा असे दिसून येते की, ही सर्व मंडळी नुकतेच शिक्षण घेत असलेली किंवा शिकून बाहेर पडलेली होती. त्यांना आता देशाच्या भवितव्याची चिंता होती. साहजिकच शिकल्यासावरलेली ही माणसं सर्व - सामान्यांना आपला आधार वाटायची.

स्वातंत्र्य सैनिकांचे कँप रानावनांत कुठेही असलेतरी आपल्या बहाद्दरांना भाकरी घालण्यासाठी आयाबायांच्या मनात कधीही किंतु परंतु आले नाही. रझाकारांच्या पापी नजरेतून वाचवायला आपले हे भाऊबंद असल्याने त्यांना मोठे सुरक्षित वाटायचे. त्यामुळे कुठे अन्याय झाला की, कँपमधली मंडळी धावून जायची. कँपमधल्या माणसांचा साऱ्यांना आधार वाटायचा.

शस्त्रे रझाकारांकडे होती तशीच ती कँपमधल्या स्वातंत्र्यवीरांकडेही होती. दोघांनाही आपापल्या शासनाचा खंबिर पाठिंबा होता. परंतु रझाकारी फौज ही अन्याय आणि अत्याचाराने बरबटून गेलेली होती. त्याउलट कँपमधल्या लोकांची परिस्थिती उदाहरणच द्यायचे झाले तर निजामाला धडा शिकवायचा म्हणून आपल्या स्वातंत्र्यवीरांनी उमरीची स्टेट बँक ऑफ हैद्राबाद लुटून त्यात सापडलेले २० लाख ६३ हजार ७१९ रुपये १५ आणे ही रक्कम जशीच्या तशी स्टेट काँग्रेसच्या हवाली करताना यातील एक आणाही इकडे

तिकडे गेला नाही.

अगदी मिल्ट्रीला शोभेल याप्रमाणे सरहद्दीवरील कँपची शिस्त होती. कोणीही उठावे आणि कँप काढावा अशी परिस्थिती अजिबात झाली नाही. कुठल्याही प्रकारची कारवाई करताना विचार विनिमय झाल्याशिवाय ती पार पाडण्याची परवानगी नव्हती. त्यामुळे स्वतंत्र भारताचे स्वप्न पाहण्याऱ्यांनी अगोदरपासूनच आपली शिस्त कायम केलेली होती.

पुढे ज्या वेळी भारत सरकारने पोलीस अॅक्शनची कारवाई केली तेव्हा या कँपमधील लोकांनी आपली जबाबदारी ओळखून काम केले. एवढेच नाहीतर ज्या वेळी हैद्राबादला भारतामध्ये विलीन करण्यात आले तेव्हा स्वातंत्र्य सैनिकांना आपली जबाबदारी संपल्याची जाणीव झाली. आणि या बहाद्दरांनी आपल्या बंदुका नुसत्याच खाली ठेवल्या असे नाही तर त्या आपापल्या पोलीस स्टेशनात स्वत: नेऊन जमा करून टाकल्या. त्यामुळे स्वातंत्र्य सैनिकांनी कुणाला धमकावले, आपल्या शस्त्राचा गैरवापर केला असे कधी ऐकिवात आले नाही. स्वातंत्र्यासाठी कँपचा प्रयोग खरंच अनोखा होता.

***



कॅम्पमधील स्वातंत्र्य सेनानी

# ४. हिप्परगा येथील राष्ट्रीय शाळा

हैद्राबाद संस्थानातील उस्मानाबाद जिल्ह्यातील हिप्परगा (नरसोबाचे), ता. तुळजापूर, जि.उस्मानाबाद या गावातील व्यंकटराव देशमुख व त्यांचे बंधू अनंतराव कुलकर्णी यांनी राष्ट्रीय शाळेची स्थापना सन १९२१ मध्ये केली. रामप्पा होनाळकर व महादबा होनाळकर ह्या बंधूंनी आपली राहण्यासाठी बांधलेली सुमारे ३०-४० खणांची इमारत विनामूल्य वापरण्यासाठी दिली. त्यांच्यापश्चात विश्वनाथराव शिवप्पा, पंढरीनाथ नरसिंग होनाळकर यांनी तो वाडा शाळेसाठी वापरण्यास दिला. शाळेची पाण्याची गरज भागविण्यासाठी त्यांनी त्यांच्या मालकीची विहीरही विनामूल्य वापरण्यासाठी दिली. हिप्परगा हे गाव सध्या उस्मानाबाद जिल्ह्यातील लोहारा तालुक्यात आहे. (लोहारा हे तत्कालीन निजाम राज्यात पायगा होते. म्हणजे या तालुक्याचा महसूल निजामाच्या किंवा जहागीरदाराच्या खाजगी खर्चाकरिता जात असे. त्यांच्या प्रशासनाचे अधिकार संबंधित जहागीरदाराकडेच असे). लोहारा या ठिकाणापासून पश्चिमेकडे ८-९ कि.मी. अंतरावर हिप्परगा आहे. सोलापूरवरून हे ठिकाण साधारणपणे ५०-६० कि.मी. आहे. हिप्परगा निजाम इलाक्यात आणि सोलापूर ब्रिटिश इलाक्यात असल्यामुळे वाटेत करोडगिरी नाके असत. निजामहद्दीत प्रवेश करण्यापूर्वी त्यांची कसून चौकशी होत असे. सोलापूरहून येताना निरनिराळ्या दोन मार्गांवर तामलवाडी व खानापूर असे करोडगिरी नाके होते.

अनंतराव देशमुख हे दत्तक गेले असल्यामुळे ते देशमुखाचे कुलकर्णी झाले. शाळेत सुरुवातीला तिसरी आणि चौथीचे वर्ग उघडण्यात आले. आरंभी अनंतराव कुलकर्णी व गणेशसिंग मास्तर हे दोनच शिक्षक होते. औसा येथील शाळेचे मुख्याध्यापक अब्दुल गफूर हे शाळेच्या उद्घाटन समारंभास हजर होते. हळूहळू वरचे वर्ग निघू लागले. विद्यार्थ्यांची संख्या वाढू लागली. गावापासून

थोड्या अंतरावर निसर्गाच्या रम्य सान्निध्यात माळरानावर शाळा हलविण्यात आली. विद्यार्थी व शिक्षकांना राहण्यासाठी झोपडया घातल्या गेल्या. तेवीस शिक्षकांसाठी तेवीस झोपड्या, विद्यार्थ्यांसाठी वेगळ्याच, शाळेसाठी ७८ खाणांची चिरेबंदी इमारत उभी राहिली. विश्वनाथराव रामचंद्र होनाळकर यांनी शाळेसाठी दोन एकर जमीन दान दिली व एक हजार रु. देणगी दिली. शाळेत शेतकी शिक्षणास सुरुवात झाली. एक सुंदर बाग तयार करण्यात आली.

बॉम्बे मॅट्रिकपर्यंत वर्ग सुरू झाले. दीडशे ते दोनशे विद्यार्थी व २३ शिक्षक होते. या शाळेच्या विद्यार्थ्यांना मुंबई मॅट्रिकच्या परीक्षेस बसविले जाई. १९२९ च्या मॅट्रिक परीक्षेत धोंडोपंत नागरसोगेकर हा पुण्यात नूतन मराठी विद्यालयातील केंद्रात प्रथम क्रमांकाने उत्तीर्ण झाला. मुंबई विद्यापीठात या संस्थेचा पहिला क्रमांक आला. ही गोष्ट हिप्परग्याच्या शाळेस भूषणावह ठरली. प्रसिद्ध इतिहास संशोधक व नूतन मराठी विद्यालयाचे सुपरिटेन्डंट दत्ता वामन पोतदार यांनी मुद्दाम पत्र पाठवून संस्थेचे व सदरील विद्यार्थ्यांचे अभिनंदन केले. हा विद्यार्थी म्हणजेच पुढील काळातील या शाळेतील शिक्षक व इतिहास संशोधक देवीसिंग चौहान हे होत. गावातील प्रत्येक गरीब घरातून वर्षाला ५०–१०० अशा देणग्या मिळत. शाळेचे एक सुंदर असे वाचनालय होते. त्यात निवडक व मोजक्या ग्रंथांचा समावेश होता. त्या काळात या शाळेत 'नवा काळ', 'ज्ञानप्रकाश', 'कर्मयोगी', 'निझाम विजय' इ. वर्तमानपत्रे व 'मॉडर्न रिव्हीव्ह', 'रत्नाकर', 'चित्रमय जगत', 'पुरुषार्थ', 'किर्लोस्कर', 'श्री दासबोध', 'आनंद', 'शाळा पत्रक', 'जमाना', 'श्रीरामकृष्ण निकेतन' आदि मासिके येत. शाळेतर्फे 'सेवक' नावाचे हस्तलिखित त्रैमासिक निघे.

शाळेत शारीरिक शिक्षणाकडे विशेष लक्ष दिले जाई. शाळेच्या पिछाडीला बलोपासना करण्यासाठी एक दगडी भिंतीची तालीम बांधण्यात आली. दंड, बैठका, नमस्कार, कुस्ती, पोहणे, मल्लखांब, वेताचा मल्लखांब, झुलता मल्लखांब, लाठीकाठी, तलवार पट्टा, जंबिया, फरीबादगा, भालाफेक, लेझीम, लष्करी कवायत इत्यादी खेळ विद्यार्थ्यांना शिकवीत असे. प्रत्येक मुलास लाठी काठी खेळावीच लागे. शाळेचा विद्यार्थी दत्तोबा भोसले (मातोळा) याने सतत तीन वर्षे 'आखिल भारतीय हिंद विजय जिमखाना बडोदा' येथील कुस्तीच्या फडातून विजयी ढाल मिळविली होती. शिवप्पा रामचंद्र होनाळकर, जनार्दन अंबाजी गोरे, बसवणप्पा जद्रे या विद्यार्थ्यांनी मल्लखांबाचे

नैपुण्य पदके अमरावतीच्या व्यायामशाळेत मिळविली. त्यामुळे शाळेचा गौरव वाढू लागला. शाळेची सहल एकदा पुण्यास गेली असता जनार्दन श्रीपत पवार (रा. कळमण) या विद्यार्थ्याने पर्वतीवरून येत असताना गजानन मंदिराच्या द्वारापासून पर्वतीच्या पायथ्यापर्यंत हातावर शरीराचा तोल सांभाळून पाय हवेत ठेवत कसरतीने तो पायथ्याला आला.

वक्तृत्त्व कला विद्यार्थ्यांना साध्य व्हावी म्हणून आठवड्याला वाद-विवाद मंडळाच्या सभा होत. शाळेतील विद्यार्थी स्वावलंबी व्हावा म्हणून त्यांना सूत कातणे, विणकाम, बुकबाईंडिंग, शिवणकाम व शाळेतील बागायतीमधून धान्य पिकविण्याचे शिक्षण दिले जाई. यासाठी खास सहा शिक्षकांची नेमणूक होती. याचे विभाग प्रमुख भिमराव धारवाडकर गुडूमी (गुलबर्गा) हे प्रमुख होते.

**शिक्षक वर्ग**

शाळेचे संस्थापक व व्यवस्थापक अनंतराव कुलकर्णी व गणेशसिंग मास्तर हे शाळेचे पहिले शिक्षक होते. पहिले मुख्याध्यापक एस.के. केसकर (फलटण) हे होते. पुढे व्यंकटराव खेडगीकर हे मुख्याध्यापक म्हणून कार्य करू लागले. त्यांनी संन्यासाश्रम स्वीकारल्यानंतर त्यांना स्वामी रामानंदतीर्थ म्हणून ओळखले जाऊ लागले. रामचंद्र गोविंद परांजपे (बाबासाहेब परांजपे), अमृत बाबाराव गवळी, श्रीपादराव कुलकर्णी, श्री.पटवर्धन, बेथुजी, राघवेंद्रराव दिवाण, गणेश धोंडो देशपांडे, एस.आर. देशपांडे, दत्तात्रय गजानन देव, कोंडोपंत कानडे, विश्वनाथराव तावशीकर, बाबाराव देशमुख, के.के. देशपांडे (अमेरिकन गुरुजी), श्री राळेरासकर, दासोपंत कुलकर्णी (ड्रॉईंग टीचर / एस.के. कुलकर्णी (सातारा), अंबादासराव बडवे, भिमराव जोशी, गो.रा. मालखरे, श्री.रं. देशपांडे, सदाशिवराव नाटेकर, होनय्या स्वामी चाकूरकर, ह.रा. महाजनी (लोकसभेचे संपादक), नरसिंगराव भातांब्रेकर, शाळेचे माजी विद्यार्थी धोंडोसिंग नागरसोगेकर असे २१ पेक्षा जास्त शिक्षक कार्यरत होते.

**शाळेला भेट देणाऱ्या नामवंत व्यक्ती**

शाळेच्या कारकीर्दीत मराठी साहित्यातील अनेक विख्यात लेखकांनी शाळेला भेट देऊन शाळेचा गौरव केला होता. त्यात प्रामुख्याने साहित्यसम्राट न.चिं. केळकर, वि.स. खांडेकर, कवी यशवंत, ग.त्र्यं. माडगुळकर, कवी गिरीष, कवी मायदेव, कवी सोपानदेव चौधरी, दत्तो आप्पाजी तुळजापूरकर, वामन नाईक (हैद्राबाद), श्रीधरराव नाईक, प्रसिद्ध चित्रकार दलाल, धनराज

गिरजी (हैद्राबाद), गिरराव अण्णा घाटे वकील (गुलबर्गा), विनायक महादू भुसकुटे (पुणे), गोपाळराव एकबोटे, ॲड. दिगंबरराव बिंदू, किर्लोस्कर पिता-पुत्र, गोपाळ कृष्ण देवधर यांनी शाळेला भेटी देऊन शाळेसंबंधी गौरवास्पद उद्‌गार काढले. प्रसिद्ध साहित्यिक वि.स. खांडेकर यांनी 'किर्लोस्कर' मासिकात 'हिप्परग्याच्या माळरानावरील फुलबाग' असा सुंदर लेख लिहिला.

हिप्परगा येथील शाळेचे विश्वस्त मंडळ व कार्यकारी मंडळ

१. भास्कररावजी वकील, नळदुर्ग (अध्यक्ष)

२. अनंतराव कुलकर्णी (व्यवस्थापक)

३. विश्वनाथराव तावसीकर (सह-व्यवस्थापक)

४. रामरावजी वकील (उमरगा)

५. व्यंकटरावजी वकील (हिप्परगा)

६. देवीदासराव नाईक तुळजापूरकर (हिशोब तपासणीस)

७. विश्वनाथराव होनाळकर (हिप्परगा)

८. व्यंकटराव खेडगीकर (स्वामी रामानंद तीर्थ) मुख्याध्यापक

९. कोंडोपंत कानडे

या राष्ट्रीय शाळेचे स्वामी रामानंदतीर्थ हे मुख्याध्यापक होते. या शाळेविषयी स्वामी रामानंद तीर्थ म्हणतात,हिप्परगे येथील श्री व्यंकटराव देशमुख व त्यांचे बंधू अनंतराव देशमुख (कुलकर्णी) या दोघा भावांनी गुरुकुल पद्धतीवर तेथे सुरू केलेल्या एका शैक्षणिक संस्थेमुळे त्या गावाला एकदम वेगळे महत्त्व प्राप्त झाले. या बंधुद्वयापैकी श्री. व्यंकटरावांनी आपल्या मालमत्तेचा बहुसंख्य भाग संस्थेला देणगीदाखल देऊन टाकला होता व संस्थेच्या खर्चापैकी बराचसा वाटा आपल्या वकिली व्यवसायातील प्राप्तीतून ते उचलीत असत. श्री.व्यंकटराव म्हणजे एक प्रामाणिक व निरागस व्यक्ती. त्यांचे धाकटे बंधु श्री. अनंतराव यांनी असहकारितेच्या चळवळीतील आवाहन स्वीकारून बी.ए. च्या वर्गात असताना कॉलेजला रामराम ठोकला होता. तेच ती संस्था चालवीत होते. एका छोट्याशा खेड्यात अगदी गाजावाजा न करता चाललेल्या संस्थेचा लवकरच चोहोकडे प्रभाव पडत चालला. संस्थानातील निरनिराळ्या ठिकाणांहून विद्यार्थी तेथे शिक्षणासाठी येऊ लागले. आपल्या मुलांना चांगले

शिक्षण देऊ इच्छिणाऱ्या कुणालाही या संस्थेत प्रविष्ट करावे असे वाटत होते. ती वसतिगृहात्मक संस्था होती. त्यामुळे विद्यार्थी व शिक्षक एकत्रच राहत असत. ते एकत्र काम करीत, एकत्र भोजन करीत, त्यांचे जीवन अत्यंत साधे होते. त्यात कुठल्याही प्रकारचा थाटमाट नव्हता. चकाकणारे वा नेत्रदीपक असे तेथे काही नव्हते. ग्रामीण वातावरणातील साधेपणाचा प्रत्यय तेथे घडत असलेल्या प्रत्येक गोष्टीत येत असे. विद्यार्थ्यांच्या व शिक्षकांच्यासाठी खेडूतांच्यासारख्या झोपड्या घातल्या होत्या. दोघांची राहणी इतकी सारखी होती की, तेथे येणाऱ्या नवख्या गृहस्थाला विद्यार्थी व शिक्षक यांतील भेद करणे कठीण होते. सर्वांना शारिरीक श्रमाबद्दल आस्था होती व प्रत्यक्षात सारेच शारीरिक श्रम करीत असत. आमचे साधे वर्ग आम्हीच बांधले होते. खोल्या झाडण्यासाठी व स्वच्छ ठेवण्यासाठी नोकर नव्हते. दर रविवारी विद्यार्थी शेण गोळा करून आणीत व खोल्या सारवीत, शिक्षकही सारवीत. कामात सहभागी होत. एखादा खादीचा सदरा व एक घोंगडी एवढाच काय त्या शाळेच्या जीवनातील गरजेच्या वस्तू होत्या. अभ्यासाचा तास सरू होताच राहण्याच्या जागेचे वर्गामध्ये रूपांतर होत असे. विदयार्थी आपल्या घोंगड्या पसरुन त्यावर बसत. खुर्ची टेबल इत्यादी कोणताच बैठकीचा प्रकार तेथे नव्हता. कधीकधी झाडाखाली अथवा उघड्यावर वर्ग घेतले जात.

**शाळेतील दिनक्रम**

शाळेत पहाटे ४.३० वा. आम्ही उठत असू. बरोबर ५ वाजता सामुदायिक प्रार्थना होई. त्यानंतर प्रत्येकाला आपापल्या कामावर जायला मोकळीक होती. सकाळी ८ वा. दूध व ज्वारीची भाकरी ही न्याहरी असायची. त्यानंतर दुपारपर्यंत वर्ग भरायचे. जेवण झाल्यावर विश्रांतीसाठी वेळ दिला जाई. पुन्हा दोन प्रहरी एक-दोन तास वर्ग घेतले जात. सायंकाळी ५ पासून व्यायामाला आरंभ होई. ७ वाजता सायंकाळी प्रार्थना होत असे. रात्रीचे भोजन झाल्यावर मुले अभ्यास करीत. रात्रौ ९.३० ला झोपी जात.

चांगले निरागस देशभावनेने प्रेरित झालेले, गरिबांसाठी कळवळा असणारे, पददलितांची समर्पण भावनेने सेवा करणारे सामाजिक कार्यकर्तेनिर्माण करण्याच्या उद्देशाने प्रेरित होऊन संस्थापकांनी या संस्थेची स्थापना केली होती. संस्थेचा अंतर्गत कारभार व शैक्षणिक बाजू सांभाळणाऱ्या एका व्यक्तीची

संस्थेला गरज होती. विद्यार्थ्यांवर त्यांनी देखरेख करावी व त्यांच्यावर चांगले संस्कार करून त्यांना चांगले शिक्षण देण्याची व्यवस्था करणारा, विदयार्थ्यांना केवळ बौद्धिक पातळीवरच शिक्षण न देता, जीवनाच्या प्रत्येक पैलूला स्पर्श करणारा, मानवी बाजूचा तसेच मानसिक व आध्यात्मिक बाजूंचाही विचार करून त्यांचा विकास करणारा, हे काम समजून घेण्याची पात्रता असणाऱ्या व्यक्तीच्या शोधात संस्थेचे संस्थापक होते. योगायोगाने त्यांनी मला वेधले. मी केवळ एक साधा मनुष्य आहे आणि हे कार्य प्रचंड आहे असे मी त्यांना सांगितले. मला तेथे चलण्याची व मुख्याध्यापक बनण्याची त्यांनी गळ घातली. माझ्या नावावर ५० रुपये जमा केले जातील. जेव्हा आवश्यकता भासेल तेव्हा त्या शिलकेतील पैसे मी काढून शकेन असे मला सांगण्यात आले.

मला माझ्या पगारातून पैसे उचलण्याचा प्रसंग आला नाही. एकदाच माझ्या एका आजारी नातेवाइकाला भेटायला जाण्यासाठी मी पैसे काढले. जेव्हा माझ्या जवळील असलेल्या सर्वचीज वस्तुंचा त्याग करावयाचे ठरविले त्यावेळी माझ्या नावे जमा असलेल्या सर्व चिजवस्तू दान करावयाचे ठरवून टाकले. या वेळी माझ्या नावे जमा असलेली सर्व रक्कम मी संस्थेलाच देऊन टाकली. स्वामी रामानंद तीर्थ यांचे हे शब्द बोलके आहेत.

**हैद्राबाद संस्थानातील परिस्थिती**

हिप्परगे येथील काही महिन्यांच्या वास्तव्यातच हैद्राबाद संस्थानातल्या निर्माण होत असलेल्या परिस्थितीत प्रत्यक्ष स्वामी रामानंद तीर्थ यांचा संबंध येऊ लागला. संस्थानातील निरनिराळया भागांतून येणाऱ्या विद्यार्थ्यांचे पालक त्यांच्याकडे आपल्याला अपमानास्पद जिणे जगावे लागत होते, याचे निवेदन करीत, सरकारी अधिकाऱ्यांकडून त्यांचा जो छळ होत असे, त्याविरुद्ध ते तक्रार करीत. सर्व शिक्षणाचे माध्यम उर्दूत असल्यामुळे मातृभाषेची पायमल्ली होत होती. धार्मिक उत्सवावर निर्बंध घातले जात होते. अधिकाऱ्याच्या परवानगीशिवाय व्यायामशाळा उघडली जाऊ शकत नाही. नांव घेण्यासारखी वर्तमानपत्रे प्रकाशित होत नव्हती. सभा घेणे शक्य नव्हते. खाजगी शिक्षण संस्थांना उत्तेजन नव्हते. चोहोबाजूंनी सर्वसामान्यांचा अशा तऱ्हेने कोंडमारा होत होता. त्यातून कुणाला मार्ग सापडत नव्हता.

जीवनाची सारी सूत्रे जातीय मुस्लीम मंडळीच्या हाती होती. हिंदू

असणे म्हणजे अवहेलना विषय झाला होता. हिंदू संशयास्पदच समजला जाई. वरिष्ठ वर्गातील मुसलमानांना सर्व प्रकारच्या सवलती मिळत होत्या. आपण राज्यकर्त्यांच्या जातीचे आहोत या गोष्टीचा अज्ञानी गरीब मुसलमानाला मोठा आनंद वाटत असे. स्वत: अंगावर चिंध्या गुंडाळून राहत असलातरी आपल्या जातीचाच एक वर्ग ऐश्वर्यसंपन्न आहे या गोष्टीविषयीच्या आसुरी सुखात तो मग्न होता. एखा सरकारी यंत्रणेत मुसलमान अमीर-उमरावांचा खूप भरणा होता. बहुसंख्याक समाज दडपणाखाली कसा चिरडला जात होता याची वर-वर पाहणाऱ्यांनाही सहज कल्पना येत होती. त्यामुळे हिंदूच्या मनात एक प्रकारच्या गुलामी वृत्तीचा प्रादुर्भाव झाला असल्यास त्यात आश्चर्य नव्हते. त्यांच्या आंतरिक प्रेरणा भीतीने झाकळून गेल्या होत्या. हैद्राबाद संस्थानाच्या जनतेची त्या वेळी अशी स्थिती होती.

हिप्परगा येथील संस्था पहायला आलेले लोक शोचनीय हकीकती सांगत असत. संस्थेकडून आपल्याला काही प्रेरणा मिळेल, काही मार्गदर्शन होईल, या दृष्टीने ते संस्थेकडे पाहत असत. देशभर दिसत असलेल्या नव्या प्रवृत्ती आपल्या मुलांनी आत्मसात कराव्यात असे त्यांना वाटत असे. आपल्या सारखेच अवमानित जीवन आपल्या पुढील पिढ्यांनी जगू नये असे त्यांना वाटत होते. ते हतबल होते.

बहुसंख्य असलेल्या बहुजन समाजाला मुक्त करणारी नवी सेना तयार करणे हाच या छोट्याशा संस्थेचा पूर्वनियोजित उद्देश होता. संस्थेला भेट देणारी मंडळी तक्रारी खूप करीत परंतु या तक्रारींची दाद लावून घेण्यासाठी पुढे येण्याची कोणाचीच तयारी दिसत नव्हती. म्हणून फारसा गाजावाजा न करता शांतपणे काम करून सरंजामदारी जोखडातून जनतेला मुक्त करण्यासाठी आपल्या सर्वस्वाचे बलिदान करायला तयार असणाऱ्या निष्ठावंत त्यागी कार्यकर्त्यांचा एक संच तयार करणे आवश्यक होते.

आम्ही शिक्षकांना व विद्यार्थ्यांना देशभक्तीचा श्वासोच्छ्वास घेण्यास शिकविले. जनसेवा हे त्यांचे ब्रीदवाक्य ठरले. केवळ त्यांना उपदेश देऊनच आम्ही थांबलो नाही तर, खेडुतांकरिता रात्रीचे वर्ग चालवीत होतो व इतर ग्राम सुधारणांची कामे आम्ही मुलांकडून प्रत्यक्ष करवून घेत होतो. दररोज संध्याकाळी आम्ही त्यांना प्रसिद्ध लेखकांच्या कृतीतून चांगले उतारे, थोर राष्ट्रीय पुढाऱ्यांची चरित्रे, स्वातंत्र्य आंदोलनाचा इतिहास वाचून दाखवीत असू. वीर

गीते, पोवाडे म्हणून दाखवीत असू. मैथिलीशरण गुप्तजींचा आदेश त्यांच्या मनात भरविला जात होता. तुम्ही केवळ स्वयंकेंद्रित बनू नका, पददलितांच्या उद्धाराकरिता जगा, त्यांच्याशी एकरूप होऊ जा. असे आम्ही त्यांना सांगत असू. ती मूले व्यक्तिश: व सांघिकपणे स्फूर्तिदायी गाणी म्हणत असत. अशा रितीने नव्या कार्यासाठी आम्ही त्यांचा मानसिक व आध्यात्मिक दृष्टीने विकास करीत होतो.

ही संस्था म्हणजे थोडक्यात स्फोटक मानवी सामग्री निर्माण करण्याचा जणू एक मोठा कारखानाच बनली होती. सरकारला या भयंकर प्रयोगाचा सुगावा लागण्यास फार मोठा वेळ लागला नाही. आमच्या भोवती गुप्तहेराचे जाळे पसरविण्यात आले.

असहकारितेच्या चळवळीतूनच आमचा उदय झाला असल्यामुळे आम्ही सर्व कट्टर काँग्रेसवादी होतो. आमच्या अंगी राष्ट्रीय वृत्ती चांगली बाणली होती. दर महिन्याच्या शेवटच्या रविवारी काँग्रेस ध्वजवंदनाचा कार्यक्रम होत असे. त्याचे वृत्त अधिकाऱ्यांपर्यंत पोहचले. आमच्या हालचालीवर, कार्यक्रमावर नजर ठेवण्यासाठी त्या खेड्यात कायमची एक तुकडी नियुक्त करण्यात आली. शाळा पहायला येणाऱ्या प्रत्येक व्यक्तीने प्रथम फौजदार किंवा साहाय्यकाला वर्दी देऊन यायला पाहिजे असा नियम करण्यात आला परंतु शाळेत भावी परिणामाची फारशी भीती न बाळगता कार्य चालू होते.

हिप्परग्याच्या वास्तव्यात तेथील ग्रामीण परिसरात स्वामीजींची अध्यात्मिक प्रवृत्ती अधिकच वाढली. तेथेच त्यांनी सन्यास स्विकारण्याचे ठरविले. त्यांनी त्यांच्याजवळ असलेल्या सर्व वस्तूंचा त्याग केला. १४ जानेवारी, १९३० ला मकरसंक्रांतीच्या दिवशी शाळेतील हिशोबवहीत माझ्या नावावर जी रक्कम शिल्लक होती ती त्यांनी गरीब विद्यार्थी साहाय्यक फंडाकडे वळती केली. स्वामीजी सकाळचे वर्ग संपताच हातात झोळी घेऊन गावात भिक्षेला निघत. तळ्याकाठी एका मंदिरापाशी बसून त्या वेळी तेथे जो कोणी असेल त्यालाही बरोबर घेऊन भिक्षेतील अन्न ते सेवन करीत असत. येथील आध्यात्मिक जीवनात कविसंत स्वामी रामतीर्थांच्या शिकवणीतून प्रेरणा लाभली होती. स्वामी रामतीर्थांचे शिल्प लखनौ येथील स्वामी नारायण यांची त्यांना हिप्परगा येथे संन्यासाकरिता दिले. व्यंकटेश खेडगीकर हे आता स्वामी रामानंद तीर्थ या नावाने ओळखले जाऊ लागले.

हिप्परगा येथील वास्तव्य काळातच स्वामीजींचे संस्थानावर मोठे मित्रमंडळ स्थापन झालेले होते. स्वामीजींनी आपले कार्यक्षेत्र अधिक व्यापक करावे, लोकांना जागृत करावे आणि मुक्तिसंग्रामासाठी त्यांना संघटित करावे, असे त्यांना सहकारी सुचवू लागले. परिणामी स्वामीजींनी आपल्या सहकाऱ्यासोबत मोमीनाबाद (अंबाजोगाई) येथे गेले व तेथूनच त्यांनी मुक्तिसंग्रामासाठी कार्याला सुरुवात केली.

१९३२ च्या दिवाळीच्या पाडव्यास श्री. अनंतराव कुलकर्णी यांनी हिप्परग्याहून हरिद्वारच्या पदयात्रेला जाण्याचे ठरविले. सोबत विश्वंभरराव हराळकर, दत्तासिंग गहिलोत (विद्यार्थी), शंकर फकिरजी पाटील, सोमनाथ (विद्यार्थी), रंगनाथ सायंगावकर, परचुरे ही मंडळी सोबत होती. प्रवास लोहारा- भातांगळी -औसा- लातूर-चाकूर- अंबेजोगाई -परळी-गंगाखेड-पूर्णा-वसमत-हिंगोली-वासीत-कारंजा-अमरावती-एलिचपूर-बैतूल-हुशंगाबाद -भोपाळ -शिवपुरी-आग्रा-मथुरा-अलिगढ-मीरत - मुझफ्फरपूर-सहारनपूर-हरिद्वार-ऋषीकेश-लक्ष्मण झुला व ब्रह्मपुरी या मार्गे झाला. चैत्र शुद्ध प्रतिपदेस पाडव्यादिवशी पदयात्रा हिप्परग्यास परत आली. एकूण पाच महिने लागले. चार महिने दहा दिवस पदयात्रा व वीस दिवस रेल्वेचा प्रवास झाला.

१९३५ च्या उन्हाळयात स्वामी रामानंद तीर्थ, बाबासाहेब परांजपे, बाबुराव कानडे, ग.धो. देशपांडे इत्यादी अनेक शिक्षकांनी शाळा सोडली.विद्यार्थी संख्याही कमी झाली होती. अशा स्थितीत शाळा चालविणे अवघड कार्य झाले होते. अनंतराव कुलकर्णी यांनी शाळेला जीवन समर्पित केले असल्यामुळे ते संस्था बंद करण्यास तयार नव्हते. त्याप्रमाणे त्यांनी आपले कार्य चालू ठेवले. शाळेची आर्थिक स्थितीही बिकट झाली होती.

हैद्राबाद संस्थानात राजकीय जागृती मोठ्या प्रमाणात होत होती. महाराष्ट्र संघ, महाराष्ट्र परिषद, हैद्राबाद स्टेट काँग्रेसच्या माध्यमातून जनतेचा लढा चालू होता. अनंतराव कुलकर्णी यांचाही या चळवळीमध्ये सक्रिय सहभाग होता. त्यांना कारागृहातही जावे लागत होते.

१९४१ मध्ये संस्थेने एक मोठा वार्षिकोत्सव साजरा केला. उत्सवामध्ये संस्थेचे प्रश्न जनतेसमोर ठेवून जनतेकडून साहय मिळविण्यास सुलभ जावे हा उद्देश होता. १९३३ च्या उत्सवानंतर असा उत्सव झाला नव्हता. मार्च, १९४१ मध्ये हैद्राबाद हायकोर्ट वकील व लॉलेस्लेटिव्ह कौन्सिलचे

सभासद रामचंद्र अंतु यांच्या अध्यक्षतेखाली साजरा करण्यात आला. उत्सवास नळदुर्ग, तुळजापूर, उस्मानाबाद, लातूर व परिसरातील प्रमुख मंडळी व तीन-चार हजार जनसमुदाय उपस्थित होता.

शाळेचे विद्यार्थी मुंबई विश्वविद्यालयाची परीक्षा देत असत. येथील विद्यार्थ्यांना परीक्षेस बसण्यास मुंबई विदयापीठाने बंद केल्यामुळे संस्थेने बनारस विद्यापीठाच्या मॅट्रिकच्या परीक्षेस मुलांना पाठवायचे ठरविले. १९४३ मध्ये शाळेतील मुलांची संख्या दोनशेवर गेली. शाळेचे शिक्षणाचे कार्यही व्यवस्थित चालू होते. संस्थेने एक उत्सव साजरा करण्याचे ठरविले व त्यासाठी प्रसिद्ध साहित्यिक वि.स. खांडेकर यांना बोलवायचे ठरविले. उत्सवाकरिता, उस्मानाबाद जिल्हयाच्या सर्व अठरा अधिकाऱ्यांना निमंत्रण दिले होते व ते सर्व अधिकारी आले होते. शंकरराव किर्लोस्कर व त्यांचे चिरंजीव मुकुंदराव किर्लोस्कर, श्रीधर नाईक, हैद्राबादचे दिगंबर बिंदू, विष्णू कृष्ण भावे, कवी यशवंत, वामन मल्हार जोशी, चित्रकार दलाल, तात्यासाहेब केळकर, नरसिंह चिंतामण केळकर हेही उपस्थित होते. बार्शी येथील तिन्ही मिल्सचे मालक झाडबुके, भगवंतराव सुलाखे व जंबुआण्णा आखाडे हे ही आले होते व जनसमुदाय हजारोंच्या संख्येने उपस्थित होता. उत्सवाचे आकर्षण म्हणजे वि.स. खांडेकरांचे व्याख्यान. हे व्याख्यान उत्सवाच्या दिवशी रात्री १२ वाजता सुरू होऊन २ वाजता संपले.

## शाळेचे अखेरचे दिवस

१९४२ च्या उत्सवानंतर पुढील दोन-तीन वर्षे शाळेसाठी फार कष्टाची गेली. याचे महत्त्वाचे कारण त्या काळची वाढती महागाई. १९४२ जूनपासून विद्यार्थी संख्या कमी होऊ लागली. त्यामुळे १९४४ मध्ये शाळा हिप्परग्याहून लोहाऱ्यास स्थलांतरित करण्यात आली. तेथे बसवंतअप्पा सट्टे व विनायकराव बोरगावकर यांच्याप्रमाणे एक मुस्लीम शिक्षक बंबईवाले साहेब (अ.माजीद साहेब) यांची नेमणूक करण्यात आली. शाळेचे विद्यार्थी व शिक्षक गांधी टोपी घालत. या गांधी टोप्या सरकारी अधिकारी व मुसलमानांना सलत होत्या. म्हणून त्यांनी शाळेतील शिक्षकांना अनेक प्रकारे त्रास देण्यास सुरुवात केली. अशा स्थितीत शाळेचा जम बसविण्याचा प्रयत्न चालू असतानाच रझाकार चळवळ उद्‌भवली. तशाही स्थितीत शाळेचे कामकाज चालूच होते. १५ ऑगस्ट,

१९४७ ला भारत स्वतंत्र झाला. परंतु हैद्राबाद संस्थानातील जनता पारतंत्र्यात होती. व्यंकटराव देशमुख यांनी सत्याग्रहात भाग घेतला. त्यांना अटक होऊन उस्मानाबाद जेलमध्ये नेण्यात आले. रझाकारांच्या अत्याचारामुळे व अनंतराव कुलकर्णी व त्यांचे सहकारी बाबुराव गवसणे यांच्या जिवाला धोका होता. त्यांनी वेश पालटून पोबारा केला. सहाजिकच शाळेचे काम बंद पडले (१९४६). शिक्षण क्षेत्रात मराठवाडयातील सर्व जिल्ह्यात उस्मानाबाद जिल्हा आघाडीवर राहिला, त्याचे श्रेय हिप्परगा येथील राष्ट्रीय शाळेकडे जाते.

निजाम राजवटीत शैक्षणिक परिस्थिती अत्यंत दयनीय असून इ.स.१८६९-७० साली विल्कीन्स यांच्या नेतृत्वाखाली हैद्राबाद संस्थानात स्वतंत्र शिक्षण विभागाची स्थापना झाली. सुरुवातीला शिक्षण हे केवळ राजघराण्यातील मुले आणि मुस्लिमांपर्यंत सीमित होते. पुढे १८८४ ला सय्यद हुसेन बिलग्रामी हे शिक्षण संचालक झाल्यानंतर त्यांनी नांदेड,जालना,तुळजापूर लातूर व बीडला प्राथमिक शाळा काढल्या. त्यानंतर १९०५ ला रॉस मसुदनी प्रत्येक जिल्ह्यात उर्दू माध्यमाच्या शाळा सुरू केल्या. इंग्रज अधिकारी मॅकेन्झीने एक चांगली सूचना मांडली. त्यानुसार खेड्यातील प्राथमिक शाळेमध्ये कृषिविषयक शिक्षण द्यावे तर माध्यमिकमधून व्यापार आणि उद्योगाचे शिक्षण द्यावे. दुर्दैवाने याची अंमलबजावनी झाली नाही.

सहाजिकच १९४१ पर्यंत मराठवाड्याची साक्षरता फक्त ७.४ टक्के होती. कारण तोपर्यंत मराठवाड्यात १४९८ खाजगी तर ५५०२ सरकारी शाळा होत्या. त्यामुळे आपल्या मुलांना स्वातंत्र्यासाठी तयार करायचे असेल तर खाजगी शाळेशिवाय पर्याय नव्हता. त्यातूनच हिप्परग्याच्या शाळेची निर्मिती झाली.

***

# ५. मुक्तिसंग्रामाचा पहिला टप्पा

हैद्राबादच्या निजामाचे राज्य म्हणजे भारतातील सर्वांत मोठे संस्थान म्हणून ओळखले जात होते. अखंड भारतात जातीयतेचे बीज पेरून राज्यकारभार कसा करता येईल याकरिता ब्रिटिशांनी निर्माण केलेले बांडगूळ म्हणजेच निजामाचे शासन होय. एका बाजूला निजामाला फूस लावून भारतविरोधी राज्यकारभारासाठी भडकावयाचे आणि दुसऱ्या बाजूला आपला प्रतिनिधी हैद्राबादेत ठेवून निजामावर विविध प्रकारची बंधने आणावयाची, अशी दुहेरी नीती इंग्रजांनी वापरात आणलेली होती. निजामाला वार्षिक ५० लाखांचा तनखा देऊन इंग्रजांनी त्याला जखडून ठेवलेले होते. एवढेच नाहीतर त्याच्या दैनंदिन खर्चावरही अनेक कडक बंधने घातलेली होती. त्यामुळे एकाबाजूला इंग्रजांचा मांडलिक असलेला निजाम उस्मानअलीखा जंगबहादूर असफजहा स्वतंत्र देशाचे स्वप्न पाहत होता, हेच मुळी आश्चर्यकारक होते. स्वतंत्र देशाची संकल्पना उराशी बाळगून त्या दिशेने पावले उचलणाऱ्या त्याच्या लांडगेशाही प्रवृत्तीला कासिम रझवीसारख्याची मदत मिळाली आणि हैद्राबाद संस्थानचा नूरच पालटला. हैद्राबादचे मूळ नाव भागानगर. मध्ययुगातील कालखंडात गोवळकोंड्याचा राजा कुतुबशाहाने या नगरीची रचना केली आणि त्याला आपली आवडती पत्नी भागमतीवरून नाव दिले भागानगर. भागानगरात चारमिनार उभा करताना त्याने हिंदू आणि मुस्लिमांचा मिलाफ साधावा म्हणून या मिनारमध्येच मंदिर आणि मश्जिदीची निर्मीती केली. याच प्रांतात लोकसंख्येने ९० % असलेल्या हिंदूंच्या भावनेची कदर न करता निजामाने स्वतंत्र देशाची शेखचिल्ली कल्पना मांडायला सुरुवात केलेली होती. अखंड भारतासाठी हे भयानक होते. काश्मीरचा प्रश्न वेगळा आहे, कारण त्याच्या सीमा हिमालयाच्या पर्वतरागांनी बंदिस्त झालेल्या आहेत. तर हैद्राबाद संस्थान हे भारताच्या मध्यभागात असून अशा अवस्थेत स्वतंत्र प्रांताची कल्पनाच मुळी

भयानक ठरणारी होती. हे कदापि शक्य नव्हते, स्वप्नांचे मनोरथ बाळगणाऱ्या निजामाला याची कल्पना नसावी. तरीपण रात्रीच्या वेळी चोरसुद्धा पोलिसांना भारी ठरत असतो, त्याप्रमाणे स्वतंत्र भारताच्या विशाल फौजेला न जुमानता निजामाने स्वतंत्र होण्याचे आपले तुणतुणे कायम ठेवले होते.

हैद्राबाद मक्तिसंग्रामाचा कालखंड हा १९४८ चा. भारतदेशाला नुकतेच अहिंसेच्या मार्गाने स्वातंत्र्य मिळालेले, तर याच समयी हैद्राबाद संस्थानात रझाकाराच्यारूपाने यमाचा नांगर फिरत होता. अन्याय आणि अत्याचाराने परिसीमा गाठलेली होती. तरीसुद्धा भारतीय संस्कृतित वाढविलेल्या माणसाने आपला समतोल कधी ढळू दिला नाही. देव नेहमी सत्याच्यामागे असतो यावर त्याचा विश्वास होता. कारण त्याला माहीत होते.

वारी निघाली पंढरीला
विठ्ठल, विठ्ठल म्हणायचे असते
वाट अगोदरच ठरलेली असते
आपण फक्त चालायचे असते.

देवधर्म आणि साधी राहणी, परोपकारची भावना त्याच्या नसानसात भिनलेली, त्यामुळे अन्यायाची परिसीमा गाठूनही त्याने आपला संयम कायम ठेवलेला होता. गांधीजींची शिकवण कायम ठेवत हैद्राबाद मुक्तिसंग्रामातील लोकांचा लढा हा सनदशीर मार्गाने सुरू होता. त्याला मराठवाडा आणि आपला उस्मानाबाद जिल्हा अपवाद नव्हता. या ठिकाणी आपण अशाच सनदशाीर मार्गाने झालेल्या आंदोलनाचा परामर्श घेणार आहोत.

लोकांची आर्थिक परिस्थिती बेताचीच असून शेती हे उदरनिर्वाहाचे एकमेव साधन असून त्याकाळी हिंदू समाजातील लिंगायत, ब्राम्हण, मारवाडी यांच्यासोबतच दुरवरून आलेले रोहिले, पठाण यांची सावकारी जोरात चाललेली असायची. अनेक जमीनदार हे अशा लोकाकडे गहान असायचे. शेकडो एकर जमीन लिहून दिल्यानंतर तिची परतफेड होत नसल्याने अशा जमिनी हडप केल्या जायच्या. त्यालाच जमीन 'डुलली असा' शब्द होता. पोलीस आणि गावच्या पाटलाला चिरीमिरी दिल्यानंतर सावकारांचा रुबाब असायचा. कळंब तालुक्यातील जवळ्याचे आमचे एक नातेवाईक जे स्वत: त्या काळी निजामाचे माले पाटील होते. त्यांनी शेजारच्या गावातील शिराढोणमधील एक सावकार रामकिशन रामलाल मारवड्याकडून काही पैसे काढले होते.

पाऊस न झाल्याने त्यांना ते पैसे ठरल्याप्रमाणे परत करणे जमले नाही. तेव्हा घरामध्ये लग्नाची घाई चालू असताना ऐन लग्नाच्या दिवशी पाटलाच्या घरातील पीठ मीठ सर्वकाही जप्त करुन नेण्यात आले. विशेष म्हणजे यात पोलिसांचा काय संबंध ? परंतु पोलिसांनी स्वत: यात भाग घेतला म्हणजे आपणास पैशाची ताकद काय होती याचा अंदाज येऊ शकतो. उस्मानाबादच्या फुलचंद गांधीकडे तर शेतकऱ्यांची जवळपास ५ ते ६ हजार एकर जमीन गहान असावी असे सांगितले जाते. परंतु याच वेळी त्यांच्या सावकारीत फरक होता. त्यामुळे त्यांनी पुढे स्वातंत्र्य संग्रामात भाग घेतला.

जमीनदारांनी आपल्या जमिनी देऊन कर्ज काढले. मग गरिबांनी काय करायचे? त्यांच्याकडे स्वत:च्या शरीराशिवाय होतेच का ? सावकार त्याचाही मोबदला आपल्या पद्धतीने द्यायचे. फक्त १२ रूपयात सालगडी. वर्षाचे १३ महिने जमीनदाराकडे किंवा सावकाराकडे रात्रंदिवस राबायचा. विशेष म्हणजे या वेळी एकाही सुट्टीची तरतूद नव्हती. जर का सुट्ट्या घेतल्याच असतीलतर वर्ष संपल्यानंतर सुट्ट्यांचे दिवस भरून काढावे लागत असत. लहान मुले तर फक्त जेवणावर जनावरे राखण्यासाठी ठेवण्याची पद्धत होती. शेतमजुराचा रोजगार दोन आणे, चार आण्यांच्या पुढे नव्हता. रोख स्वरूपातील पैसे हे सावकार, दुकानदार आणि जमीनदाराकडेच दिसायचे. जे पैसे असतील ते सायकलचे ट्यूब असते त्याप्रमाणे कपड्याची एक पिशवी शिवून ती कंबरेला बांधली जायची. या पिशवीला हामिणी,हमिणी किंवा हमेणी म्हणत असत.

आपण स्वातंत्र्य संग्रामाच्या वेळचा इतिहास पाहत आहोत. या वेळी ८० ते ९० वर्षांच्या वृद्ध माणसांशी चर्चा करून बरीच माहिती संकलित करण्याचा प्रयत्न केला आहे. ते म्हणायचे, धोतर किंवा साडीची किंमत दीड रुपया तर बैल १० रुपयाला मिळायचे. घरातील दिवे हे गोड्या तेलाचे होते. पुढे पाण्याच्या व पिठाच्या गिरणीसाठी इंजिन आल्यानंतर प्रथम क्रुड ऑईल आणि नंतर घासलेट आले. ३५ रुपयांत बॅरलभर तेल मिळाल्याचे ते आवर्जून सांगतात. उस्मानाबादहून पंढरपूरची वारी अवघ्या ३ रुपयात प्रसादासह व्हायची. १९५४ ला तुपाचा भाव १. २५ रुपया तर सोन्याचा भाव ६० रुपये तोळा होता. सोने मोजण्याचे परिमाण ८ गुंजाचा १ मासा, १२ मास्याचा १ तोळा याप्रमाणे होते. पुर्वी सोने बिस्किटऐवजी कांडी मिळायची. त्याचीच हातात अंगठी घालायची. खेडेगावात अगदी १९७२ पर्यंत जमिनीचे भाव २००

रुपये एकर असल्याची कागदपत्रे मी स्वत: पाहिलेली आहेत. मग ज्वारीचा भाव तर विचारू नका, २० रुपयाला पोतंभर ज्वारी यायची. ४० ते ५० किमी अंतरावर खेडेगावचा माल लातूर किंवा बार्शीपर्यंत वाहून न्यायचा असेल तर बैलगाडीला भाडे असायचे फक्त ३ रुपये. दूध कोणी विकायचे नाही तर दही केल्यानंतर ताक गोरगरिबांना वाटून टाकले जायचे. त्यामुळे सकाळच्या वेळी अशी मंडळी जमीनदारच्या दारात भांडे घेऊन उभी असायची. त्यामुळे ताकाला जाऊन भांडे लपविण्याच्या वाक्प्रचार रूढ झाला.

निजामाच्या काळात पैशाला पै म्हटले जायचे. त्यानुसार पैशाचे मूल्य पुढीलप्रमाणे निश्‍चित करण्यात आलेले होत.

| पै | पैसे |
|---|---|
| २ पै | १ पैसा |
| ६ पै | १ ढब्बू |
| २ ढब्बू | १ आणा |
| २ आणे | १ चवली |
| २ चवली | १ पावली |
| २ पावली | १ अधेली |
| २ अधेली | १ रुपया |
| १६ आणे | १ रुपया |
| ९६ पैशांचा | १ रुपया |

निजामशाहीत रुपयाचा बंदा चांदीचा असून सहावा निजाम मीर महमंदच्या काळात मीमचा रुपया तर सातव्या आणि शेवटच्या निजामाच्या काळात ऐनचा रुपया चलनात होता. आजच्या डॉलरच्या तुलनेप्रमाणे इंग्रजाच्या चलन व्यवस्थेतील रुपयाच्या मानाने निजामशाहीतील रुपयाची किंमत कमी होती. इंग्रजांना छत्रपती शिवरायांची किंमत माहीत असल्याने पेशवाईच्या अस्तानंतरही शिवराई नावाचे नाणे चलनात आणले होते. त्यामुळे मुंबई इलाक्यात म्हणजेच सोलापूर, बार्शी भागात जाताना चलनाची अदलाबदल करावी लागायची. तेव्हा आपणाला जास्तीचे पैसे मोजावे लागायचे. निजामाचे

नाणे नावाप्रमाणे वजनाला ढब्बू असलेतरी त्याची किंमत शिवराईपेक्षा कमी असायची. म्हणून त्या काळी म्हातारी माणसं सहजपणे म्हणून जायची, 'दिसायला ढब्बू आणि चालायला शिवराई'. आणि चांदीचा बंदा रुपया देऊनही पैसे कमी यायचे त्यातून म्हण आली, बट्टा लागला.

धान्य मोजण्यासाठी अडशेरी, पासरी, धडा, खंडी, शेर आणि मन याप्रमाणे मोजण्याची पद्धत असायची. तीच पद्धत पातळ पदार्थ मोजताना असायची.

| | | |
|---|---|---|
| १२ | माशांचा | १ तोळा |
| ५ | तोळा | १ छटाक |
| २ | छटाक | १ अदपाव |
| २ | अदपाव | १ पावशेर |
| २ | पावशेर | १/२ शेर |
| २ | अर्धशेर | १ शेर |
| १२ | शेराचा | १ मन |
| ४ | धड्याचा | १ मन |
| २० | मनांची | १ खंडी |

बदलत्या जगाबरोबर आपणही आता शिकले पाहिजे ही भूमिका जोर धरायला लागली होती. कारण त्याला माहीत झाले होते की, पुस्तक वाचल म्हणजे मस्तक सुधारतं आणि मस्तक सुधारलं म्हणजे कोणापुढे नतमस्तक व्हावं हे कळत. त्यानुसार उस्मानाबादचे नगर वाचनालय लोकमान्यांच्या हस्ते १९०१ साली सुरू करण्यात आले. परभणीचे गणेश वाचनालय याचवेळचे. तर आपल्या जिल्हयात नळदुर्गचे बलभीम वाचनालय १९३० ला, जेवळीचे सुबोध वाचनालय १९३४ तर परंड्याचे हंस वाचनालय १९३८, तुळजापूरचे नगर वाचनालय १९४७ साली काढून आपल्या लोकांना ज्ञानाची नवीन दारे खुली करून देण्यात आलेली होती. याप्रमाणे गुंजोटी, लोहारा यांच्यासह उस्मानाबाद जिल्ह्याच्या अनेक भागांत वाचनालये सुरू होऊन जगातील माहितीने मराठवाड्यातील माणूस शहाणा व्हायला लागला. माझे रामायण, माझी जन्मठेप

यासारख्या ग्रंथांनी त्याला आपला धर्म शिकविला.

या वाचनालयावर जिल्हा कलेक्टरचे नियंत्रण असून त्याकरिता त्याचा पाहणीदौरा असायचा. या दौऱ्यात कलेक्टरला वाचनालयातील पुस्तके आणि भिंतीवर लावलेल्या गांधीजी, टिळक यासारख्या लोकनेत्यांच्या फोटोमुळे बरीच अस्वस्थता वाटायची. नुसती वाटायचीच नाही तर त्याने बऱ्याच वाचनालयाच्या शेरा नोंदवहीत शेरा मारलेला असायचा की, आपला राजा म्हणून वाचनालयाच्या भिंतीवर निजामशहाचा फोटो आढळून आलेला नाही. अर्थात अशा शेऱ्याला घाबरण्याचे दिवस आता राहिलेले नव्हते. निजामाची सत्ताच उखडायला निघालेल्या माणसाला फोटोची काय किंमत ?

ग्रंथालयांसोबतच आता शाळाही निघायला लागल्या होत्या. निजामाने राष्ट्रीय शाळांवर बंदी घातलेली असलीतरी १९२१ साली ऐन विजया दशमीच्या दिवशी क्रांतिकारकांनी हिप्परग्यातील रामचंद्र होनाळकरांच्या घरात शाळा काढली. शाळेचे नाव ठेवण्यात आले 'प्रायव्हेट हायस्कूल'. या कामी औशाचे अनंतराव आणि व्यंकटराव कुलकर्णी यांनी महत्वपूर्ण भूमिका घेतली. निजाम राजवटीत याला परवानगी नव्हती म्हणून विद्यार्थ्यांना मुंबईच्या बोर्डात बसविण्यात आले. तेव्हा संपूर्ण मुंबई बोर्डात ही शाळा पहिली आली. याच शाळेचा विद्यार्थी मातोळ्याचा दत्तोबा भोसले अखिल भारतीय हिंद विजय जिमखाना बडोदा येथील फडात कुस्ती खेळून सतत तीन वर्षे विजयी ढाल मिळवून आला होता.

ही शाळा कोणाच्या मालकीची नव्हती याउलट यातून क्रांतीसाठी लागणारा पक्का माल तयार करावयाचा होता. म्हणून पद्मीनबाई, शांताबाई, पार्वतीबाई, कमलाबाई, अमृतराव पाटलांच्या पत्नी स्वत:च्या हाताने स्वयंपाक करून मुलांना पिठलं-भाकर खाऊ घालत होत्या. शेजारच्या उंडरगाव, बाणेगाव, शिवकरवाडी, सलगरा या गावांतून दूध आणि दुपारच्या बैलगाडया भरून येत असायच्या. गावातील विश्वनाथराव होनाळकरांनी या पोरांसाठी स्वत: दहा गायी पाळलेल्या होत्या. इथं शिपाई सेवक असा काही प्रकार नव्हता. विद्यार्थ्यांनी शेण आणायचे तर शिक्षकांनी शाळा सारवून काढायची. शाळेकरिता विश्वस्तनिधीची उभारणी करण्यात आली. विशेष म्हणजे यावर साहित्यिक वि. स. खांडेकरांनी स्वयंस्फूर्तीने काम केले.

राष्ट्रीय शाळा म्हटल्यानंतर राज्यकर्त्यांचे डोके फिरणारच. त्यांनी

शाळेच्या बाजूलाच स्वतंत्र पोलीस ठाणे निर्माण केले. संस्थापक म्हणून अनंतरावकाकांना ठाण्यात हजेरी लावण्यात आली. परंतु शाळेचे कामकाज पाहून ठाण्याचे प्रमुख कोतवाली अमीन सायबाला त्यांचा आदर वाटायला लागला. तेव्हा त्याने शिपायाला आदेश देऊन सांगितले की, काकाची सही घ्यायला तूच शाळेत जात जा. तर तुळजापूरचे तहसीलदार एकदा भेट देण्यासाठी हिप्परग्याच्या शाळेवर आल्यानंतर ते एवढे भारावून गेले की, आपण मुसलमान आणि निजामशाहीतील नोकर असल्याचे विसरून ते चक्क खादीचा वेश परिधान करू लागले. हा स्वातंत्र्यवीरांच्या त्यागाचा विजय होता.

पुढे स्वामी रामानंद तीर्थांनी मुख्याद्यापकाच्यारूपात अनेक क्रांतीकारक घडविले. अगदी पी. व्ही. नरसिंगराव आणि शंकरराव चव्हाणासारखी मोठी माणसं या शाळेने घडविली. १९३५ ला पुण्यात रँडचा खून करणारे चाफेकरबंधू याच हिप्परग्याचे पाणी पिलेले होते. गुंजोटीचे श्रीकृष्ण विद्यालय १९२१ ला तर उमरग्याचे भारत विदयालय १९४१ साली सुरू होऊन जिल्हाभर शिक्षणसंस्था काढून क्रांतीचे धडे गिरवायला सुरुवात झाली.

शालेय शिक्षणाची तऱ्हा काही निराळीच होती. एक तर हैद्राबादशिवाय जवळपास उच्च शिक्षणाची सोय नव्हती. तर शाळेत वंदेमातरम् म्हणायला बंदी घातलेली होती. याची आजही आठवण होत असल्याची माहिती स्वातंत्र्यसेनानी भास्करराव नायगावकर यांनी दिली. याउलट शाळेतील प्रार्थना मोठी अजब असून हिटलरची आठवण करून देणारी होती. देवाकडे हात जोडून निजामासाठी दुवा याप्रमाणे मागायची –

खिचर की उम्र हो तुझको,
आना बख्त सिंकदर हो!
याचा अर्थ होतो,
दीर्घायू दे निजाम प्रभूला,
हीच मागणी ईश्वराला.

तर हैद्राबाद संस्थानच्या राष्ट्रगीततही निजामाचाच बोलबाला असल्याचे दिसून येते–

ता अबद खालिक – इ – अलम ये रियासत रखे।
तुझको उस्मान बसद इजलाल सलामत रखे।

जैसे तू फक्र इ सलातीन है। बाफजल याझदान।
युही मुमताज तेरा दौर ए हुकूमत रखे।
अल ओ औलाद को अल्लाह दे उम्र इ खिज्री।
उनसे अबाद मेरा खाना – इ – दौलत रखे।
जोड इ हतीम रहे शरमिंदा – इ – अहसान तेरा।
अदल – इ – खुश्राऊ को खिजल तेरी अदालत रखे।
खंदाजन सुरत – इ – गुल तेरे हवा खा रहे।
आके कदमो पे अदु फर्क इताअत रखे।
बन के साकी तेरे इक्बाल निजाम – इ – सबय।
तुझको सहबी काश खुमखाना इशरत रखे।।

शाळेबरोबरच उस्मानियासारख्या उच्च शिक्षण देणाऱ्या विदयापीठातही उर्दूतूनच शिक्षण घ्यावे लागायचे. याशिवाय विदयार्थ्यांना मुस्लिम शिक्षण देण्यासाठी दिनीयात नावाचा विषय सक्तीचा असून तो रोज शिकविला जाई. तर हिंदू विद्यार्थ्यांना नीतिशास्त्र विषय आठवड्यातून फ क्त एकच दिवस शिकविला जायचा. त्याला अखलियात म्हणत. या विषयात नापास झालातरी त्याला पुढच्या वर्गात ढकलण्यात येई. मात्र त्याच्या प्रगती पुस्तकावर शेरा असायचा नाकाम अखलियात.

निजाम सरकारच्या परंपरावादी शिक्षणाला खतपाणी घालण्याचे काम इत्तेहादूल मुसलमीनसारख्या कट्टर मुस्लिम संघटनांनी केले. याच संघटनेचे नेतृत्व पुढच्या कालखंडात कासिम रझवीसारख्या कडव्या नेत्याकडे गेले. आणि पाहतापाहता निजाम राजवटीचा चेहराच बदलून गेला.

कासिम रझवी आणि त्याची रझाकार नावाची संघटना याविषयी आपण पुढे सविस्तरपणे चर्चा करणारच आहोत. रझाकारांच्या हुकूमशाही प्रवृत्तीच्या छळामुळे लोक हैराण झालेले होते. उघडपणे जातीयवादी शक्तींनी निजाम राजवटीत धुमाकूळ घालण्यास सरुवात केलेली होती. त्यामुळे समाजात हिंदू आणि मुस्लिम अशी दरी निर्माण होण्यास सुरूवात झालेली होती. यामुळे उत्तर भारतातून आर्य समाजाचे लोण आता मराठवाडयात आले. पाहता पाहता हिंदूंनी आर्य समाजाच्या चळवळीत उडी घेतली. लोक जागृतीबरोबरच समाज मंदिरांची उभारणी सुरू झाली.

उस्मानाबादच्या आर्य समाज मंदिराची उभारणी याच कालखंडातील असून याकरिता बन्सीलाल व्यास यांच्या नेतृत्वाखाली बापू मास्तर, गोंदिराव जहागीरदार, जगन्नाथ गणेश, बापू शिंदे यांनी विशेष परिश्रम घेतले. आर्य समाजाच्यावतीने अनाथ मुलांच्या संगोपनाची जबाबदारी घेतलेली होती. त्यांच्यासाठी निधी जमा करण्याकरिता तेरचे पांडुरंग सुरवसे हातामध्ये दानपेटी घेऊन अक्षरक्ष: रस्त्यांनी पैसे मागत फि रायचे. व्यायामशाळा, अस्पृश्यता निवारण आणि धार्मिक शुद्धीकरण करून घेण्याच्या आर्य समाजी भूमिकेमुळे या परिसरातील समाज मोठ्या प्रमाणावर आर्य समाजाकडे झुकला आणि त्यातूनच स्वातंत्र्य चळवळीला हातभार लागत गेला.आर्य समाजाबरोबरच हिंदू महासभेनेही स्वातंत्र्य चळवळीत उडी घेतली आणि सोलापूरच्या वि. रा. पाटलांच्या नेतृत्वाखाली हिन्दू महासभेचे कामकाज याचप्रमाणात पुढे वाढत गेले.

हैद्राबाद मुक्तिसंग्रम हा देशातील एक वेगळ्या प्रकारचा लढा याकरिता होता की, जनमाणसातील हरप्रकारच्या माणसाने यात भाग घेतलेला होता. सर्वसामान्य जनता निजामाविरूद्ध उठाव करायला लागली असतानाच सरकारच्या जहागिरीवर स्वत:ला मोठे समजणारे देशमुख, देशपांडे आणि पाटील तसेच कुलकर्णी आणखी स्वस्थ बसलेले होते. या वेळी बीडच्या बलभीमराव कदम यांनी समाजातील अशा बहुजणांना एकत्र आणण्याचे महत्वपूर्ण काम हाती घेतले. याकरिता बीडला एक महत्त्वपूर्ण बैठक झाली. या बैठकीतून मराठा समाजातील पहिले उच्चशिक्षित झालेले ॲड. नरसिंगराव देशमुख काटीकर हे पुढे आले. त्यातूनच मराठा तत्समवर्गीय शिक्षण परिषदेचा जन्म झाला. या परिषदेच्या माध्यमातून बहुजनांना स्वातंत्र्य संग्रामाकडे ओढण्याचे काम हाती घेण्यात आले. पुढे भाई उद्धवराव पाटलांनी या कामी महत्त्वाची भूमिका पार पाडली.

साहित्याच्या क्षेत्रातही पूर्वी मुस्कटदाबी सुरू होती. साहित्य संमेलनालाही निजाम प्रांतीय संमेलन अशा प्रकारचे नाव होते. साहजिकच यात उर्दूला मोठे स्थान देण्यात आलेले होते. मराठी भाषा टिकली पाहिजे म्हणून या परिषदेचे नाव बदलून ते मराठवाडा साहित्य परिषद असे ठेवण्यात आले. या माध्यमातून आता मराठी भाषेचा विकास आणि मराठीतून शिक्षण याकरिता काम सुरू झाले.

एका बाजूला निजामशाहीची पिळवणूक चालू असतानाच दुसऱ्या बाजूला देशभरात स्वातंत्र्य आंदोलनाने जोर पकडलेला होता. कुठलीही जुलमी राजवट उलथून टाकण्याकरिता जनतेची ताकद हवी असते आणि त्यासाठी आवश्यकता असते संघटनात्मक खंबीर नेतृत्वाची आणि समर्पणाच्या भावनेची. यातूनच १९३८ साली स्वामी रामानंद तीर्थ आणि बाबासाहेब परांजपे यांच्या नेतृत्वाखाली हैद्राबाद स्टेट काँगेसची स्थापना झाली. त्यांच्यासोबत उस्मानाबादचे फुलचंद गांधी, शेषराव वाघमारे, बळीराम पाटील, व्यासाचार्य संदीकर यांचा समावेश होता. गोंविदभाई श्राफ तर जहालवादी म्हणून पुढे आल्याने निजामाने त्यांच्यावर बंदी घातली.

याच वेळी महात्मा गांधींनी देशभरात सत्याग्रहाची हाक दिलेली होती. त्यात अनेकांनी भाग घेतला. दिगंबरराव जिंतूरकर, मुरलीधर कानडे, व्यंकटेश जोशी, शंकरराव खानापूरकर, विनायकराव प्रयाग, लक्ष्मण पाथरूड, बलभीम बाळा, वीरभद्र कलय्या स्वामी, दगडू सुतार यांसारख्यांनी हैद्राबादमध्ये जाऊन सत्याग्रहात भाग घेतला. सत्याग्रहींना निजाम सीमेबाहेरून मदत मिळावी म्हणून सोलापूर या ठिकाणी चळवळीचे एक केंद्र कायम करण्यात आले. यासाठी सोलापूरच्या पत्रा तालीम भागात असणारी फुलचंद गांधीची माणिक ऑईल मील या कामाकरिता वापरण्यात आली. त्यानुसार सोलापूर केंद्रावरून देवीसिंह चौहान, उमरग्यातून रामराव राजेश्वरराव, लोहाऱ्याचे व्यंकटराव देशमुख, तुळजापुरचे साहेबराव हंगरगेकर, कळंबचे यशवंतराव बावीकर, औशाचे व्यासाचार्य संदीकर, उमरग्याचे बळवंतराव नागणेगुरूजी यासारख्यांनी भाग घेतला. उस्मानाबाद परिसरात महाराष्ट्र परिषदेच्या माध्यमातून कॅप्टन व्यंकटराव जोशी, नरहरराव मालखरे, विश्वंभरराव हराळकर, उमरग्याचे नानासाहेब चिंचोलीकर, तात्याराव मोरे, फुलचंद गांधी व त्यांचे बंधू विमलचंद गांधी यासारख्या नेत्यांनी सारा परिसर पिंजून काढला.

भारताचा स्वातंत्र्यदिन साजरा करण्यावर बंदी घातलेली असल्याने तिरंगा फडकाविण्यास बंदी घालण्यात आलेली होती. तरीपण उस्मानाबाद भागातील कळंब, ढोकी, तेर, मातोळा, हिप्परगा, तुगाव, सास्तुर यांसारख्या भागात १५ ऑगस्ट, १९४७ चा दिवस मोठ्या उत्साहात साजरा करण्यात आला. चिलवडीचे धाडसी स्वातंत्र्यवीर रामभाऊ जाधव या पठ्ठयानेतर तीन चारशे लोकांना एकत्रित घेऊन खेड्यापाड्यातून तिरंग्याची मिरवणूक काढली.

यांसारख्या घटनांमुळे इत्तेहादूलसारख्या संघटनेचे डोके फिरले.

आतापर्यंतचा लढा हा सनदशीर मार्गानेच चालू होता. त्यामुळे अहिंसेच्या माध्यमातून निजामावर जास्तीत जास्त प्रमाणावर दबाव कसा टाकता येईल यासाठी प्रयत्न चालू होते. निजाम सरकारची उत्पन्नाची साधने म्हणजे लेव्ही, अबकारी कर आणि करोडगिरी नाके याप्रमाणे होती. याकरिता गावच्या पाटील कुलकर्ण्यांची मदत आवश्यक होती. परंतु यातील बरीच मंडळी निजामाला सामील झाल्याने स्वातंत्र्य लढ्याला बरेच अडथळे निर्माण झालेले होते. देवणी परिसरात देवर्जननजिक असणाऱ्या हत्तीबेटावर स्वातंत्र्य सैनिकांनी आपला तळ ठोकलेला होता. त्यांच्यासाठी रात्रीबेरात्री उठून भाकरी बडवून देण्याचे काम आपल्या आयाबहिणी करत होत्या. परंतु इथला पाटील निजामाचा पक्का भक्त असल्याने त्याने ही खबर सरकार दरबारी कळविली. तेव्हा गावातील एका स्वातंत्र्य सैनिकांने त्या पाटलाला घराबाहेर बोलावून त्याच्या नरडीचा घोट घेतला. अशा रितीने गावोगावी आंदोलने होऊन पाटील आणि कुलकर्ण्यांना राजीनामे देण्यास भाग पाडण्यात आले.

खरं तर निजाम राजवट म्हणजे अन्यायाचे टोकच. दुष्काळाच्या खाईत लोटलेल्या शेतकऱ्यांना उत्पन्नाचा विचार न करता भरमसाट प्रमाणात लेव्ही आकारली जात होती. जागोजागी जबरदस्तीने मालाची वसुली चालू होती. तेव्हा जबरदस्तीने लेव्ही आकारणाऱ्या शासनाचा धिक्कार करून स्वातंत्र्यवीरांनी लेव्ही बंदीची घोषणा करून माल वसूली करणाऱ्या अधिकाऱ्यांना शिक्षा देण्यास सुरुवात केली. आपला शेतीमाल गुपचूपपणे निजाम राजवटीबाहेर घेऊन जाणाऱ्या शेतकऱ्यांना रस्त्यात अडवून त्यांना अमानुषपणे मारहाण करून तुरुगांत डांबण्यात येत असे. अशा प्रकरणात जेलमध्ये गेलेले अनेक स्वातंत्रसैनिक आपणाला भेटतील.

तुळजापूरपासून जवळच असलेल्या लोहारा आणि औसा तालुक्यातील गावांत वेळाआमवस्याचा सण हा ऐन संक्राती दिवशी साजरा करण्याची परंपरा आहे. याच्यामागे स्वातंत्र्याची झालर असल्याचे बहुतेकांना माहीतही नाही. भातांगळी गावातून शेतसाऱ्याची रक्कम घेऊन पाटील आणि कुलकर्णी बैलगाडीतून निघालेले असताना नरसिंगराव पाटील, नागोराव पाटील, दामोदर जगताप, लक्ष्मण मांग, महादेव जगताप, पुंडलिक चव्हाण, मातोळयाचे दत्तोबा भोसले यांनी गोळीबार करून बैलगाडी अडवून जमा

झालेला शेतसारा पळवून तो काजळ्याच्या कँपमध्ये जमा करण्यात आला. या वेळी या परिसरातील स्वातंत्र्यवीरांना निजाम पोलिसांनी अटक केली म्हणून साडेसात गावातील लोकांनी वेळाआमावस्या साजरी केली नाही. संक्रातीच्यादिवशी सुटका झाल्यानंतर याच दिवशी या ठिकाणी वेळाआमावस्या साजरी केली. विशेष म्हणजे सकाळी संक्रांत आणि दुपारी वेळाआमावस्या याप्रमाणे आजही हे सण केले जातात.

लेव्ही प्रमाणेच जंगल सत्याग्रहाचा विषयही बराच गाजला होता. जंगल सत्याग्रह म्हणजे विनोबा भाव्यांची भूदान चळवळ नव्हती, तर जंगल हे निजामाचे उत्पन्नाचे साधन होते. या जंगलातून त्याला मोठया प्रमाणावर सिंदी, अफू, गांजा याचे उत्पन्न मिळत होते. नदीच्या काठावर सिंदीची झाडे असायची. वास्तविक पाहता शेतकऱ्याच्या बांधावर हे झाड असायचे, त्याची मालकी निजामाची. मग त्याच्याच शेजारचे बाभळीचे झाड का चालत नव्हते ? सिंदीच्या झाडापासून मिळणारे उत्पन्न काढणारे लोक वर रुबाबात शेतकऱ्यांनाच त्रास द्यायचे. तुमच्याच शेतातील झाड तोडायला तुम्हाला बंदी घालण्यात आलेली होती. यावरच घाला घालायचा म्हणून लोकांनी आपल्या परिसरातील सिंदीची झाडे तोडण्यास सुरुवात केली. त्याचबरोबर अफूची झाडे उद्ध्वस्त करण्यात आली. रऊळगाव, आळजापूर, केशेगाव, आरळी यांसारख्या अनेक गावांत सिंदीची बने होती.

निजामशाही कारभार तसा चोखच. गावोगावी अफू, गांजा, दारूची परवानाधारक दुकाने असायची. अगदी ओरिजनल अफू आपल्या लोकांना मिळावी म्हणून जहिराबाद येथून अगदी सीलबंद करून माल दुकानापर्यंत पोहोचविला जायचा. कडक माल ३ रुपये तोळ्याने मिळत असल्यावर लोकांना त्याची चटक लागायला किती वेळ लागणार? दारूतही हीच तऱ्हा असायची. निजाम डिसलरी नावाचा दारूचा ब्रँड त्या वेळी खूप गाजलेला होता. पोटासाठी लागणारे धान्य जबरदस्तीने हिसकावून घेणारे सरकार मायबाप आपल्या लोकांना अफू, गांजा आणि दारू किती काळजीने पुरवत होते हे पाहिल्यास निजामशाही कारभाराचा अंदाज बांधता येतो.

सध्याच्या टोल नाक्याच्या धर्तीवर निजाम राजवटीत करोडगिरी नाक्याची रचना करण्यात आलेली होती. आपल्या राज्याच्य हद्दीतून येणाजाणाऱ्या मालावर जकात आकारण्यात येत होती. जकातीची रक्कम ही काही करोडोंच्या घरात होती. म्हणून या नाक्याला करोडगिरी नाके म्हटले जात

होते. निजाम राजवटीला आर्थिक कोंडीत पकडण्यासाठी करोडगिरी नाक्यावर छापे घालून ते लुटून उद्धवस्त करण्यात आले. खानापूर, काटी, तुळजापूर, आळणी, अपसिंगा यासारख्या हद्दीवरील गावात करोडगिरी नाके उद्धवस्त करण्यात आले. गौडगाव भागातील जे करोडगिरी नाके उध्वस्त करण्यात आले, त्या वेळी रोख स्वरूपातील रक्कम सोडून बाकी सामान गौडगावातील लोहकरे गुरुजींच्या संस्थेला दिले जायचे. अतिशय नम्रपणे लोहकरेगुरुजी आपली शाळा चालवत असत.

प्रत्यक्ष सत्याग्रहाबरोबरच आपल्या लेखनीतूनही अनेकांनी लोकजागृतीला सुरुवात केली. मराठवाडा, वैदिक संदेश, सुदर्शन अशा अनेक मुखपत्रातून सरकारच्या काळ्या कर्तृत्वाला वाचा फोडायला सूरुवात करताच सरकारने भाषणबंदी आणि लेखनबंदी घालण्यात येऊन त्यांना 'नागवार बागी' म्हणून नोटीस देण्यात आली. यात फक्त हिंदूच होते असे नाहीतर काही मुस्लिमांचाही समावेश होता. खुद्द निजामाच्या भावाने हुकूशाहीविरुद्ध आवाज उठवताच त्याला तुरुंगात डांबण्यात आले. तर शोयब उल्लाखा नावाच्या पत्रकाराने लोकांच्या वर्गणीतून 'दैनिक इमरोज' नावाचे वर्तमानपत्र सुरू करून 'दिन की सरकार रात की सरकार' नावाचे अग्रलेख लिहून सरकारचे वाभाडे काढण्यास सुरूवात केली तेव्हा रात्रीच्या समयी आपली लोकचाकरी संपवून शोएब आपल्या मेव्हण्यासह घरी जायला निघाला तेव्हा पाच सहा रझाकारांनी त्याचा हात कलम करून पाठीत गोळी घालून भर रस्त्यात त्याची हत्या करण्यात आली. यावरून निजामाची राजनीती आणि रझाकारावर त्याचा वाढत चालेला फाजील आत्मविश्वास ध्यानात येऊ शकतो.

अशा रितीने अन्यायकारी शासनाला उलथून टाकण्यासाठी अहिंसक मार्गाने आता लढा उभारला जाऊ लागला होता. खरं तर ही जमिनीची मशागत म्हणावी. कारण खरा लढा तर आता सुरू होणार होता. इंग्रजांसारख्या सुशिक्षितांना अहिंसा, सत्याग्रह या भाषा भल्याही समजल्या असतीलही परंतु ज्याचा राज्यकारभारच मुळी तलवारीच्या जोरावर आहे. त्याला अशा आंदोलनाने काय फरक पडणार आहे? हैद्रबाद मुक्ती संग्राम हा रझाकाराचा अभ्यास केल्याशिवाय पूर्णच होऊ शकत नाही.

***

# ६. स्वातंत्र्य संग्रामातील म्होरके

हैद्राबाद संस्थानात उस्मानाबाद जिल्ह्याचे वेगळे महत्व असून हा जिल्हा निजामाचा सर्फे खास जिल्हा म्हणून ओळखला जात होता. सर्फे खास म्हणजे खाजगी उत्पन्नाचा इलाका. त्यामुळे या जिल्ह्यातील उत्पन्न निजामाच्या वैयक्तिक खर्चाकरिता लावून दिलेले होते. तसेच धाराशिवचे नामांतर उस्मानाबाद हे सातवा निजाम मीर उस्मानअलीच्या नावावरूनच करण्यात आलेले आहे. त्यानुसार वर सांगितल्याप्रमाणे उस्मानाबादचे वेगळे महत्व ध्यानात येऊ शकते. यासोबत ज्या वेळी निजामाचे वर्तन मर्यादेबाहेर गेले तेव्हा याच उस्मानाबादने मोठया हिरिरीने स्वातंत्र्य संग्रामात सहभाग नोंदविला. अनेक हुतात्म्यांनी आपल्या प्राणांच्या बलिदानातून अखंड हिंदुस्थानचे स्वप्न सत्यात उतरवून दाखविले. उस्मानाबाद परिसरात स्वातंत्र्य संग्रामाचा दिलेला लढा हा अनेक अर्थांनी वेगळा होता.

उस्मानाबादच्या भौगोलिक सीमा या सोलापूरला लगत असल्याने स्वातंत्र्यवीरांना सोलापूरचा आधार होता. म्हणूनच उस्मानाबादच्या स्वातंत्र्यवीरांनी सोलापूर हद्दीत कँप उघडून एल्गार केला. या वेळी आपल्या घरादारांवर तुळशीपत्र ठेवून ज्या लोकांनी स्वातंत्र्य संग्रामाचा प्रपंच मांडला अशा अनेक वीर पुरुषांच्या पराक्रमाची गाथा नव्या पिढीसमोर येणे गरजेचे आहे. आपल्या नेत्याच्या आदेशावर सर्वस्व पणाला लावणारे अनेक वीर या भूमीने दिले. सर्वांचाच इतिहास माझ्या छोट्याशा लेखनीत सामावणे कठीण असल्याने तूर्त या ठिकाणी स्वातंत्र्य संग्रामातील ठरावीक म्होरक्यांच्या कार्याचा आढावा घेण्यात आलेला आहे.

हैद्राबाद मुक्तिसंग्राम हा भारत वर्षातील एक असा लढा आहे की, या लढ्यात समाजातील अठरापगड जातींच्या लोकांनी यात सहभाग नोंदविला.

नेतृत्व कोणाचेही असेल परंतु दोनशे वर्षांच्या अमर्याद सत्तेला पदच्युत करण्याचे कार्य केले. त्यामुळे हैद्राबाद मुक्तिसंग्राम हा सर्वसामान्यांचा लढा होता. आपण ज्या वेळी स्वातंत्र्य संग्रामातील वीर पुरूषांचा आढावा घेऊ त्यावेळी एक गोष्ट प्रकर्षाने जाणवते ती म्हणजे या संग्रामातील असली हिरे हे कुठल्याही राजघराण्यातून आलेले नसून ते एका सर्वसामान्य कुटुंबातून आलेले आहेत. स्वामी रामानंद तीर्थसारख्या संन्याशाने याचे नेतृत्व केले. त्यांना अनेक स्वातंत्र्यवीरांनी साथ दिली. याठिकाणी अशा काही स्वातंत्र्यवीरांचा आढावा घेण्यात आलेला आहे.

**फुलचंद गांधी :**



उस्मानाबाद परिसरातील स्वातंत्र्य संग्रामाचा इतिहास लिहीताना ज्यांचे नाव अग्रक्रमाने घेतले जाते, ते म्हणजे फुलचंद रामचंद्र गांधी. गांधी घराणे मुळचे गूजरातमधील मारवाडचे असून उद्योग-धंद्याकरिता बाहेर पडलेले हे घराणे उस्मानाबादेत येऊन स्थायिक झाले. रामचंद्रांना विमलचंद हे बंधू असून हळूहळू गांधी घराणे उस्मानाबादच्या अर्थकारणावर अधिराज्य गाजविणारे घराणे निर्माण झाले. सावकारी व्यवसायाचा पसारा एवढा वाढलेला होता की, गांधीकडे या परिसरातील अनेक मोठमोठे जहागीरदार गहाण पडले होते. एकच उदाहरण द्यायचे झाले तर तुळजापूर तालुक्यातील कामठ्याचे जहगीरदार दौलतराव देशमुखांची ७०० एकर जमीन यांच्याकडे गहाण होती. अशा हजारो एकर जमिनी यांच्याकडे आल्याने किमान ४ ते ५ हजार एकर जमिनीचे ते मालक होते.

केवळ सावकारीच नाही तर किराणा दुकानांसारख्या अनेक व्यावसायाचा पसारा दूरवर पसरलेला असल्याने बार्शीचे अशा चित्रपटगृह, सोलापूरची माणिक ऑईल मील, पंढरपूर, टेंभुर्णी, अकलूजबरोबरच पुणे, हैद्राबादेतही त्यांचा कारोबार पसरलेला होता. घरात पाचपन्नास माणसांचा राबता, दिमतीला डॉज कंपनीची उस्मानाबाद जिल्ह्यातील एकमेव मोटारकार, एकरावर पसरलेला टोलेजंग वाडा एवढा भव्य होता की, फुलचंद गांधी आपल्या वाड्यातल्या टेनीस कोर्टवर टेनीस खेळायचे. आजच्या नेहरू चौकाच्या बाजूला

असलेला गांधीचा वाडा उस्मानाबादची शान होता.

सुखवस्तू कुटुंबातील फुलचंद गांधीनी कायद्याची परीक्षा पास करून उस्मानाबादच्या जिल्हा न्यायालयात वकिलीचा व्यवसाय सुरू केला. थोड्याच दिवसांत ते उस्मानाबाद बार कौन्सिलचे अध्यक्ष झाले. या माध्यमातून त्यांनी अनेक क्रांतिकारी खटले चालविले. हैद्राबाद मुक्तिसंग्रामात भाग घेतलेल्या अनेकांचे खटले त्यांनी आपल्या बुद्धीचातुर्याने निकाली लावले. अशा वेळी ते कुठलाही मोबदला घेत नव्हते. त्यामुळेच त्यांच्या मनात स्वातंत्र्याचे स्फुलिंग चेतविले गेले. आजच्या उस्मानाबाद सहकारी बँक, जिल्हा मध्यवर्ती, भूविकास बँक यासारख्या आर्थिक संस्थांवर त्यांनी काम केले.

महात्मा गांधींच्या नेतृत्वाखाली काँग्रेस चळवळीने ज्या वेळी जोर धरला त्याचे वारे उस्मानाबादला आल्यानंतर फुलचंद गांधींनी यात सक्रिय सहभाग नोंदविला. काँग्रेसच्या माध्यमातून अनेक वरिष्ठ नेत्यांशी त्यांचे जवळचे संबंध आले. १९३८ साली हैद्राबाद संस्थानातील काँग्रेसचे पहिले अधिवेशन ज्या वेळी स्वामी रामानंद तीर्थ यांच्या नेतृत्वाखाली हैद्राबाद येथे पार पडले तेव्हा फुलचंद गांधींनी यात उस्मानाबादचे प्रतिनीनिधीत्व केले. तर पुढे काँग्रेसच्या मार्गदर्शनाखाली ज्या वेळी हैद्राबाद मुक्तिसंग्रामाचा लढा पुकारला गेला त्या वेळी त्यांनी आपली मोलाची भूमिका निभावली.

स्वातंत्र्य संग्राम आणि सावकारी व्यवसाय या दोन्ही पैकी एकाची निवड करण्याची वेळ आली तेव्हा त्यांनी आपल्या व्यवसायाला रामराम ठोकला. काही लोकांनी त्यांच्या व्यवसायाबद्दल आक्षेप नोंदविला तेव्हा त्यांनी आपल्याकडून कर्ज घेणाऱ्या लोकांना आवाहान करून आपापले दस्तावेज फु कटात परत घेऊन जाण्याचे आवाहान केले. तेव्हा अनेकांनी आपल्या जमिनी परत मिळविल्या. अनेक जमिनी त्यांनी शासनाकडे वर्ग करून टाकल्या. एखादा कर्जदार शेतकरी वारल्यानंतर ते संबंधिताच्या पत्नीला बोलावून घेऊन त्याचे गहाणखत फाडून टाकून कर्ज माफ झाल्याचे घोषित करत असत.

१९४७ चे साल, स्वातंत्र्याचा लढा आता निर्णायक वळणावर येऊन ठेपला होता. अशा वेळी निजामासारख्या बलाढ्य सत्तेपुढे लढताना आपल्या स्वातंत्र्य सैनिकांनी सोलापूर जिल्ह्याच्या सरहद्दीत आपले कँप उघडून सशस्त्र लढा उभा केला. अशा वेळी गौडगावपासून खड्यार्पर्यंतच्या कँपची जबाबदारी फुलचंद गांधीवर सोपविण्यात आलेली होती. पुढे लढ्याचे स्वरूप व्यापक

झाल्यानंतर त्यांनी सोलापूर या ठिकाणी असलेली आपल्या मालकीची माणिक ऑईल मील बंद करून त्यात स्वातंत्र्य संग्रामातील चळवळीचे केंद्र स्थापन केले. या माणिक मीलमध्ये स्वातंत्र्यासाठी लागणारे बॉंब, बंदुका तयार होऊ लागल्या. पुण्याला १०० ते १५० रुपयांना मिळणारा बॉंब सोलापुरच्या या वीरांनी फक्त ३ रुपयात तयार करण्याची कला अवगत केली.

उस्मानाबाद जिल्ह्यातील स्वातंत्र्य संग्रामात आर्थिक व्यवस्था पार पाडण्याचे काम फुलचंद गांधींनी केले. स्वातंत्र्य संग्रामातील लढ्याची व्युहरचना स्टेट कॉंग्रेसच्या मार्गदर्शनाखाली चालत होती. या वेळी जिल्ह्यातील कॉंग्रेसची जबाबदारी फुलचंद गांधीवर सोपविण्यात आलेली होती. साहजिकच वरपासून ते खालपर्यंत त्यांचे सलोख्याचे संबंध असल्याने फुलचंद गांधी म्हणजे कॉंग्रेसचे बडे प्रस्थ अशी त्यांची ख्याती होती. निजाम सरकारने त्यांच्यावर पकड वॉरंट काढलेले होते. त्यामुळे फुलचंद गांधी बरेच दिवस भूमिगत होते. आपले घरदार सोडून त्यांनी सोलापूरला आश्रय घेतला.

जनतेच्या लढ्याला अखेर यश आले आणि हैद्राबाद संस्थान अखिल हिंदुस्थानमध्ये सामील करण्यात आले. तेव्हा १९५२ साली राज्यात सार्वत्रिक निवडणुका पार पडल्या. कॉंग्रेसचे जेष्ठ नेते म्हणून फुलचंद गांधींना उमरगा विधानसभा मतदार संघाचे तिकीट देण्यात आले. त्यांचा सामना शेतकरी कामगार पक्षाच्या शंभुगिरी महाराजांशी होता. एकूण ३३, ५४८ मतांपैकी गांधींना १८, २८२ तर शंभुगिरींना १०, २२३ मते पडली. त्यामुळे फुलचंद गांधी प्रचंड मतांनी विजयी होऊन डॉ. बुर्गुला रामकृष्ण राव यांच्या मुख्यमंत्रिपदाच्या काळात ते शिक्षण आणि आरोग्य मंत्री म्हणून निवडले गेले. या वेळी ते सरकारी बंगल्यात न राहता बेगमपेठच्या स्वत:च्या बंगल्यात राहिले. एवढेच नव्हे तर दोनतीन वर्षात सरकार जनतेच्या मागण्या पूर्ण करत नाही हे दिसताच त्यांनी नेहरूंकडे याची तक्रार केली. परंतु त्यांना अपेक्षित बदल दिसला नाही, तेव्हा स्वाभिमानी फुलचंद गांधींनी मंत्रिपदाचा राजीनामा देऊन उस्मानाबाद गाठले.

पुढे त्यानंतरच्या १९५७ च्या निवडणुकीत कॉंग्रेस पक्षाने त्यांना उस्मानाबाद विधानसभा मतदार संघातून उमेदवारी दिली. शेतकरी कामगार पक्षाचे नेते भाई उद्धवराव पाटील आणि कॉंग्रसचे फुलचंद गांधी यांच्यात काट्याची लढाई झाली. याच वेळी स्वातंत्र्य संग्रामातील एक धाडशी नेते श्री.

रामभाऊ जाधव चिलवडीकर यांनी अपक्ष म्हणून मैदानात उडी घेतली. या वेळी जात पात आणि त्यांच्या सावकारीवर प्रचार झाला. गांधी घराणे पिढीजात सावकारीत असल्याने त्यांची कोंडी व्हायला लागली. तेव्हा त्यांनी आपण हा व्यवसाय सोडल्याचे घोषित केले. एवढ्यावर ते थांबले नाहीत तर त्यांनी आपल्या कर्जदारांना आवाहन केले की, आपल्याकडील कर्जदारांनी त्यांच्या जमिनीची कागदपत्रे विनाअट घेऊन जावीत. अशा प्रकारे लोकांचे लिहून घेतलेले स्टँप त्यांनी विनाअट परत करून टाकले. तरीसुद्धा गहाणवटीची अनेक कागदपत्रे त्यांच्याकडे शिल्लक राहिली होती. तेव्हा त्यांनी शिल्लक राहिलेली गाडीभर कागदपत्रे रस्त्यावर आणून जाळून टाकली.

देशासाठी पुर्वी त्यांनी आपला व्यवसाय सोडला. आता पक्षासाठी सावकारी सोडली. खरंतर रामभाऊ त्यांचे जिवलग मित्र, परंतु निवडणुकीच्या गर्दीत माणूस सारं काही विसरून जातो हेच खरे. दुसऱ्या बाजूला भाई उद्धवराव पाटलांच्या शेतकरी कामगार पक्षाने शेतकऱ्यांच्या प्रश्नावर राज्यभर रान पेटविले होते. याचा त्यांना फायदा झाला. तर रामभाऊ लढण्यात पटाईत असलेतरी डावपेचात ते कमी पडले. त्यामुळे पुन्हा एकदा उस्मानाबादकरांनी उद्धवरावदादांना कौल दिला. यात दादांना १६, १२७, फुलचंद गांधी १०, ९२८ तर रामभाऊ जाधवांना ४, ९८४ मते मिळाली.

निवडणुकीत अनेक मुद्धयांवर प्रचार झाल्यामुळे त्यांचा विजय धोक्यात यायला लागला. तेव्हा ते आपल्या सहकाऱ्यांना म्हणायचे की, मी लोकांसाठी स्वत:च्या प्रपंच्याचा विचार केलेला नाही. दिल्लीत आपले वजन आहे. काँग्रेसवर लोक प्रेम करतात. त्यामुळे आपली इज्जत करून आपण सहज निवडून येऊ शकतो. विरोधक भाई उद्धवराव पाटलांचा शेतकरी कामगार पक्ष आता नव्याने पुढे आला होता. शेतकरी, मजूर, सावकार आणि सरकार यांच्या विरोधात या पक्षाने चांगलाच आवाज उठविला होता. यातच जातीचे नवे समीकरण वापरले जाऊ लागले. कामाच्या भरवशावर गांधी निश्चिंत राहिले आणि अनपेक्षितपणे १९५७ च्या निवडणुकीत त्यांना हार पत्करावी लागली.

सत्ता, संपत्ती आणि सहानुभूती असूनही लोकांनी आपला अपमान केल्याची भावना त्यांच्या मनात घर करून गेली आणि त्यांनी उस्मानाबादला कायमचा रामराम करण्याचा निर्णय घेतला. अपमानित भावना घेऊन फुलचंद गांधींनी त्याच दिवशी गाव सोडून सोलापूर गाठले. पुन्हा कधीही ते

उस्मानाबादला आले नाहीत. यादरम्यान त्यांची दोन मुले बिपीन आणि नलीनचंद्र  पुण्यात व्यवसायात स्थिरावली होती. त्यामुळे ते पुण्याला स्थायिक झाले. तेथून त्यांनी मुंबईच्या हायकोर्टात वकिली केली. त्यामुळे एवढा मोठा उद्योगपती पुन्हा एकदा नव्याने प्रपंच्याला लागला. आपला राहता वाडासुद्धा त्यांनी मुंबईत बसूनच विकला.

फुलचंद गांधी गेल्यामुळे उस्मानाबादचे नुकसान झाले. त्यामागची कारणे शोधण्याचा प्रयत्न केल्यानंतर त्यांनी अन्य ठिकाणी केलेल्या कामाचा आढावा घेतल्यानंतर याचे उत्तर आपोआप मिळून जाईल. वालंचद उद्योग समूहाचे प्रमुख हिराचंद वालचंद यांना फुलचंद गांधींची आतेबहीण कस्तुरबा दिलेल्या असल्याने ते या उद्योग समूहाशी जोडले गेले. त्यांच्या प्रेरणेतून वालचंद नगरचा डोलारा उभा राहिला. वालचंद उद्योगाविषयी जास्त सांगण्याची गरज नाही. बारामती येथील तुळजाराम कॉलेजच्या स्थापनेत त्यांचा सिंहाचा वाटा होता. आज येथे १२,००० विद्यार्थी शिक्षण घेत आहेत. तर जयसिंहपपूरच्या शिक्षण संस्थेतही त्यांनी महत्त्वपूर्ण कामगिरी बजावली. तर पुण्यातील कस्तुरबा मंगल कार्यालयाची स्थापना करून त्यांनी अनेकांची व्यवस्था केली. हा त्यांच्या कामाचा झपाटा.

फुलचंद गांधींची पोहोच काय होती? एकदा उस्मानाबाद येथे काँग्रेसचे अधिवेशन घेण्यात आले होते. याकरिता भारताचे पंतप्रधान पंडित जवाहरलाल नेहरू आले होते. नेहरूंचा मुक्काम आताच्या कलेक्टर बंगल्यात होता. सकाळची वेळ होती, नेहरूंनी कलेक्टला विचारले, फुलचंद गांधी के घर नाश्ते के लिए जाना है। त्यावर हिंदू-मुसलमान दंग्याचा संदर्भ देऊन आपण जाऊ नये असा सल्ला त्यांनी दिला. तेव्हा सुरक्षेची तमा न बाळगता नेहरू सरळ फुलचंद गांधींच्या घरी नाष्ट्याला गेले. त्यांनतर ते कोवळ्या उन्हात उभारण्यासाठी बाहेर रस्त्यावर आले. त्यामुळे त्या चौकाचे नाव पडले 'नेहरू चौक' असा हा त्यांचा राजकीय प्रवास. त्यामुळे संयुक्त महाराष्ट्राच्या निर्मितीनंतर फुलचंद गांधी जर उस्मानाबादच्या राजकारणात असते तर?

पत्नी अनुराधेच्या साथीने त्यांनी दोन मुली इंदुमती आणि मालन यांना मुलाप्रमाणे वाढविले. सतत कार्यमग्न राहण्याच्या त्यांच्या स्वभावामुळे ते लवकरच थकले. एकदा ते कामानिमित्ताने सोलापूरला आले असता अचानकपणे त्यांना अस्वस्थ वाटू लागल्याने दवाखान्यात दाखल करावे

लागले. सोलापुरातून त्यांनी निजामाविरूद्ध लढा उभा करून त्यात विजय मिळविला होता. परंतु या वेळी त्यांचा मुकाबला नियतीशी होता. यात त्यांना हार पत्करावी लागली. आपल्या आवडत्या रणभूमीत त्यांनी आपला देहत्याग केला. मात्र हैद्राबाद मुक्ती संग्रामाच्या इतिहासात फुलचंद गांधीचे उल्लेखनीय योगदान कदापि विसरता येणार नाही. आज त्यांचे पुण्यातील एक नातू चकोर नलिनचंद्र गांधी त्यांच्या विचारांचा वारसा पुढे चालवत आहेत. ही समाधानाची बाब आहे.

**मनोहर शंकर टापरे :**



उस्मानाबाद शहरातील एका अत्यंत गरीब कुटुंबात मनोहरावांचा जन्म झाला. कवठे खाऊन त्यांनी दिवस काढले. शेवटपर्यंत भाड्याच्या घरात राहिल्याने त्यांच्या सर्वसामान्य परिस्थितीचा अंदाज येतो. पराक्रमाला परिस्थितीची गरज नसते. त्यातच हैद्राबाद मुक्ती संग्रामाच्या लढ्याचा इतिहास पाहिल्यास यात सर्वसामान्यांची कामगिरी श्रीमंतांपेक्षा निश्चितच वरचढ आहे. रोजचे मरण भोगण्यापेक्षा लढून मेलेले बरे, अशी भावना बाळगून यात अनेकांनी आपला सहभाग नोंदविला. निजाम राजवटीत जे रोज परिस्थितीशी लढले त्यांना निजामाशी लढताना कधी भीती वाटली नाही. अशांतच टापऱ्यांच्या सहभाग होता.

स्वातंत्र्याचे वारे वाहत असताना मनोहररावाने उस्मानाबाद या ठिकाणी राहून निजामाविरुद्ध लढा उभा केला. विशेष म्हणजे त्यांचे घर हे मुस्लिम मोहल्यात होते. पोलीस दप्तरी त्यांच्या नावाची नोंद झाल्यानंतर ते भुमिगत होऊन गौडगाव कँपवर गेले. गौडगाव कँपवर काम करत असताना त्यांनी निजाम सरकारचा करोडगिरी नाका लुटणे, खजिना लुटणे, पोलीस पाटील आणि कुलकर्णी यांचे राजीनामे घेणे यांसारखी कामे करत असत. अपसिंग्याच्या करोडगिरी नाक्यावर जो हमला झाला त्यात टापऱ्यांच्या महत्त्वपूर्ण सहभाग होता. तसेच चिलवडी वाचविण्याकरिता त्यांनी दिलेले योगदान महत्त्वपूर्ण होते.

मनोहर हे नावाप्रमाणे शत्रूला आपल्या मनोहारी कृतीने चकित करायचे. गौडगाव कँपवर मनोहर टापरे देशासाठी हेरगिरीचे काम करायचे. छत्रपती

शिवरायांचा हेर बहिर्जी ज्याप्रमाणे वेशांतर करून शत्रूच्या गोठात घुसायचा त्याप्रमाणे मनोहरचा पोशाख ठरलेला नव्हता. कधीकधी तर हा बहाद्दर मुसलमानाच्या वेशात रझाकाराच्या डेऱ्यात घुसून अचूक माहिती बाहेर काढायचा. त्यांच्यासोबत राहून एकदोन रझाकाराला ठार करून मनोहर 'लांडगा आला रे आला' च्या घोषात आरोळी ठोकून मोकळा. त्यामुळे आपला वाटणारा मनोहर शत्रूसाठी काळच होते यात काही शंका नाही.

स्वातंत्र्य संग्रामात त्यांनी दिलेल्या योगदानाबद्दल त्यांना सरकारी बंदूक मिळालेली होती. एकदा तर ते राहत असलेल्या गल्लीत कासिम रझवीची सभा झाली होती. यावरून स्वातंत्र्य संग्रामात त्यांनी केलेल्या कामातील धोक्याचा अंदाज येऊ शकतो. परंतु ज्यांनी मरणच आपल्या हातावर पेलले त्यांना मरणाची भीती थोडीच वाटणार? 'आधी लगीन कोंढाण्याचे मग रायबाचे' या उक्तीप्रमाणे हैद्राबाद संस्थान अखिल हिंदुस्थानात विलीन झाल्याशिवाय आपण लग्न करणार नाही अशी जणू त्यांनी शपथच घेतली होती. त्याप्रमाणे ते स्वत:च्या सुखाचा विचार बाजूला सारून जगाचा संसार करत बसले.

१३ सप्टेंबर, १९४८ हिंदुस्थानी फौजा हैद्राबाद संस्थानाच्या इलाक्यात घुसल्या. तेव्हा एक तुकडी सोलापुराहून बार्शी,येडशीमार्गे उस्मानाबादला आली. या वेळी भारतीय लष्कराला वाट दाखविण्याचे काम मनोहर टापऱ्यांच्या केले. रझाकाराला वेचून काढताना त्यांनी कुठल्याही सर्वसामान्य मुसलमानाला त्रास होणार नाही याची विशेष काळजी घेतली. हैद्राबाद मुक्त झाला तेव्हा हिंदूंकडून बदल्याची भावना जागृत होऊन त्यांनी बेकसूर लोकांची कत्तल करण्यास सुरुवात केली. तेव्हा त्यांनी अशा मुसलमानाला अभयदान देण्यासाठी जिवाचे रान केले. लोकांनी अनेकांची घरे लुटली तेव्हाही त्यांनी एका वस्तूला कधी हात लावला नाही. शेवटपर्यंत घरची परिस्थिती हालाखीची राहिली परंतु कधी फुकटच्या पैशाचा मोह करायचा नाही हा त्यांचा पण शेवटपर्यंत कायम होता.

देश स्वातंत्र्य झाला. आतापर्यंत देशाचा प्रपंच केला, आता स्वत:चा प्रपंच करू या म्हणून त्यांनी चिलवडीच्या गणपती जाधवाच्या कन्या काशीबाईशी विवाह केला. विशेष म्हणजे काशीबाई या कुणी सामान्य घरातल्या नव्हत्या. तर त्या चिलवडीतल्या स्वातंत्र्य सैनिकांची लेक होत्या. काशीबाईचे बंधू कोंडीबा आणि विश्वनाथ यांनी गौडगावच्या कँपमध्ये स्वातंत्र्य सैनिकांना

जेवण तयार करण्याचे काम केले होते. विशेष म्हणजे चिलवडी गाव रझाकारांनी जाळून टाकल्यानंतर या लोकांनी आपला संसार चालू केला होता हे विशेष आहे. पुढे यांना अरुण आणि प्रवीण ही दोन मुले तसेच सुरेखा आणि वनमाला या मुली झाल्या. आपल्या वडिलांचे योगदान उराशी बाळगून ही मुले बापाच्या कर्तृत्वाने जगात ताठ मानेने जगताहेत.

स्वातंत्र्य लढा सुरू असताना रझाकारांच्या भीतीने त्यांना कुणी घर दिले नाही. पुढे संसार करण्याची गरज पडली तेव्हा मनोहर टापऱ्यांच्या नेहरू चौकात सायकल दुकान थाटले. मी एवढा मोठा स्वातंत्र्य सैनिक आणि ज्यांच्या नावाने रझाकाराला कापरे भरायचे ते मनोहरराव सायकल दुकान चालवताना कधी कचरले नाहीत. आपण गरिबीत असलोतरी स्वाभिमानात जगतो आहोत याचाच अभिमान टापरे घराण्याला आहे. काशीबाईंशी बोलताना त्यांच्या डोळ्यांत आपल्या नवऱ्याच्या पराक्रमाची झलक दिसून येते.

मनोहर टापरे विजय चौकात राहायचे. ते निघाले म्हणजे पाच पन्नास माणसे सोबत असायची.जाताजाताना लोकांचे प्रश्न ऐकायचे आणि जमेल त्यांना मदत करायची ही भावना त्यांनी कधी सोडली नाही. पूर्वी एखाद्या कार्यालयात पुढाऱ्याची किंमत ही त्याच्या कामावर असायची, त्यामागे अर्थकारण कुणी पाहत नव्हते. मनोहर टापरे एखाद्या कार्यालयात गेले म्हणजे तहसीलदारसुद्धा उठून त्यांना खुर्ची द्यायचा. यावरून त्यांच्या नीतिमत्तेचा अंदाज येऊ शकतो. लोकांच्या सायकली नीट करून त्यांना गती दिली, त्याच वेळी आपल्या विचाराने त्यांनी लोकांच्या मनाला गती दिली.

शेवटीशेवटी स्वातंत्र्य सैनिकांना शासकीय लाभ देण्यासाठी ज्या समित्या नेमल्या, त्यावर त्यांनी काम करताना कधी जातपात किंवा अर्थकारण पाहिले नाही. त्यांची फक्त सही झाली की, अनेकांना स्वातंत्र्य सैनिक म्हणून लाभ घेण्याचे भाग्य लाभले ते केवळ मनोहर टापरे यांच्यामुळेच.



**व्यासाचार्य संदीकर:**

लहानपणीच वडिलांचे छत्र हरवल्यामुळे औशाच्या एका छोट्याशा खोलीत आपल्या वृद्ध आई लक्ष्मीबाईसोबत राहत असताना आपल्याबरोबर जगाचा

प्रपंच करायचा निर्धार करून व्यासाचार्य संदीकर घराबाहेर पडले. १९३८ सालापासून उस्मानाबाद जिल्ह्यात फुलचंद गांधी, बाबासाहेब परांजपे, विश्वंभरराव हराळकर, कॅप्टन जोशी यांच्या नेतृत्वाखाली काँग्रेसच्या माध्यमातून निजाम सरकारच्या विरोधात रान पेटवायला सुरूरुवात केली होती. ज्या युगात निजाम सरकार विरोधात बोलायची चोरी होती त्या समयी व्यासाचार्य संदीकर आपल्या घरावर तिरंगा झेंडा फडकावून जणू सापाच्या शेपटीवर पाय ठेवायला निघाले होते. परंतु हे कृत्य जाणीवपूर्वक असल्याने याची त्यांना थोडीच फिकीर होती ?

व्यासाचार्य तसे कुठल्याही शाळेत जाऊन चार इयत्ता शिकले नसलेतरी मराठी, हिंदी, उर्दू, संस्कृत अशा अनेक विषयांत ते पारंगत होते. खुद्द देवीसिंग चौहान, माधवराव दिवाण यांच्यासारखी माणसं व्यासाचार्यांना आपल्या गुरुस्थानी मानत होते. यावरून त्यांच्या कार्याचा अंदाज बांधता येऊ शकतो. पुढे तर वि. स. खांडेकर, रा. ज. देशमुख यांच्याशी त्यांचे अतिशय घनिष्ठ संबंध होते. काँग्रेसचे काम सुरू केले म्हणून कुठलेही कारण न देता व्यासाचार्यांना लातूरच्या तुरुंगात टाकण्यात आले. परंतु इच्छा तिथं मार्ग हा संदीकरांचा स्थायीभाव असल्याने ते रडत बसले नाहीत. तर आपल्याच सहकरी मित्राला आपला पालक आणि जामीनदार बनवून ते तुरुंगातून बाहेर पडले आणि भूमिगत झाले.

उस्मानाबाद जिल्ह्यातील स्वातंत्र्य सैनिकांना अभयदान देऊन त्यांना स्वातंत्र्यासाठी लढता यावे म्हणून स्टेट काँग्रेसच्यावतीने सोलापूर जिल्ह्याच्या हद्दीत कँप काढण्यात आले होते. या कँपच्या माध्यमातून अनेक स्वातंत्र्यवीरांनी निजामाच्या तोंडचे पाणी पळविले. अशा वेळी बाबासाहेब परांजप्यांच्या माध्यमातून त्यांनी सोलापूरच्या आँईलमीलमध्ये आश्रय घेतला. उस्मानाबादचे उद्योगपती फुलचंद गांधी यांनी आपली मील बंद करून तेथे स्वातंत्र्य संग्रामासाठी शस्त्रास्त्रांचा कारखाना सुरू केला होता. या कारखान्याचे वैशिष्ट्य म्हणजे येथे कारखानदारी केली जायची हातबाँब बनविण्याची. आणि याची जबाबदारी होती व्यासाचार्य आणि उमरग्याच्या व्यंकटराव नागणेगुरुजींवर.

बलशाली निजामाविरूद्ध लढण्यासाठी तेवढयाच ताकतीने उभे राहणे गरजेचे असताना पुण्याहून आणले जाणारे हातबाँब ६० रुपयांना एक बसायचा. अशा वेळी व्यासाचार्य आणि नागणे गरुजी यांनी पुण्याला जाऊन एका लष्करी

अधिकाऱ्याकडून प्रशिक्षण घेतले आणि सोलापूरच्या मीलमध्ये उत्पादन सुरू केले. बाँबसाठी लागणारे पिकरीक पावडर, बिडाची कव्हर, पिना आणि वात यांसारख्या वस्तू येथेच तयार करू लागले. विशेष म्हणजे हा बाँब त्यांना फक्त ३ रुपयाला पडू लागला. दोन वर्षांच्या काळात सोलापूरच्या केंद्राने जवळपास ५ ते ६ हजार बाँब तयार करून वाटले असतील.

एकदा बाँबचे प्रशिक्षण घेण्याकरता ते पुण्याला गेले तेव्हा ते बाँब तयार करत असताना पकडले गेले. तेव्हा पोलिसांनी त्यांना तुरुंगात पाठविले. तेव्हा उस्मानाबादचे काँग्रेस पुढारी फुलचंद गांधींनी थेट भारताचे गृहमंत्री सरदार वल्लभभाई पटेलांशी संपर्क करून त्यांची सुटका केली. त्यानंतर त्यांनी आपले काम अधिक जोमाने सुरू केले. निजामाचे शासन धुडकावून उस्मानाबाद जिल्ह्यातील माढा परिसरात जामगाव येथे क्रांतिसिंह नाना पाटलांच्या पत्रे सरकारच्या धर्तीवर आझाद मुक्तापूर स्वराज्य स्थापन केले. या वेळी स्वतंत्र मंत्री मंडळाची स्थापना करण्यात आली. यात व्यासाचार्य आरोग्य मंत्री म्हणून कार्यरत राहिले.

मंत्रीपदाच्या काळात आझाद मुक्तापूर स्वराज्यातील गावागांवात त्यांनी घोड्यावरून दौरा केला. आणि लोकांना आरोग्याविषयी माहिती देत असतानाच ते स्वत: औषधपाणी पुरविण्याची व्यवस्था करायचे. याचबरोबर मुक्तापूर स्वराज्यातील लोकांसाठी बार्शीच्या हिरेमठ हॉस्पिटलबरोबर एक अलिखित करार झालेला होता. त्यानुसार डॉ. हिरेमठ हे स्वत: लोकांची तपासणी करत होते. यातही महत्त्वाची बाब म्हणजे बाळंतपणाचे आजार स्त्रियांना मोठया प्रमाणावर होत असत. अशा वेळी त्यांना रात्रीबेरात्री दवाखान्यात पोहोचविण्याची जबाबदारी पार पाडली जात असे. असे अनेक निर्यण घेतले.

देशाच्या स्वातंत्र्यानंतर त्यांनी सरकारी सवलती घेण्याचे टाळले तेव्हा सरकारने त्यांना स्वतंत्र माणूस पाठवून ताम्रपत्र अर्पण केले होते. लग्न झाल्यानंतर पहिल्याच दिवशी ज्यांनी आपल्या पत्नीच्या अंगावरील सोने देशासाठी वाहिले त्यांना अशा सवलतीचा मोह थोडाच राहणार होता? शासनाच्या खादी ग्रामोद्योगाच्या सरव्यवस्थापक पदावर काम करत असताना औसा या ठिकाणच्या केंद्रावर त्यांनी दर्जेदार कागदाचे उत्पादन केले. विशेष म्हणजे हा कागद शिंप्यांकडच्या चिंध्यांपासून बनविला जात होता. कागदाच्या दर्जेदार

उत्पादनामुळे औशाच्या कागदाला अमेरिका, इंग्लंड, जर्मनीसारख्या देशांतून मोठी मागणी होती. इंदिरा गांधींचे लेटरपॅड याच कागदापासून तयार करण्यात आले होते.

कुठलेही काम करायचे तर ते मनापासून असावे असा त्यांचा खाक्या असल्याने ते वयाच्या ७८ व्या वर्षांपर्यंत नेहमी कार्यमग्न राहिले. सोलापूरच्या केंद्रावर बाँब तयार करताना रसायनामुळे त्यांच्या डोळयावर आणि हातावर परिणाम दिसत होता. बाँबसाठी वापरल्या जाणाऱ्या पिकरीक पावडरमुळे त्यांचे हात कित्येक दिवस पिवळे राहिले होते. तेव्हा लोक त्यांना म्हणायचे, व्यासाचार्यजी आपण हळद खेळलात काय ? तेव्हा त्यांचे उत्तर होते, होय हळद खेळलोय, स्वातंत्र्याची आणि आता तर स्वातंत्र्याशी माझा विवाहसुद्धा झाला आहे. असा हा स्वातंत्र्याला वाहून घेतलेला माणूस जगावेगळा होता.

**विश्वंभरराव हराळकर :**



उमरगा तालुक्यातील तुगावच्या वारकरी संप्रदायातील हराळकर घराण्यात विश्वंभररावांचा जन्म झाला.त्यांना सर्वजण दादा म्हणायचे. लहानपणापासून विठ्ठलांच्या भक्तीवर तल्लीन झालेल्या दादांनी कपाळावर बुक्का, गळयात तुळशीची माळ कधी सोडली नाही. त्या काळी मातृभाषेतून शिक्षण घेण्याची सोय नसल्याने दादांना हिपरग्याच्या राष्ट्रीय शाळेत घातले. याच ठिकाणी त्यांच्या जडणघडणीस वाव मिळाला. स्वामी रामानंद तीर्थ, बाबासाहेब पराजंपे, शंकरराव चव्हाण, देवीसिंग चौहान यांसारख्या दिग्गजांचा व्यासंग त्यांना लाभला. खरं तर यात सर्वांत चांगली आर्थिक परिस्थित त्यांचीच असलीतरी ते सर्वांशी अगदी मिळूनमिसळून वागायचे.

स्वामीजींचे ते सर्वांत आवडते विद्यार्थी होते. स्वामींजींचे मूळ नाव व्यंकटेश भगवानराव खेडगीकर. हिपरग्यात आल्यानंतर ते या मातीत एवढे गढून गेले की, त्यांनी कायमस्वरूपी संन्यासाश्रम घेण्याची घोषणा केली. याकरिता लखनौ येथील स्वामी रामतीर्थ महाराजांच्या शिष्यांच्या हस्ते हा कार्यक्रम घेण्याचे ठरले. महाराजांना निमंत्रण देण्याकरिता हिपरग्याच्या शाळेतून निवडक

मुले स्वामींजीबरोबर जाणार होती. त्या पाचसहा मुलांत दादा होते. सांगायला आश्चर्य वाटते की, १९३२ साली आपल्या गुरुसोबत या सर्व मुलांनी हिप्परगा ते ऋषीकेश हे अंतर साडेचार महिने पायी चालत जाऊन पार केले. आणि ठरल्यानुसार स्वामींची दीक्षा पूर्ण होऊन ते स्वामी रामानंद तीर्थ झाले. स्वामीं रामानंद त्या काळातील अतिशय नावाजलेले व्यक्तिमत्त्व असून दादांशी त्यांचे नाते यावरून स्पष्ट होते.

हिप्परग्याची राष्ट्रीय शाळा म्हणजे देशप्रेमी तरुण तयार करण्याचा एक कारखानाच. त्यामुळे १९३८ साली जेव्हा हैद्राबाद संस्थानात निजामशाहीविरूद्ध काँग्रेसने एल्गार केला तेव्हा विश्वंभररावांना कुणी आंमत्रण देण्याची गरज भासली नाही. ते राष्ट्रीय चळवळीत काम करू लागल्याने सरकारने त्यांच्यावर अनेक बंधने घातली. अशा वेळी भूमिगत राहून दादांनी आपली चळवळ चालूच ठेवली. यादरम्यान १९४६ साली काँग्रेसचे अधिवेशन लातूर या ठिकाणी होणार असल्याने गावोगावी फिरून फुलचंद गांधी, बाबासाहेब परांजपे, राघवेंद्रजी दिवाण यांसारख्यांनी हजारोंचा जनसमुदाय उभा केला. पुढे निजाम राजवटीत रझाकारांचे महत्त्व वाढल्याने सर्वत्र अन्यायअत्याचाराने परिसीमा गाठली होती. अशा अन्यायकारी सत्तेला उलथून टाकण्यासाठी दादांनी कंबर कसली. परंतु याचा एक परिणाम असा झाला की, दादांना आपले घरदार सोडावे लागले. शेतीबाडी, घरदार, संसार सर्वकाही सोडून मुलाबाळांसह त्यांनी सोलापूरला आश्रय घेतला. या गोष्टी आता ऐकायलाही कठीण वाटत असल्यातरी याच्यातील वास्तविकता विदारक होती. दादावर सूड उगविण्यासाठी रझाकारांनी तुगावच्या वाड्यात चक्क कत्तलखाना सुरू केला. माळकरी माणसाला याच्यापेक्षा मोठी वेदना ती कोणती असावी ?

स्वातंत्र्याने भारलेल्या या वीरांना आपल्या घरादारांची चिंता थोडीच असणार आहे? त्यांनी आता पुर्ण वेळ या कार्याला वाहून घेतले. स्टेट काँग्रेसने सोलापूर हद्दीत जे लढाऊ कँप काढले होते त्यात दादांनी भाग घेतला. निजाम आणि रझाकारांशी दोन हात करायचे असतील तर आपण शस्त्रानिशी सज्ज असणे गरजेचे होते. म्हणून सोलापूर येथे फुलचंद गांधींच्या माणिक ऑईल मीलमध्ये शस्त्र निर्मिती करण्यात येऊ लागली. तयार झालेली शस्त्रे उस्मानाबाद जिल्ह्याच्या कानाकोपऱ्यांपर्यंत पोहोचविण्याचे काम दादांनी केले. काही वेळेला शंभरशंभर किलोचे वजन घेऊन रात्रीबेरात्री ही मंडळी पायी जाऊन आपले काम

फत्ते करत असत.

स्वातंत्र्य चळवळीत काम करत असताना त्यांच्यावर अनेक संकटांचे प्रसंग आले. तळहातावर शिर घेऊन त्यांनी अखेरपर्यंत आपली लढाई चालूच ठेवली. दादांसारख्या स्वातंत्र्यवीरांच्या प्रयत्नातून २२४ वर्षांची निजाम राजवट संपुष्टात आली. १७ सप्टेंबर, १९४८ ला अखेर मराठवाडा स्वतंत्र झाला. आता लोकशाही आली की, विचारांच्या दिशा बदलतात. १९५२ च्या सार्वत्रिक निवडणुका घोषित झाल्या. दादासाठी खरं तर दोन सोईचे मतदारसंघ एक उमरगा आणि दुसरा औसा. परंतु सर्वच बाबतीत अग्रेसर असलेल्या दादांची ज्या वेळी तिकिटाची बारी आली तेव्हा त्यांना तिकीट दिले गेले नव्हते. परंतु या दोन्ही ठिकाणच्या उमेदवारांना निवडून आणण्याची जबाबदारी त्यांच्यावर होती. ती त्यांनी फत्ते करून दाखविली.

औसा मतदार संघातले उमेदवार देवीसिंह चौहान अतिशय गरिबीतले असल्याने दादांनी त्यांना शिक्षणापासून ते आमदार करण्यापर्यंतची सर्व जबाबदारी पार पाडली. १९५२ ते ६२ अशी दहा वर्षे ते उस्मानाबाद जिल्हा काँग्रेसचे अध्यक्ष होते. तर १९५७ ते ६२ औसा मतदार संघातून विधानसभेवर तर ६२ ते ६८ विधान परिषदेवर आमदार होते. खरं तर ६२ साली त्यांना भूम परंडा मतदार संघातून उमेदवारी देण्यात आली होती. परंतु त्यांना अपघात झाल्याने ते पुण्याच्या ससून रूग्णालयात दाखल झाले होते. आपणाला आश्चर्य वाटेल की, स्व. यशवंतराव चव्हाणांनी त्यांच्याशी रुग्णालयातील खोली क्रं. २२ मध्ये बसून उस्माबादचे उमेदवार घोषित केले. यशवंतरावांवर त्यांचे अत्यंत प्रेम होते. १९६० साली ते पहिल्यांदा उमरग्याला आले, तेव्हा त्यांची ५२ बैलगाडयासह मिरवणूक काढली. या वेळी जवळपास एक लाखवर जनसमुदाय हजर असावा.

आणखी एक आश्चर्यकारक निर्णय त्या वेळी यशवंतराव चव्हाणांनी घेतला होता, तो म्हणजे पंचायतराज यशस्वी होण्यासाठी आपल्याच कार्यकर्त्यांतून बी. डी. ओ. आणि जिल्हा परिषदेचे सि. ई. ओ. निवडण्याचा. बस्स ! याकरिता ग्रॅजुअट आणि सहकार क्षेत्रातला पाच वर्षांचा अनुभव हवा होता. त्यामुळेच मातोळ्याचे तुकाराम भोसले उस्मानाबाद जिल्हा परिषदेचे मुख्य कार्यकार अधिकारी झाले. तर ॲड. यशवतंतराव इर्लेकर बीडीओ झाले. यामागे दादांची मोठी प्रेरणा होती हे नाकारता येत नाही.

उमरग्याच्या भारत शिक्षण संस्थेची स्थापना करताना त्यांनी घेतलेले कष्ट महत्त्वाचे आहेत. तर आपल्यासोबत असणाऱ्यांनीही चारित्र्यवान राहिले पाहिजे यावर त्यांचा कटाक्ष असायचा. एकदा उस्मानाबाद बँकेची बैठक लातूरला होती. बैठकीसाठी संचालकांना राहण्याखाण्याचा भत्ता मिळत असे. उस्मानाबादचे एक संचालक इर्लेकर बैठकीसाठी गेले होते. बैठक संपल्यावर सर्वांना भत्ता वाटप झाला. परंतु अचानकपणे ते चेअरमन भास्करराव चालुक्यांच्या गाडीतून उस्मानाबादला आले. परंतु इर्लेकरांवर दादांचा पगडा असल्याने इर्लेकरांनी घेतलेला भत्ता पोष्टाने परत केला. ही होती हराळकरांची शिकवण.

शेतीवर नवनवीन प्रयोग करत असताना त्यांनी थेट मुंबईच्या डेअरीतून शेणखत आणून शेतीवर नवनवीन प्रयोग केले. त्यांचे उसाचे गुऱ्हाळ तर फारच प्रसिद्ध होते. वृक्ष लागवडीवर त्यांचा भर असायचा. आपल्या प्रपंचातून ते देवाच्या भक्तीला कधी विसरले नाहीत. म्हणून पंढरपूरची वारी, दिंडेगावच्या शिवरामबुवाची वारी त्यांनी कधी चुकविली नाही. एवढेच नाही तर आळंदी ते पंढरपूर या ज्ञानेश्वर महाराजांच्या दिंडीचा नियम त्यांनी नित्याने पाळला. सात्त्विक आहार, उच्च विचार आणि परोपकारी वृत्ती यामुळे विश्वंभरराव हराळकरांसारख्या स्वातंत्र्यवीराला भरपूर आयुष्य लाभले हे विशेष आहे. तुळजापूरचे माजी आमदार आणि बालाघाट शिक्षणसंस्थेचे चेअरमन शिवाजीराव पाटील बाभळगावकर हे दादांचे जावई तर पद्माकर हराळकर हे दादांचे पुत्र होत.

**भगवानराव तोडकरी :**



उस्मानाबाद परिसरात घडलेल्या स्वातंत्र्य संग्रामातील लढाईत जी अनेक नावे पुढे येतात त्यांत भगवानराव तोडकरी यांचे नाव घेतल्याशिवाय उस्मानाबादचा इतिहास पुढे सरकत नाही. ज्याप्रमाणे मराठ्यांच्या स्वातंत्र्ययुद्धात धनाजी- संताजींची जोडी होती, त्याप्रमाणे उस्मानाबाद परिसरात मनोहर टापरे आणि भगवानराव तोडकरी होते. शिक्षण कमी असलेतरी देशप्रेमात त्यांनी जणू पीएचडी केलेली. एखाद्या कसलेल्या योद्धयाप्रमाणे

भगवानराव तोडकरी रझाकारांवर तुटून पडायचे. विठ्ठलाच्या प्रसन्नतेमुळे काळाभोर रंग असल्याने रझाकार त्यांना 'काला भगवान' म्हणायचे.

निजाम राजवटीला उलथून टाकण्यासाठी सर्वत्र असंतोष पसरला होता. उस्मानाबाद परिसरातही याचा वणवा पसरलेला होता. जागोजागी प्रभातफेऱ्या निघायला लागल्या. तिरंगा झेंडा फडकावणे गुन्हा मानला जायचा. अशा वेळी या पठ्ठ्यानेतर भारताचा तिरंगा ध्वज आपल्या घरावर फडकावून निजामाला ललकारले. या वेळी भगवानरावांचे वय होते फक्त १५ वर्षो. खरं तर हे हसणे खेळण्याचे वय. परंतु स्वातंत्र्य संग्रामाच्या चळवळीने त्यांना समजदार बनविले होते. आपल्या घरावर तिरंगा गाडून भगवानने आता स्वातंत्र्याचा एल्गार पुकारला होता.

तिरंगा फडकावयाचा म्हणजे आता पुढील परिणामास तयार व्हावे लागायचे. परंतु अशी कामे करणाऱ्यांना आता परिणामाची थोडीच चिंता होती? गरीब परिस्थितीमुळे जिथं खायची पंचायत आणि या बहाद्दराने तर घरावर आणखी एक संकट आणून सोडल्याने सर्वांनी त्यांच्यावर रोष व्यक्त केला. भगवानला याची चिंता नव्हती. कारण भगवानला वेड लागले होते. होय, भगवान वेडा झालेला होता. त्याला आता कुठल्याही डॉक्टराचा इलाज होणार नव्हता, कारण भगवानला वेड लागले होते, स्वातंत्र्याचे !! खरंच असे पेशंट कुठल्याच दवाखान्यात बरे होणारे नसतात.

तुम्हाला वेड लागले असेल. परंतु निजाम तर शहाणा होता ना. भगवान तोडकऱ्यासारख्या सामान्य मुलाने आपल्या घरावर झेंडा लावला ही खबर पोलीस स्टेशनात गेली. पोलीस ठाणे तर कुठे लांब होते. तोडकरी राहत होते उस्मानाबादच्या सांजावेशीत तर पोलीस स्टेशन होते पोस्ट ऑफीसच्या पाठीमागे. निजाम राजवटीत कर्मचाऱ्यात मुस्लिमांचा भरणा अधिक होता. ही बातमी गेली तेव्हा अमीनने आदेश दिला, पकडो. साले को! हातोहात चकमा देणाऱ्या भगवानला याची खबर लागताच ते पोलिसांच्या हातावर तुरी देऊन सटकले.

पोलिसांनी त्यांना शोधण्याचा भरपूर प्रयत्न केला. परंतु ते सापडले नाहीत. एक गुन्हा पचल्यावर गुन्हेगार दुसरा गुन्हा करत असतो त्याप्रमाणे भगवानचे धाडस वाढले. स्वत:च्या घरावराचा झेंडा काढला तेव्हा पोलिसांना वाटले बरे झाले हा घाबरला आहे. परंतु त्यांना पुढचे रामायण काय माहीत होते.

रात्री गायब झालेला झेंडा पोलिसांना दुसऱ्या दिवशी आपल्या डोळयांसमोर दिसला. या भगवानने मोठी करामत केलेली होती. आपल्या घरावरचा झेंडा या पठ्ठयाने रात्रीतून सरकारी पोष्ट ऑफीसवर लावला होता. अमिन ओरडला,आपने सामने दफ्तरखानेपर किस साले ने ये जुर्रत की है?

त्यांना माहिती मिळाली, हे काम भगवान तोडकऱ्याचे आहे. सकाळी सकाळी पोलीस त्यांच्या घरासमोर जाऊन थडकले. पुन्हा एकदा भगवानने पोलीसांना गुंगारा दिला. परंतु जास्त वेळ ते गायब राहू शकले नाहीत. पोलीसांनी पकडून त्यांना हैद्राबादच्या तुरुंगात डांबून टाकले. परंतु नावातच भगवान असल्याने ते पोलिसांना थोडेच जुमानणार होते. भगवान तोडकरी यांनी काय शक्कल लावली माहीत नाही, परंतु तुरुंगातून ते गायब झाले. पोलीस दफ्तरात गुन्ह्येगाराची सविस्तरपणे नोंद करण्यात आली, उमर १५ साल, बाल काले, कद छोटा और रंग काला. तेव्हापासून भगवान तोडकरी 'काला भगवान' म्हणून परिचित झाले.

यानंतर भगवान शंकरराव तोडकरी गौडगावच्या कँपवर दाखल झाले. कँपवर राहत असताना रझाकाराच्या अड्डयावर छापा घालून ते उद्धस्त करणे, करोडगिरी नाके लुटणे, ठिकठिकाणी हत्यारे पुरविणे आणि कुठल्याही प्रकारे निजामाच्या सत्तेला हतबल करणे हे कार्यक्रम कँपच्या माध्यमातून हाती घेण्यात आले होते. आपल्या वरिष्ठांनी दिलेले आदेश अगदी निष्ठेने पार पाडण्याची किमया भगवानने अचूकपणे निभावली. भगवान तोडकरींनी अपसिंग्याच्या मोहिमेत भाग घेतला होता. यामध्ये श्रीधर वर्तक शहीद झाले होते. त्यामुळे अपसिंग्याचा लढा उस्मानाबादच्या इतिहासातील एक अविस्मरणीय दिवस आहे.

याप्रमाणेच उस्मानाबादचा कलेक्टर महंमद हैदरीने जेव्हा चिलवडी गाव जाळून टाकण्यासाठी गावावर हल्ला चढविला तेव्हा गौडगावच्या कँपवरील स्वातंत्र्य सेनानी धावून आले. यात भगवानराव होते. या लोकांनी रझाकारांचा जोरदार प्रतिकार केला. दोन्ही बाजूंनी गोळीबार चालू होता, परंतु कँपवाल्याच्या गोळ्या संपल्यामुळे त्यांना माघार घ्यावी लागली होती. स्वातंत्र्यवीरांना माघार घ्यावी लागली असलीतरी यामुळे गावकऱ्यांचे प्राण वाचले होते. कारण सर्वांना पळून जायला वेळ मिळाला. यादरम्यान एका बाळंतबाईला रझाकरांनी जाळून ठार केले होते. आपण तिला वाचवू शकलो नाही याची खंत त्यांना शेवटपर्यंत

होती.

चिलवडी आणि अपसिंग्याचा रणसंग्राम झाल्यामुळे लोकांमध्ये संतापाची लाट उसळली. आता तर त्यांनी रझाकारांविरुद्ध उघडपणे दोन हात करायला सुरूवात केली. सारा भरणे बंद केला, कराडेगिरी नाके कायमचे बंद करून टाकले, सिंदीची झाडे तोडून टोकली. एवढेच नाहीतर उस्मानाबादच्या घाटाखाली निजामाच्या कर्मचाऱ्याला अघोषित बंदी घातली. त्यातून माढा तालुक्यातील जामगाव या ठिकाणी मुक्तापूर स्वराज्य स्थापना केले. खरे तर हे स्वतंत्र्य भारताचे एक स्वतंत्र राज्य होते. त्यामुळे मुक्तापूर स्वराज्याचे स्वतंत्र मंत्रिमंडळ स्थापन करण्यात आले. यात राज्यमंत्री म्हणून भगवानराव तोडकरी यांनी काम पाहिले होते.

भगवानरावांचे शिक्षण कमी असलेतरी कुठल्याही बाबतीत कमी पडले नाहीत. एखाद्या गुप्तहेराप्रमाणे शत्रूच्या गोठ्यात घुसून ते अनेक बातम्या काढत असत.त्यामुळे गायब झालेल्या भगवान तोडकरींना पकडून देण्यासाठी निजाम सरकारच्या पोलिसांना त्यांच्यावर रोख ५,००० रूपयांचे बक्षिस लावले होते. परंत शेवटपर्यंत ते सरकारला सापडलेच नाहीत. शेवटी १७ सप्टेबरला, १९४८ ला हैद्राबाद संस्थान स्वराज्यात विलीन झाले. त्यानंतर आता देशाचे काम संपले म्हटल्यानंतर भगवानराव तोडकरी यांनी संसार करण्याचा निर्यण घेतला.

तुळजापूरच्या मंडके घराण्यातील सुमनबाईशी त्यांचा विवाह झाला. त्यांच्यापासून या दापंत्याला प्रकाश, कैलास, अनिल ही मुले आणि विजया, मिना आणि चित्रा या मुली झाल्या. संसार चांगला चालला होता. परंतु देवालाही त्यांची दृष्ट लागली. वयाच्या अवघ्या ५० व्या वर्षी भगवान तोडकरी देवाघरी गेले. शत्रूला आयुष्यभर हुलकावणी देणाऱ्या भगवानला खऱ्याखुऱ्या भगवान पासून वाचणे कठीण झाले. किरकोळ आजारातच त्यांचे दु:खद निधन झाले. भगवान तोडकरींच्या निधनामुळे संपूर्ण उस्मानाबाद जिल्ह्यातील लोकांवर शोककळा पसरली होती.

एवढी मोठी कामगिरी करूनही भगवान तोडकरींना प्रसिद्धी कधी मिळाली नाही. त्यांचे काम सर्वसामान्यापर्यंत पाहोचविणे गरजेचे आहे. तरीपण दिलेले काम निष्ठापूर्वक करणाऱ्या भगवानच्या कुटुंबालामात्र त्यांच्याविषयी अभिमान आहे. आज आपण जे काही आहोत ते केवळ त्यांच्यामुळेच ही त्यांची भावना कायम आहे.

**भास्करराव नायगावकर**



भास्करराव सांभराव नायगावकरांचा जन्म ७ फेब्रुवारी, १९२७ रोजी उस्मानाबाद येथे एका सर्वसामान्य कुटूंबात झालेला आहे. घरची आर्थिक परिस्थिती बेताची असलीतरी लहानपणापासून त्यांना शिक्षणाची आवड होती. परंतु निजाम राजवटीतील शिक्षणाचे माध्यम हे उर्दू असल्याने मराठी भाषिक मुलांना ते अवघड जात होते. नायगांवकरांचे घर हे नेहरू चौकातील पांडुरंग दरबाराच्या बाजूला असल्याने त्याच्याच बाजूला असलेल्या आर्य समाजाच्या कार्यालयात त्यांची बैठक वाढली. या कार्यालयात हिंदू समाजात जनजागृती व्हावी म्हणून विविध धार्मिक कार्यक्रम चालविले जायचे. याचबरोबर या ठिकाणी लाठी, काठी, भालाबर्ची, तलवारबाजी यांसारखे प्रशिक्षण दिले जायचे. सहाजिकच भास्करराव आर्य समाजाकडे आकर्षित झाले. आर्य समाजाच्यावतीने त्या ठिकाणी लाठीकाठी, भाला-बर्ची आणि तलवारबाजीचे प्रशिक्षण दिले जायचे. पुढे हैद्राबादच्या सिटी कॉलेजमध्ये शिकत असताना त्यांनी 'वंदेमातरम'चळवळीत भाग घेऊन स्वातंत्र्य संग्रामात उडी घेतली त्यामुळे भास्कररावांचे नाव पोलीस दफ्तरात नोंदविले गेले. हैद्राबादध्ये राहत असतांना त्यांनी देवीसिंग चव्हाणांच्या नेतृत्वाखाली काम केले. काही दिवस त्यांनी त्यांच्या मुलाला शिकवण्याचेही काम केले.

शिक्षण अर्धवट सोडून त्यांना उस्मानाबादला परत यावे लागले. त्या वेळी या परिसरात स्वातंत्र्य संग्रामाच्या लढ्याने तीव्र स्वरूप घेतले होते. या ठिकाणी प्रभाकर नामदास,मनोहर टापरे,राजेंद्र देशमुख यांच्यासोबत काम करायला सुरुवात केली. स्वातंत्र्यसंग्रामासाठी लागणारी हत्यारे, हातबॉम्ब त्यांनी आपल्या घरात लपवून ठेवले होते. पोलिसांना यांचा सुगावा लागताच भास्करराव भूमिगत झाले. दुर्दैवाने त्यांच्या वडिलांचे निधन झाल्यानंतर तिसऱ्या दिवशी ते भेटायला घरी आले तेव्हा पोलीसांनी त्यांना पकडून त्यांच्यावर फौजदारी गुन्हा नं.१७७/१-१३५७ फसलीनुसार खटला दाखल केला. त्यानुसार २३ एप्रिल, १९४८ ते १४ सप्टेंबर, १९४८ पर्यंत त्यांना उस्मानाबादच्या कारागृहात ठेवण्यात आले. या वेळी उस्मानाबादचे इन्स्पेक्टर महमद शहाखान आणि हवालदार बिराजदार यांनी त्यांना अमानुषपणे मारहाण

केल्याचे ते सांगतात. पोलिसांच्या मारहाणीविषयी ते एक वेगळा निष्कर्ष मांडतात की, सुरुवातीला पोलिसांचा मार लागतो मात्र एकदा अंग बधिर झाले की, त्याचा काहीच फरक पडत नाही. खरं तर ही स्वातंत्र्य देवतेची कमाल आहे. अशा रितीने स्वातंत्र्य सैनिकांनी अनेक हालअपेष्टा सहन करून ते स्वातंत्र्य मिळवून दिले आहे . त्यामुळे स्वातंत्र्याचा आणि स्वातंत्र्य सैनिकांचा सर्वांनी आदर करावा एवढी माफक अपेक्षा स्वातंत्र्य सेनानी भास्करराव नायगावकर यांनी व्यक्त केली.

***



पंडीत जवाहरलाल नेहरू उस्मानाबाद येथील
मा.फुलचंद गांधी यांच्या निवासस्थानी



## ७. हुतात्मा बाबूराव बोरगावकर

स्वातंत्र्य संग्रामाचा बारकाईने आढावा घेतला असता असे दिसून येते की, या संग्रामात शिकलेल्या लोकांचा सहभाग मोठ्या प्रमाणावर होता. खंर तर शिक्षणाचा अर्थच अंधकारातून शहाणे होणे हा आहे. परंतु हे शक्य होताना दिसत नाही. आजच्याप्रमाणे शिकलेल्या माणसाची प्रवृत्ती स्वत:च्या स्वार्थापलीकडे पाहण्याची नव्हती. तर त्यांचे अंतिम स्वप्न देशाचे स्वातंत्र्य होते. त्यातही हैद्राबाद संस्थानातील तरुण हा निजामी शाळेत शिकलेला होता. निजामाच्या भल्यासाठी प्रार्थना करावी लागायची.

निजामवुल्मुल्क उस्मानअली खाँ आसिफे साबे
सिराजे दिने इस्लामी अमिरे मोमीनां तू हो

सारं शिक्षण उर्दूतून दिलं जायचं. शाळेचा पोशाखही शेरवानी आणि डोक्यावर तुर्रानी टोपी याप्रमाणे असायचा. निजाम राजवटीने तरुणांच्या डोक्यावर भलेही आपल्या पगडीचे ओझे टाकले असले परंतु आतील मस्तकाला ते भेदू शकले नाहीत. ही मंडळी शिकून बाहेर पडली, तेव्हा पाहिजे तर त्यांना मानाच्या मोठ्या नोकऱ्या सहज मिळाल्या असत्या. परंतु बरेच लोक अशा नोकऱ्यांना लाथा मारून जगाच्या भल्याकरिता बाहेर पडले.

आपणाला ज्ञात आहेच की, पूर्वी नळदुर्ग हे तालुक्याचे ठिकाण असल्याने अगदी १९५१ - ५२ पर्यंत तालुक्याचे मुन्सफ कोर्ट नळदुर्गच्या किल्ल्यात चालायचे. नळदुर्ग म्हटले की, संपूर्ण मुस्लीम लहेजा. आदिलशाहीपासून ते मोगलापर्यंत या किल्ल्याने मुस्लीम राजवटी पाहिलेल्या. १६६५ ला मिर्झाराजा जयसिंगाबरोबर विजापूर स्वारीवर निघालेले छत्रपती शिवराय जाता जाता नळदुर्गला आले आणि हाच किल्ला घेण्यासाठी स्वराज्याचे युवराज छत्रपती संभाजीराजे नळदुर्गवर चालून आले. किल्ल्याच्या दृष्टिने हाच

काही तो भाग्याचा क्षण. बाकी सबकुछ नबाबी थाट.

देशाच्या भल्यासाठी स्वत:चा संसार उघड्यावर टाकणारे असे अनेक होते. जुन्या धाराशिव जिल्ह्यातील प्रत्येक तालुक्यात बरीच नामांकित घराणी या कामी पुढे आली.त्यात बोरगावकर हे नाव सर्वांना सुपरिचीत आहे. बोरगावकर हे मूळचे तुळजापूर तालुक्यातील बोरगावचे सोमवंशी पाटील. नळदुर्गपासून अगदी पाच दहा किलोमीटरवर असणारं बोरगाव हे तसं शांत गाव. गावचा कारभार गोपाळराव पाटलाकडे असल्याने गावात सर्वजण सुखी आणि गुण्यागोविंदाने नांदायचे. गोपाळराव शेतसाऱ्याला जेव्हा मामलेदार कचेरीत जायचे तेव्हा त्यांनापण वाटायचे की, आपला पोरगा असाच शिकून मोठा साहेब व्हावा. खरं तर हैद्राबादच्या नजाम राजवटीत शिकले म्हणजे मोठी मानायची नोकरी मिळेलच याची खात्री देता येत नव्हती. कारण या जागा आपल्या समाज बांधवासाठी त्याने राखून ठेवलेल्या होत्या. परंतु 'कोशिश करने वाले की कभी हार नही होती'। हे या घरण्याचे जणू ब्रीदच असल्याने बोरगावकरमंडळी नेहमी झटत असते.

गोपाळरावाचा मुलगा बाबू हा गावात सर्वात हुशार मुलगा. बोरगावात शिक्षणाची सोय नाही म्हणून त्यांना शिकायला नळदुर्गात ठेवलं. गोपाळरावांना गावचा व्याप त्यातच गावाबरोबरच आष्टाकासार या ठिकाणी शेतीबाडी वाढविल्याने जरा जास्तच धावपळ व्हायची. परंतु बाबूला जास्तीचे सांगण्याची आवश्यकता नव्हती. जन्मता:च तल्लख बुद्धी असल्याने दुर्गाची शाळा त्याने गाजविली. उर्दूमध्ये पारंगत होऊन दिलेल्या उत्तराने जनाब मास्टरजी बहुत खुश व्हायचे.

गाव जवळ असल्याने बाबूने चौथीपर्यंतचे शिक्षण म्हणजे तहतानिया, सातवीपर्यंतचे उस्तानिया आणि दहावीपर्यंतचे फोकानिया असे सारे शिक्षण नळदुर्गच्या शाळेतून पूर्ण केले. उस्मानाबाद जिल्ह्यात त्या वेळी उच्च शिक्षणासाठी हैद्राबादला जावे लागायचे. त्यातही जिल्ह्यातील अनेक बडी घराणी मुलाला हैद्राबादला पाठवून स्वत:ची क्रेझ सांभाळायचे. काटीचे देशमुख, उमरग्याचे मोरे, उस्मानाबादचे गांधी, गावोगावचे कुलकर्णी यावर आघाडीवर असायचे. वाशीचे बळवंतराव कवडे तर हैद्राबादचे सातवे निजाम मीर उस्मानअलीचे वर्गमित्रच. असा हा ताफा हैद्राबादच्या उस्मानिया विद्यापीठात शिक्षण घ्यायचा. त्या वेळी सातवी किंवा दहावी झाल्यानंतर थेट

कायद्याचे शिक्षण घेता येत असल्याने बरीच मंडळी याकडे वळायची. कायद्याची सनद मिळाली की, कोर्टात जाऊन वकिली करता यायची. स्वातंत्र्याच्या वेळी वकिली हा अतिशय प्रतिष्ठेचा व्यावसाय होता.

देशाला स्वातंत्र्य मिळाले नसलेतरी लोकांना आता न्यायनिवाड्यासाठी कोर्टात यावे लागायचे. त्या वेळी दुर्गाच्या कोर्टात काही गाजलेली वकील मंडळी होती. त्यात बोरगावचे बाबूराव बोरगावकर, व्यंकटरावकाका नळदुर्गकर, वासुदेव शहापूरकर, भास्करराव वकील यांचा बोलबाला होता. आता गावचा पोरगा शिकून मोठा झाला म्हटल्यावर त्यावेळी घरालाच नाही तर साऱ्या गावाला अशा लोकांचा आधार वाटायचा. त्यातच ही मंडळी स्वातंत्र्याच्या एका उर्मीने भारलेली असल्याने त्यांच्या मनातील आग कायम असायची. लोहाऱ्याच्या रसाळपाटील घराण्यातील पार्वतीबाईंशी विवाह झाल्यानंतर बाबूरावांना शकुंतला, कमल, नरेंद्र, सुरेंद्र, विमल, सुभाष आणि कुसूम अशी अपत्ये झाली. मुलींच्या बाबतीत ते पुरोगामी विचारांचे होते. आपल्या कमलने शिकून मोठे व्हावे म्हणून त्यांनी तिला सोलापूरच्या हरिबाई देवकरण शाळेत पाठविले होते.

मराठी गड्याचा मराठी बाणा. आपण शिकलो. आता आपली मंडळी शिकली पाहिजे. आपला समाज पुढे आला पाहिजे हे ज्याच्या डोक्यात घुसतं तेच काहीतरी करू शकतात. त्यांपैकीच एक बाबूराव बोरगावकर. दोन पैसे पदरात आलेतरी स्वभावात काही बदल नाही. रोज सर्वांनी व्यायाम केला पाहिजे असा त्यांचा खाक्या होता. व्यायाम केला मग खायला खुराक हवा म्हणून खडीसाखर एका फडक्यात घेऊन ते एका चरवीवर ठेवूनच गायीची धार काढायची. आणि तसंच मुलांना गरम गरम प्यायला द्यायचे. बदामाच्या तेलाने अंगाची मसाज व्हायची. हे फक्त घरापुरते मर्यादित नव्हते तर बाहेरच्यांनाही हीच वागणूक मिळायची. दोन पैसे आले की, त्यांनी दुर्गात थोडीफार जमीन घेतली होती. तिथं बरीच मंडळी हुर्डापार्टीला हजेरी लावायची. जवळच्या मित्रापांसून ते मामलेदार आणि न्यायाधीशांपर्यंत सर्वांचा राबता असायचा.

टेनीस खेळण्यात बाबूराव कोणाला जमू दयायचे नाहीत. वकिलीतही त्यांचा मोठा दबदबा निर्माण झाला. स्वातंत्र्याच्या वेळी फौजदारी खटले कमी आणि दिवाणी जास्त असायचे. आपली केस हक्कानं जिंकता यावी म्हणून मोठा नामांकित वकील लावला जायचा. त्यामुळे काटीचे शहाजीराव देशमुख,

शिवाजीराव देशमुख, वाशीचे कल्याणराव कवडे देशमुख आणि अपसिंग्याच्या बळवंतराव जहागीरदारांनी आपल्या केसेस बाबूराव बोरगावकरांना दिलेल्या होत्या. या मोठ्या खटल्याबरोबरच गोरगरिबांच्या खटल्यांतही त्यांनी कधी आळस केला नाही. पैसे असले तर दया, नाहीतर पुन्हा बघू हे त्यांचे वाक्य ठरलेले असायचे. आणि जर समाजातील खटला असले तर फी माफ असायचे.त्यामुळे रझाकराच्या विरोधातले बरेच खटले त्यांनी जोमाने चालविले.

स्वातंत्र्याचे वारे वाहत असताना आता कुठलाही भारतीय माणूस यापासून दूर जाऊ शकत नव्हता. बाबूरावही याकामी पुढे सरसावले. आर्य समाजाच्या चळवळीत त्यांनी सक्रिय सहभाग नोंदवायला सुरुवात झाली. गरिबाला सावकारी पाशातून मुक्त करण्यासाठी त्यांनी पतपेढीची स्थापना केली. भारत सरकारची कुठलीही वर्तमानपत्रे वाचायला बंदी असलीतरी रोज ती गुपचूपपणे वाचल्याशिवाय त्यांना कधी चैन पडायची नाही. आपल्याबरोबर आपल्या जनतेचे भले व्हावे हा विचार नेहमी मनामध्ये घोळत असायचा. पैशासाठी कधी वकिली करायची नाही म्हणून लोक त्यांना गरिबाचा वकिल म्हणायचे. वरपासून खालपर्यंत त्यांचे सर्वांशी चांगले संबंध होते.

आपल्या गावचे बाबूराव वकील तालुक्याला आहेत म्हटल्यावर गावच्या लोकांवर मूठभर मांस चढायचे. त्यातच गावात रझाकारांशी दोन हात करावे लागायचे. १९४७ - ४८ या वर्ष दिड वर्षाच्या कालावधीत लोकांना निजामाचा नाही तर रझाकारांचा भयंकर त्रास सहन करावा लागला. भारतदेश स्वतंत्र झालातरी हैद्राबाद संस्थान आणखी स्वतंत्र होण्याची स्वप्न बाळगून होता. त्यामुळे निजामाने रझाकारांना हाताशी धरले होते. यांच्या अत्याचाराने गावोगावचे लोक त्रस्त झालेले होते. यांना आधार होता बाबूरावांसारख्या खंबीर वकिलाचा.

काळानुसार माणसाचे वर्तन घडत असते. स्वातंत्र्याच्या वेळी जेव्हा समाजाला प्रेरणा देण्याची गरज असते तेव्हा सर्वसामान्यांची डोकी पेटविण्याचे काम समाजातील काही धुरंधर मंडळी करत असतात. याला पूर्वी साधुसंतही अपवाद नव्हते. ज्याप्रमाणे संतश्रेष्ठ तुकोबारायांनी छत्रपती शिवरायांना चालना दिली त्याप्रमाणे तुळजापूर तालुक्यातील दिंडेगावच्या शिवरामबुवांनी स्वातंत्र्यासाठी लोकांना पेटून उठण्याचा धडा दिला. साहजिकच दिंडेगावच्या

शिवरामबुवाची यात्रा म्हणजे विठ्ठल आणि स्वातंत्र्यदेवता अशा दोहोंचा संगम होता. त्यामुळे नळदुर्गपासून ते उमरगा आणि अक्कलकोटपर्यंतचे लोक या यात्रेला आवर्जुन हजेरी लावायचे.

ॲक्शन झाली की रिॲक्शन ही येणारच. आणी चेंडूला भिंतीवर जेवढया जोरात माराल तेवढ्या जोरात तो परत येणार, हा शास्त्राचा नियम आहे. तीच अवस्था हैद्राबाद संस्थानातील सर्वसामान्य जनतेची झालेली होती. निजामाच्या आडून रझाकारांनी गावागावांत हैदोस घातलेला आणि मुस्लिमीकरणाचे वाढते आक्रमण होत असल्याने तरुण वर्ग अगदी चिडून गेलेला होता. बंधनं असावीत परंतु ती किती? यात्रेला जायचं तर करोडगिरी नाक्यावर कर भरावा लागायचा. गाडीला भारताचा झेंडा लावायचा नाही, मग करायचं काय? असा प्रश्न सर्वसामान्यांच्या मनामध्ये कायम असायचा.

पन्नास वर्षांपूर्वीचा भारत आठवल्यास माणूस पारतंत्र्यातही माणसिक दृष्ट्या सुखी होता हे सहज जाणवते. शेतीवर आधारित अर्थव्यवस्था आणि गायीगुरांचा राबता असल्याने आणखी माणुसकी शिल्लक होती. कारण धूर्त माणसाच्या सोबतीपेक्षा जर निष्पाप जनावरांचा सहवास माणसाला लाभला तर तर पापभीरू वृत्ती त्याच्यात शिल्लक राहत नाही. अशीच काही अवस्था पूर्वी होती. गावातील पोरांचा एकच छंद, व्यायाम करून शरीर कमवायचे आणि ठरवून यात्रेत कुस्त्या हाणायच्या. आता या पैलवान गडयांना आणखी एका व्यसनाने धरले होते आणि ते व्यसन होते स्वातंत्र्य संग्रामाचे.

पूर्वीच्या यात्रा या अनेक उद्दिष्टे पार करणाऱ्या असायच्या. नवीन वस्तूची खरेदी, देवाचे दर्शन, कुस्त्याचा फड आणि आप्तांच्या भेटी. आणी यामुळेच माघ वद्य चतुर्थीला भरणारी दिंडेगावच्या शिवरामबुवाची यात्रा प्रसिद्ध होती. यात्रेला जाण्याकरिता गावोगावच्या लोकांप्रमाणेच आष्टयाचे तरूणही निघाले. गाडीचा रुबाब तर काय सांगाल? खिलार बैलं धुवून घेतलेली, वर गुलाल आणि पिवळा रंग मारलेला, तासलेल्या शिंगाना शेंब्या, गळयात घुंगराऱ्या चंगाळया, तर गाडीच्या तुटाटीलाही शेंब्या लावून रंग आणि रिबीन मारलेली. बायका असतील तर गाडीला तट्टूया लावलेला आणि बापडे असतील तर गडीमाणसं नेमकी पात्यावर बसून पोरांना नीट बसारेऽ म्हणून सांगणारी असायची. आता स्वातंत्र्याच्या लाटेत आणखी एका गोष्टीचे आकर्षण वाढलेले होते. ते म्हणजे आपल्या घरावर आणि बैलगाडीवर स्वातंत्र्याचा तिरंगा लावणे.

अर्थात यासाठी मर्दाचं काळीज लागायचं.

तर याप्रमाणे सजून आष्ट्याची एक बैलगाडी दिंडेगावच्या यात्रेला निघाली होती. गाडीत नरसिंग साळू गायकवाड, बाबू पांढरे, हणमंत औटी, शंकर योगाजी आणि शिवराम ढोपरे बसलेले होते. शिवराम जरा जास्तच आक्रमक होता. अन् दुर्गात आपले बाबूराववकील आहेत म्हटल्यावर त्याला आणखी चेव चढलेला. उजवीकडच्या पात्याला तिरंगा फडकावत आष्टयाच्या या शिष्टमंडळाची बैलगाडी राष्ट्रपतीच्या गाडीप्रमाणे निघाली जोशात. बैलाचा कासरा म्हणजे ॲसेलिटर तेच, ब्रेक तेच, क्लच तेच आणि स्टेअरिंगसुद्धा तेच असल्याने अनेक गाड्यांना ओहरटेक करत यांची गाडी आली नळदुर्गाच्या किल्ल्याजवळ. दुर्गाच्या करोडगिरी नाक्यापर्यंत गाडी निर्धोकपणे आली होती. परंतु आता त्यांना इथं उटी लागली.

दुर्गाच्या नाक्यावर त्यांची गाडी अडवली गेली. वर सांगितल्याप्रमाणे स्वातंत्र्याच्यावेळी रझाकारमंडळी आता चांगलीच शेफारलेली होती. हैद्रबाद संस्थान म्हणजे आपल्या बापाची जहागीर समजणाऱ्या रझाकाराला आष्ट्याच्या गाडीवरील तिरंगा पाहून राग येणे साहजिक होते. त्याप्रमाणे रझाकाराने गाडीवरचा तिरंगा काढायला सांगितले. तेव्हा बाबूराववकील आपल्या पाठीशी आहेत अन् आता तर आपण खुद्द नळदुर्गात आहोत म्हटल्यावर आष्टयाचा नरसिंग आता कुणाच्या बापाला घाबरणार नव्हता. रझाकाराने आदेश दिला, झेंडा निकालो। तेव्हा नरसिंगाने कडब्याखालची तलवार काढून आरोळी ठोकली, भारतमाता ऽऽ की जय ऽऽ, स्टेट कॉंग्रेसचा विजय असोऽऽ, नाना पाटलांचा विजय असो . नरसिंगाचा हा नरसिंह आवतार पाहून रझाकारांपैकी एकाचेही पुढे येण्याचे धाडस झाले नाही. तेव्हा एखाद्या नेत्याप्रमाणे बिनधास्तपणे नरसिंगाची गाडी पुढे निघून गेली.

नरसिंगाप्रमाणचे महंकाळच्या शिवारातून कृष्णा मानेने आपलीही गाडी जुंपली होती. गाडीत गहिनीनाथ पाटील, देवीदास सोमवंशी, परूतप्पा सोलापुरे, भिमा सूर्यवंशी बसलेले होते. नरसिंगाप्रमाणेच कृष्णानेही आपली गाडी करोडगिरीवरून बाहेर काढून दिंडेगाव गाठले होते. याप्रमाणे मुरूम, जळकोट, नंदगाव, लोहगाव, किल्लारी, गुंजोटी अशा कितीतरी गावच्या गाड्यांनी नळदुर्गच्या करोडगिरीला धडक देऊन मोठया रुबाबात शिवरामबुवाच्या काल्याचा आनंद घेतला होता.

सकाळच्या घटनेने रझाकारात चुळबुळ सुरू झाली होती. साले इक गाव कें लौंडें की ये हिम्मत ? इसकी जुर्रत कैसी हुई? अशा प्रकारची चर्चा करत रझाकारानांनी आता आपला पुढचा डाव आखायला सुरुवात केली. तिकडे शिवरामबुवाचे दर्शन घेऊन संध्याकाळी लोक आपापल्या गावाकडे निघाले. नरसिंगाची गाडी टेलरनगर, आरबळीच्या शिवारातून चिवरी उमरगामार्गे अणदुऱ्यातून नळदुर्गाच्या नाक्यावर आली. सकाळी गप्प झालेले रझाकार शब्दाने घायाळ झालेले होते. त्यामुळे त्यांनी आपले दोन खबरे सायकलीवरून पाळत ठेवण्यासाठी दिवसभर यांच्या मागेच ठेवलेले होते. याची आष्ट्याच्या तरुणांना तर कुठं पर्वा होती?

जत्रा संपली अणि संध्याकाळची वेळ असल्याने साठ सत्तर गाड्या एकदम आपापल्या गावाकडे जायला निघालेल्या होत्या. तर सकाळचा बदला घेण्यासाठी नळदुर्गाच्या करोडगिरी नाक्यावर दोनअडीचशे रझाकार टपून बसलेले होते. दुर्गाचा करोडगिरी नाका आताच्या हैद्राबाद रस्त्यावर किल्ल्याच्या खालच्या बाजूला मशिद आणि मारुतीच्या मंदिरादरम्यान होता. सर्वांना घराकडे जाण्याची घाई झालेली, पोरं आणि गुरं अशी दोघांची काळजी मनामध्ये लागलेली असल्याने सकाळचा जोश त्यांच्यात नव्हता. तरीपण गाडीवरचा तिरंगा झेंडा कायम होता.

सकाळचा बदला घेण्यासाठी रझाकार तिथंच टपून बसलेले होते. प्रत्येकाच्या हातात सुरा, जंबीया, तलवार, काठी याप्रमाणे काहीना काहीतरी हत्यारे होती. आष्ट्याच्या गाडीचा चाकाचोळा घेण्यासाठी रझाकार कटाक्षाने प्रत्येक गाडीकडे बारकाईने पाहत होते. परंतु दुर्गात आता साठसत्तर बैलगाडी एकदम आलेली. स्वातंत्र्याची खुमखुमी सर्वांच्याच डोक्यात घुसलेली त्यात आपल्याच माणसांचा जमाव म्हटल्यावर जरा जास्तीची हुडहुडी भरलेली होती. कृष्णा माने आणि नरसिंग साळूच्या अंगात तर जणू क्रांतिवीर संचारला होता. रझाकार सकाळच्या नरसिंगाला शोधताय तर गाडीवानांनी एका दमात जयघोष सुरू केला, भारतमाता ऽऽ की जय ऽऽ, वंदे ऽऽऽऽ मातरमऽऽऽऽ. सारा नळदुर्ग परिसर हादरून गेला.

तेवढ्या गर्दीतही रझाकारांना पाहिजे तो माणूस दिसला. ओळखायला तशी अडचण यायचा प्रश्नच नव्हता, कारण आष्ट्याच्या एकाच गाडीवर तिरंगा फडकत होता. दोनशे रझाकार हा झेंडा काढण्यासाठी आता पुढे सरसावले.

रझाकारांना आता चांगलाच चेव चढलेला असल्याने त्यांनी अर्वाच्य भाषेत शिवीगाळ सुरू केली. तर वारकऱ्यांनी आपल्या भारतमातेच्या घोषणा चालूच ठेवल्या होत्या. अशा वेळी कृष्णा माने मुद्दामहून गाडीतून खाली उतरून गाडीबरोबर चालायला लागला. एक रझाकार नरसिंगाच्या गाडीचा झेंडा काढायला गाडीच्या ढकलीवर चढला. तर दुसऱ्याने काठी फिरवून नरसिंगाच्या डोक्यात वार केला. नरसिंगाने वार चुकविला परंतु मागे बसलेल्या भीमा सोमवंशीच्या पाठीत त्याचा तडाखा बसला.

एवढ्यात कृष्णा मानेची काठी फिरली. कृष्णाची काठी रझाकारी नव्हती तर ती धर्माची छडी होती. त्यामुळे एका दणक्यात रझाकार जमिनीवर कोसळला. रझाकार आणि वारकरी एकमेकाला चांगलेच भिडले. हाणा ऽऽ मारा ऽऽ काट दो ऽऽ. अशा घोषणा ऐकायला मिळाल्या. या झटपटीत एकदोन रझाकार आडवे झाले तर हणमंत औटी, बाबू चौधरी, जनार्दन चौधरी, पांडू गवळी आणि बळीराम मारेकर जखमी झाले. तशातही साऱ्यांनी आपल्या गाड्या पुढे ढकलल्या. माणसं जमू देत नाहीत म्हटल्यावर रझाकाराने आता बैलावर चाकूचा वार केला. त्यामुळे बैल जाग्यावर थिरावला. तेव्हा आणखी एकाने आष्ट्याच्या शिवराम ढोपरेवर जंबियाचे दोन वार केले. शिवराम खाली कोसळला. त्यांच्या अंगातून भळभळ रक्ताचा पाट वाहायला लागला.

कृष्णा मानेच्या काठीने खाली पडलेला रझाकार कोणी साधा माणूस नव्हता तर तो दुर्गातल्या मस्तानसाहेब या वजनदार दुकानदाराचा मुलगा होता. त्यामुळे सारा गाव हादरून गेला. गावभर चर्चा उठली, अपना आदमी मारा गया। आष्टयाचा एकजण दगावलाय. परंतु शिवरामच्या अंगात भारतमातेचे रक्त असल्याने तो अजुनही तग धरून होता. रझाकाराला त्याच्या बांधवांनी उचलले तर शिवरामला बघायला खुद्द बाबूराव बोरगावकर वकील आले. आपल्या गावचा माणूस आलाय म्हटल्यावर शिवरामला धीर आला. बाबूरावांनी त्याला दवाखान्यात नेऊन त्याच्यावर उपचार केले. परंतु खरा धोका पुढेच होता. कारण रझाकाराला मारणे म्हणजे त्या काळी दस्तुरखुद यमाची चेष्टा करण्याचाच प्रकार होता. याची जाणीव असलेल्या वकील साहेबांनी शिवरामला मुद्दामहून पुढील उपचारासाठी म्हणून उस्मानाबादला पाठविले.

इकडे आपल्या इलाक्यात येऊन एका काफीराने आपल्याच माणसाचा खून करावा याची बोचणी साऱ्या रझाकारी वृत्तीच्या लोकांना होऊन त्यांनी 'खून

का बदला खून' अशी घोषण दयायला सुरुवात केली. आष्टे के काफीर को उडा. देंगे। काफीर को पना देने वाले को देख लेंगे। अशा चर्चा गावभर सुरू झाल्या. याची कुणकुण बोरगावकर वकिलांनाही लागली. त्यामुळे गल्लीतले बाबाराव पोतदारवगैरे मंडळी त्यांच्या घरी आली आणि त्यांनी सांगितले, वकिलसाहेब, जरा जपूनच रहावा, या लोकांचा काही भरवसा नसतो बघा. उद्या कोर्टातसुदीक जाऊ नका बघा. सर्वांचे भले चिंतणाऱ्या बाबूरावांना याविषयी विशेष काही वाटले नाही.

२२ फेब्रुवारी, १९४७ चा दिवस होता. आदल्या दिवशीच्या घटनेने दुर्गातला माणूस सुन्न आणि भयभीत झालेला होता. व्यापारपेठेसह संपूर्ण गावात सन्नाटा पसरलेला. इकडे बोरगावकरांचे कुटुंबही भयभीत झालेले होते. त्यामुळे सर्वांनी रात्र जरा काळजीतच काढली. परंतु दुसऱ्या दिवशी गावाने सुट्टी घेतली तरी कोर्टाला सुट्टी थोडीच होती? त्यातच मोठी मुलगी शकुंतला ला बघायला पाहुणे येणार असल्याने सारी लगबग चाललेली होती. तर आपुनके दो आदमी गये, सो दो के बदले दो। याप्रमाणे रझाकारांची तयारी चाललेली होती. अपना बडा आदमी गया है, तो अपन भी अभी मोहरा ही टपका देंगे। याप्रमाणे त्यांची तयारी चालू झालेली होती. हिंदू के ये दो मोहरे कौन? एक बाबूराव बोरगावकर वकिल तर दुसरा व्यंकटरावकाका नळदुर्गकर.

रोजच्याप्रमाणे काळी शेरवानी, डोक्यावर भरजरी फेटा, हातात आशिलाच्या फायली घेऊन ही मंडळी कोर्टात पोहोचली. तुळजापुरचे कोर्ट त्यावेळी नळदुर्गाच्या किल्ल्यात चालायचे. दुपारपर्यंत आपले काम आटपत आलेले होते. कालच्या घटनेमुळे आज कोर्टातही जरा गर्दी कमीच होती. त्यामुळे दुपारी दोनच्या सुमारास एक एकजण कोर्टातून बाहेर पडायला लागला. नळदुर्गकाका सहजपणे बाबूरावांना म्हणाले, बाबूराव जरा जपूनच रहावा. तेव्हा बाबूराव म्हणतात कसे - अहो काका ऽऽ आपणाला कसली भिती? आणि कायहो भिऊन जमणार आहे का? उगीच काहीतरी बोलू नका. चला निघू आता. त्याप्रमाणे काका आणि त्यांचा मोहरीर म्हणजे लेखनिक निळ्ळ्या स्वामी, बाबूराव बोरगावकर वकील अशी मंडळी किल्ल्याबाहेर निघाली.

निजाम राजवटीत आता किल्ल्यालाही अवकळा आलेली होती. अत्तराच्या फायात स्वच्छतेला मुक्ती मिळालेली होती. किल्ल्याबाहेर एक बाई भाजीपाला विकायला बसलेली असायची तर चहाची एक दोन हॉटेलही उघडी

होती. कटवाली मंडळी तिथंच टपून बसलेली होती. पहिल्यांदा व्यंकटरावकाका किल्लयातून बाहेर आले. बाहेर काहीतरी हालचाल दिसली म्हणून त्यांनी घाबरून सहज कोटाच्या खिशात हात घातला. मारेकऱ्याला काहीतरी शंका आली की, काकाच्या खिशात पिस्तूल वगैरे असावे म्हणून ते मागे हटले असावे. परंतु यामुळे काकाची वेळ निभावली. म्हणतात ना, 'काळ आला होता पण वेळ आली आली नव्हती'.

त्यांच्यामागे बाबूराव बोरगावकर वकील आणि सोबत निल्लय्या स्वामी निघाले. जरा ही मंडळी बाहेर आली असेल नसेल तोच आजूबाजूला काहीतरी खुणवाखुणवी झाली. रझाकारांच टोळकं हातात शस्त्रे घेऊन अचानक गिधाडासारखं बाबूरावावर तुटून पडलं. पहिला वार त्यांनी हातावर घेतला. हात फाटल्याने रक्ताची चिळकांडी लागली. खरं तर आता सारं आभाळच फाटलं होतं, कुठं कुठं म्हणून ठिगळ लावणार? एक शेळी तीनचार लांडग्यांनी एकाकी फाडावी तसं निरापराध वकिलावर तब्बल बावीस वार करण्यात आले. तीच अवस्था निलय्या स्वामीची झाली. त्यांच्यावरही जवळपास सव्वीस वार करण्यात आले होते. कालच्या दिवशी करोडगिरी नाक्यावर पहिलवानापुढे शेपटं घालणारे आज निरपराधासमोर वाघ झाले होते.

रझाकारांचे झेंगट नको म्हणून जो तो दिसेल तिकडे पळायला लागला. तिथे शिल्लक राहिले ते दोन जखमी शेर . निलय्या स्वामीच्या शरीराची पार चाळणी झालेली होती. त्यांनी तिथंच जीव सोडला तर वकीलसाहेब त्याही अवस्थेत जरा धीर धरून होते. मन कणखर होतं पण शरीर साथ देत नव्हतं. बेसुमार रक्त वाहिल्याने आता डोळ्यांपुढे अंधारी यायला लागली. तेवढयात गावात ही वार्ता समजताच गोविंदराव बेले, बाबूराव पुदाले, नरहारी पुदाले ही मंडळी धाऊन आली. कावड करत सर्वांनी बाबूरावांना अलगद उचलून बाजारपेठेतल्या एका दुकानासमोर आणून पाणी पाजवायला सुरूवात केली. ओठं थरं थरं कापायला लागले, कंठ फुटेना, त्याही अवस्थेत आवाज आला – नरेंद्र ऽऽ . लेकराला बघावं अशी, त्यांची इच्छा असावी. आता त्यांच्याकडे तेवढा वेळ नव्हता. माझ्या लेकरांना सांभाळा म्हणत त्यांनी आपली मान टाकून दिली.

वा रे निजामशाही! कुणाचा बदला कुणावर. यांचा दोष तर काय? आपल्या लोकांना आधार दिला? बाबूराव गेल्याची वार्ता वाऱ्यासारखी सर्वत्र

पसरली. बाबूरावाची आई हरणाबाई, पत्नी पार्वती आणि सात मुलं ऽऽ . सारं काही सुन्न होऊन गेलं. यात कुणी मुलगा, कुणी पती तर पोरांनी आपला बाप हरवला होता. निल्लयाच्या पत्नी मुक्ताबाईची हीच अवस्था. नळदुर्ग पंचक्रोशी सारं काही सुन्न होऊन पाहत होती. रात्रीची वेळ, वीस पंचवीस हजारच्या जमावाने या वीरांना अखेरचा निरोप दिला. काहीजण आजच्या आज रझाकाराचा खातमा करण्याची भाषा बोलायला लागलो. परंतु लोकांनी त्यांना आवरलं. बाबानो सरकारच त्यांचं हाय, जरा दमानं घ्या, नाहीतर .....

ही घटना पाहून गोविंद बेलेच्या मनावर भलताच परिणाम झाला. तो वेडयासारखं बडबडायला लागला. माझा वकील गेला, अहो वकीलसाहेब ऽऽ. माझ्या साहेबाला मारलं ऽऽ. स्टेट काँग्रेस झिंदाबाद ऽऽ. अशा प्रकारच्या घोषणा देत उभं आयुष्य काढणारा वेडा तुम्ही क्वचितच पाहिला असेल. देशासाठी अनेक तरुण वेडे झाले परंतु हा गोंविद खरंच वेडा झाला. बरं या वेडाचा उपयोग तो काय? गोविंदनं सारं आयुष्य असंच स्वातंत्र्याची भाषा करत काढलं.

दुसऱ्या दिवशी मुंबई, हैद्राबाद, औरंगाबादसह अनेक ठिकाणांहून लोक भेटायला आले. दैनिक काळ, केसरी गर्जने, हिंदूराष्ट्र, दिव्यशक्ती अशा प्रत्येक वर्तमान पत्राने पहिल्या पानावर ही बातमी छापून आपल्या भावना व्यक्त केल्या. सोलापूरच्या वि. रा. पाटलांनी तर अग्रलेख लिहून सरकारला इशारा दिला, असेच हिंदूवर अत्याचार होत असतील तर इकडे प्रतिक्रिया आल्याशिवाय राहणार नाही. लगेच शांतता कमेटीची बैठक घेण्यात आली. श्रीपाद कवठेकर, आंबादास कासार, नारायण पेशवे, साहेबराव हंगरगेकर, केशवराव वकील, व्यंकटराव नळदुर्गकर यांच्यासह बशीर अहमद, कुर्बान वकील, अब्दुल बागवान यांनी सर्वांना शांततेचं आवाहान केलं. तिथेच मामलेदार हजर होता. तोही आवाहान करायला लागला. याला काहीच अर्थ नव्हता, कारण यापुर्वीची बैठक बोरगावकारांच्या घरीच झाली होती. पुढे १६ ते १८ मे, १९४७ ला हैद्राबाद शहरातील मुशीराबाद या ठिकाणी क्राँग्रेसचे अधिवेशन भरले तेव्हा अध्यक्षस्थानी असलेल्या स्वामी रामानंद तीर्थ यांनी बाबूराव बोरगावकर आणि निल्लय्या स्वामीच्या निधनाबद्दल दुखवट्याचा ठराव मांडला तेव्हा जमलेल्या एक लाख लोकांनी त्यांच्या बलिदानाला अभिवादन केले.

बाहेरच्यांचा दुखवटा किती दिवस असतो? भोगायचं तर घरच्यांना

असतं. मुलगी उपवर झालेली, त्याच दिवशी पाहुणे बघायला आलेले. याचा परिणाम थोरली मुलगी शकुंतला वर झाला. आणि झुरणी लागून थोड्याच दिवसांत तिने वडिलांचा रस्ता धरला. बोरगावकर कुटुंबाला हा दुसरा धक्का. बाबूरावांचा स्वभाव सरळमार्गी असल्याने आपली इस्टेट पाहुणे, मित्र कुणाच्याही नावावर केलेली. त्याही अवस्थेत उमरग्याचे तात्याराव मोरे, सलगऱ्याचे दिनकरराव मोरे, होर्टीचे प्रल्हादराव पाटील, नरसिंगराव देशमुख काटीकर, आबासाहेब हंगरगेकर यासारख्यांनी धीर देऊन बरीच मदत केली.

खरं तर बोरगावकर कुटुंबावर आभाळ कोसळलं होत. अचानक संसार उघड्यावर आलेला. त्यात पुन्हा रझाकारांची भीती कायम होती. अशा वेळी बाबूरावांचे आजोळ तुळजापूरचे शंकरराव हे आपली बहिण हरणाबाईसाठी धाऊन आले. त्यांनी नळदुर्गाला जाऊन सारं गबाळ गाडीत भरून त्यांना आपल्या घरी घेऊन आले. घासातला घास चारून बाबूरावांची लेकरं वाढविली. बाबूरावांच्या पत्नी पार्वतीबाई मोठ्या हिंमतीच्या. त्यांची एकच जिद्द, माझा मुलगा नरेंद्र वकील झाला पाहिजे. कठीण प्रसंगी बोरगावकर कुटुंबाला जमिनी विकाव्या लागल्या.

खरं तर एखाद्या चित्रपटाची पटकथा वाटावी अशी ही बोरगांवकर कुटुंबाच्या नशीबाची चित्तरकथा! अपराध कुटुंब, पार्वतीचा आशीर्वाद आणि नरेंद्राची जिद्द यामुळे सारं काही व्यवस्थित झालं. नरेंद्र पुढे हैद्राबादला जाऊन वडिलाप्रमाणे वकील झाले. आईचं स्वप्न साकार झालं. आता त्यांचं स्वप्न तेवढ्यापुरतं मर्यादित नव्हतं. झेप उत्तुंग होती. साऱ्या काँग्रेसवाल्यांनी बाबूरावांच्या बलिदानाची बूज राखली. त्यामुळे नरेंद्रजी बोरगावकर आता कोर्टाचे नाहीतर जनतेची वकिली करायला राजकारणात पडले. १९७२ ला उस्मानाबाद जिल्हा परिषदेचे अध्यक्ष, पुढे साखर महासंघाचे चेअरमन, आमदार अनेक संस्थांचे पदाधिकारी राहून जनतेच्या सेवेत कार्यरत आहेत. आजही बोरगावकर आणि स्वामीच्या स्मारकाकडे पाहिल्यानंतर दोन्ही हात आपोआप जोडले जातात.

***

# ८. उस्मानाबादचे कलेक्टर मोहमद हैदर



१९४८ हे वर्ष उस्मानाबाद जिल्ह्यातील नागरिकांसाठी अत्यंत भयावह वर्ष म्हणून गणले गेले पाहिजे. एका बाजूला स्वातंत्र्य संग्रामाचा जोर वाढत असताना अनेकांनी यात स्वयंस्फूर्तीने सहभाग नोंदविला. त्याच वेळी निजाम प्रशासनाने रझाकारांची फौज निर्माण करून त्यांच्या माध्यमातून गोरगरीब जनतेवर अन्यायअत्याचाराची सीमा पार केली. एका बाजूला स्वतंत्र भारताच्या पाठबळावर भूमिगत लढणारे स्वातंत्र्य सैनिक तर दुसऱ्या बाजूला निजामाची फौज घेऊन तोऱ्यात वावरणारे रझाकार याप्रमाणे उस्मानाबाद परिसरात एक प्रकारची अशांतता पसरलेली होती. त्यातच उस्मानाबाद जिल्ह्याच्या बाहेरुन सतत आक्रमक हालचाली होत होत्या. त्यामुळे हैद्राबाद संस्थानातील एकूण १६ जिल्ह्यांपैकी सर्वांत संवेदनशिल जिल्हा म्हणून उस्मानाबाद परिचित झाले होते. अशा वेळी ५ मार्च, १९४८ ला हैद्राबादचा रहिवाशी असलेल्या मोहमद हैदरने उस्मानाबादचा कलेक्टर म्हणून सूत्रे हाती घेतली.

निजाम राजवटीतील शेवटचा आणि सर्वांत वादग्रस्त कलेक्टर म्हणून मोहमद हैदरची कारकीर्द अतिशय वादळी ठरली. आपल्या आठ महिन्याच्या कारकीर्दीत हैदरने निजाम शासनाची इमानेइतबारे सेवा केली. सन १९१५ रोजी मोहमद गौसच्या पोटी जन्मलेल्या हैदरची आर्थिक परिस्थिती अत्यंत चांगली होती. लहानपणापासून अत्यंत तीक्ष्ण बुद्धीच्या हैदरने १९३६ साली उस्मानिया विद्यापीठातून बी.ए.ला विशेष गुणवत्ता प्राप्त केली तर दुसऱ्याच वर्षी म्हणजे

१९३८ ला हैदरने हैद्राबाद सिव्हील सर्विस कमिशनची (HCS) परीक्षा पास केली. निजाम राजवटीतील प्रशासकीय अधिकाऱ्यांना प्रशिक्षण घेण्यासाठी थेट लंडनला पाठविले जात असल्याने हैदर हे प्रशिक्षण घेवून परत आल्यानंतर वरंगल जिल्ह्यात मुन्सिफ कोर्टात त्यांची नियुक्ती झाली. याच दरम्यान हैद्राबादचे पोलीस प्रमुख (DG) म्हणजे कोतवाल नवाब दिनियार जंग बहादूर यांची कन्या जेहरा बेगम हिच्याशी त्याचा विवाह झाला. हैदरच्या लग्नाला सर्व प्रमुख व्यक्तीसंह  स्वत: निजाम हजर होते.

हैद्राबाद जवळ असल्याने त्या ठिकाणी सर्व काही सुव्यवस्थित चालले होते. त्यातच सासरे नवाब दिनयार जंग हे निजामाच्या खास मर्जीतले आणि संस्थानातील अतिशय महत्त्वाच्या पदावर असल्याने हैदरचे वजन अधिकच वाढले. परंतु १९४८ ला सर्वत्र धामधुमीचे वातावरण असल्याने संस्थानातील संघर्ष दिवसेंदिवस तीव्र होत चालला होता. त्यातच उस्मानाबाद जिल्हा हा निजामाच्या दिवाणी, सर्फेखास, पायगा आणि जहागिरीचा जिल्हा असलातरी निजामापुढे सर्वात डोकेदुखीचा जिल्हा होता. त्यामुळे या ठिकाणी यायला कोणी धजावत नव्हते. या ठिकाणचा कलेक्टर (तालुकदार) फरहतुल्ला इथल्या स्वातंत्र्य चळवळीपुढे अयशस्वी ठरला होता. याच वेळी हैदरची बढती आली होती. मुद्दामहून आवाहन स्वीकारण्याची तयारी असणाऱ्या हैदरने बढती जवळ घेऊन कुठतरी ठोस काम करून दाखविण्याची तयारी सुरू केली.

तो स्वत: महसूलमंत्री फजल नवाज जंग याच्याकडे गेला आणि संस्थानातील सर्वांत अवघड जिल्ह्यात तालुकदार म्हणून काम करण्याची इच्छा व्यक्त केली. हैद्राबादच्या कोतवालाचा जावई असल्याने सर्वांना याचे आश्चर्य वाटले. राज्याचे मुख्य सचिव सय्यद अहमद रझवीने तर हैदर करीता मंत्रालयात उपसचिवासाठी काम करण्याची सूचना केली. परंतु त्याच वेळी हैद्राबाद संस्थानच्या सीमेवरील सर्वांत संवेदनशील जिल्हा उस्मानाबादला कलेक्टर म्हणून बदली मिळण्याची त्या विनंती करताच खुद्द निजामालाही याचे आश्चर्य वाटले आणि त्याच वेळी त्याने एक वाक्य वापरले, 'या परिस्थितीत सध्या सर्वजण सुरक्षित जागा शोधत असताना तुझ्या धाडसाचे कौतुक केले पाहिजे'. अशा रितीने ५ जानेवारी, १९४८ या दिवशी मोहमद हैदर नावाच्या वादळी माणसाने उस्मानाबादचे कलेक्टर (तालुकदार) म्हणून पदभार स्वीकारला.

स्वातंत्र्य संग्राम आता अंतिम टप्प्यात पोहोचलेला असल्याने हैदरचे

धाडस वाखाणण्याजोगे होते. स्टेट काँग्रेसचे जिल्हा अध्यक्ष फुलचंद गांधीच्या नेतृत्वाखाली उस्मानाबादच्या सीमेवर कँप काढून स्वातंत्र्य सैनिकांनी प्रशासनाच्या नाकात दम आणला होता तर प्रशासनाच्या वतीने (PWD) म्हणजे सार्वजनिक बांधकाममंत्री आणि उस्मानाबादचे पालकमंत्री इकरामुल्ला यांची जिल्ह्यावर विशेष नजर होती. हैदरला मदत करण्यासाठी प्रशासनात पुढीलप्रमाणे एक टीम काम करत होती.

जिल्हा पोलीस प्रमुख (DSP) अबुल हसन

एक्साईज (SP)- मोहमद खान

सहायक (DSP)- अब्दुल कादेर

उपजिल्हाधिकारी - कपूर आणि अकबरली खान

(CID) इन्स्पेक्टर- सय्यद अब्दुल लतिफ

स्थानिक इंजिनिअर - मोहमद खान

उस्मानाबाद तहसीलदार- अकबर लायक अली

तुळजापूरचे तहसीलदार- सय्यद महमद काद्री

तुळजापूरचे इन्स्पेक्टर - अब्दुल गफुर

उमरग्याचे सर्कल इन्स्पेक्टर - अफसर अली

जिल्हा आरोग्य अधिकारी - डॉ. रेणापुरकर

जिल्हा न्यायाधीश - याकुब हुसेनी

हैदरचा (P.A.) - मौलाना

ड्रायव्हर - गुलाम रसूल

शिपाई - अहमद खान

या सर्वांच्या नावाचा उल्लेख करण्याचा हेतू हाच की या मंडळींनी स्वातंत्र्य संग्राम चिरडून टाकण्यासाठी भरपूर मेहनत घेतली होती. स्वातंत्र्यवीरांनी आता स्वातंत्र्याचा चंग बांधला होता. त्यामुळे त्यांना कोण आले आणि कोण गेले याची चिंता नव्हती. संस्थानातील ७५० नाक्यांपैकी ५०० नाके उद्ध्वस्त करून टाकण्यात आलेले होते. लगतच्या सोलापूर जिल्ह्यातून रसद मिळत होती. गुन्हा करून सोलापूर जिल्ह्याच्या हद्दीत पळून जाता येत होते. त्यामुळे उस्मानाबाद जिल्ह्याची सीमा निजाम सरकारची मोठी डोकेदुखी बनली होती.

त्यातच नान्नज प्रकरणामुळे वातावरण आणखीनच चिघळून गेले होते. यावर चर्चा करण्याकरिता पदभार घेतल्यानंतर दुसऱ्याच दिवशी म्हणजे ६ जानेवारी, १९४८ ला हैदरने सोलापूरचे कलेक्टर संभाजीराव घाटगे आणि पोलीस प्रमुख पी. ए. पंत यांच्यासोबत तामलवाडी या ठिकाणी एक बैठक घेतली. या दरम्यान सीमेवरून जवळपास ६१ हल्ले करण्यात आले होते. १५० मैल लांबीच्या सीमेवर कुठं कुठं लक्ष देणार?

स्वातंत्र्य सैनिकांची खरी ताकद सीमेबाहेरील कँप असल्याने त्यांनी प्रत्येक गावाला भेट देण्याचा मोठा कार्यक्रम राबविला. कुठेही दौऱ्याला निघाल्यानंतर स्वत:ची जीप घेऊन तिला पाठीमागे ट्रेलर लावलेले असायचे. सोबत एस.पी. सह सर्व खात्याचे प्रमुख आणि रझाकार म्हणून ३०० ते ४०० लोकांचा ताफा सर्वत्र नजर मारत जिल्हाभर फिरत होता. मुद्दामहून ते स्थानिक लोकांत मिसळत होते.

जिल्ह्यात २४३ दिवाणी, ३७७ सर्फेखास ,२६० पूर्ण स्वायतत्ता असलेले आणि २१ फक्त महसूल जमा करणारे याप्रमाणे एकूण ९०१ जहागीरदार होते. या सर्वांना सोबत घेऊन त्यांना काम करायचे होते. पूर्ण स्वायतत्ता असलेल्या जहागीरदारांना दिवाणी बरोबरच फौजदारी शिक्षा करण्याचा अधिकार होता. तुळजापूर तालुक्यातील कामठ्याच्या दौलतराव देशमुखांच्या गढीत आजही गुन्हेगारांना फाशी देण्याचा वधस्तंभ पाहण्यास मिळतो. याप्रमाणे जहागिरीच्या विविध तऱ्हा असल्यातरी हैदरने आपले प्रशासन अतिशय शिस्तीत राबवायला सुरुवात केली.

उस्मानाबादचा पदभार घेतला तेव्हा फक्त ३३ वर्षे वय असणाऱ्या महमद हैदरने निजाम शासनाची इमानइतबारे सेवा केली. स्वत:ला तो रझाकार (स्वयंसेवक) म्हणवून घेताना दिसतो. त्याचबरोबर तो रझाकाराचा प्रमुख कासिम रझवीचा खास मित्र होता. तर प्रशासनात काम करताना निजामापासून खालच्या मंत्र्यापर्यंत हैदरचे संबंध होते. त्यामुळे उस्मानाबादमध्ये काम करताना स्वत: अगदी जिव्हाळ्याने काम करण्याची त्याची पद्धत होती. स्वातंत्र्य संग्रामाचा लढा चिरडून जिल्ह्यात निजाम राजवट शांततेत चालावी म्हणून हैदरने भरपूर प्रयत्न केले. त्यामुळे प्रशासनाला विरोध करणाऱ्याची गय केली नाही. आपल्या आठ महिन्यांच्या कालावधीत हैदरचे वर्तन जालियनवाला बागेतील जनरल डायरपेक्षा वेगळे नव्हते.

स्थानिकांची मुस्कटदाबी करतानाच पठाण, रोहिले, रझाकार यांना विशेष पाठबळ दिले. रझाकारांविषयी चर्चा करताना अनेकदा त्यांने कासिम रझवीची भेट घेतल्याचे दिसून येते. प्रशासन म्हणून ठिक आहे परंतु मुद्दामहुन एखादा पठाण किंवा रझाकार गैरवर्तन करताना आढळल्यास हैदरने त्यांना शिक्षासुद्धा केलेली आहे. गडदेवधरीचा दौरा करून परत येत असताना रस्त्यात त्यांना मालनबाई नावाची स्त्री पठाणाच्या हल्ल्यामुळे जखमी झाल्याचे दिसताच तिला आपल्या जीपमध्ये बसवून सरकारी दवाखान्यात पोहोचवून उपचाराची व्यवस्था केली. अशा वेगळ्या शैलीतला माणूसही त्यांच्यात होता. एका बाजूला स्टेट काँग्रेसची चळवळ तर दुसऱ्या बाजूला रझाकारांच्या हालचाली यात हैदरची बरीच फरपट झाली.

प्रशासनातील अतिशय कडक शिस्त आणि ताठर भूमिका यामुळे एक कलेक्टर म्हणून घेतलेले निर्णय इतरांच्या जिवावर बेतणारे ठरले. चिलवडीच्या लोकांनी लेव्ही भरली नाही. उलट वसुली अधिकाऱ्यालाच गोळ्या घातल्या. त्यामुळे स्वत: गावात जाऊन संपूर्ण गाव जाळण्याचा पराक्रम हैदरने गाजविला. यावेळी चिलवडीचे ग्रामदैवत दत्तात्रय यांची मूर्ती हैदरच्या ताफ्यातील एका माथेफिरुने रस्त्यावर आणून फोडून टाकली होती. स्वातंत्र्यानंतर १९५० साली गावकऱ्यांनी जयपूरहून आणून नवीन मूर्ती बसविली. चिलवडीप्रमाणेच नंदगाव, धानोरा यासारखी गावे जाळून बेचिराख केली. उपळा, अपसिंगा, ढेकरी, सारोळा, आळजापूर, ईट या ठिकाणच्या लोकांना नाहकपणे गोळ्या घातल्या. तपासणीच्या नावाखाली किल्लारी गावाची लूट करण्यात आली. उस्मानाबाद जिल्ह्यात कायदा आणि सुव्यवस्था निर्माण करत असताना सर्वसामान्यांचे अतोनात हाल झाले. अनेकांच्या घराची राख रांगोळी झालीतरी अनेकांचे जीव गेले.

मला महमद हैदरचे आत्मचरित्र वाचायला मिळाले त्यातून अनेक गोष्टी बाहेर आल्या आहेत. रझाकाराच्या बाबतीत कासिम रझवी अत्यंत कडक असून जर त्यांने कुठल्याही प्रकारचे गैरवर्तन केले तर त्याला फासावर लटकवा असा आदेश त्याने दिला. याविषयी कळंब तालुक्यातील गौर येथील ७ लोकांना रझाकारांनी जिवंत जाळले तेव्हा त्यांना पडकण्याचे नाटक शेवटपर्यंत चालत राहिले. परंतु कारवाई झाली नाही. ढेकरीत २ लहान मुले आणि एका बाईला जिवंत जाळल्यानंतर पठाणाला किरकोळ प्रकारची शिक्षा करण्यात आली. तर

उमरग्याचे सर्कल इन्स्पेक्टर अफसर अली आणि लोहाऱ्याच्या तहसीलदाराला लोकांना लुबाडण्याबद्दल निलंबित केले ही त्याची जमेची बाजू होती. याचवेळी अपसिंग्याच्या बापूराव तेल्याचा खून केल्याबद्दल रझाकाराला अटक केली. पुढे त्याच्यावर नेमकी कोणती कारवाई झाली माहीत नाही. असे काही ठोस निर्णय त्यांने घेतले.

हैद्राबाद संस्थानची त्यांला मोठी काळजी असून उस्मानाबाद परिसरातील सीमा भागात भारतीय लष्कराकडून होणाऱ्या हालचाली पाहून हैदरला पुढील संकटाची चाहूल लागली होती. २४ जुलै, १९४८ ला नान्नज येथील रझाकारांनी शिख रेजिमेंटच्या गाडीवर हल्ला करून ६ जवानांची हत्या केल्यानंतर भारतीय सेनेने नान्नजचा ताबा घेतला. अधिकृतपणे नान्नजच्या रूपाने हैद्राबादच्या पतनाला सुरुवात झाल्याची जाणीव हैदरला झाली होती. नान्नज हे सोलापूर उस्मानाबाद सीमेवरील महत्त्वाचे ठिकाण असल्याने याविषयी सरकारने गांभीर्याने विचार करावा अशी भूमिका त्याने सातत्याने मांडली. जर नान्नज परत घेणे जमत नसेल तर त्याऐवजी येडशीवर हल्ला करुन ते ताब्यात घेण्याची भूमिका त्याने मांडली. दिवसेंदिवस अडचणीत सापडलेल्या निजाम प्रशासनाने हैदरच्या सुचनेकडे कानाडोळा केला.

उस्मानाबादमध्ये राहिल्याशिवाय नान्नजचे महत्व कसे समजणार ? याविषयी अधिक चर्चा करण्यासाठी त्याने हैद्राबादला जाऊन पंतप्रधान लायक अली, जनरल अल ॲड्रुस, पोलीस प्रमुख नवाब दिनयार जंग आणि कासिम रझवीची भेट घेतली. याचबरोबर निजाम उस्मान अलीखानाला नकाशाच्या सहाय्याने नान्नजचे महत्त्व समजावून सांगितले. परंतु कोणीही हैदरच्या सूचनेकडे गांभीर्याने पाहिले नाही तेव्हा ६ ऑगस्ट, १९४८ ला हैदरने आपल्या पदाचा राजीनामा दिला. उस्मानाबादमध्ये कार्यरत असलेले लष्करी अधिकारी ले. कर्नल हिमायत बेग, भाटीया, जाफरी तसेच मेहर मोहसीन अली, अहेमदुल्ला आणि दास यांच्याविषयी हैदरच्या मनात अभिमानाची भावना आहे. इतर अधिकारी मात्र लष्कराच्या लायकीचे नसल्याचे मत त्याने स्पष्टपणे मांडले आहे. हैद्राबाद वाचविण्यासाठी त्याने हरएक प्रयत्न केले. उस्मानाबादचे न्यायाधीश याकुब हुसेनीच्या पत्नीच्या नेतृत्वाखाली महिलांचे एक सशस्त्र पथक तयार केले होते. सर्व खाते प्रमुखाला रायफल चालविण्याचे प्रशिक्षण दिले.

एकट्या हैदरच्या काळजीने हैद्राबादवरील संकट टळणारे नव्हते. १३

सप्टेंबर रोजी भारतीय सेनेने हैदरच्याच उस्मानाबाद जिल्ह्यातून निजामाचे उच्चाटन करण्यासाठी नळदुर्ग आणि तुळजापूरवर आक्रमण करून स्वातंत्र्याचे रणसिंग फुंकले. कुठलाही विशेष विरोध न होता ही दोन्ही ठिकाणे ताब्यात घेतल्यानंतर हिंदुस्थानी फौज येरमाळा, बार्शी, गौडगाव अशा तिन्ही बाजूंनी उस्मानाबाद शहरात घुसली. आज उस्मानाबादच्या कलेक्टरचे निवासस्थान आहे त्याच ठिकाणी हैदरसाहेबाचा मुक्काम होता. येडशीकडून येणाऱ्या फौजेने जेलसमोर उभा असलेला रखवालदार तोफेने उडवून देऊन एल्गार पेटविला. निजाम सेनेचा कुठलाही विरोध झाला नाही आणि पाहता, पाहता हैदरच्या हे ध्यानात आले की, आता डाव उलटलेला आहे, फासे उलटे पडलेले आहेत तेव्हा जीव वाचविण्याची धडपड सुरू झाली.

त्याने आपला पी.ए. मौलाना याला विचारले बाहेरची काय परिस्थिती आहे? त्याने सांगितले, साब! हिंदुस्थान की मिलीटरी ने सब कब्जे में लिया है। त्याने डी.एस.पी. अब्दुल हसनकडून माहिती घेतली. निजाम राजवटच मुळी फुशारक्या मारण्यातच चालली होती. डी.एस.पी.ने सांगितले, आपल्याकडे सध्या १०० रायफली, २५ स्टेनगन आणि ५००० काडतुसे आहेत. हजारो पोलीस दल आणि तेवढेच रझाकार यांच्यासाठी ही व्यवस्था! रोज मोठ मोठ्या गप्पा मारणारा रझाकारांचा जिल्हा प्रमुख सालार -इ-खबिर आणि रझाकारांना मदत करणारा इकरामुल्ला कुठे गेले माहीत नाही. एकाही रझाकाराने कंबर धरली नाही. रझवीच्या जहाल भाषणाच्या वेळी मोठमोठ्याने आरोळ्या ठोकणारे रझाकार पाठीला पाय लावून पळाले. ३/११ गुरखा रायफल्स आणि ८ कॅवॅलरीच्या जवानांनी उस्मानाबादवर रणगाडा फिरवायला सुरुवात केली. सामान्य जनता मात्र तिरंगा घेऊन त्यांचे स्वागत करत होती तर निजामाचे वफादार नोकर हैद्राबादच्या दिशेने पळायला लागले. ले. कर्नल हिमायत बेग, भाटिया, दास असे कितीतरी लष्करी अधिकारी कुठं निघून गेले माहिती नाही. वायरलेस यंत्रणा बंद पडली होती. पुढे काय होईल हे सांगता येत नव्हते. प्रसंग मोठा कठीण होता. अशा आणिबाणीच्या प्रसंगी महमद हैदरने कंबर कसली.

त्याने प्रशासनाचा शेवटचा आढावा घेतला. १३ सप्टेंबर, १९४८ हा या धडपडणाऱ्या कलेक्टरच्या कार्यकालाचा अंतिम दिवस होता. त्याने कोषागारातून सर्व रक्कम काढून घेतली. मेजर मोहसीन खानावर सर्व कागदपत्रे जाळून टाकण्याची जबाबदारी सोपविली होती. त्याने ती योग्यरितीने निभावली.

लष्कराने सर्व मुख्य रस्ते बंद करून टाकले होते. त्यांचा चालक गुलाम रसूलने जीप बाहेर काढली. वफादार शिपाई अहमदखान साहेबासोबत निघाला. बेंबळी, ढोकीवरून आडमार्गाने ही मंडळी रात्रभर रानावनातून प्रवास करत करत मुरूडला पोहोचली. १३ तारखेला सायंकाळी ६.४५ ला पळून निघालेले कलेक्टर दुसऱ्या दिवशी अकरा वाजता मुरूडमध्ये पोहोचले. सप्टेंबरचा महिना आणि भरपूर पाऊस यामुळे शेतातून जाताना काय हाल झाले असतील ? कलेक्टर म्हणजे शेतीचा सारा जमा करणारा असा त्याचा अर्थ होतो. शेती म्हणजे काय असते हे या कलेक्टरला या वेळी समजले असेल.

मुरूडला निजामाचा मिलीटरी कँप होता. त्या ठिकाणी काही सूचना देऊन हैदर लातूरला गेला. त्याठिकाणच्या कोषागार कार्यालयातील रक्कम घेऊन त्याने नांदेड,बिदरमार्गे हैद्राबादचा रस्ता धरला. रस्त्यात जातानाच त्याला पुढील अनर्थाची कल्पना यायला लागली होती. भारतीय वायुसेनेची विमाने वर घिरट्या घालताना  त्याच्या जिवाची घालमेल होत होती. १५ तारखेला रात्री उशिरा तो कसेबसे हैद्राबादला पोहोचला. त्या ठिकाणी पंतप्रधान, निजाम, पोलीसमंत्री अब्दुल हमीदखान यांची भेट घेऊन शेवटी कासिम रझवीच्या भेटीला गेले. लंका जळाली तरी रावणाचा तोरा कायम होता. त्याप्रमाणे भारतीय सेना हैद्राबादच्या जवळ पोहोचली होती. तरीपण कासिम रझवी हैदरला समजावून सांगत होता एक दिन ठहरो, कल देखो क्या होता है । तो कल कधीच आला नाही. १७ सप्टेंबर,१९४८ ला निजामाने शरणागती पत्करली आणि हैद्राबादच्या पतनाबरोबर महमद हैदरची फरपट सुरू झाली.

डि.एस.पी. अब्दुल हसनसारखे अनेक अधिकारी रातोरात पाकिस्तानला पळाले. पंतप्रधान लायकअलीचे मंत्रिमंडळ बरखास्त झाले. तात्पुरती व्यवस्था म्हणून राजप्रमुखपदी निजामाची नेमणूक करण्यात आली तर प्रशासक म्हणून मेजर जनरल जोयंतीनाथ चोधरी यांनी हैद्राबाद राज्याची सूत्रे हाती घेतली. त्या वेळी त्यांना अनेक अधिकाऱ्यांनी गैरवर्तन केल्याचे आढळून आले. तेव्हा जनरल चौधरी यांनी ७ ऑक्टोबर,१९४८ ला एक अध्यादेश काढून अनेक अधिकाऱ्यांबरोबरच उस्मानाबादचे कलेक्टर महमद हैदरला नोकरीतून निलंबीत करून अटक करण्याचे आदेश देण्यात आले. सासरे पोलीस प्रमुख असल्याने हैदरचा पूर्वी रुबाब होता. परंतु आता जो तो आपला जीव वाचविण्यासाठी धडपडत होता. नवीन पोलीस महासंचालक ए. व्ही. पेट्रो

आणि प्रशासक चोधरी यांची भेट घेऊन त्याने आपल्या निलंबनाची माहिती घेतली.

एकदा घर फिरले की घराचे वासे फिरतात. इथं तर राज्याचेच वासे फिरले होते. १८ सप्टेंबर, १९४८ पासून निलंबन दाखवून १९ फेब्रुवारी १९४९ ला हैदरला अटक करण्यात आली. आजच्या राजकारण्याप्रमाणेच त्याने वारंट हाती येताच दवाखाना गाठला. त्याला पोटाचा त्रास पूर्वीचाच होता, त्यात हगवण लागली परंतु दवाखान्याचा सहारा किती दिवस पुरणार? अटक झाल्यानंतर उस्मानाबादमध्ये हैदरवर २४ वेगवेगळ्या प्रकारचे खटले दाखल करण्यात आले. त्यात प्रामुख्याने ७ मुख्य खटल्याचा समावेश होता. सर्व खटले हे गंभीर स्वरूपाचे असून खटल्याची तारीख आणि गुन्हा नोंदीची तारीख पुढीलप्रमाणे होती.

१) किल्लारी दरोडाप्रकरण एकूण ९ केसेस– गुन्ह्याची तारीख २० जानेवारी, १९४८ आणि गुन्हा दाखल केल्याची तारीख १० मार्च, १९५०.
२) चिलवडी खून प्रकरण– गुन्ह्याची तारीख २० मार्च, १९४८ आणि गुन्हा नोंद २२ फेब्रुवारी, १९४९
३) ढेकरी दरोडा आणि ३ खून – गुन्हा २० एप्रिल, १९४८ आणि नोंद २२ फेब्रुवारी, १९४९
४) उपळा १२ गाडीवानांचे खून प्रकरण – गुन्ह्याची तारीख २९ एप्रिल, १९४८, नोंद २४ जानेवारी, १९४९
५) ईट ता. भूम येथील टेके दांपत्य खून प्रकरण – गुन्ह्याची तारीख ६ मे, १९४८, नोंद २६ जानेवारी, १९४९.
६) अपसिंगा दरोडा प्रकरण– २२ ते २४ जून, १९४८ नोंद ४ फेब्रुवारी १९४९
७) अपसिंगा ४ लोकांचे खून प्रकरण– गुन्ह्याची तारीख २४ जून,१९४८, गुन्ह्याची नोंद २५ मार्च, १९४९

अशा रितीने हैदरवर विविध ठिकाणी खटले भरण्यात येऊन त्याला निलंबित करण्यात आल्यानंतर सरकारने कर्नल रहेमानच्या नेतृत्वाखाली एक चौकशी समिती नेमली. महमद हैदरला निलंबित करण्यात आल्याचे समजताच अनेक पिडीतग्रस्त पुढे येवून खटले दाखल करू लागले. महमद हैदरच्या

विरोधातील सर्व खटले हे उस्मानाबाद जिल्ह्यातील असल्याने हैद्राबाद पोलिसांनी त्यांना उस्मानाबादच्या जेलमध्ये हलविण्याचा निर्णय घेतला. २१ मार्च, १९४९ ला उस्मानाबादचे निलंबित कलेक्टर हैदर साहेब पोलिसांच्या उघड्या ट्रकमध्ये पाठीमागच्या बाजूला बसून उस्मानाबादच्या जेलमध्ये दाखल झाले. ज्या अधिकाऱ्याने अनेक स्वातंत्र्य सैनिकांना ज्या जेलमध्ये घातले होते, त्यालाच त्याच जेलमध्ये आणि त्या लोकांच्यासमोर आरोपी म्हणून यावे लागले, हा काळाचा महिमा होता. फुलचंद गांधींनी काँग्रेसच्या माध्यमातून स्वातंत्र्य चळवळीला अधिक बळकटी देण्याचे काम केले होते. त्यामुळे महमद हैदरनी त्यांची संपत्ती जप्त करून त्यांच्यावर वॉरंट काढल्याने मुलाबाळांसह त्यांना भूमिगत व्हावे लागले होते. स्वातंत्र्यामुळे आता बाजी उलटी झाली होती. फुलचंद गांधी हैद्राबाद राज्यातील एक एक बडे प्रस्थ म्हणून पुढे आले होते. हैदरसाहेबाला उस्मानाबादच्या जेलमध्ये घातल्याचे समजताच त्यांनी गावोगावच्या केसेस उभ्या करायला सुरुवात केली होती.

फुलचंद गांधींविषयी हैदरच्या मनात आदरयुक्त भिती वाटत असावी. त्यांच्यामुळेच माझा जेलमधील मुक्काम दिवसेंदिवस वाढत गेल्याचे त्याने आवर्जून नमूद केले आहे. फक्त हैदरच नाही तर  नलगोंडा आणि वरंगळचे जिल्हाधिकारीसुद्धा त्यांच्यामुळे अडचणीत आले. उपळ्याची केसतर फुलचंद गांधींमुळे उभा राहिली. या केसमध्ये हैदरला १० वर्षाची शिक्षा आणि ५००० दंड झाला. अटक होण्यापूर्वी बऱ्याच लोकांनी हैदरला पाकिस्तानला पळून जाण्याचा सल्ला दिला होता. परंतु त्यांनी ती सूचना धुडकावली आणि भारतीय न्यायव्यवस्थेवर विश्वास ठेवून लढण्याचा निर्णय घेतला. २२ मार्च,१९४९ ते ३० मे, १९५० या दरम्यान महमद हैदर उस्मानाबादच्या जेलमध्ये होता. या दरम्यान त्यांनी आपणाला इतर लोकांपासून वेगळी व्यवस्था करण्याची केलेली मागणी कोर्टाने नाकारली होती. या वेळी न्यायाधीश जयवंतराव यांनी हैदरला सुनावले की, ‘हैदर, तुम्ही कलेक्टर नसून एक आरोपी आहात’.त्या वेळी हैदर फारच उदास झाले होते.

खरंतर उस्मानाबाद म्हणजे हैदरच्या अधिकारातील गाव परंतु आता सर्व परिस्थिती बदलली होती. आपणाला जामीन मिळावा म्हणून त्याने उस्मानाबादचे प्रसिद्ध वकील नरसिंगराव देशमुख काटीकर यांच्याकडे विनंती केली परंतु उस्मानाबादच्या बार कौन्सिलने महमद हैदरची केस न घेण्याचा ठराव

घेतल्यामुळे उस्मानाबादच्या एकाही वकिलाने हैदरची वकिली घेतली नाही. शेवटी हैदरने हैद्राबादचे प्रसिद्ध वकिल बॅरिस्टर अकबरअली खान यांना रोज ५० रु. ची फी देऊन उस्मानाबादला आणले परंतु याचा काही एक उपयोग झाला नाही. उपळा केस या वेळी बोर्डावर आली तेव्हा गाडीवानाचा खून करणारे पठाण आणि या वेळी त्याच्यासोबत दौऱ्यावर असणारे कुतुबउद्दीन आणि हमिदोद्दीन राणा यासारखे अधिकारी नम्रपणे बाजूला सरकले. या अधिकाऱ्यांनी हैदरला नकार देत सांगितले की, हैदरसाहेब, आम्हांला मुलेबाळे आहेत, आम्हाला माफ करा. खर तर प्रत्यक्षात उपळ्याच्या गाडीवानाचा खून करोडगिरीच्या नाक्यावरील पठाणांनी केलेला होता. परंतु अलगदपणे ते बाजूला सरकले.

दिवसेंदिवस वातावरण आणखी कठीण होत चालले होते. हैद्राबादहून आणलेला वकील इथं चालला नाही. उस्मानाबादच्या जेलमध्ये राहिल्यामुळे हैदरसाहेबाची प्रकृती बरीच ढासळली होती. स्वातंत्र्यानंतर उस्मानाबादचे प्रशासक बटमंगलकर एकदा जेलमध्ये गेल्यानंतर हैदरला जेलमध्ये पाहून त्यांनी मोठे आश्चर्य व्यक्त केले तर त्यांच्याजागी आलेले एम.जी. पिंपरकर यांनी आपल्याविषयी मला सहानुभूती आहे मात्र मी आपल्याला कुठल्याही प्रकारची मदत करणार नाही, असे स्पष्ट शब्दात सांगितले. १० मे, १९४९ ला हैद्राबाद राज्याचे पोलीस महासंचालक जेटली हे उस्मानाबादच्या दौऱ्यावर आल्यानंतर त्यांनी जेलला भेट दिल्यानंतर महमद हैदरने जेटलींच्यापुढे आपल्यावरील गुन्ह्याविषयी नाहक अडकविल्याबद्दल तक्रार केली. तेव्हा जेटलींनी सांगितले मीस्टर हैदर, मी तुम्हाला सावध करतोय. हिंदू मंदिरे भ्रष्ट केल्याबद्दल तुमच्यावर आणखी गुन्हे दाखल होणे बाकी आहे. हे ऐकल्यानंतर मात्र हैदरच्यापुढे तारे चमकायला लागले.

त्याचे काही गुन्हे पुढे गुलबर्ग्याला हायकोर्टात गेले. त्या ठिकाणी नेवून चौकशी करण्याकरिता त्याला उस्मानाबादच्या जेलमधून गुलबर्ग्याला हलविले. गुलबर्ग्याच्या कोर्टात त्यांच्याविरोधात ईटच्या टेके दांपत्याची केस पुढे आली. तेव्हा महमद हैदर ज्या वेळी न्यायाधीश राय वासुदेव प्रसाद यांच्यापुढे आरोपीच्या पिंजऱ्यात उभा राहिला त्या वेळी न्यायाधीशांनी हैदरकडे पाहिले आणि म्हटले, 'मिस्टर हैदर, आज जरी तुम्ही माझ्यापुढे सुटाबुटात आला असला तरी लवकरच तुम्हांला कैद्याचा पोशाख घालावा लागणार आहे'. आणि

खरंच, हैदरने कितीही मोठे वकील लावलेतरी न्यायाधीश राय वासुदेव प्रसादनी ईटच्या टेके दांपत्याची हत्या घडवून आणल्याबद्दल निकाल दिला, 'उस्मानाबादचे तालुकदार (कलेक्टर) महमद हैदर यांना मरेपर्यंत फाशीची शिक्षा देण्यात येत आहे'. निकाल ऐकून अगोदरच प्रकृतीमुळे खचलेल्या हैदरने जणू मान टाकली. कधीकधी त्याला जीवनाचा कंटाळा यायला लागला. माणसाच्या जीवनाची किंमत एवढी स्वस्त असते, याची त्याला जाणीव झाली.

हैदरची फरपट काही थांब नव्हती. उस्मानाबाद आणि गुलबर्ग्यांच्या कोर्टात त्याला मोठ्या शिक्षा झाल्या त्याविरोधात पुढे अपील करण्यात त्याला बरेच दिवस गेले. दुसरी महत्त्वाची बाब म्हणजे त्याच्याविरोधात उस्मानाबद, गुलबर्गा आणि हैद्राबाद या ठिकाणी वेगवेगळे खटले दाखल झाले. त्यामुळे गुलबर्ग्याच्या जेलमधून त्यांना हैद्राबादच्या चंचलगुडा जेलमध्ये हलविले. महमद हैदरला कुठल्याही जेलमध्ये घातलेतरी आजारी असूनही त्याने आठवणीच्या आधारावर आपली डायरी लिहिण्याचे कधी सोडले नाही. त्यामुळे उस्मानाबादच्या स्वातंत्र्य संग्रामाचा इतिहास पहायचा असेल तर आपणाला महमद हैदरचे पुस्तक पाहावे लागेले. 'ऑक्टोबर कुप'नावाच्या पुस्तकात महमद हैदरने जणू हैद्राबादचा मुक्तीसंग्राम लिहिला आहे. या पुस्तकातून आपणाला उस्मानाबादचा मुक्तीसंग्राम ज्वलंतपणे उभा करता येतो.

३ वर्षे११ महिने तीन ठिकाणच्या जेलमध्ये राहिल्यानंतर २९ फेब्रुवारी, १९५२ रोजी त्याला अंतरिम जामिनावर सुटका झाली. जेलमध्ये गेल्यानंतर ४ महिन्यात त्यांना दोन मुलांवर एक मुलगी झाली. परंतु जवळपास तीन वर्षानंतर तिला पाहण्याचा योग त्याला आला. मधल्या काळात जवळ वाटणारे अनेकजण त्याच्याजवळ फिरकले नाहीत परंतु तरीही त्याच्या जवळचा एक मित्र जिंदा तिलीस्मातचा निर्माता मोईजुद्दीन मात्र त्याच्या पाठीमागे खंबीरपणे उभा राहिला. त्यामुळे किमान जामिनावर सुटका होऊ शकली. जामीन मिळाला तरी कोर्टातला खटला चालूच होता. अनेक प्रकरणात त्याला शिक्षा झालेली होती. ईटच्या प्रकरणात तर फाशीच होती. त्यामुळे हैदरने सर्व खटले सुप्रिम कोर्टापर्यंत नेले. दरम्यान त्याने स्वत: ङ.ङ.च. ही कायद्याची पदवी मिळविली. बऱ्याच प्रकरणात त्याने स्वत: बचाव केला. त्यांच्या पुढे जीवनमरणाचा प्रश्न होता. परंतु नशीब बलवत्तर म्हणून जून,१९५४ साली सर्वोच्च न्यायालयाने त्यांच्यावरील सर्व खटले काढून घेतले. त्या वेळी न्यायाधीश होते मेहरचंद

महाजन.

याकरिता राजप्रमुख किंवा गव्हर्नर म्हणून नेमलेल्या निजामाने त्यांना बरीच मदत केली. खटल्यातून मुक्तता मिळाली असलीतरी त्याच्या निलंबनाचा कालावधी हा १८ सप्टेंबर, १९४८ हाच धरण्यात आला. वैद्यकीय कारण देत त्यांना सेवेतून कार्यमुक्त करण्यात आले होते. त्याचा एकूण पगार ११०० रुपये व भत्ता ५०० रुपये मिळून १६०० रुपयेप्रमाणे त्याला ५८ रुपये म्हणजे ९ डॉलर इतकी पेंशन मंजूर करण्यात आली. काळ कुणासाठी थांबत नसतो हेच खरे. ५ मार्च, १९४८ साली उस्मानाबादच्या कलेक्टरपदाचा त्याने कार्यकाल स्वीकारला त्या वेळी त्यांचे वय केवळ ३३ वर्षांचे होते. महमद हैदरच्या कारकीर्दीला ही कुठे सुरुवात होती. एक प्रशासन यंत्रणेतील अधिकारी म्हणून त्याने कायदा आणि सुव्यवस्था राखण्याकरिता कडक भूमिका घेत निजाम शासनाची इमान इतबारे चाकरी केली. यात उस्मानाबाद जिल्ह्यातील जवळपास ८४ लोकांना आपल्या प्राणांची आहुती द्यावी लागली. अनेक गावे जळून खाक झाली तर लूट, मारामारी आणि खून, जाळपोट यांची गणती नाही.

हैद्राबाद लोकसेवा आयोगातून उच्च पदावर नियुक्ती झाल्यानंतर पत्नी जहेरा आणि तीन मुलं यांच्यासह सुखाचा संसार चालला असताना त्यांची उस्मानाबादच्या कलेक्टरपदी नियुक्ती झाल्यानंतर जिल्ह्यात खळबळ माजवून दिली परंतु स्वातंत्र्याच्या वेडाने बेभान झालेल्या लोकांनी हैदरच्या दडपशाहीला अजिबात जुमानले नाही. चिलवडी गाव जाळून टाकताना त्याने स्वत: उभे राहून हे कृत्य घडवून आणले होते. स्वातंत्र्यसेनानी रामभाऊ जाधवांचा राग गावावर काढला. तरीपण गाव डगमगले नाही. अशीच अवस्था सर्वत्र होती. त्रासातून शेवटी हैद्राबाद मुक्त झाले. याच वेळी हैदरला काय मिळाले ? कलेक्टर झाल्यानंतर फक्त ८ महिन्यांची नोकरी झाली. बाकी आयुष्य जेल आणि कोर्टाचे खेटे मारण्यात गेले. कोर्टातून निर्दोष सुटल्यानंतर १९५५ पासून ते १९६७ म्हणजे निजाम उस्मानअली खान यांच्या मृत्यूपर्यंत हैदरीसाहेब निजामाचे पी.ए. म्हणून कामावर राहिले. त्यामुळे पहिल्यापासून शेवटपर्यंत हैदर हे सत्तेच्या कोंडावळ्यात कायम राहिले.

देश स्वतंत्र झाला. विज्ञानाने जग जवळ आले. हैदरचे घराणे अगोदरच शिकलेले घराणे होते. कारण  त्याच्या भाऊ डॉ. फारुकी हे आरोग्य संचालक, एक मेव्हणा कलेक्टर होता. मोठा मुलगा मसुद हैदर हे सध्या ६९वर्षांचे असून ते

अर्थतज्ज्ञ असून सध्या न्यूयॉर्कमध्ये स्थानिक असून ते युनोच्या अन्न सल्लागार मंडाळावर काम करताहेत. त्यांनी मला हैदरचे पुस्तक आणि फोटो तसेच इतर माहिती पाठवून दिली दुसरा मुलगा डॉक्टर आहे तर मुलगी शास्त्रज्ञ म्हणून झुरिच देशात आहे. आज २०१३ मध्ये महमद हैदरच्या पत्नी जेहरा बेगम या ९४ वर्षांच्या असून, त्या हैद्राबादमधील आसिफ नगर भागात राहतात. हैद्राबाद मुक्तिसंग्रामात उस्मानाबादमधील अधिकारी वर्गातील त्या शेवटच्या साक्षीदार. हैदरने १९६४ पर्यंत बाहेरच्या देशांत जाण्यासाठी पारपत्रे मिळविण्यासाठी खूप प्रयत्न केला. परंतु शासनाने ते नाकारले. वयाच्या बाबतीतही ते कमनशिबी ठरले. इ.स. १९७३ साली वयाच्या ५८ व्या वर्षी हैद्राबाद या ठिकाणी महमद हैदर याचे निधन झाले. आजही चिलवडीसारख्या गावात गेलात आणि विचारले उस्मानाबादचा कलेक्टर कोण होता? तर म्हाताऱ्या बायकासुद्धा सहजपणे नाव घेतात – हैदरी !

# २७ निष्पापांना ठार करणाऱ्या कलेक्टरला फाशीची शिक्षा!

**मुक्तिदिन विशेष**

## कारागृहातच कायद्याचे शिक्षण घेतले; स्वतःच खटला लढवून सुटला

**चंद्रसेन देशमुख | उस्मानाबाद**

हैदराबाद संस्थानचे विलीनीकरण झाल्यानंतर निझामी हुकूमशाहीचा अंत झाला. निझामी राजवटीत जाळपोळ, मारहाण करून २७ निरपराधांचे जीव घेणाऱ्या उस्मानाबादच्या महंमद गौस हैदर या शेवटच्या निझामी कलेक्टरला न्यायालयाने फाशीची शिक्षा सुनावली. उस्मानाबादच्या बार कौन्सिलने त्याचे वकीलपत्र न घेण्याचा निर्णय घेतला. त्यामुळे कलेक्टरने कारागृहात असताना कायद्याची पदवी घेतली व स्वतःच युक्तिवाद करून सुटका करून घेतली. त्याच्या 'ऑक्टोबर कूप' या आत्मचरित्रात ही माहिती आहे.

**कोशागारातील पैसे घेऊन निझामाकडे पळून गेला**

१४ सप्टेंबर १९४८ रोजी लष्कराने उस्मानाबादवर आक्रमण केल्यानंतर निझाम सरकारातील लष्कर कर्नल हिमायत बेग, कॅप्टन भाटिया, दास आदी अधिकारी पाकिस्तानात पळून गेले. कलेक्टर हैदरलाही त्यांनी पळून जाण्याचा सल्ला दिला. मात्र, कोशागारातील सर्व रक्कम घेऊन तो मुरूड, लातूर, बिदरमार्गे हैदराबादला पळून गेला. १७ सप्टेंबरला निझामाने शरणागती पत्करल्यानंतर सरकारने हैदरला निलंबित करून अटक केली. त्याला उस्मानाबादच्या मध्यवर्ती कारागृहात ठेवले होते.



निझामी राजवटीतील १६ जिल्ह्यांत उस्मानाबाद सर्वांत संवेदनशील होते. या ठिकाणी ताकदीच्या कलेक्टरची गरज होती. त्यामुळे निझामाने ५ मार्च १९४८ रोजी हैदरची नेमणूक केली. हैदर निझामाचा विश्वास व कडक शिस्तीचा अधिकारी होता. वयाच्या ३३ व्या वर्षी त्याला ही संधी मिळाली होती. संघर्ष थांबत नसल्याने हैदरने स्वतः निरपराधांना गोळ्या घालून ठार मारण्याचा सपाटा लावला. त्यानंतर गावे जाळण्याची मोहीम आखली. त्यासाठी त्याने चिलवडी येथे ३ दिवस मुक्काम ठोकला.

उर्वरित . पान १०

सौजन्य: दै.दिव्य मराठी

# ९. तुमचे सरण तुमच्या हातून

गौर, ता. कळंब हे इतर गावाप्रमाणे सर्वसामान्य गाव. तेरणा नदी गावाला वळसा घालून गेलेली असल्याने गावची जमीन सुपीक आहे. साहजिकच गावात देशमुखाबरोबर अठरापगड लोकांची वस्ती आहे. निजाम कालखंडात गौर, वाघोली, मोहा ही नावाजलेली गावे होती. स्वातंत्र्य सैनिक सोलापूरच्या हद्दीत आश्रय घेत असत. खामसवाडी,धानोरा,गौर,वाघोली, काजळा या भागातील लोक दुधगावच्या रामराव पाटलांच्या शेतात लपून बसत असत. त्या वेळी रामरावांच्या पत्नी हरिबाई यांनी अशा स्वातंत्र्य सैनिकांना आपल्या हाताने भाकरी घालण्याचे काम केले. जि.प.चे उपाध्यक्ष संजय पाटील दुधगावकर यांनी आपल्या आजीच्या आठवणी ताज्या करून सांगितल्या. गौर वाघोलीच्या बाजूला येरमाळा हे देवीचे गाव असून इतर गावांच्या मानाने इथ रझाकारांची मोठी संख्या होती. येरमाळ्याचे पोलीस पाटील आनंदराव पाटील हे पंचक्रोशीतील वजनदार व्यक्तिमत्व तर त्यांचा गुमास्ता हसन हा बेरका होता. पाटलामुळे हसनलाही लोक वचकून असायचे. त्यामुळे रझाकारांचे वर्चस्व वाढायला लागले,त्याप्रमाणे हसनसारखी माणसं लोकांची पोथी ओळखायला लागली.

देशमुखांचे गाव म्हणून गौरची ओळख होती, तरीपण माळी, धनगर यासारख्या लोकांनी आपले वेगळे अस्तित्व निर्माण केले. त्यातच गुलाब पठाण, मालनबी पठाण यांच्यासारखी काही मुस्लीम घराणी गौरमध्ये गुण्यागोविंदाने नांदत होती. मालनबीची नदीकाठी बागायत जमीन असून, ती गावच्याच पांडूरंग लंगडे यांनी बटईने केली होती. चार बैलांची मोट चालायची. १९४७-४८ पर्यंत या पद्धतीने हिंदू मुसलमान यांच्यात कुठल्याही प्रकारचा तंटा नव्हता.

सर्वत्र स्वातंत्र्याचे वारे वाहताना त्यात गौर गावाच्या तरुणांनीही उडी

घेतली. गौरला चिटकून येडशी, तडवळे यांसारखी सोलापूर जिल्ह्यातील गावे होती. त्यामुळे हैद्राबाद मक्तिसंग्रामाच्या सभा या गावांमध्ये व्हायच्या. क्रांतिसिंह नाना पाटल, राघवेंद्रजी दिवाण, फुलचंद गांधी, केशवराव जेधे यांच्या सभा व्हायच्या. या सभेमुळे गावातील तरुण स्वातंत्र्य संग्रामासाठी पुढे आले. गावातील राम विठोबा गवळी, मुकुंद रावण लांडगे, बळीराम भानुदास माळी, चत्रभुज बापूराव पवार, अंबादास कुलकर्णी यांच्यासारखी माणसं पेटून उठली. यातील बऱ्याच लोकांनी चिंचोलीचा कँप गाठला. चिंचोली कँपवर चंद्रशेखर बाजपेयी, राघवेंद्र दिवाण, शेषराव वाघमारे यांसारखी माणसं स्वातंत्र्यासाठी रात्रीचा दिवस करत होती.

स्वातंत्र्याचे वारे वाहायला लागले त्याप्रमाणे गावोगावचे लोक यात सहभागी व्हायला लागले. चिंचोली कँपला मदत करण्यासाठी गावातून मदतफेरी काढण्यात आली. जवळपास ४७ पोती ज्वारी जमा झाली. जमेल तेवढे पैसे आणि धान्य घेऊन गौरची मुले स्वातंत्र्यासाठी मदत करायला लागली. गौरचे पोलीस पाटील विठ्ठलराव हे सरळमार्गी होते. खरं तर गावच्या सुरक्षिततेचा प्रश्न सोडविण्याची जबाबदारी गावच्या पोलीस पाटलाची होती. त्यामुळे गावात कोणी निजाम सरकारच्या विरोधात भूमिका घेत असेलतर याची माहिती पोलिसांना पुरविण्याची जबाबदारी पाटलांकडे होती परंतु गौरचे विठ्ठलराव हे निजामाचे चाकर असलेतरी ते स्वातंत्र्य चळवळीसाठी नेहमी मदत करायचे. विठ्ठलराव पाटील गप्प असले तरी त्यांचा कोतवाल हसन झोपलेला नव्हता. येरमाळ्याचा गुमास्ता हसन आणि गौरचा कोतवाल हसन यांच्यामध्ये अंतर्गत संबंध होते. त्यामुळे गौरमधील एक एक बातमी येरमाळ्याच्या रझाकारापर्यंत पोहोचविण्याची जबाबदार हसन कोतवाल चोखपणे बजावत होता. त्यामुळे गौरमध्ये काहीतरी गडबड व्हायला लागलीय, याची कुणकुण गावकऱ्यांना लागली होती.

गावात बागवानांच्या पडक्या वाड्यात एका मुसलमानाचे कापड दुकान होते. त्याला सर्वजण काका म्हणायचे. आजूबाजूचे बाजार व गावात कपडे विकून काकाने चांगलाच जम बसविला होता. उधारीवर कापड देऊन वर्षाकाठी ज्वारीवर पैसे घ्यायचे किंवा ज्वारीच घ्यायची. काका उधार देतोय म्हटल्यावर लोकांची चांगलीच घसट पडलेली होती. काकाकडे कायम स्वरूपी एक नोकर होता. त्याचे नाव होते अब्दुल्ला. लोक त्याला अमदुल्ला नावाने

ओळखायचे. महादेवापेक्षा नंदीचा रुबाब भारी, याप्रमाणे काका थ़ोडासा सरळमार्गी असला तरी अमदुल्लाचा तोरा मोठा होता. कोणाकडे उधारी मागायला जायचे म्हटल्यानंतर अमदुल्लाची ऐट असायची. नाकापेक्षा मोती जड, या म्हणीप्रमाणे तो उधारीसाठी लोकांना भलबुरं बोलायचा. बाजारामुळे त्याच्याही ओळखी आता वाढल्या होत्या. त्याच्या जोडीला गावचा हसन कोतवाल मिळाला आणि या दोघांच पाऊल वाकडं पडायला सुरुवात झाली. १९४८ मध्ये हैद्राबाद संस्थानात जातीयवादाची नदी मोठ्या जोरात वाहायला लागली होती. त्यात या दोघांनी उडी घेतली.

येरमाळ्यात कमालखान नावाच्या रझाकाराची मोठी दहशत पसरलेली होती. त्याला पोलीस पाटलाचा गुमास्ता हसनची मोठी फूस होती. तर गावातच निजामाचे पोलीस ठाणे असल्यामुळे पोलिसांनीसद्धा कमालखानाला मदत करायला सुरूवात केली होती. त्यामुळे कमालखानासारख्या रझाकाराने गोवोगावच्या रझाकारी प्रवृत्तींना पेटवायला सुरुवात केली होती. त्यामुळे गौरमधील अमदुल्ला आणि हसन कोतवालाची दाढी आता फुरफुरायला लागली होती. रझाकारी प्रवृत्तीची माणसं वचक बसावा म्हणून कुरापती काढून भांडण काढायला लागली. कमालखान तर येरमाळा परिसरात कुणाला जुमानतच नव्हता. येरमाळ्याचे पोलीस पाटील कुलकर्णी यांच्यावर त्याचा दात होता. येरमाळ्याच्या कुलकर्णीची २ मुले दत्तु आणि राजाभाऊ गौर या ठिकाणी पाहुण्याकडे आली होती. शाळेला सुट्टी असल्याने गावाकडे आल्यानंतर मुलांना पोहोण्याचा मोठा छंद असायचा. त्यानुसार दत्तू आणि राजू पोहोण्यासाठी गेली असता अज्ञात रझाकारांनी त्यांचा खून करून त्यांना पाण्यात टाकून दिले. पोलीस दफ्तरी खुनाची नोंद झाली, परंतु तपास शून्य!

हिंदूना चिंचोली कॅपचा आधार, त्यातच आता गावातील तरुण मुलं स्वातंत्र्यासाठी जीव द्यायला निघाली होती. त्यामुळे दिवसेंदिवस वातावरण बिघडायला लागलं. गौरची काही माणसं एकत्रित येऊन त्यांनी एक-दोन रझाकारांचा काटा काढला. तसं येरमाळ्याच्या कमालखानाचे डोके फिरले. पोलीसांनी गावभर फिरून आरोपींचा शोध घेण्याचा प्रयत्न केला परंतु सर्वांनी कानावर हात ठेवले. ही बातमी उस्मानाबादच्या सालार ए खबिर म्हणजे रझाकाराच्या जिल्हा प्रमुखाकडे गेली. त्याने सालार ए सागिर म्हणजे तालुका प्रमुखाकडे विचारणा केली. तेव्हा गौरच्या लोकांनी रझाकांरावर हल्ला केल्याची

सविस्तर माहिती पुरविली. सालारसाहेबांचे डोके जाम भडकले. त्यांनी आपल्या हाताखालील जैश (शाखा प्रमुख) ला आदेश दिला. बदला लो ! इन सालो को ऐसा सबक सिखाओं की दुबारा इसकी जुर्रत ना करे !

'चोराला मेसाई धार्जिण', या म्हणीप्रमाणे पोलीसही यात सामिल व्हायला निघाले. येरमाळ्याच्या रझाकारांचा म्होरक्या कमालखान, हसन यासिन साहेब, मौला, कोंडाजी दगडू (आडनाव मिळाले नाही), उस्मान अलीखान, लाडले साहेब, शेख करिम खान, सरवरखान, जुमाखान यांच्यासह जवळपास ५०० रझाकार हातात नंग्या तलवारी घेऊन गौरच्या दिशेने निघाले. बिचारे पोलीसही त्यांच्या मदतीला सोबतच होते. खरं तर १९४८ या वर्षी पोलिसांपेक्षा रझाकारांचे महत्त्व जरा अधिकच वाढले होते. त्यामुळे रझाकार करील ती पूर्वदिशा होती. गौरचा कोतवाल हसनने गावची संपूर्ण माहिती अगोदरच पुरविली होती. या रझाकारामध्ये सरवरखान हा बाभळगावचा होता. सर्वांना अगोदरच निरोप गेलेले असल्याने जोतो हत्यारासह गौरच्या दिशेने चालायला लागला होता. रझाकारांची येणारी फौज म्हणजे साक्षात यमदुताचे आगमन होते. थोड्याच अवधीत यमाचा फास कोणाच्या गळ्याभोवती लागणार हे बाळ जन्मल्यानंतर ५ व्या दिवशी सटवाईने अगोदरच त्याच्या माथ्यावर लिहून ठेवलेले असते. त्यानुसार गौरकरांचे नशीब ठरणार होते.

काळ आणि वेळ एकत्रित आल्यास माणसाचे काही खरे नाही. गौरकरांवर आता हे दोन्ही एकत्रित तुटून पडणार होते. शनिवारचा दिवस असल्याने कुणी घरातच पूजाअर्चा करत होते. तर कुणी पारावरच्या मारुतीला पाणी घालायच्या गडबडीत होते. खर सांगायच तर वरच्या देवाचे बोलावणे आल्यावर गावातले किंवा घरातले देव वाचवू शकत नाहीत. माणूस मात्र आपली भाबडी आशा सोडत नाही. त्याच्यामते वरच्या देवाकडे सुरक्षित जाण्याकरिता खालच्या देवांची मदत होते. ते काही असो, आज गौरकरांचे काय होणार हेही देवालाच माहीत? परंतु तो कोणालाही सांगत नाही. सकाळची वेळ असल्याने कोण आंघोळ करतोय, कोण शेताकडे निघालाय, तर कोण शेताकडे चक्कर टाकून परत येतोय. जोतो आपल्या कामात दंग झालेला होता. गावात कुठं काय चाललंय याची अद्यापि कोणालाच काही खबर नाही.

सकाळची वेळ असल्याने गावात थोडा किलकिलाट होता. तेवढ्यात घोडे, गाड्या, सायकली आणि जीपमध्ये येऊन पोलीस आणि रझाकारांनी

गौरला वेढा घातला. येरमाळ्याचा जमादार (सब इन्स्पेक्टर), दफेदार (पोलीस) आणि रझाकाराचा म्होरक्या कमालखान गौरच्या चावडीवर जमा झाले. हसन कोतवाल आणि अमदुल्याला याची अगोदरच खबर लागली होती. पोलीस आलेत म्हटल्यावर हसन त्यांच्या सेवेकरिता पुढे गेला. कमालखानाने आदेश दिला, पोलीस पाटील विठ्ठलराव को बुला के लाओ ! गावातले वातावरण अगोदरच बिघडून गेल्यामुळे ते चिंतेत होते. गावच्याच काही पोरांनी रझाकारांचा काटा काढल्याने पाटलांना आता गावाविषयी अधिक काळजी वाटायला लागली होती.

हसन कोतवालाच्यासोबत विठ्ठलराव पाटील चावडीवर आले तसे कमलखानाचे डोके भडकले. तो बोलला, पटेल ! मुझे बताव? हमारे साथीओं के किसने मारा है ? पाटलांनी उत्तर दिले, मला काही माहीत नाही. शिवाय ती लोकं आमच्या गावची नसावीत. झूट बोलता है साला ! म्हणून रझाकारांनी पाटलांना मारायला सुरूवात केली. तेवढ्यात गावचे अंबादास कुलकर्णी त्या ठिकाणी येऊन दाखल झाले. कमालखानाने कुलकर्ण्याकडे पाहिले नी जोरात ओरडला, इस बम्मन को पकडो, बहुत चरबी चढी है ना ? पाटील और कुलकर्णी तुम दोनो अला हजरत निजाम के शागीर्द होकर तुम्हे अपने गाव में जो कुछ हो रहा है, उसका पता नहीं है ? अंबादास कुलकर्ण्यानें नकारार्थी उत्तर देताच त्यांनाही मारायला सुरुवात केली.

गावची माहिती या दोघांना असूनही ते जाच सहन करत गप्प बसले. मात्र हसन कोतवालाला आता गावालाच आग लावायची होती. त्याने एक एक करून लोकांची नावं घ्यायला सरुवात केली. काही माणसांना रझाकार म्हणजे काय? याचा गंधही माहिती नाही. परंतु त्यांची आर्थिक परिस्थिती चांगली आहे, काही लोकांवर कुठलातरी सूड उगवायचा होता. त्यामुळे हसन कोतवालाने एकएक करून नाव घेतली. त्यात अंबादास माळी, विठ्ठल भगवानराव पाटील, अंबादास गंगाधर कुलकर्णी, दशरथ आबा लंगडे, पांडूरंग अण्णा लंगडे, रामा मल्हारी धनगर आणि पांडूरंग शिवराम धनगर या मंडळींचा समावेश होता.

रोज गावकऱ्यांसमोर खाली मान घालून चालणारा हसन कोतवाल आपल्या भाईबंधांना पाहून आज चांगलाच शेफारून गेला होता. त्यात रझाकारांना चांगलाच चेव चढलेला. त्याचा फायदा हसन कोतवालाने घेतला.

येरमाळ्याचा हसन आणि गौरमधला हसन दोघेही रझाकाराला मिळाले. त्यांच्यात काका दुकानदाराचा नोकर आमदुल्लाची भर पडली. हसन कोतवालाने एका एकाची घरं दाखवायला सुरुवात केली. नंग्या तलवारी घेऊन रझाकार गावात घुसले होते. 'कासिम रझवी जिंदाबाद'च्या घोषणांनी सारा परिसर दुमदुमून गेला होता. गावात भीतीचे वातावरण पसरले होते. बऱ्याच लोकांनी आपल्या घराचे दरवाजे बंद करून घेतले होते. रझाकारांची परेड नेहमीचीच असल्याने काही जणांनी त्याकडे दुर्लक्ष केले होते. त्यानुसार दशरथ आबा लंगडे हे धार्मिक गृहस्थ सकाळची देवपूजा आटोपून तुळशीला पाणी घालून प्रदक्षिणा घालायला लागले होते. देवपूजा करतानाही यमदूत सोडत नाही याचा अनुभव दशरथला येणार होता. हसन कोतवालाने इशाऱ्याने दशरथचे घर दाखविले तसे रझाकार त्यांच्यावर धावून गेले. दोन रझाकारांनी दोन्ही बाजूंनी त्यांना धरून कासऱ्याने बांधून चावडीत बसलेल्या कमालखानाकडे घेऊन चालले. दशरथची आई झिंगाबाई आंधळ्या होत्या. आपल्या पोराला घेऊन चालले म्हटल्यानंतर त्यांनी मोठमोठ्यांने ओरडायला सुरुवात केली. धडपडतधडपडत त्या रझाकारांच्यापुढे जाऊन विनंती करायला लागल्या. माझी सर्व संपत्ती घ्या पण माझ्या पोराला सोडा. त्यातल्या एका रझाकारांला वाटले, बघावी जरा गंमत करून! म्हणून त्याने म्हातारीला हटकले, कितना पैसा है तुम्हारे पास? म्हातारीला बरं वाटलं. पोटाला पीळ मारून नवऱ्याने काबाड कष्ट करून साठविलेले चार पैसे आणि सोने त्या आंधळ्या आईने आपल्या पोराचे भविष्य पाहून सुरक्षितपणे एका घागरीत पुरून ठेवले होते. म्हातारी पळत पळत घरात घुसली. खुरप्याने भराभर माती उकरली आणि घागर घेऊन रझाकारांच्या हाती सोपविली. म्हातारीच्या नातवाच्या म्हणण्यानुसार त्यात रोख ६५ हजार रुपये होते. रझाकाराने घागरभर पैसे घेतले आणि म्हातारीला सांगितले. ठीक आहे, आम्ही त्यांना विचारपूस करून सोडून देतो, असे म्हणत दशरथला पारावर घेऊन गेले.

हसन आणि आमदुल्याने आज गावचा सफाया करायचे ठरविले होते. एक एक घर दाखवत ते पुढे निघाले. त्यांना पाहिजे असलेली शिकार पुढे दिसली. आज शनिवारचा दिवस असल्याने पांडूरंग अण्णा लंगडे मारुतीला पाणी घालून अभिषेक करावा म्हणून हातात चरवी घेऊन देवाचे नामस्मरण करत मारुतीच्या पाराकडेच निघाले होते. असे घराच्या बाहेर पडताच पुढे रझाकाराचे

टोळके दिसले. हसन कोतवाल आणि आमदुल्लाला पाहून पांडूरंगाच्या मनात शंकेची पाल चुकचुकली. एका रझाकाराने पांडूरंगाकडे बघत आरोळी ठोकली. पकडो साले को ! पांडूरंगाला काय घडतंय याचा अंदाज आला. त्यांनी पळत पळत जाऊन चांदीची चरवी आणून रझाकरांच्या हाती सोपविली. त्यांना वाटलं पैशाच्या आशेने ते आपल्याला सोडून देतील परंतु त्याचा काही उपयोग झाला नाही. त्यांच्या दोन्ही दंडाला कासरा बांधून त्यांना चावडीकडे घेऊन चालले थोड्या वेळापूर्वी स्वत: पांडूरंग हे हातात पाण्याची चरवी घेऊन देवाकडे चालले होते. परंतु रझाकार आता त्यांना देवाघरी नेण्यासाठी घेवून चालले होते. देवाकडे जाणे आणि देवाघरी जाणे यातला फरक पांडूरंगाला समजायला वेळ लागला नाही. रझाकारांचे या पद्धतीचे आमंत्रण म्हटल्यावर देवाघरचे आमंत्रणच होते. पांडूरंग गयावया करायला लागले तर घरातली बायापोरं मोठ मोठ्याने रडायला लागली. पांडूरंगाचा मुलगा प्रल्हाद आपल्या बापाची अवस्था पाहून पार गोंधळून गेला. आमच्या वडिलांना सोडून द्या म्हणत प्रल्हादने वडिलांचे धोतर घट्ट पकडत रझाकारांना विरोध करायला सुरुवात केली. परंतु कसायाला काय? गाय असो की शेळी, दोघांना कापायचेच असते. त्यांनी प्रल्हादला ढकलून द्यायला सुरुवात केली. तरी प्रल्हाद वडिलांचे धोतर सोडायला तयार नव्हता. लहानग्या प्रल्हादला अक्षरश: फरफटत नेले. चावडीजवळ येताच लाथ मारून त्याला बाजूला सारले.

या पद्धतीने अंबादास माळी, विठ्ठल पाटील, अंबादास कुलकर्णी, दशरथ लंगडे, पांडूरंग लंगडे, रामा धनगर, पांडूरंग धनगर, शिवराम धनगर या सर्वांना धरून कमालखानाच्यापुढे आणले. पोलीस आणि रझाकारांनी त्यांना जोरजोराने मारायला सुरुवात केली. कमालखानाने सर्वांना एकच प्रश्न केला. बताओ, हमारे भाईओं को किसने मारा है ? चिंचोली कँप को पैसा क्यों दिया ? या पद्धतीने पाटील, कुलकर्णी यांनाही प्रचंड मारहाण केली. परंतु कुणीही तोंड उघडले नाही. त्यामुळे रझाकारांचा पारा अधिकच चढला. इन सालों को पकड के बाहर ले चलो म्हणत पोलीस आणि रझाकारांनी नदीकडे चालायला लागली. आपल्या वरीष्ठांच्या आदेशाचे पालन करत रझाकारांनी बाजाराला जनावर नेताना बांधतात त्याप्रमाणे गौरच्या पकडलेल्या ७ लोकांना एकत्र बांधून घेऊन चालले. गावकरी फक्त जोरजोराने रडायला लागले. हत्यारबंद पोलीस आणि रझाकारांपुढे येण्याची कोणाची हिम्मत झाली नाही.

गावच्या बाजूला एक ओढा आणि तेरणा नदीचा संगम आहे. त्या संगमाच्या पटांगणात या मंडळींला घेऊन गेल्यानंतर पुन्हा एकदा मारहाण करुन नाहक प्रश्न विचारण्यात येऊ लागले. पाटील आणि कुलकर्णी हे निजामाचे नोकर असूनही त्यांनी गावकऱ्यांना सहानुभूती दाखविली ही त्यांची चुक होती. बाकीची मंडळी ही धनगर आणि माळ्यांची होती. कष्ट करून खाणारी माणसं असल्याने त्यांना बाकीचे बारकावे काय माहीत? आता रझाकारापुढे कोणाचाच इलाज चालणारा नव्हता तर बिचाऱ्या गौरकरांच्या आयुष्याची दोरी आता तुटायला थोडाच अवधी शिल्लक होता. त्यातल्याच एका दीड शहाण्या रझाकाराने कल्पना सुचविली. यांना मारण्यापेक्षा जिवंत जाळले तर कसे राहिले ? बाकीच्यांना या दीडशहाण्याची कल्पना लगेचच आवडली. जवळच चिंतामन जैनाचे शेत होते. जैनाचा बैलबारदाना मोठा असल्याने पाचदहा हजार कडब्यांची मोठी गंज लावलेली होती. तुम्हाला मरायचे आहे ना? मग तुमचे सरण आम्ही का आणायचे? म्हणत एखाद्या बैलाला धरून त्याच्याकडून काम करुन घ्यावे त्याप्रमाणे रझाकारांनी पाटलांसह सर्वांना कडबा घेऊन यायला सांगितले. प्रत्येकाच्या डोक्यावर कडब्याचा भारा देऊन त्या संगमावर भरपूर कडबा जमा केला. खरं तर तो कडबा नव्हता, गौरकरांची ती चिता होती.

आपण कधी कत्तलखान्याकडे चक्कर मारली तर त्या ठिकाणी खुल्या मैदानावर जनावरे कापली जातात. एकाला दुसऱ्यासमोर कापले जात असल्यामुळे ज्यावेळी दुसऱ्याचा नंबर येतो तेव्हा त्याच्या तोंडाला फेस आलेला असतो. याचे कारण असते की त्याला आपले मरण कळालेले असते. जिथे मुक्या जनावराला आपले मरण कळत असेल तर इथे पकडलेली माणसे होती. या सातही जणांना आता मरण जवळ आल्याची जाणीव झाली होती. परंतु सुटायचे कसे? कासऱ्याने हाताला घट्ट बांधलेले आणि त्यातून पाचशे रझाकार हातात तलवार आणि बंदूका घेऊन बाजूलाउभे होते. तरीपण मरण जवळ आले की, जीव गोळा होतो म्हणतात. जीव आणि शरीर हे एकमेकात एवढे घट्ट मिळून गेलेले असतात की, ते एकदुसऱ्याला सोडायला तयार नसतात. त्यामुळे जीव जाताना शरीराची ताकद एकवटून त्याला पुर्णपणे विरोध केला जातो. हा प्रयत्न ठरावीक मर्यादेपर्यंत ठीक आहे. परंतु एकदा इलाज संपला की जीवनाचे काही खरे नाही. तरीपण प्रयत्न करणार नाही तो जीव कसला? त्याप्रमाणे रामा धनगराने आपला जीव एकवटला आणि रझाकाराच्या हाताला हिसका देऊन

आपली सुटका करून घेतली. कुणाला काही कळायच्या आत रामा शेतातून पळत सुटला. शेळ्यामागे फिरणारा आणि लांडग्याला धुडकावून लावणारा रामा एखाद्या शिकारी चित्याप्रमाणे धावायला लागला होता. एवढा जीव मुठीत घेऊन पळणारा माणूस सहजासहजी थोडाच सापडणार होता? रझाकार त्याच्या पाठीमागे कुत्र्यासारखी पळायला लागली. एकाने आपला घोडा काढला. आणि पाठलाग सुरू केला. तरीपण रामा सहजासहजी त्यांना सापडत नव्हता. तेव्हा रझाकाराने आपली बंदूक काढून रामावर गोळी झाडली. पाठीत गोळी घुसली तसा रामा आडवा पडला. शिकार पकडल्याच्या आनंदात रझाकारांनी रामाचे हातपाय बांधून टाकले. बंदुकीच्या गोळीपेक्षा रामाला अजूनही रझाकाराची भीती जास्त वाटायला लागली होती. त्यामुळे त्याही अवस्थेत रामाने विनवणी करायला सुरवात केली. परंतू 'दया करील तर तो रझाकार कसला?' हातपाय बांधून घोड्याच्यामागे अक्षरश: जनावरासारखे ओढतच रामाला पुन्हा संगमावर आणले गेले.

ईकडे तोपर्यंत बराच कडबा जमा झालेला होता. लोकांना अधूनमधून मारहाण चालूच होती इतर गावकऱ्यांची जवळ जायची हिंम्मत नव्हती. आपला कडबा का घेताहेत? म्हणायची चिंतामणीचीही हिंमत व्हायचा प्रश्नच नव्हता. आपला जीव मुठीत घेऊन चिंतामणी जैन जिवंत माणसासाठी जमा होणारे सरपण उघड्या डोळ्यांनी पाहत होता. रामाने पळ काढल्याने रझाकाराचा पारा आणखीन चढला. बंदुकीच्या दस्त्याने, तलवारीने या लोकांना अमानुषपणे मारहाण व्हायला लागली. मारून मारून या सातही जणांचे शरीर काळे निळे झाले होते. तलवारीच्या घावाने सारं शरीर रक्ताने माखून गेले होते. तेवढ्यात एका रझाकाराला त्यांची दया आली आणि त्याने सांगितले इन बेचारों को मत मारो ! इनको ऐसा करते है, ''जिंदा जला देते है'' । त्यांच्या सूचनेनुसार त्या सातही लोकांना कडब्यावर ढकलण्यात आले. एकाने घासलेटचा डबा रिकामा केला तर दुसऱ्याने काडी लावली, कडब्याने पेट घेतला तशा रझाकारांनी घोषणा दिल्या 'दिन-दिन'!

हातपाय बांधलेले, वरून तलवार आणि बंदुकीच्या गोळ्यांचे धाव, त्यामुळे हालचाल होत नव्हती, पण जीव कासावीस व्हायला लागला होता. चुलीत वांगी भाजावी त्याप्रमाणे ही लोकं आगीत होरपळायला लागली. त्याही अवस्थेत रामाला वाटले असेल, बंदुकीच्या गोळीने मेलो असतो तर बरे झालं

असते. परंतु मरण कधी आणि कुठल्या रूपात येणार हे फक्त काळच ठरवितो. आपले काम फत्ते झाले म्हटल्यानंतर रझाकारांनी तेथून पळ काढला. तसे लोकं त्या ठिकाणी धावले. पाणी टाकून आग विझविली. अर्धवट जळालेली सातही जणांची प्रेते बाहेर काढली. या घटनेत पोलीसांचा हात असलातरी पोलिस ठाण्यात वर्दी देण्यात आली. गावचा कोतवाल हसनने पळ काढला तर आमदुल्ला कुठतरी लपून बसला होता. पोलिसांनी पंचनामा करून प्रेतांचे शवविच्छेदन करण्यासाठी प्रेतं तेरला पाठविली. एकाच वेळी गावची सात माणसे गेल्यामुळे गौरमध्ये भयाण सन्नाटा पसरला होता. अंतयात्रेसाठी परिसरातील अनेक लोक आले होते. सारा गाव ओक्साबोक्शी रडत होता. साऱ्या गावाने परत एकदा चिता रचली. सातही लोकांना भावपूर्ण मनाने अखेरचा निरोप दिला. तशाही अवस्थेत लोकांनी घोषणा दिली, भारत माता की जय ऽऽ

या गुन्ह्याची प्राथमिक नोंद गुन्हा कलम १७२, २० आर्दोबेहस्त, १३५७ फसली म्हणजे १९४७ ला याची नोंद झाली. नूतन पोलिस पाटील रामचंद्रराव यांनी याविषयी पुढाकार घेतला. येरमाळ्याचे फक्त रझाकारच नाहीतर पोलिसही यामध्ये सामील झालेले असल्याने पकडायचे कोणाला? त्यामुळे निजाम सरकारच्या पोलिसांनी चौकशी चालू आहे असा शेरा लिहून फाईल दाबून टाकली. पुढे स्वातंत्र्याचा जोर वाढत गेला. भारतीय फौजांनी निजाम हद्दीत प्रवेश केला. औरंगाबादची एक तुकडी येरमाळा-येडशीतून लातूरकडे गेली तेव्हा सर्वसामान्यांना भारी ठरलेला कमालखान कुठल्या बिळात जाऊन दडला माहीत नाही. जिथं निजामाचे सैनिक आणि पोलीस पळाले तिथं रझाकारांची काय कथा? त्यामुळे हैद्राबादच्या विलीनीकरणाला वेळ लागला नाही. देश स्वतंत्र झाला, न्याययंत्रणा बदलली, त्यामुळे गौरच्या खूनप्रकरणाने पुन्हा एकदा उचल खाल्ली. स्वतंत्र भारताच्या पोलिसांनी स्वातंत्र्यानंतर रझाकारांची धरपकड करायला सुरुवात केली. याच वेळी गावचा एक रोहिला अजिजखान लोकांनी चिरून टाकला. हसन कोतवाल कुठं पळून गेला किंवा कुणी त्याला मारून टाकले असेल परंतु शेवटपर्यंत पुन्हा म्हणून तो गौरकरांना कधी दिसला नाही. एवढं सारं काही होऊनही गौरकरांनी गावच्या बेकसूर मुसलमानांना कधी हात लावला नाही. त्यांनी आपली माणुसकी कायम ठेवली.

फसली तारीख २७ देय, १३५९ म्हणजेच १९४९ ला या खुनातील आरोपी पकडले गेले. यामध्ये एकूण ११ पोलिस आणि २० रझाकारांवर कलम

२४०, १७२, ३३१, २३९ नुसार कळंबच्या न्यायालयात खटला उभा राहिला. या वेळी सरकारी वकील अनसिंगकर तर फिर्यादीच्यावतीने गुलबर्ग्याचे वकील तिमापुरे यांनी आपापल्या बाजू मांडल्या. यात कमालखान हा येरमाळ्याचा रझाकार मुख्य आरोपी होता. आपण इंग्रजांची न्यायप्रणाली स्वीकारल्याने आपल्याच वकिलांनी कायद्याचा कीस पाडून सर्व आरोपींची निर्दोष मुक्तता केली. पुढे हा खटला गुलबर्ग्याच्या उच्च न्यायालयापर्यंत गेला. परंतु याकडे कोणी लक्ष दिले नाही.

भारत सरकारने या सात लोकांच्या स्मृतिप्रित्यर्थ स्मारक बांधले. त्याच्यावरील नावे वाचताना 'आपले सरण आपल्या हातून' रचताना त्यांना काय वेदना झाल्या असतील! हे गौरचा सर्व्हेनंबर १८२ च मूकपणे सांगू शकतो. आपण फक्त त्याची कल्पना केली तरी अंगावर शहारे येतात.

***

# १०. नाईचाकूरच्या पोलीस ठाण्यावर हल्ला

आजच्या उमरगा तालुक्यातील नाईचाकूर हे जवळपास १० हजार लोकसंख्येचे गाव म्हणजे कर्नाटक आणि आंध्र प्रदेशच्या सीमेवरील मोठ्या बाजारपेठेचे गाव म्हणून प्रसिद्ध आहे. निजाम राजवटीत पायग्याच्या जहागिरीत नाईचाकूरचा समावेश होता. गावातील अठरा पगड जातीवरून गल्ल्यांची नांवेही तशीच. धनगर गल्ली, कोळी गल्ली, लोहार गल्ली, चांभार गल्ली, तेली गल्ली. याप्रमाणे मराठ्यांसह मागासवर्गीय लोक मोठया संख्येने गावात गुण्या गोविंदाने राहतात.

१९९३ साली झालेल्या भूकंपात सुदैवाने गावात मोठी हानी झाली नसलीतरी घरांच्या पडझडीमुळे नाईचाकूरचे पुनर्वसन झाले. माणसाबरोबर देवही गावाबाहेर आले. मातीच्या घरात आणि माणसाच्या मनात पूर्वी ओलावा असायचा. सिमेंटच्या भिंतीने जशी घराला मजबुती आली तसा माणूसही निर्ढावला. प्रेम गेलं आणि औपचारिकता आली. मातीचा ओलावा सिंमेटमध्ये कोठून येणार ?

'जुनं ते सोनं' म्हणत मातीच्या ढिगाऱ्याकडे बघत प्राचीन वैभवाचा आनंद घ्यायचा असेलतर जुन्या गावात जावं लागतं. घरं पडलीतरी आठवणी कायम आहेत. मूळ नाईचाकूरच्या नावातच मोठा इतिहास दडला आहे. कारण कन्नडमध्ये नाईचा अर्थ होतो कुत्रा. त्याचाही मोठा इतिहास आहे. प्राचीन काळात चाकूरमधल्या एका इमानदार शेतकऱ्याने गरिबीमुळे शिवेलगत असणाऱ्या हाडोळीच्या सावकाराकडून व्याजाने पैसे घेतले. दुष्काळग्रस्त परिस्थितीमुळे शेतकऱ्याला पैसे परत करणे शक्य झाले नाही. तेव्हा त्याचा प्राणप्रिय कुत्रा सावकाराने तारण म्हणून हाडोळीला घेऊन गेला.

कुत्रा मोठा इमानदार ! मालकासाठी त्याने सावकाराची चाकरी धरली. दरम्यान सावकाराच्या घरी मोठी चोरी झाली. सकाळी त्या हुशार कुत्र्याने

चोराचा माग काढत चोरांनी परून ठेवलेली संपत्ती दाखविली. सावकाराने आनंदित होऊन कुत्र्याला सोडून दिले आणि चाकूरला मालकाकडे जाण्याचा इशारा केला. इकडे रात्रंदिवस काबाडकष्ट करुन शेतकऱ्यांने आवश्यक ते पैसे जमा करून सावकाराचे कर्ज फेडण्यासाठी हाडोळीचा रस्ता धरला. आपल्या हुशारीने इमानदार कुत्र्याने चोरीचा छडा लाऊन मालकाचे पैसे माफ करून घेतले होते. तोही अगदी ऐटीने घरधन्याची भेट घेण्याकरिता व्याकूळ होऊन निघाला होता. अगदी शिवेवर कुत्रा आणि मालकाची समोरासमोर भेट झाली. आपला पराक्रम त्या मुक्या प्राण्याला थोडाच सांगता येणार ? मालकाला पाहताच आनंदाने ते नुसते कु ऽऽ कु ऽऽ करत मालकाभोवती फिरू लागले. परंतु मालकाच्या मनात वेगळाच राग भरला होता. इमान तोडून आपला कुत्रा मधूनच सावकाराकडून परत कसा आला? याचा त्याला भयंकर राग आला. रागाच्या भरात शेतकऱ्याने कुत्र्याचा जीव घेतला.

तावातावात हाडोलीळा सावकाराकडे जाऊन त्याच्यापुढे कर्जाचे पैसे टाकले आणि आपला कुत्रा मधूनच पळून आल्याबद्दल सावकाराची माफी मागितली. सावकाराने कुत्र्याच्या इमानदारीची घडलेली कथा सांगून आपणच त्याला सोडून दिल्याचे सांगितले. गैरसमजुतीतून इमानदार कुत्र्याचे प्राण मात्र गेले. त्यामुळे शेतकरी आणि सावकार अशा दोघांनाही गहिवरून आले. कुत्र्याच्या पराक्रमाची चर्चा गावभर पसरली. ज्या ठिकाणी कुत्र्याचे निधन झाले तेथे एक समाधीशिला बसवून त्याचे स्मारक तयार केले. साहजिकच कुत्र्याला दैवत्व प्राप्त झाले आणि त्या भागाला नाव पडले कुत्रतीर! आजही त्या भागाला कुत्रतीर म्हणून संबोधले जाते.

पुढे कुणीतरी नवसाने गावातच या कुत्रोबाचे मंदिर बांधले. महादेवाच्या पिंडीसमोर कुत्रोबाची मूर्ती एका दगडावर कोरून बसविण्यात आली आहे. त्याच्याही पुढे जाऊन एका भक्ताने त्यावर पितळी पत्र्यावर कोरलेली अतिशय सुबक कुत्रोबाची मूर्ती बसविली आहे. धनगर समाजातील पुजारी रोज याची पूजा-अर्चा करतो. अक्षयतृतीयेला कुत्रोबाची यात्रा भरते. अशा प्रकारे कुत्र्यासारख्या एका मुक्या प्राण्याचे मंदिर बांधणारे नाईचाकूर हे एकमेव गाव असावे. गावात कुणीही कन्नड बोलत नाही मग नाई हा कन्नड शब्द कोठून व का आला हा प्रश्न आहे?

या गावाशी संबंधित कुत्र्याचा इतिहास अगदी इथंच संपत नाही. हे

पुस्तक लिखाण चालू असताना (ऑक्टोबर, २०१३ ) नाईचाकूर या गावात एक कुत्रे पिसाळले आणि दोन दिवसात त्याने जवळपास १०६ जनावरे आणि ५३ लोकांचा चावा घेतला. एखाद्या कुत्र्याने एवढा मोठा धुमाकूळ घालण्याची ही पहिलीच वेळ असावी. नाई चाकूर आणि सध्या पिसाळलेले कुत्रे हा बदलत्या जगाचा चेहरा तर नसावा ना?

प्राचीन काळात हा भाग कर्नाटकातील बदामीच्या चालुक्याकडे होता. तेव्हाची तर ही घटना नसावी ना ? असा प्रश्न पडतो. त्याचेही काही पुरावे जुन्या गावात सापडतात. जुन्या काळातील पांढर गढी नावाची एक जुनी वास्तू होती. गावात आणखी दोन महत्त्वाची ठिकाणे आहेत. इथल्या पिराचे नाव सिंदप्पा पीर आहे. नावावरून याचा अंदाज येईल. परंतु दर्गा आणि पीराची कल्पना ही बाराव्या शतकातील आहे. तर दुसरी एक समाधी बोधलेबाबाची आहे. हा साधुपुरुष कोण ? हे मात्र कुणालाच माहीत नाही.

बार्शी तालुक्यात वैरागजवळ धामनगाव येथे जगताप घराण्यातील एक देशमुख माणकोजी असून त्यांना विठ्ठलाने बोध दिला म्हणून त्यांचे नाव बोधले पडले. बोधलेबाबा हे छत्रपती शिवरायांचे आध्यात्मिक गुरू असून शिवरायांच्या वंशजांनी तसेच पेशव्यांनी बोधलेबाबाच्या मठाला दानपत्र दिलेली आहेत तर खुद्द औरंजेबानेही त्यांना गुरुस्थानी मानले असून त्यांनीही जमीन दान दिली आहे. या बोधलेबाबांचा पुढचा एखादा वंशज नाईचाकुरात आला असावा. अशा रितीने सिंदप्पा पीर आणि बोधलेबाबांची समाधी गावाची दिशा ठरवायला पूरक आहेत. कुत्रोबाच्या मंदिराने तर वेगळा विक्रम केला आहे.

दोन हजार वर्षांपूर्वी अखिल हिंदुस्थानात सुरू झालेला जैन धर्माचा प्रसार उस्मानाबादपर्यंत येऊन पोहोचला. त्यातून उस्मानाबाद, तेर, बेंबळी, आष्टा कासार, काटी सावरगाव आणि नाईचाकूर ही गावे प्रभावित झाली. त्यातूनच उस्मानाबादच्या लेण्यापासून ते नाईचाकुरात जैनाचे बस्ती म्हणजे तिर्थक्षेत्र तयार झाले. त्यामुळे इथली पाटीलकी जैनाकडे होती हे विशेष. गावालगत देवीचे मंदिर असून तिला भगतवाडीची देवी म्हटले जाते. कुठल्याही देवीची यात्रा नवरात्रात असते, मात्र इथली यात्रा वेळअमावस्याला भरते हे एक वेगळे वैशिष्ट्य म्हणावे लागणार आहे. देवीचे परंपरागत पुजारी श्री. परशुराम पुंडलीक गरुड यांनी आपले घराणे पिढीजात देवीची सेवा बजावल्याचे आवर्जून

सांगितले. याबद्दल प्राचार्य दिलीप परशुराम गरुड यांनी याविषयी सविस्तर माहिती दिली.

वरच्या सत्ता बदलत गेल्या तरी गावाने आपले गावपण जपले होते. कधीकाळी धारहून आलेल्या परमारांनी पवार नांव धारण करून गावचा कारभार हाती घेतला. निजाम काळात लोहाऱ्याअंतर्गत पायग्याच्या जहागिरीत हे गाव मोडत होते. गावची लोकसंख्या आणि मोठी बाजारपेठ यामुळे निजाम राजवटीचे स्वतंत्र पोलीस ठाणे नाईचाकूरला ठेवण्यात आले होते. जवळपास ४० गावे या पोलीस ठाण्याअंतर्गत येत होती. त्यामुळे नाईचाकुरात येणाऱ्या जाणाऱ्यांची मोठी वर्दळ असायची.

१९३५-३६ म्हणजे हैद्राबाद संस्थानात जोपर्यंत रझाकाराचा उदय झाला नव्हता तोपर्यंत हिंदू-मुसलमान संघर्षाचा विषयच नव्हता. १९४७ पासून नाईचाकूर पोलीस ठाण्याचा प्रमुख म्हणजे अमीन शैदोद्दीन पठाण हे आपल्या मुलाबाळासह गावातच प्रेमनाथ पवारांच्या वाड्यात राहायचे. तर कॉन्स्टेबल म्हणजे जमादार रहेमान जमादार हे भवानी कोळ्याच्या वाड्यात मुक्कामाला होते. बरकंदाज म्हणजे पोलीस शिपाई अब्दुल सत्तार हे ठाण्यातच अनेक पोलिसांसह राहत होते. पोलीस ठाण्यातील सर्वच पोलीस हे धर्माने मुस्लीम असलेतरी गाव पातळीवर ते सर्वांत मिळून मिसळून गेलेले होते.

शैदोद्दीन पठाण म्हणजे भारदस्त गडी तर त्यांच्या पत्नी या नाईचाकूरमध्ये मिसळून गेलेल्या. त्यांना सर्वजण बुबू म्हणायचे. साहेबाची बायको म्हणून त्यांनी कधी रुबाब केला नाही. कुणी भाजी द्यावी, तर कुणी सरपण. ईद मोहरमला हिंदूंना बोलवायला त्याही कधी चुकल्या नाहीत. अमीनसाहेब पोलीस ठाण्याच्या बाहेर खुर्ची टाकून बसले की, रस्त्यावरून येणाऱ्या-जाणाऱ्यांनी त्यांना खाली वाकून कुर्निसात घालावा ही त्यांची अपेक्षा. नाही तर मग रागाने बघणार. बाकी अमीन सायबाचा या गावाला कुठला त्रास नव्हता.

तरी परंतु निजाम राजवटीचे काही नियम पाळावे लागायचे. कुठल्याही कार्यक्रमाच्या निमित्ताने वाजंत्री वाजवत पुढे निघाले आणि मश्जिद आली की ४० पावलं वाजवायचे बंद करावे लागायचे. गावकऱ्यांसह वाजंत्र्याच्या हे अंगवळणी पडले होते. वरचे शासनही तेवढेच कडक होते. जिल्ह्याला तालुकदार म्हणजे जिल्हाधिकारी म्हणून आलेले महंमद हैदर कडक शिस्तीचा

माणूस. लोहाऱ्याचा तहसीलदार भ्रष्टाचार करतोय हे ध्यानात येताच त्वरित चौकशी नि लगेच निलंबित, अशा काही चांगल्या बाबी या शासनात होत्या.

सणसमारंभ, रितिरिवाजानुसार गावचा कारभार सुरळीतपणे चालू होता. भजन-कीर्तनाबरोबरच लेझीम, लाठ्या-काठ्या चालविण्याची कला गावात शिकविली जायची. पवाराकडे पोलीस पाटीलकी असल्याने भांडणतंट्याचा विषयच नव्हता. स्वतंत्र भारताची चळवळ वगैरे कल्पना आणखी गावापर्यंत आल्या नव्हत्या. एका बाजूला मराठवाड्यात आर्य समाजाच्या चळवळीने जोर धरला होता. त्यामुळे निलंगा, उमरगा, लातूर या भागात आर्य समाजी मोठ्या प्रमाणावर दिसतात.

या चळवळीला दडपून टाकण्यासाठी रझाकारी चळवळीला अप्रत्यक्षपणे मदत करण्याची भूमिका निजाम सरकारने घेतली होती. त्यामुळे मोठ्या गावात रझाकारांचे अड्डे तयार व्हायला लागले.तसे गावातील तरुणांची डोकी भडकायला लागली. त्यातच केसरजवळग्यात क्रांतिसिंह नाना पाटलाची सभा भरली. नानांची सभा म्हणजे फटाक्यांची वातच होती. या सभेला आसपासच्या गावांतील वीस हजार लोक उपस्थित होते. नाई चाकूरमधील शाहुराज जाधव, गोविंदराव पवार, यांनी नानांचे विचार ऐकल्यानंतर आता कृती करण्याची भूमिका घेतली. शाहुराव जाधव वाघदरी कँपचे प्रमुख असल्याने त्यांनी चळवळीची दिशा ठरवून दिली. त्यातूनच करोडगिरी नाक्यावर हल्ले, सिंदीची झाडे तोडण्याचा कार्यक्रम हाती घेण्यात आला.

यामुळे सरकार जागे होऊन काँग्रेसच्या लोकांना पकडण्याची मोहीम सुरू झाली. त्या वेळी आपल्या घरावर तिरंगा झेंडा फडकावणे हा देशद्रोह मानला जायचा. देश स्वतंत्र करायचा असेल तर यासाठी आपला तरुण अभिमानाने पुढे यायला लागला होता. आपणही नाईचाकुरात आता तिरंगा फडकवायचाच म्हणून श्री नाभीराज धर्मराज जयपालकर जैन यांच्या वाड्यात बैठक भरली. याकरिता शाहुराज जाधव, गोविंदराव पवार, सदानंद सुतार, सुग्रीव पवार, गुलाबचंद उबाळे, रामराव उबाळे यांच्यासारखी मंडळी उपस्थित होती. याची बातमी जिल्हा पोलीस प्रमुख म्हणजे मोहतमिन यांच्यापर्यंत गेली. उमरग्याचे सर्कल इन्स्पेक्टर अफसर अलींनी गावाला भेट दिली. परंतु त्यांना वाड्यात प्रवेश मिळू दिला नाही. त्यामुळे एकदाचे जैनाच्या वाड्यात झेंडावंदन पार पडले.

साहजिकच शाहूराज जाधव, गोविंदराव पवार यांना अटक करून नळदुर्गच्या कोर्टापुढे हजर करण्यात आले. ॲड. बाबूराव बोरगावकरांनी या लोकांची केस घेतली तर गावातील माणिकराव पवार कारभारी व नागनाथ महादु पवार यांनी याकरिता जामीन दिला. जामीन झाली तरी तारखा चालू झाल्या. नाईचाकूरहून मधल्या मार्गाने ही मंडळी नळदुर्गला जायची. कोर्टकचेऱ्या चालू असल्यातरी त्यांच्या मनातील धगधग कायम होती.

नानांच्या सभेपासून गोविंदराव पवारांचे डोके तर जाम भडकून गेले होते. काय करावे ? हे मात्र कळत नव्हते. म्हणून गोविंदने सरळ नाना पाटलांचे गाव कुंडल गाठले. तिथं राहून हातघाईची लढाई आणि डावपेचाचे प्रशिक्षण घ्यायला सुरुवात झाली. तर तारखेला गैरहजर राहिले म्हणून कारभाऱ्याची पंचायत व्हायला लागली. गोविंदराव सापडला नाही तर आता माणिकराव पवार कारभारी यांनाच जेलमध्ये टाकण्याची नोटीस बजावण्यात आली. साहजिकच रामा गायकवाडला कुंडलला पाठवून गोविंदरावला माघारी बोलावून आणले.

क्रांतिचे धडे गिरवून आल्यानंतर आता वेळ होती कृती करण्याची. निजाम राजवटीला हाकलून देण्यासाठी काय करता येईल याची चाचपणी सुरू झाली. सरकारशी दोन हात करायचे असतील तर आपल्याही हातात बंदूक असली पाहिजे अशी कल्पना एकाने मांडली. नाईचाकूरच नाही तर संपूर्ण हैद्राबाद संस्थानातील लोक आता पेटून उठले होते. कवठा, किल्लारी, माडज, हाडोळी, उमरगा, सरवडी, सारणी याप्रमाणे प्रत्येकजण लढण्यासाठी आतुर झाला होता. एक तर पारतंत्र्य आणि वर रझाकारांचा त्रास यामुळे वैताग आला होता. पोलिस आणि रझाकार दोन्ही मुस्लिम असलेतरी त्यामानाने पोलिसांचे वर्तन बरे होते. रझाकारांना मात्र सामाजिक बांधिलकी नव्हती. एखाद्या गावात रामायण बसविले की, आजही लोक मंदिरासमोरून चपला काढून जातात. रझाकार मात्र लोकांच्या जेवणाच्या पंक्तीतही बुटात फिरायचे. काही तरुणांना वाटायचं की, सरळ उठून गोळी घालावी पण जनतेची हत्यारे जप्त करून टाकलेली होती. त्यामुळे लोकांची डोकी भडकायला लागली. इस्माईलसारखी भली माणसेही या गावात होती.

हत्यारे जप्त केली पण हत्यारे तयार करणारे हात अजून मोकळेच होते. गावात तांबटकऱ्यांची काही घरे होती. युद्धात किंवा मंगलमयप्रसंगी वाजवली जाणारी तुतारी तयार करण्याचे काम गावचा नागनाथ लोहार करायचा.

प्रसंगानुसार नागाने आता बंदुकी तयार करायला सुरुवात केली. त्याच्याच बंदुकीने लोक आता रझाकारांविरुद्ध दोन हात करायला तयार झाले होते. गावातल्या बिघडत चाललेल्या वातावरणाची चिंता ज्याप्रमाणे माणिकराव कारभाऱ्यांना होती. तशीच ती मुसलमानाच्या इस्माइल पटेलला होती. इस्माइल रझाकारांची समजूत काढून सामाजिक समतेचा संदेश द्यायचा. संबंध तुटत चालले होतेतरी भली माणसे जोडण्याचा तो प्रयत्न करत होता.

स्वातंत्र्य संग्रामाचा जोर दिवसेंदिवस वाढतच चालला होता. स्टेट काँग्रेसच्या माध्यमातून कँपवरील स्वातंत्र्यसैनिकांचा सिंदीची जंगलतोड, करोडगिरी नाके आणि पोलीस ठाण्यावर हल्ले करणे, लेव्ही बंदी याप्रमाणे कार्यक्रम होता. आपल्याच गावात पोलीस ठाणे असूनही आपण काहीच करत नाहीत याची खंत शाहुराज जाधव आणि गोविंदराव पवार यांना बोचत होती.

अमीनसाब चांगला असला म्हणून काय झालं ? आपणाला तर निजाम राजवटीला हाकलायचे आहे. निजाम राजवटीला धक्का द्यायचा असेल तर काय करावे ? याकरिता लिंबराज हडोळेच्या शेतात एक बैठक भरविण्यात आली. नाईचाकूरमधील राम माने, किसन पवार, बळीराम पवार, गोविंद पवार, शाहुराज जाधव, रामा गायकवाड, राम जिनकर, गुलाब जिनकर यांसारखी मंडळी तयार होती. कवठ्यातून धोंडीराम सोनवणे, नरसिंग भोसले, किल्लारीतून किसन पवार, शामराव पवार, सरवडी गावातून पांडूरंग इंगळे, विश्वनाथ इंगळे, हरिजवळग्यातून लिंबराज हडोळे, गणपती हडोळे, प्रल्हाद आणि नामदेव हडोळे, माडजहून हणमंतराव बेलूरकर, रामराव गायकवाड, पांडूरंग आणि संतराम शहापूरे व माधव शहापूरे जमा झालेले होते. त्यांच्यासोबत संभा माडीवाले नागदे होते. आपल्या वडिलांकडून जी माहिती मिळाली त्याविषयी बोलताना उस्मानाबाद जनता सहकारी बँकेचे सरव्यवस्थापक श्री.वसंतरावजी नागदे यांनी सांगितले की संभाजीरावांसह अनेक लोकांनी या हल्ल्याच्या वेळी बंदुका आणि धारदार शस्त्रे हातात घेतली होती. या ५० तरुणांना प्रेरणा देण्यासाठी पराक्रमी मोहनराव पाटील हाडोळीवरून आले होते.

डोक्याने भडकलेली आणि शक्तीने एकवटलेले ५० मराठे एकत्र आल्यावर हल्ल्याची भाषा येणारच. शिवरायांच्या मातीतल्या मावळ्यांना गनिमी कावा शिकवावा लागत नाही. गनिमी काव्याचे लढे संध्याकाळी लढले जातात याची त्यांना जाणीव होती. सर्वानुमते धाडसी बेत आखण्यात आला तो

म्हणजे थेट पोलीस ठाण्यावर हल्ला करण्याचा. खरं तर हा प्रकार म्हणजे सापाच्या शेपटीवर पाय देण्यासारखा होता.

आर आणि पारची लढाई करण्यास निघालेल्या वीरांना जिथं स्वत:च्या जिवाची पर्वा नव्हती तिथं सापाच्या शेपटीची काय किंमत? त्यामुळे नाईचाकूरच्या पोलीस ठाण्यावर हल्ला करणे म्हणजे खरं तर मगरीच्या जबड्यात हात घालण्यासारखे होते. उपमा काही असो परंतु नाईचाकूरचा गोविंदराव पवार आता थांबायला तयार नव्हता. हैद्राबाद मुक्तिसंग्रामाचा अभ्यास केल्यानंतर असे दिसून येते की, खरंच या लोकांनी छत्रपतींच्या लढाईचा बारकाईने अभ्यास केलेला आहे. शाहिस्तेखानावर स्वारीची वेळ पहाटेची होती. केवळ नशिबाच्या भरवशावर चालणाऱ्याला अमावस्या भलेही अशुभ असेल परंतु गनिमी काव्यासाठी ती शुभ असते.

त्याप्रमाणे स्वातंत्र्यवीरांनी हल्ल्याचा दिवस निवडला त्यादिवशी वेळ अमावस्या होती. इंग्रजी महिन्यानुसार तारीख होती १६ जानेवारी, १९४८. याच दिवशी गावच्या देवीची यात्रा भरलेली. वेळअमावस्यानिमित्ताने सर्वजण शेतात गेलेले, गाडग्यात दिवा घालून लक्ष्मीचे रूप खुणेने जमिनीत पुरले. वर दगडाला चुना लावून त्याचे पांडव तयार केले. त्याच्याभोवतीची ज्वारीची पाच ताटं एकत्र करून त्याचा ताटवा तयार केला. बाजरीची भाकरी, भोगीची भाजी(दहा प्रकारच्या एकत्र शिजवलेल्या भाज्या), त्यावर बाजरीचे उंडे आणि आंबिल पिऊन शेतकऱ्यांनी आपला दिवस घालविला. संध्याकाळच्यावेळी एका टोपल्याला ज्वारीची ताटं आणि त्याभोवती कपडा बांधून आत दिवा ठेवून टोपलं डोक्यावर घेऊन गड्यानं आरोळी ठोकली हरऽऽ हर ऽऽ महादेव. दिव्याला दिवा पेटवून शेतातली लक्ष्मी आता घराकडे आली होती.

दिवसाची वेळअमावस्या संपली आता रात्री देवीच्या यात्रेनिमित्ताने गावात तमाशाचा फड लागलेला होता. गावकऱ्यांनी दिवसा स्वत:च्या शेतात दिवा लावलेला होता. परंतु, दुसऱ्या बाजूला स्वातंत्र्य सैनिक आता अखंड भारताचा दिवा पेटवायला निघाले होते. त्यांना स्वत:च्या शेताची नाही तर अखंड भारतमातेची पूजा बांधायची होती. त्यामुळे गोविंदरावांची फळी खलबते करण्यात गुंग होती. गोविंद पवाराच्या अंगात मराठ्याचं रक्त सळसळत होतं. मग महाराजाप्रमाणे पहिला वार आपलाच असावा हा त्याचा आग्रह होता. त्यामुळे ठाण्यावर हल्ला करताना तो बहाद्दर दहा जणांसह पुढच्या तोंडाला

राहिला. दुसरी तुकडी शाहुराव जाधवाच्या नेतृत्वाखाली अमीनसाहेबाच्या घराबाहेर पहारा देण्यासाठी उभी राहिली. कुणाचीही छोटीशी चूक आता त्यांच्या जिवावर बेतणार होती.

यात्रेमुळे पोलिसांचा ताण वाढलेला होता. आजची नाईट ड्यूटी बरकंदाज (शिपाई) अब्दुल सत्तारची होती. ठाण्याला कुलूप लावून बाहेरच्या बाजूला खुर्ची टाकून हातात संगीनधारी बंदूक घेऊन सत्तारसाब मिणमिणत्या कंदिलाच्या प्रकाशात हळूच डुलकी मारायला लागले होते. गोविंदरावाने एका भिंतीच्या आडून आपली फुलदार बंदूक भरली आणि चाफ ओढला. परंतु, आज अब्दुल्लाचा अल्ला त्याच्यावर मेहरबान होता. दोन, तीन राउंड भरले ते वाया गेले. बंदुकीच्या घोड्याचा आवाज मात्र पहाटेच्या समयी स्पष्टपणे ऐकायला आला.

अब्दुलभाईला जाग आली. अरे बापरे ! कुछ तो भी गडबड है, त्याची नजर पारखायला लागली. तेवढ्यात गोविंदाचा चौथा राउंड कामाला आला. आणि फुलदार बंदुकीने धाड म्हणून आवाज केला. अब्दुल सत्तारची झोपच उडाली. तेवढ्यात आणखी एक टोळी दुसऱ्या बाजूने धावून आली. सर्वांनी मिळून केलेली ‘भारतमाता की जय’ ची घोषणा आसमंतात दुमदुमली. पोलिसाने समोर बघितले तर गावचाच गोविंद पवार पुढे उभा ! ये तो नाना पाटील का आदमी है! हत्यार जवळ असलेतरी ते चालवायला धाडस लागतं. पाच-पन्नास जणांचा जमाव बघून बरकंदाज अब्दुलने पोलीस स्टेशन को अल्ला के नाम पर छोडकर पीछे की ओर छलांग मार दी । गावात पहाटेच्या वेळी भारतमातेचे नारे होताहेत म्हटल्यावर आता पुढे काय होणार याची गावाला काय ती कल्पना आली होती. परंतु आवाजाने जागे झालेला अमीन बंदूक घेऊन बाहेर आला. पाहतो तर घरासमोर शाहूराव जाधवाची एक तुकडी आपल्यावर नेम धरून बसलेली होती. हे बघून अमिनसाब गुमानाने घरात परत गेले.

इकडे लक्ष्मण गायकवाडाने हातोड्याच्या एका दणक्यात पोलिस ठाण्याचे कुलूप तोडले. सर्वजण ठाण्यात घुसले आणि अख्खं ठाणं लुटून टाकलं. ‘भारतमाता की जय’ म्हणत अगोदर सर्व हत्यारे घेतली आणि मागून आग लावून दिली. सकाळ व्हायला लागली परंतु, इथं प्रकाश होता ठाण्याच्या आगीचा. गावाजवळच एक ‘लांबूळा डोंगर’ आहे. लुटून आणलेली हत्यारे घेऊन सर्वजण दिवसभर या डोंगरात दबून राहिले. तेव्हा गावकऱ्यांनी त्यांना

भाकरी पुरविल्या. रात्र झाली तशी स्वातंत्र्य सेनानींनी वागदरी कँप जवळ केला. हत्यारे मिळाल्याने कँपची ताकद वाढली. हडोळीला मोहनराव पाटलांची एक मजबूत गडी होती. मोहनरावांनी बऱ्याच बंदुका आपल्या गावाकडे नेल्या. त्यामुळेच पुढे जेव्हा चिंचोलीच्या रझाकारांनी हडोळीवर हल्ला केल्यानंतर याच बंदुका वापरल्याने अख्खे गाव वाचू शकले.

दुसऱ्या दिवशी संपूर्ण उस्मानाबाद जिल्ह्यात एकच गोंधळ सुरू झाला. स्वातंत्र्य सैनिकांनी नाईचाकूरचे पोलीस ठाणे लुटून जाळून टाकले. उस्मानाबादचे पोलीस प्रमुख ज्यांना म्हटले जायचे त्यांच्यापर्यंत बातमी पोहोचली. तोपर्यंत उमरग्याचे सर्कल इन्स्पेक्टर अफसर अली, सी.आय.डी. चे प्रमुख सय्यद अब्दुल लतीफ यांनी नाईचाकूरचा रस्ता धरला. दुपारचे ४ वाजले असतील गावात पोलिसांची गाडी आल्याने सर्वत्र भीषण शांतता पसरलेली होती.

गावचे प्रमुख माणिकराव पवार, नागनाथ पवार, बळीराम कारभारी, सुग्राव डॉक्टर, शामराव पवार, पंढरी माने, किशनराव पवार, नामदेव पवार यांना वेशीजवळ बोलावून भर रस्त्यात जनावरांसारखे मारण्यात आले. दिगंबर कुलकर्णी, लक्ष्मण वाघमोडे, शंकर सुतार, किल्लारीचे रतनचंद जैन, जयपाल काक्रंबे, रतनचंद कोठे, हिराचंद भोसले, बाबाराव माने यांच्यासह अनेकांची धरपकड करून या लोकांना उस्मानाबादच्या कारागृहत घातले. या वेळी उस्मानाबादचे भास्करराव नायगावकर हे याच कारागृहात शिक्षा भोगत होते. त्यांनी नाईचाकूरच्या स्वातंत्र्य सैनिकाबरोबर अनेक दिवस तुरुंगात काढले असून या घटनेविषयी आपण आजही अवगत असल्याचे नायगावकर यांनी आवर्जून सांगितले. श्री. वसंतराव नागदे यांचे वडील ज्यांना संभा माडीवाले म्हणायचे त्यांनी चाकूरच्या मोहिमेत भाग घेतला होता. परंतु इतिहास लेखनात अशा अनेक अज्ञात मंडळींची नावे इतिहास लेखकाच्या उदासीनतेमुळे काळाच्या पडद्याआड राहिली आहेत.

नाईचाकूरच्या पोलिस ठाण्यावर झालेला हल्ला हा पोलिसांवर झालेला मराठवाड्यातील सर्वांत मोठा हल्ला होता. खरंतर निजाम शासनाला हे उघड उघड आव्हान होते. त्यामुळे प्रशासन खडबडून जागे झाले. उस्मानाबादचे कलेक्टर महंमद हैदर, डी.एस.पी. अबुल हसन, अबकारीचे महंमद खान, गुप्तहेर गुप्तचर प्रमुख अब्दुल लतिफ , उस्मानाबादचे उपजिल्हाधिकारी कपूर,

उमरग्याचे सर्कल इन्स्पेक्टर अफसरअली, उमरग्याचे तहसीलदार (नाव उपलब्ध नाही), अमिन सैदोउद्दीन यांची बैठक भरली. यात या हल्ल्याविषयी भरपूर चर्चा करण्यात येऊन याची खबर हैद्राबाद संस्थानचे पोलीस मंत्री अब्दुल हमिद खान, उस्मानाबादचे संपर्क मंत्री इकरामुल्ला यांनाही कळविण्यात आली.

वरिष्ठ पातळीवरून त्वरित हालचाली होऊन पोलिस खात्याच्या गाड्या आणि रझाकारांनी नाईचाकूरला गराडा घातला. उस्मानाबादसाठी विशेष म्हणून नियुक्ती झालेले कलेक्टर महंमद हैदर जहिराबाद या ठिकाणी उपजिल्हाधिकारी म्हणून कार्यरत होते. ५ जानेवारी, १९४८ ला पदभार घेतल्यानंतर इथल्या स्वातंत्र्यवीरांनी त्यांना ही धोक्याची सलामी दिली होती. आता गावचे काही खरे नाही याची संपूर्ण गावकऱ्यांना खात्री झाली होती. गोळीबार आणि जाळपोळीतून अनेकांचे मुडदे पडणार हे निश्चित होते. अशा वेळी गावचे मीठ खाल्लेले अमिन मोक्याच्या वेळी धावून आले. त्यांनी सर्वांना सांगून टाकले, इस कारवाई में नाईचाकूर के कोई आदमीने हिस्सा नहीं लिया है। असे म्हणून रिपोर्ट दाबून टाकला होता. एवढ्यावर काम भागेना म्हणून अमिनच्या पत्नी नाईचाकूरच्या बुबूही आता पुढे आल्या. मेरे गाव को हाथ नहीं लगाना, म्हणत त्यांनी रझाकारांना अडवून धरले. त्यामुळे गावावर आलेले मोठे संकट टळले.

नाईचाकूरचे संकट टळले परंतु कलेक्टरसह पोलिसांनी आजूबाजूची सर्व गावे पिंजून काढली. मारहाण, लूट करून अक्षरश: या लोकांनी हैदोस घातला. याचाच एक भाग म्हणून किल्लारीच्या चार लोकांना पकडून गोळ्या घातल्या. याविषयी आपण एका प्रकरणात माहिती घेणारच आहोत. परंतु हा सर्व प्रकार नाईचाकूरच्या घटनेतून पुढे आला होता. गावकऱ्यांनी या वेळी मोठे कष्ट सोसले, अनेकजण तुरुंगात गेले तर गोविंदराव पवार आणि शाहूराव जाधव भूमिगत राहिले परंतु, कोणीही पश्चात्ताप केला नाही. नाईचाकूरवरचे संकट टळले होते. जिल्हाभर आता स्वातंत्र्याच्या चळवळीने टोक गाठले होते. त्यातून चिलवडी, धानोरा आणि नंदगाव ही गावे जाळून टाकण्यात आली होती. तर या चार-पाच महिन्यांत वीस-पंचवीस लोकांना गोळ्या घालण्यात आल्या होत्या. सरहद्दीवरच्या कँपमुळे निजाम राजवटीतील १६ जिल्ह्यांत उस्मानाबाद सर्वांत संवेदनशील झाले होते. गोविंदराव आणि शाहुराव जाधवा नंतर वरचेवर स्फुरण चढायला लागले होते. स्वातंत्र्याचा लढा आता रझाकार आणि स्वातंत्र्यसैनिक

यांच्यातच सुरू झाला होता.

वागदरी कँपवरून रात्रीबेरात्री गोविंदराव पवार आणि शाहुराव जाधव गावाकडे येऊन जायचे. लोक त्यांना तेवढीच मदत करायचे. ही जोडी गायब असल्याने रझाकारांची टोळकी आता गावापर्यंत पोहोचली होती. पाहतापाहता उन्हाळा आला. गावागावांतून महादेवाच्या काठ्या शिंगणापूरला निघाल्या. नाईचाकुरातील काठी वाजतगाजत निघण्याच्या तयारीत होती. गावभर त्याचा गाजावाजा व्हायचा. त्यानुसार रात्रभर हा जल्लोष सुरू होता. गावात काठीच्या मिरवणुकीची लगबग सुरू असताना हणमंतराव रामजी पवारांच्या शेतात वेगळीच घटना घडणार होती. पूर्वी शेतातल्या सालगड्याची नोकरी पाडव्याला संपायची. त्यानुसार हणमंतरावाच्या शेतातील इस्माईल महबूब मुल्ला आणि व्यंकू धनगर हे नोकरीचे साल संपलेतरी जुन्या वळणाने शेतात झोपायला गेले होते. इस्माईल तसा चांगला पोरगा परंतु अलीकडे रझाकाराला आपल्या गावच्या बातम्या पुरवितो अशी त्याची शंका यायला लागली होती. त्यामुळे गोविंदराव पवार यात्रेचा मुहूर्त साधून इस्माईलचा समाचार घ्यायला आले होते. रात्रीची वेळ होती, दोन गडी आणि इतर काहीजण वाऱ्याच्या झुळकीनं शांत झोपी गेली होती. तेवढय्ात घोंगडं पांघरून दोघजण तिथं आले, त्यांनी साऱ्यांना उठवलं. इकडच्या तिकडच्या गप्पा सुरू झाल्या. तेवढयात गोविंदरावांने आपल्या जोडीदाराला विचारलं, वेळ काय झाली ? एकाने सांगितले बरोबर बारा वाजले आहेत. तेवढ्यात गोविंदने लपवून ठेवलेले पिस्तूल काढले आणि धाडकन एक गोळी इस्माईलच्या डोक्यात गाढली. बडबड करत आणखी तीन गोळ्या झाडून गोविंद पवार आल्या पावली निघून गेले.

हणमंतरावांची दोन्हीकडून पंचायत झाली. खरं सांगावं तर गोविंद सोडणार नाही आणि खोटं सांगावं तर रझाकारांची भीती. त्यांनी शक्कल लावली, आपला दुसरा गडी व्यंकूच्या तोंडात बोळा कोंबून त्याला झाडाला बांधून टाकले आणि पोलिसांना वर्दी दिली. पोलिसापेक्षा आता रझाकारांनी गावाला वेढा घातला. इस बार नही छोडेंगे ! सालों को बहुत चरबी चढी है, अशा नाना शिव्या देत रझाकारांनी गावचा नायनाट करून टाकण्याच्या हालचाली सुरू केल्या. तेव्हा सारा गाव घाबरून गेला होता.

पुन्हा एकवार गावची बुबू गावच्या रक्षणासाठी धावून आली. ये सब मेरे भाई लोगा है, किसीने हात लगाया तो याद रखना । अमीनची बायको पुढे

आली म्हटल्यावर कुणाची हिंमत होणार आहे ? अमीनसायबाच्या पत्नीमुळे नाईचाकूर दुसऱ्यांचा वाचले. थेट पोलीस ठाण्यावर हल्ला होऊनसुद्धा नाईचाकूर वाचले ते केवळ अमिनसाहेबांच्या पत्नीमुळेच. हिंदू असो की मुसलमान मानवता महत्त्वाची असते. हे निजाम राजवटील्या एका मुस्लीम बाईने दाखवून दिले होते. गोविंद पवार, शाहुराव जाधव हे शेवटपर्यंत भूमिगत राहून वागदरी कँपवरून त्यांनी अनेक मोहिमेत भाग घेतला होता. तर पोलीस ठाण्याच्या प्रकरणामुळे चाकूरसह आजूबाजूच्या खेड्यांतील बरीच मंडळी उस्मानाबाद किंवा गुलबर्ग्याच्या जेलमध्ये टाकण्यात आली होती. ते सर्वजन स्वातंत्र्यापर्यंत जेलमध्येच राहिले.

स्वातंत्र्य सैनिकांच्या हालचाली दिवसेंदिवस वाढत गेल्या. त्यानुसार रझाकारांच्या अत्याचाराने परिसीमा ओलांडली. निजामाच्या दडपशाहीमुळे लूट, बलात्कार, खून यांसारख्या घटना घडत राहिल्या. शेवटी भारत सरकारने आपले सैनिक हैद्राबाद संस्थानात उतरविले आणि फक्त १०० तासांत उस्मानअलीखान निजामाला शरणागती पत्करावी लागली. रझाकाराचा म्होरक्या कासिम रझवीला अटक करण्यात आली. आता जुलमी शासनाचा नायनाट झाला होता. रेडिओवरून ही माहिती सर्वांना मिळत होती.

रझाकारांच्या जुलमाला कंटाळलेली जनता आता बदल्यासाठी पुढे आली. रझाकारांचा बदला आता सर्वसामान्य मुसलमानाला मारून घेण्यात येऊ लागला. गावोगाव सरेआम मुसलमानांच्या रक्ताचे पाट वाहू लागले. अमीनसाहेब गावाबरोबर सलोख्याने वागले होते. त्यांची पत्नी तर नाईचाकुरात मिसळून गेल्या होत्या. त्यांच्यामुळे गाव दोनदा वाचलेही होते. परंतु आता त्यांच्याही जिवाला धोका निर्माण झाला होता. त्यामुळे अमिनसाहेबांनी आपले सामान एका बैलगाडीत भरले आणि ते गावाबाहेर पडले. जायचं तर कुठं ? गावोगाव हिंदूंचे माथेफिरू आता रस्त्यावर उतरले होते. सारणी गावाच्या हद्दीत अमिनसाहेबाची गाडी दिसताच मागचापुढचा विचार न करता ते एक मुसलमान आहेत म्हणून नाईचाकूरला वाचविणारी बुबू आणि अमिन सैदोउद्दीन यांना कुटुंबासह ठार करण्यात आले. दहशतवादाला जातीचा इतिहास पूर्णपणे माहीत नसतो हेच खरे ! त्यामुळे हैद्राबाद मुक्तिसंग्रामाचा इतिहास पाहताना जातीचा नाही तर व्यक्तीचा इतिहास अभ्यासावा लागतो.

***

# ११. किल्लारीचे हुतात्मे

१९९३ साली उस्मानाबाद जिल्ह्यात झालेल्या भूकंपामुळे किल्लारीचे नाव जगभर पसरले. कारण भूकंपाचा केंद्रबिंदु किल्लारी होता. चाळीस फूट काळी माती आणि शेजारी तेरणा नदी यामुळे एकदा पेरले की, काढायलाच जावे ही शेतकऱ्यांची अवस्था. जमिनीच्या प्रतवारीवरून माणसांचा स्वभाव ठरत असतो. नदीकाठची माणसं शांत तर माळावरच्या माणसाचा स्वभाव चिडचिडा असतो तर समुद्र किनाऱ्यावरची माणसं आक्रमक असतात. अर्ध्या गावाला तेरणा नदीने वेढल्यामुळे जमिनीची सुपीकता मोठी असून जमिनीप्रमाणे माणसाच्या मनातील ओलावा आजही कायम आहे.

तेरपासून किल्लारी–माकणीपर्यंत तेरणा खोऱ्यात प्राचीन संस्कृती नांदत असावी असे तेथे सापडत असलेल्या अवशेषांवरून सांगता येते. गावचा इतिहास हा त्या ठिकाणच्या मंदिरावरून ठरविता येऊ शकतो. देवगिरीच्या यादवांचे साम्राज्य तेराव्या शतकापर्यंत अस्तित्वात होते. यादवांचा पंतप्रधान हेमाद्रीपंत पंडीताने बांधलेली मंदिराची बांधकाम शैली म्हणजे हेमाडपंथी. ज्या गावामध्ये अशा प्रकारची हेमाडपंथी शैलीतील मंदिरे आहेत त्या गावचे अस्तित्व किमान १३ व्या शतकापर्यंत पाठीमागे जाते. किल्लारी गावामध्ये अशा प्रकारची दोन मंदिरे आहेत. त्यामुळे किल्लारीच्या वसाहतीला आज किमान एक हजार वर्षे पूर्ण झालेली आहेत हे स्पष्ट आहे. किंबहुना किल्लारीचे अस्तित्व त्याच्याही अगोदरचे असावे परंतु, पुराव्याशिवाय आपण बोलू शकत नाही.

किल्लारीतील निलकंठेश्वर मंदिर हे गावचे वैभव असून हेमाडपंथी बांधकाम शैलीतील एक सुंदर मंदिर असून नदीच्या काठावर एका उंचवट्यावर मंदिराची उभारणी झालेली आहे. निलकंठेश्वर मंदिराचे वैशिष्ट्य म्हणजे मंदिरात असणाऱ्या महादेवाच्या पिंडीच्या बाजूला दोन दगडांच्यामध्ये एक छोटीशी फट असून त्यातून अखंडपणे पाणी वरच्या बाजूला येत असते. विशेष म्हणजे

मंदिराची उंची नदीपात्रापेक्षा बरीच वर आहे. त्यामुळे पिंडीच्या खालच्या बाजूला एखादा आड वगैरे असावा आणि त्याच्यातून पाणी वरच्या बाजूला येत असावे. तरीपण शास्त्राच्या दृष्टीने हे गूढ आहे. याचसोबत मंदिर परिसरात बरेच विरगळ असून यातून मंदिर परिसरातील संघर्षाचा अंदाज बांधता येतो.

मंदिराच्या इतिहासाविषयी वर्तमानपत्रात सातत्याने लिखाण करणारे स्थानिक पत्रकार सूर्यकांत बाळापुरे यांनी याविषयी सविस्तर माहिती दिली. त्यानुसार किल्लारी हा भाग प्राचीन काळातील दंडकारण्याचा भाग असून निलकंठेश्वर मंदिरातील पिंडीवर आद्य शंकराचार्यांनी स्वत: रुद्र यंत्र बसविले आहे. किल्लारीचा निलकंठेश्वर नवसाला पावणारा असून या परिसरातील ४० गावांतील लोक सातत्याने देवाच्या दर्शनासाठी येत असतात. राखी पौर्णिमेच्या दुसऱ्या दिवशी निलकंठेश्वराची यात्रा भरत असून त्यानंतर ११ दिवस यात्रेची गडबड चालू असते. यादरम्यान नारळाचे तोरण बांधण्याचा नवस मोठ्या प्रमाणावर पूर्ण केला जातो. अलीकडच्या काळातील माणुसकीचे वेगळे वैशिष्ट्य म्हणजे यात्रेच्या दरम्यान खाजगी वाहतूक करणारे जीप आणि टमटम चालक मंदिरासाठी मोफत प्रवाशी वाहतूक करतात.

तेरणा नदीला वर्षभर पाणी असून मंदिराच्या बाजूला एक ईश्वर डोह आहे. या डोहात स्नान करणे पुण्यवान समजले जाते. याच निलकंठेश्वर मंदिराच्या बाजूलाच देवीचे मंदिर असून ते मंदिरही हेमाडपंथी शैलीतील आहे. परंतु, मूळचे मंदिर हे वेगळ्याच दैवताचे असून पुढे या मंदिरात देवीच्या मूर्तीची प्रतिष्ठापना केली असावी असा अंदाज आहे. या मंदिराच्या अगदी समोरच पोलिस पाटलाची उंच गढी असून त्याच्याच बाजूला साबळगिरी महाराजांची समाधी आहे. हा मठसुद्धा मजबूत स्थितीत आहे. अशा रितीने किल्लारीचे प्राचीन वैभव हे मंदिराच्या अवशेषांवरून दिसून येते.

चाळीस-पन्नास वर्षांपूर्वी भारताची अर्थव्यवस्था ही पूर्णत: शेतीवर आधारित होती. त्यामुळे नदीकाठची गावे ही संपन्न असायची. त्यातूनच किल्लारी हे वैभवसंपन्न गाव होते. या ठिकाणी एक मोठी बाजारपेठ असून औशापासून किल्लारीपर्यंतचे लोक किल्लारीच्या बाजारला यायचे. इतर मालापेक्षा किल्लारीचे सोने या परिसरातील सर्वात चोख सोने म्हणून खात्रीने खरेदी केले जायचे. वारकरी संप्रदायाचा मोठा पगडा असल्याने सदैव भजन-कीर्तनाचा आवाज परिसरात घुमत असतो. किल्लारीचे पोलीस ठाणे आणि तालुक्याचे ठिकाण

म्हणून औसा हे सर्वश्रुत असलेतरी या गावकऱ्याची एक अशीही श्रद्धा आहे की, औशाचा किल्ला खरं तर इथच बांधायचा होता. परंतु काळ्या मातीमुळे पाया न लागल्याने तो औशाला बांधला. तरीपण किल्ल्याच्या बांधकामाची सुरुवात इथेच झाली. म्हणून गावचे नाव पडले किल्लारी.

देवगिरीच्या यादवांचे राज्य गेले आणि मराठवाड्यातील रयतेला मुस्लिमांच्या जुलमी राजवटीला सामोरे जावे लागले. पुढे मराठवाड्यावर हैद्राबादच्या निजामाची सत्ता आल्यानंतर स्वातंत्र्याच्या वेळी रझाकार चळवळ फोफावली. त्यातच या वेळी अफगाणिस्तान आणि उत्तर भारतातून मोठ्या प्रमाणावर मुस्लीम हैद्राबाद संस्थानात स्थलांतरित व्हायला लागले. यात अरब, पठाण, रोहिले यांचा भरणा अधिक होता. हे लोक स्वत:ला उच्च समजत असून मानाच्या जागा या लोकांनी पटकावलेल्या होत्या. दुसरी गोष्ट म्हणजे पठाण आणि रोहिले हे निजाम राजवटीत चालणाऱ्या अफू , गांजा, सिंदी आणि दारूचे ठेकेदार होते. पठाण आणि रोहिल्यांचा मुख्य व्यवसाय हा सावकारीचा होता. त्याला जोडून ही मंडळी कापड आणि किराणा व्यवसायात उतरली.

किल्लारीला तेरणा नदीचा काठ लाभल्याने या परिसरात सिंदीची भरपूर झाडे होती. या सिंदीचा ठेका घेत-घेत असेच एक रोहिल्याचे घर किल्लारीत स्थायिक झाले. सावकारी, दुकानदारी आणि नशापाणी यामुळे रोहिल्यांना आपली प्रगती करण्यास फार वेळ लागला नाही. त्यामुळे भर चौकात रोहिल्याचा चिरेबंदी वाडा गावात आले की सर्वांचे लक्ष वेधून घ्यायचा. वाड्याला चार दरवाजे असून बाजूला एक स्वतंत्र पाण्याचा आड होता. त्याला रोहिल्याचा आड म्हणायचे. आड रोहिल्याचा असलातरी पाणी भरण्याकरिता कुणालाही अटकाव नव्हता. सावकारीच्या पैशातून रोहिल्यांनी भरपूर जमीन खरेदी केलेली असून बैलबारदान्याबरोबर नोकर-चाकरांचा मोठा राबता असायचा. चार भावांचे एकत्र कुटुंब असल्याने मनुष्यबळाच्या जोरावर गावात मोठा दबदबा निर्माण झाला होता.

रोहिल्यांचा दबदबा वरचेवर वाढत गेला. तशी गावची आर्थिक नाडी त्यांनी आपल्या हातात घेतली. सुलतान, फकीर, नूर, गफूर यांसारख्या तरण्याबांड पोरांमुळे रोहिल्यांची ताकत बळावली. पैशाच्या व्यवहारामुळे सकाळपासूनच त्यांच्या वाड्याभोवती लोकांची मोठी वर्दळ व्हायची. दारुच्या ठेल्यामुळे पोलिसांची बैठक घडायची. मात्र चिरीमिरी घेतल्यामुळे गावात

आल्यानंतर पोलिससुद्धा किल्लारीच्या रोहिल्याला सलाम ठोकायचा. एकंदर रोहिल्याच्या या रुबाबामुळे त्या काळी किल्लारीला 'रोहिल्यांची किल्लारी' असे नाव पडले हेते. रोहिल्यांचा कारभारी वल्ल्याचा ओठ तुटका असल्याने गावातील लोक त्याला 'ओठ तुटक्या' नावानेच ओळखायचे. शेतात धान्याची रास पडली की, दोन-चार बकरी कापून वल्या सर्वांनाच खुश करून टाकायचा.

सुरुवातीच्या काळात गावागांवात हिंदु-मुसलमानांचे संबंध अतिशय चांगले होते. मूळचे हिंदूस्थानी असणारे दलित अस्पृश्याच्या भावनेतून दूर राहिले आणि परमुलूखातून आलेल्या मुस्लिमांना इथल्या हिंदूंनी बरोबरीचा दर्जा दिला. विवाहसंबंध जोडले. हा सत्तेचा परिपाक होता. दर्जाप्रमाणे सर्वसामान्य मुस्लिमांचे वर्तनही सवर्णाला साजेसे होते. अल्पसंख्याक असूनही सत्ताधारी जातभाई असल्याने गावपातळीपर्यंत मुसलमानांचा मोठा रुबाब होता. असे असलेतरी सत्तेची हवा आणखी खालपर्यंत पोहोचली नव्हती. परंतु पुढे ज्या वेळी कासिम रझवीमुळे रझाकारांचा उदय झाला आणि गावातल्या सर्वसामान्य मुसलमानांतील काही उपद्रवींच्या डोळ्यांत वेगळीच हवा शिरायला सुरुवात झाली. त्यानुसार पूर्वी गुण्यागोविंदाने राहणाऱ्या रोहिल्यांच्या वल्ल्याला आता आपण वेगळे असल्याचा साक्षात्कार व्हायला लागला. घरासमोर बसल्यानंतर येणाऱ्याजाणाऱ्यांनी नमस्कार घालावा इथपर्यंतची प्रतिष्ठा वाढवून ठेवली. असेच एकदा रंगा सावरेची बैलगाडी रोहिल्याच्या वाड्यासमोरून जात असताना बैलगाडीतल्या एका लहान पोराने नमस्कार घातला नाही म्हणून वल्ल्याने त्याला चापट मारली होती. रोहिल्याच्या या कर्तृत्वामुळेच पुढे किल्लारीच्या रस्त्यावर रझाकारांची परेड व्हायला लागली.

हिंदू असो की मुस्लीम प्रत्येक जातीत संधिसाधूंची कमतरता नव्हती. रोहिल्यांप्रमाणे गावात इतरही मुसलमानांची घरे होती. परंतु त्यांच्या मनात कुठलीही शंकाकुशंका उत्पन्न झाली नाही. याउलट किल्लारीचा एक मुसलमान लाडुबा शिरगापुरे हा गावची माहिती रझाकारांना पुरवितो म्हणून गावच्या लोकांनी त्याला मारून टाकण्यासाठी नदीकाठी नेले. तेव्हा त्याने आपणाला निलकंठेश्वराच्या पाया पडायचे आहे म्हणून स्वत:ची सुटका करून घेतली आणि नदीत उडी घेऊन खोल बुडून बऱ्याच दूर अंतरावर निघून गेला. लोकांना वाटले हा बुडून मेला. पुढे बऱ्याच वर्षांनी लाडुबा गावाकडे आला. आपण केवळ निलकंठेश्वरामुळेच जिवंत राहिलो असल्याची त्याची भावना होती. त्यामुळे

लाडुबा अधूनमधून निलकंठेश्वराच्या मंदिरात बसलेला असायचा. ज्याप्रमाणे रोहिल्याच्या वर्तनात फ रक पडला, त्याप्रमाणे काही हिंदू मंडळी देशमुखीच्या लोभाने मुस्लीम धर्मात गेली. नांदुर्गा, निंबाळा या परिसरात अशा लोकांचा भरणा अधिक होता. एक भाऊ हिंदू तर दुसरा मुसलमान अशी विचित्र अवस्था मराठवाड्यातील बऱ्याच गावांत आहे. अजून एक पिढी जायची असल्याने एकमेकांच्या कार्यक्रमात आहेरउपचाराची पद्धत आजही सुरूच आहे.

१९४७ ला भारत स्वतंत्र झाल्यानंतर देशभरात स्वतंत्रता दिवस साजरा होत असताना हैद्राबाद संस्थानातील जनता मात्र आणखी पारतंत्र्यात वावरत होती. निजामशाही सत्तेला हाकलून लावले पाहिजे अशा प्रकारची भावना ठेवून आता जागोजागी उठाव व्हायला लागले. जुन्या किल्लारीतील रोहिल्याचे घर मारुती आणि सुखदेव संभाजी भोसल्यांच्या शेजारीच होते. सुरुवातीची बरीच वर्षे यांचे घरोब्याचे संबंध होते. पुढे रझाकारांमुळे रोहिले बिघडल्यासारखे वागायला लागल्यानंतर गावातील रत्नू भोसल्यांनी त्याला विरोध करायला सुरुवात केली. रत्नाकरला ६ भाऊ आणि सर्वजण तालमीतले असल्यामुळे जिथं अन्याय झाला तिथं रत्नूची माणसं तुटून पडायची. बाकी किल्लारीतल्या एकाही मुसलमानाने निजामाच्या बाजूने उघडपणे भूमिका घेतली नाही. त्यामुळे हिंदू-मुस्लीम संघर्षाचा प्रश्नच आला नाही. गाव पातळीवरच्या या राजकारणाबरोबरच आता देशाच्या राजकारणाची चर्चा सुरू झाली.

किल्लारी परिसरात आर्य समाजीय चळवळीने मोठे व्यापक स्वरुप धारण केले होते. त्यामुळे जागोजागी हिंदुत्वाबरोबरच निजामाविरुद्ध उठावाला प्रेरित करण्याचे काम लागले. त्यातच हैद्राबाद मुक्तिसंग्रामाच्या चळवळीत आता भारतीय स्टेट काँग्रेसने उडी घेतल्याने स्वातंत्र्य चळवळीचा शिस्तबद्ध कार्यक्रम सुरू झाला. गावोगाव प्रभातफेऱ्या काढणे, वंदे मातरम म्हणणे,तिरंगा ध्वज फडकावणे यांसारखे कार्यक्रम होऊ लागले. स्वातंत्र्य संग्रामात सर्वांत मोठी अडचण व्हायची ती गावोगावचे देशमुख आणि पाटील या लोकांची. 'धरलं तर चावतंय आणि सोडलं तर पळतंय' अशी यांची कथा. निजामाचा कर जमा करणारी ही मंडळी. त्यामुळे स्वातंत्र्य संग्रामात भाग घ्यावा तर वतन जाईल, नाही घ्यावा तर गावकऱ्यांचे जोडे खायची वेळ यायची.

त्यामुळे स्वातंत्र्य संग्रामाच्या इतिहासात फार कमी लोकांनी उघडपणे भाग घेतला. परंतु बऱ्याच पाटील आणि देशमुखांनी गुपचूप राहून आपली मूक

संमती दर्शवली. किल्लारीचे पोलीस पाटील रावसाहेब पाटलांनी हीच भूमिका घेतली. त्यामुळे गाव पातळीवर आता प्रभातफेरी निघायला लागल्या. यासाठी जयपाल काक्रंबे, शामराव उमाटे, माधवराव बिराजदार, रामभाऊ भोसले, यादवराव पाटील, महादप्पा दलाल यांनी पुढाकार घ्यायला सुरुवात केली. शामराव उमाटे किल्लारीकर गडी बुटका पण एकदा बोलायला उभा राहिला की, निजामावर तुटून पडायचा. त्यामुळे लोकांच्या मनामध्ये स्फुरण चढायचे.

निजाम राजवटीत तिरंगा फडकावणे देशद्रोह मानला जायचा. त्यामुळे किल्लारीत तिरंगा फडकावल्याचे कळताच औशाच्या फौजदाराने आपला मोहरीर पाठवून रावसाहेब पाटलांना तंबी देऊन गावातील जवळपास २९ लोकांना अटक करून औशाला नेले. कोर्टाने त्यांना १३०० रु. दंड आणि १४ महिन्यांची शिक्षा फर्मावली. त्यामुळे बरेच दिवस किल्लारीतील स्वातंत्र्यसैनिक उस्मानाबाद आणि गुलबर्ग्याच्या कारागृहात राहिले. शामराव किल्लारीकर भूमिगत झाले. पुढे शामरावांनी शंकरदेव कस्तुरे, विश्वनाथ कापसे, रघुवीर शिंदे, मदनलाल जोशी, भीमराव बावळ यांच्या सोबतीने लातूरच्या गंजगोलाईत तिरंगा फडकाविला. यामध्ये पुन्हा एकदा शामराव किल्लारीकर भूमिगत झाल्याने ते पोलिसांना सापडले नाहीत. इतरांना पकडून त्यांना ७ वर्षांची शिक्षा ठोठावण्यात आली. शामराव किल्लारीकरांनी त्यानंतर बऱ्याच कारवाईत भाग घेतला.

किल्लारीच्या इतिहासात हुतात्म्यांची गाथा वेगळ्याच भाषेत सांगितली जाते. आपल्या पणजोबाचे नाव माहीत नसणाऱ्या समाजाकडून ऐतिहासिक घटनांचे भान ठेवणे अपेक्षित नाही. स्वातंत्र्य संग्रामासाठी किल्लारीने आपले ६ गडी पणाला लावले. गावाला नाही परंतु सरकारमधील काही लोकांना त्यांच्या बलिदानाची जाण होती. स्वातंत्र्य वीरांसाठी महाराष्ट्राच्या मुख्यमंत्रिपदी बॅरिस्टर अब्दुल रहेमान अंतुलेसारखी व्यक्ती विराजमान झाली आणि १९८१-८२ ला त्यांनी हुतात्मा स्मारकांची निर्मिती केली. त्यात गावकऱ्यांनी आता जनावरे बांधली, काहीजण तिथं शौचाला बसतात तर काही मंडळी पत्ते खेळतात. याच्याही पलीकडे किल्लारीच्या हुतात्मा स्मारकाची अवस्था झालेली आहे. फक्त खांब कसाबसा शिल्लक आहे. स्मारकाच्या जागेची माती आणि मुरूम सुधारणा करण्याच्या कामाकरिता काढून घेतल्याने स्मारक गेले, आता ज्योतीचा खांब शेवटची घटका मोजतोय. पुस्तक छपाई होईपर्यंत तो पडलेला असेल. तर हुतात्म्यांचा इतिहास या पद्धतीने जपणारी आपण माणसं. त्यामुळे

अशा लोकांकडून काय इतिहास घेणार ?

समाजाचे सोडा परंतु ज्याचा पूर्वज हुतात्मा झाला त्यांनीतरी स्मारकाची काळजी घ्यायला नको का ? सर्व काही सरकारने करावे अशी लोकांची अपेक्षा असते. असो, महाराष्ट्रातल्या कुठल्याही स्मारकाकडे पाहिल्यानंतर निराशा पदरी पडते. ज्याला पूर्वजांचे भान नाही त्याच्याकडून पराक्रमाची अपेक्षा नाही. आपला मूळ विषय होता किल्लारीतल्या हुतात्म्यांचा. काही लेखक आणि स्थानिक जाणकारांनी या घटनेचा संबंध लातूरमधील गंजगोलाईतील झेंडा फडकावण्याच्या घटनेशी लावलेला आहे. मी स्वत: किल्लारी गावात जाऊन लोकांशी चर्चा केल्यानंतर हाच सूर ऐकायला मिळाला. मध्यंतरी या घटनेचा साक्षीदार आणि ज्यांच्यामुळे उस्मानाबाद जिल्ह्यात खून, दरोडे यांचे सूडनाट्य घडले तो उस्मानाबादचा कलेक्टर महंमद हैदर यांचे आत्मचरित्र हाती लागले. महंमद हैदर किल्लारीच्या घटनेचे साक्षीदार होते. एवढेच नव्हेतर किल्लारीच्या प्रकरणात त्याच्यावर स्वातंत्र्यानंतर खटला भरण्यात आला होता. त्यामुळे किल्लारी गावातील चार लोकांना आपले प्राण का गमवावे लागले ? याचा इतिहास आपण नव्या स्वरूपात आणि वास्तववादी मांडत आहोत.

त्यानुसार १९४८ ला हैद्राबाद संस्थानात स्वातंत्र्य आंदोलनाने जोर पकडला. संस्थानातील एकूण १६ जिल्ह्यांपैकी तेलंगणाचा काही भाग आणि उस्मानाबाद जिल्हा सर्वांत आघाडीवर होता. जिल्ह्यातील हालचालींची गुप्त माहिती शासन दरबारात जात होती. त्यातच उस्मानाबाद जिल्हयालगत सोलापूर जिल्ह्याची सीमा असल्याने या भागातून हल्ल्याची शक्यता अधिक वाढली होती. त्यामुळे उस्मानाबाद जिल्हा एके काळी निजामाचा सर्फेखास जिल्हा असलातरी आता परिस्थिती बदलली होती. त्यामुळे निजामाच्या अंतर्गत गोटातील तरुण अधिकारी असलेले महंमद हैदर यांना उस्मानाबादचे जिल्हाधिकारी म्हणून नेमण्यात आले. ५ जानेवारी, १९४८ मध्ये हैदरने पदभार स्वीकारला आणि १५ जानेवारीला उमरगा तालुक्यातील नाईचाकूरच्या पोलिस ठाण्यावर हल्ला करून या भागातील लोकांनी सलामी दिली.

नाईचाकूरच्या पोलिस ठाण्यावर हल्ला करण्याकरिता हाडोळी, सरवडी, कवठा, माडज, किल्लारी यांसारख्या सर्वच गावांतून लोकांनी आपला सहभाग नोंदविला होता. नाईचाकूर प्रकरणात याविषयी आपण माहिती घेतली

आहे. त्याप्रमाणे नाईचाकूरचे पोलिस ठाणे लुटल्याची वार्ता जिल्हा पोलिस प्रमुख (त्या वेळी त्यांना डीएसपी म्हणायचे) हबुल हसन खानला कळविण्यात आली. त्याचप्रमाणे याची बातमी वरपर्यंत गेलेली होतीच. साहजिकच पोलिस ठाण्यावर हल्ला म्हणजे थेट सरकारला आव्हान असल्याने पोलिस खात्याने याची गंभीर दखल घेतली. या घटनेत कोणकोण सहभागी होते याची गावनिहाय यादी बनविण्यात आली. त्या परिसरातील पोलिस पाटील आणि गाव कोतवालांना तंबी देण्यात आली. त्यामुळे काही गावांनी चांगला अहवाल दिला तर काही पाटलांनी हात झटकून टाकले. एकंदर नाईचाकूरच्या घटनेमुळे उमरगा परिसरातील वातावरण एकदम गरम झाले होते.

नाईचाकूरच्या ठाण्यावरील हल्ल्याची तयारी अचानक झालेली नव्हती. गोविंदराव पवार आणि शाहूराव जाधव यांनी अगदी पूर्वनियोजितपणे आपल्या गावच्या परिसरातील लोकांना एकत्रित करून हल्ला केलेला होता. साहजिकच हल्ला करणारे लोक केव्हाच पसार झाले होते. त्यातच आता पुढे कारवाई होणार याचीही त्यांना कुणकुण लागलेली होती. काळ कुणासाठीच थांबत नसतो. नाईचाकूरच्या हल्ल्यामुळे कलेक्टर महंमद हैदर जाम वैतागले होते. उस्मानाबादच्या कार्यालयात याविषयी चर्चा करण्यासाठी तहसीलदार, पोलिस, लश्कर, अबकारी, जिल्हा गुप्तचर विभागाचे प्रमुख अशा सर्व खात्यांची बैठक भरविण्यात आली. उस्मानाबाद जिल्हा गुप्तचर विभागाचे प्रमुख अब्दुल कादर यांनी आपल्या कर्मचाऱ्यांना गुप्तवार्ता काढण्यासाठी कामाला लावले. याकरिता गुप्तचर विभागाचे फौजदार सय्यद अब्दुल लतिफ हे रात्रंदिवस किल्लारी परिसरात फिरून लोकांची माहिती घेण्यामध्ये गुंग होते.

सर्व माहिती हाती आल्यानंतर २० जानेवारी, १९४८ ला उस्मानाबादचे कलेक्टर महंमद हैदर, पोलीस प्रमुख अब्दुल हसन, उमरग्याचे सर्कल इन्स्पेक्टर अफ सर अली, एक्साईजचे महंमदखान, लेव्ही इन्स्पेक्टर, लातूरचे तहसीलदार ४०० रझाकार, पठाण आणि मोठा फौजफाटा घेऊन ही मंडळी किल्लारीत घुसली. नाईचाकूर प्रकरणात कोण-कोण होते याची चौकशी करून संशयितांना पकडण्याकरिता घरात घुसून लोकांची धरपकड करण्यात आली. स्वत: कलेक्टर होते तोपर्यंत काही लोकांना पकडून चौकशी करण्यात आली. मात्र सायंकाळच्या वेळी कलेक्टर त्या ठिकाणाहून निघून आल्यानंतर उमरग्याचे सर्कल इन्स्पेक्टर अफसर अली आणि इतरांनी मिळून किल्लारी गाव

धुण्यास सुरुवात केली. सकाळी-सकाळी एवढा मोठा फौजफाटा आल्याने गावातील बरीच मंडळी पळून गेली होती. त्यामुळे या दरोडेखोरांना आयतेच रान मिळाले. लूट, जाळपोळ करून श्रीमंतांच्या घरांना ठरवून आगी लावण्यात आल्या. प्रचंड सोने आणि धनधान्य लुटण्यात आले. पुढे सापडलेल्या कागदपत्रांनुसार जवळपास ६०,००० रुपयांची लूट करण्यात आली.

त्यानंतर या लोकांनी किल्लारीच्या ४ लोकांना पकडून ठेवल्याचे सांगण्यात आले आहे. परंतु त्यानंतर भारतीय सैनिकांनी या ४ लोकांना सोडवून आणल्याची माहिती कागदपत्रांत सापडते. त्यानंतर मात्र रझाकार आणि पोलिसांनी किल्लारीतील एकूण ६ लोकांना पकडून ठेवले. या सहामध्ये रामराव भोसले, यादव पाटील, माधवराव बिराजदार, महादप्पा दलाल, शिवलिंगप्पा दलाल आणि बळीराम बाभळसुरे यांचा समोवश होता. या लोकांना अटक करून नळदुर्गकडे घेऊन जात असताना गावाबाहेर गेल्यानंतर शिवलिंगप्पा दलाल आणि बळीराम बाभळसुरे यांना गोळ्या घालण्यात आल्या. इतर चौघांना पुढे घेऊन जाताना येळी गावाजवळ आल्यानंतर काय बाचाबाची झाली सांगता येणार नाही. कदाचित या लोकांनी पळून जाण्याचा प्रयत्न केला असेल किंवा रझाकारांना जोरदार विरोध केला असेल. कारण काही असो परंतु, येळीच्या पुलाखाली नेऊन राहिलेल्या चौघांना निर्दयपणे ठार मारण्यात आले.

आश्चर्याची बाब म्हणजे किल्लारीच्या या घटनेची कुठेच नोंद नव्हती. खरे म्हणजे तक्रार द्यावी तर कुणाकडे ? जिल्ह्याचे कलेक्टर आणि पोलिस प्रमुखच जर यात सहभागी असतील तर बाकीच्या लोकांकडून काय अपेक्षा करणार ? परंतु स्वातंत्र्यानंतर किल्लारीच्या घटनेला जबाबदार धरून उस्मानाबादचे कलेक्टर महंमद हैदरवर जे खटले भरण्यात आले त्यात किल्लारीमध्ये ९ घरांची लूट आणि जाळपोळ केल्याची नोंद सापडते. विशेष म्हणले या कलमात कुठेही ४ लोकांच्या मृत्यूची नोंद नाही. १९५० पर्यंत उस्मानाबादचे उच्च न्यायालय गुलबर्गा या ठिकाणी होते. जिल्हा न्यायालयातून हैदरची केस जेव्हा गुलबर्गा कोर्टात आली. तेव्हा केस नं. ८/२, २२ एप्रिल, १९५० प्रमाणे हैदरवर उस्मानाबाद जिल्ह्यातील अनेक गुन्ह्यासंदर्भात खटले दाखल झाल्याचे दिसून येतात. या खटल्यांत प्रामुख्याने ईटचे टेके खून प्रकरण, ढेकरीची लूट आणि खून, अपसिंग्यातील श्रीधर वर्तकांचा खून, उपळा गावातील ११ बैलगाडीवानांची हत्या, किल्लारीतील लूट आणि जाळपोळ यांचा

समावेश असलातरी त्यात ४ हुतात्म्यांच्या खुनांचा संबंध नव्हता.

त्यामुळे किल्लारीतील लोकांना मारण्याचे काम रझाकार आणि पठाणांनी केल्याचे स्पष्ट होते. घटना घडून गेल्यानंतर जवळपास वर्षानंतर म्हणजे १० मार्च, १९४९ ला हैदरवर खटला भरण्यात आला. या वेळी उस्मानाबादचे पोलीस अधिक्षक डॉ. बेडेकर यांनी ही केस तपासासाठी सीआयडीचे अब्दुल कादेर यांच्याकडे दिली. उस्मानाबादच्या न्यायालयाने हैदरला दोषी धरले होते. मात्र गुलबर्ग्याच्या न्यायालयात ते निर्दोष सुटले. खरंतर या खटल्यात अनेक बाबींची तपासणी करण्यात आली होती. यामध्ये कलेक्टर महंमद हैदर याचा दौरा किल्लारीत असल्याची नोंद त्यांच्या रजिष्टरमध्ये आढळून आली. परंतु, आपण स्वत: या ठिकाणी उपस्थित असलोतरी या दरम्यान काहीही घडले नसल्याचा त्याचा दावा होता. शिवाय आपण निघून आल्यानंतर लोहाऱ्याचे तहसीलदार, उमरग्याचे सर्कल इन्स्पेक्टर अफसर अली, सब-इन्स्पेक्टर आणि काही पोलिसांनी किल्लारीत धुडगूस घातला म्हणून कलेक्टर हैदरी याने या लोकांना त्वरित निलंबित केले होते. त्यामुळे किल्लारीच्या इतिहासाविषयी मौखिक स्वरूपातील माहिती, आणि हाती लागलेली माहिती यात बरीच तफावत असल्याचे स्पष्टपणे जाणवते.

किल्लारीच्या हुतात्म्यांचा अभ्यास करत असताना २० जानेवारी, १९४८ ला किल्लारी गावावर ४०० रझाकारांनी अक्षरश: नांगर फिरविल्याची माहिती पुढे आली आहे. लूट आणि जाळपोळीमुळे लोक गाव सोडून पळून गेले होते. ४ लोकांना येळीच्या पुलाखाली कोणी मारले ? हे अद्याप पुढे आलेले नाही. नाईचाकूरच्या तपासासंदर्भात आपण गावात गेल्याचे कलेक्टरने म्हटले असलेतरी ते स्वत:च पोलिसांना निलंबित केल्याचे सांगतात. स्वातंत्र्यानंतर उस्मानाबादचे डीएसपी अबुल हसन पाकिस्तानला पळाल्याने त्याच्यावर खटला दाखल होऊ शकला नाही. तर पोलिस कारवाईनंतर इथल्या रझाकारांना लोकांनीच कापून काढल्यामुळे नाव कुणाचे घ्यावे ? असा प्रश्न आहे. परंतु, लातूरच्या झेंडा प्रकरणाचा हुतात्म्याशी काहीही संबंध नाही. शामराव किल्लारीकर आणि रघुनाथ शिंदे यांनी लातूरच्या गोलाईत तिरंगा फडकावला. माझ्या अभ्यासानुसार गावात दोन-तीन वेळा धरपकड झाली. परंतु, शामराव कधीही सापडले नाहीत, हे त्यांचे वैशिष्ट्य. किल्लारीच्या लुटीत ज्या चार लोकांना पकडले त्यांचे पूर्वचरित्र अद्यापि पुढे आलेले नाही.

कदाचित त्यांचे कार्य आणखी मोठे असू शकते. मुळात किल्लारी हुतात्मा प्रकरणाचा संबंध २० जानेवारी, १९४८ च्या निजाम प्रशासनाकडून पडलेल्या धाडीत आहे. नाईचाकूरच्या पोलिस ठाण्यावर झालेल्या हल्ल्यातून गुन्हेगाराची धरपकड करण्याच्या हेतूने कलेक्टर आणि पोलिस प्रमुखाने स्वत: जाऊन किल्लारीसह आजूबाजूच्या खेड्यांत धाडी घातल्या होत्या. यामध्ये घटनेच्या दुसऱ्या वर्षी तक्रार झाल्यानंतर किल्लारीची केस उभी राहिली.

या घटनेतील माहितीनुसार प्रशासनातील अनेक बड्या अधिकाऱ्यांसोबत ४०० रझाकारांचे पथक होते. रझाकारांचा इतिहास पाहता या दिवशी किल्लारीबरोबरच आणखी काही गावांत लूट, जाळपोळ करून भयानक अत्याचार झाल्याची शक्यता आहे. परंतु, आपण पाठपुरावा करण्यास नेहमीच कमी पडतो. ज्याप्रमाणे ६५ वर्षांनंतरही हैद्राबाद मुक्तिसंग्रामाचा इतिहास आजही दडलेला आहे. त्याप्रमाणे अनेक अज्ञात वीरांची गाथा समाजासमोर येणे गरजेचे आहे.

किल्लारीच्या इतिहासात रामराव भोसले, माधवराव बिराजदार, यादवराव पाटील, महादप्पा दलाल, बळीराम बाभळसुरे, शिवलप्पा दलाल यांचे बलिदान प्रेरणादायी ठरले आहे. स्वातंत्र्यानंतर लाभ घेण्यासाठी अनेकजण पुढे आले असतील परंतु, नागनाथ उस्तुरेसारखी माणसे विरळच. स्वातंत्र्य संग्रामात खबऱ्या म्हणून काम करूनही त्यांना सरकारी मदत नाकारली. पुढे स्वातंत्र्यानंतर गावच्या प्रगतीत उस्मानाबाद जि.प. सभापती म्हणून काम करताना विश्वनाथ बिराजदार आणि उस्मानाबाद जनता सहकारी बँकेचे उपाध्यक्ष म्हणून श्री.निवृत्ती भोसले यांनी गावच्या विकासाला मोठा हातभार लावला. अशाच थोर माणसांकडून गावचा गाडा पुढे जात असतो. हुतात्म्यांच्या बलिदानाचे भान ठेवून मार्गक्रमण केल्यास आपलेही कर्तृत्व उजळून निघते हेच किल्लारीकरांनी दाखवून दिले आहे.

***

# १२. जिगरबाज चिलवडी

फिनिक्स म्हणजे राखेतून पुन्हा उभारी घेणे, असा याचा अर्थ होतो. हे वास्तवात येणे सोपे आहे का? का शक्य नाही ? चिलवडीकरांनी हे करून दाखवलंय. उस्मानाबाद-वैराग रस्त्यावर द्राक्षाच्या बागांने फुलून गेलेले आजचे चिलवडी म्हणजे जणू शहराचा एक भागच वाटत असलातरी साठ वर्षांपूर्वी उस्मानाबादचा कलेक्टर महमंद हैदरीने स्वत: उभे राहून संपूर्ण गाव जाळून बेचिराख करून टाकला होता. दोन वर्ष गावात माणूस नाही की जनावर नाही. पाहुण्यारावळ्यांनी बी-भरण देऊन चिलवडीकरांचे पुन्हा एकदा बिजांकुरण केले. इंग्रज अधिकारी जनरल डायरप्रमाणे एखाद्या जिल्ह्याचा कलेक्टर स्वत: गावात जाऊन लोकांच्या अडचणी सोडविण्याऐवजी अख्खा गावच जाळून बेचिराख करतो याला काय म्हणावे ? हे असे का घडले ?

संपूर्ण हैद्राबाद संस्थानात स्वातंत्र्याचे वारे वाहत असताना चिलवडीकरांनी यात आघाडी घेतलेली होती. गावचा कारभारी रामभाऊदादा जाधव करारी माणूस. सधन शेतकरी, नोकरचाकरांचा ताफा, २०० पोती ज्वारी, ३०० पोती शेंगा, असे भरमसाठ उत्पन्न. आपलं चांगलं आहे पण देशाचं काय? अशा पठाडीतला स्वभाव. मराठी गड्याचा मराठी बाणा. अण मराठा कुणाला म्हणावं? दुसऱ्यावर अन्याय होत असताना जो पेटून उठतो ना, तो मराठी? मग दादा तर अस्सल मराठमोळा माणूस. हैद्राबाद संस्थान स्वतंत्र झाले पाहिजे म्हणून सर्वत्र उठाव व्हायला लागले. तेव्हा आपणही यात उडी घ्यायला पाहिजे याची जाणीव होऊन रामभाऊच्या नेतृत्वाखाली अनेकजण कामाला लागले.

तिरंगा फडकावणे म्हणजे गुन्हा मानला जायचा ? परंतु भारतभूमीसाठी आपले प्राण न्यौछावर करायला निघालेल्या माणसाला असल्या धमक्यांनी थोडाच फरक पडणार आहे. रामभाऊ कामाला लागले. चिलवडी, रुईभर,

मेडसिंगा, ढोकी या परिसरात प्रभातफेऱ्या काढून लोकांची मस्तकं पेटवायला लागले, तशी सरकारी यंत्रणा चिडायला लागली. ढोकीत त्यांच्यावर गुन्हा दाखल झाला. बेंबळी पोलीस ठाण्याचा फौजदार रॅफसनने दादांना अटक करण्याची धमकी दिली. दादानी सांगितले, मी फेरी काढणारचं ! तुला काय करायचयं ते कर. व्हायचे तेच झाले. रामभाऊंना अटक करून बेंबळीला नेण्यात आले.

काही न्यावं पण विस्तव वाहून नेऊ नये म्हणतात. तीच चूक रॅफसनने केली. दादाला पकडल्याचे समजताच लोक चवताळून उठले. आता आपले काही खरे नाही याची फौजदाराला जाणीव झाली. त्याने विचार केला, हा विस्तव जाऊ द्या जिल्ह्याला. दादाला जिल्ह्याला आणलं. जिल्ह्याच्या फौजदाराने रामभाऊला सांगितले, माफी मांगो! दादांनी ठणकावलं,माझ्या देशासाठी मी लढतोय, माफी मागायचा विषयच नाही. तेव्हा त्यांना सरळ उस्मानाबादच्या जेलमध्ये पाठविण्यात आले.

चिलवडीच्या रामभाऊ जाधवांना अटक झाली म्हटल्यानंतर हैद्राबाद स्टेट काँग्रेस जागी झाली. काँग्रेसचे मोठे पुढारी आणि उस्मानाबादचे नामांकित वकील फुलचंद गांधी यांनी दादांची केस घेऊन त्यांना जामीन मिळवून दिला. परंतु यामागे सरकारी नीती काही वेगळीच होती. सरकारला न जुमानणाऱ्या रामभाऊचा काटा काढण्याचा डाव टाकण्यात आला. बस्स ! जेलमधून बाहेर आल्यानंतर रस्त्यात गाठून त्यांच्या खांडोळ्या करण्याकरिता रझाकार तयार होते. पोलिसांची त्यांना तशी फूसच होती.

कुठलीही जात कधीच खराब नसते तर जातीआड लपलेला माणूस खराब असतो. माणुसकीला सर्वच जाती सारख्याच असतात. त्यानुसार रामभाऊंना मानणारी माणसं उस्मानाबादच्या मुस्लीम मोहल्यातही होती. 'चिलवडी के जाधव को मारने वाले है', ही खबर मोहल्यातील निजामोद्दीनला लागली. खरंतर तो गुंड म्हणून ओळखला जायचा. तरीपण त्याच्यातला माणूस जागा झाला आणि त्याने सरळ जेल गाठली. रामभाऊ जेलच्या बाहेर येताच त्याने सारे कटकारस्थान सांगितले. निजामोद्दिन हा दादाचा जवळचा मित्रवगैरे असावा. त्याने दादाला वाचविण्यासाठी चिलवडीची वेगळीच वाट काढली. दर्ग्याकडून पिंपरीमार्गे चिलवडीला जाण्याऐवजी दादा उलटमार्गे अंबेहोळ जुनोनीमार्गे चिलवडीला जाऊन पोहोचले. मारणारा निजाम तर वाचविणारा

निजामोद्दिन.

घराची कळा अंगणावरून तर गावाची कळा चावडीवरून कळते. रामभाऊने घेतलेला वसा साऱ्या गावाने पाळला. निजामाच्याविरूद्ध सारा गाव एक झाला होता. निजाम राजवटच मानायची नाही तर मग त्याचे कायदेकानू का मानायचे? निजामाची शाळा बंद केली, सारा भरणा बंद, करोडगिरीवर जकात बंद, सिंदीची वाहतूक बंद. एवढेच नाहीतर पोलिसांचा आदेशही झुगारायला सरुवात केली. रामभाऊला पकडून आणण्याचे ओदश देण्यात आले तर ते गायब ! निजामाने रामभाऊ जाधवाच्या डोक्यावर नगद १० हजारांचे इनाम लावले.

दादा गावात नाहीत म्हणून सारा वसुलीसाठी गिरदावर आपल्यासोबत एका जमादार पठाणाला घेऊन आला. गावकऱ्यांनी लेव्ही आणि साऱ्यासाठी नकार दिला. एवढेच नाहीतर त्यांना गावात बांधून टाकण्याची भूमिका घेतली. तेव्हा त्यांनी चिलवडीतून पळ काढला. पठाण पळत जाऊन पोहनेरच्या पोलीस स्टेशनात बसला. आणि तिथून तो येणाऱ्याजाणाऱ्याला अर्वाच्य भाषेत शिवीगाळ करायला लागला. तोपर्यंत ही बातमी गौडगावच्या कँपवर गेलेली होती. ग्यानबा भोजगुडे, सौदागर बागल, रावसाहेब माने, मनोहर टापरे, जयकुमार अजमेरा यांच्यात भारतमाता घुसली. त्यांनी पोहनेर गाठले तर जमादाराचा अवतार बदलेला.

खवळलेल्या सापाला पकडायचे कसे ? जमादाराने गावात गोंधळ घालायला सुरुवात केलेली. चिलवाडी वालों को देख लूँगा, जला के राख कर दूँगा, अशी भाषा वापरत तो बेभान झाला होता. साप आला म्हणजे गारुडी असतोच. गावाच्या बाहेर आलेल्या स्वातंत्र्यसेनानींनी गावात जाणाऱ्या शेतकऱ्यांचे कपडे घातले. डोक्यावर गवताचा भारा आणि हातात बैलाचा कासरा घेऊन ते पोलिस ठाण्यापासून पुढे निघाले. जमादार शिव्या देण्यात बेभान झालेला होता. जवळ जाताच ग्यानबाने जमादाराला जोरदार मिठी मारली तर सौदागर बागलाने तिथलीच थ्री नॉट थ्रीची बंदूक घेऊन जमादाराच्या डोक्यात फिरवून घातली.

जमादार जातीने पठाण असून तो पाचदहा जणांना सहज लोळवू शकत होता. परंतु तोपर्यंत बाकीचे लोक धावून आले आणि सर्वांनी मिळून पठाणाला जखडून टाकले. मुसक्या बांधून गौडगावला आणल्यानंतरही त्याच्या तोंडाचा

पट्टा चालूच होता. पठाणाला पकडल्याची बातमी वरपर्यंत सांगण्यात आली. वरून आदेश आला शूट  हिम ! पकडलेल्या शत्रूला कसाबासारखे पोसायचे नाही यासाठी हा एक आदर्श होता. हुकमाची तामील झाली, गौडगावमधील लांडगेच्या वाड्यातल्या कँपमधून जमादाराला भालगाव रस्त्यावरच्या बिरुवाच्या माळावर नेऊन गोळ्या घालून तिथेच त्याचा दफनविधी करण्यात आला.

हैद्राबाद संस्थानातील सिव्हील सर्व्हीस १९३७ सालच्या तुकडीचा सनदी अधिकारी असलेली श्री. महंमद हैदर याने ५ जानेवारी, १९४८ ला उस्मानाबादचा कलेक्टर म्हणून नुकताच पदभार स्वीकारला होता. त्या वेळी कलेक्टरला तालुकदार म्हटले जायचे. नुकतेच येऊन हैदरीला दोन महिने झाले होते. अतिशय कडक आणि सक्त असणाऱ्या हैदरसाहेबाला चिलवडीकरांनी थेट आवाहान दिले होते. त्यामुळे पहिल्याच झटक्यात आपला जरब बसला तर पुढे कायम वचक राहील म्हणून हैदर साहेबाने आपली गाडी आता चिलवडीच्या दिशेने दौडायला सुरुवात केली होती.

आज लोकशाही असूनही पोलिसाला चापट मारून बघा काय होते ते. कानोकानी ही खबर उस्मानाबादचे कलेक्टर महमंद हैदरसाहेबाच्या कानावर गेली. अगोदरच चिलवडी हिट लिस्टवरचे गाव, वरून त्यांची ही मुजोरी. हैदरीचा राग अनावर झाला आणि तो रागाच्या भरात आपले केस उपटायला लागला. पोलिसाला लॉ अँड ऑर्डरचा आदेश देऊन तातडीने रोल कॉल घेण्यात आला. एक हजार पोलीस, चार हत्यारबंद गाड्या, रझाकार, पठाण आणि रोहिले घेऊन हैदरसाब चिलवडीकडे निघाला. चिलवडीला जाण्यासाठी दर्ग्याच्या बाजूने खंडबनातून पुढे केकतवाडी, राघुच्यावाडीच्या दक्षिणेकडून जावे लागायचे. खरं तर हैदरीच्या रूपाने आता उस्मानाबादहून निघालेले अण्वस्त्र चिलवडीवर बरसणार होते. काळाच्या गर्भात एक काळसर्प दडलेला होता.

हैदरसाहेब गावाजवळ आले. तारीख होती १९ मार्च, १९४८, दुपारचे चार वाजलेले. भोगावती आणि रामनदीच्या संगमावर बसलेल्या चिलवडीच्या चंद्रवंशीय जाधवांचे कुलदैवत दत्तांचे मंदिर अगदी गावाच्या वेशीत आहे. आता त्यांना कोणताच देव वाचवायला येणार नव्हता. हैदरीने गावाचा चाकाचोळा घेण्यासाठी कोंडीबा माळ्याच्या शेतात आपला तंबू ठोकला. गावाकडे पाहताच

त्याच्या तळपायाची आग मस्तकाला गेलेली. त्याने आदेश दिला, सालों को जला के राख कर दो. शेतात कडब्याच्या गंजी लावलेल्या, कुणाच्या ज्वारीच्या राशी चालू होत्या. त्याने आपल्या तथाकथित चमच्यांना विचारले, ''ये किसके खेत है'' ? उत्तर आले, यह माली का खेत है, और ये जो दिखता है ना, वो रामभाऊ ज्याधव का है. बस्स ! जला दो सबकुछ.

काही कळायच्या आत चिलवडीच्या साऱ्या शिवाराला आग लागली. गुरेढोरे, कडबा, गंजी, ज्वारीच्या राशीच्याराशी वणव्यासारख्या पेटल्या. गावकरी भयभीत होऊन आपला जीव मुठीत धरून बसले. आता हताश होऊन भागणार नव्हते. चिलवडीतील माणसाच्या अंगात जाधव कुळाचे रक्त होते. अंगावर आलेल्या संकटाला झेलण्याची परंपरा लखुजी जाधवापासून होती. गावातील प्रभाकर, नागू, नामदेव यांसारख्या हिंमत बहाद्दरांनी लोकांना धीर देऊन धोंडिबा जाधवाच्या वाड्यात एकत्र केले. सारी बायकामाणसे वाड्यात कोंडून ही पूरूष मंडळी दोन हात करण्यासाठी माळवदावर चढून बसली.

संपूर्ण गाव तसं गौडगावच्या कॅंपला जोडलेले असल्याने त्यांच्या जवळ हत्यारे होती. परंतु मुकाबला मोठा विचित्र होता. शेदोनशे बायकापोरे आणि एक हजारांवर पोलिस आणि रझाकार असा असंतुलित सामना होता. आपल्या सत्तेला झिडकारले आणि थेट पोलिसांना गोळ्या घालण्याची हिंमत केली. अगोदरच चिलवडी डोक्यात बसलेली आणि त्यातून हा प्रकार झाल्याने कलेक्टरसाहेब चिलवडीचे नामोनिशान मिटवायला निघालेले तर स्वातंत्र्यासाठी निजाम राजवटीला शिंगावर घेतलेल्या जाधवांना याची फिकीर वाटत नव्हती. आहे त्या साधनांसह ही मंडळी घरावर चढून पुढची आखणी करायला लागली. मागच्या बाजूने काही धोका होऊ नये म्हणून बोळात असलेल्या पिंपळाच्या झाडाच्या ढोलीत एकजण रखवालीचे काम चोखपणे बजावत होता.

गावकूस जाळल्यावर निजामी पोलिस रझाकारांसह गावात घुसले. ग्रामदैवत दत्त मूर्ती फेकून फोडल्यानंतर मंदिराला आग लावण्यात आली. पोलीस गावात घुसले परंतु कुठेच काही दिसेना. पोलिस गावामध्ये घुसून परिस्थितीचा अंदाज घ्यायला लागले. बहुतेक गाव रिकामं झालं होत. काहीजण धोंडिबा जाधवाच्या घरात जाऊन बसले होते. तरीपण काहीजण आपल्या घराच्या छतावर जाऊन काय घडतंय ते दूरूनच पाहत होते. निजामाचे पोलिस आपल्या हत्यारांसह गावातून फेरफटका मारत निघाले. तेव्हा त्यांना स्वत:च्या

घराच्या माळवदावर दत्तू कृष्णा जाधव निवांत पाय सोडून बसलेला दिसला. वास्तविक पाहता दत्तूआण्णाच्या पायाला नारू झाल्याने त्यांना आपला पाय सरळ करता येत नव्हता. आणि विशेष हलताही येत नव्हते. पोलिसांना वाटले हा मुद्दाम आपल्यापुढे असा वागतोय. म्हणून त्यांनी दत्तूला सरळ एक गोळी घातली. दुर्दैव पोलिसाची गोळी दत्तूच्या पायात घुसली. तो मोठमोठ्याने बोंबलायला लागला तसे पोलीस पुढे निघून गेले. सारा जीव एकवटून दत्तू खाली आला आणि आपल्या वेगाने झरेगावच्या दिशेने पळत सुटला. तिथं नदीवर काही माणसे दिसली म्हणून तो थोडा वेळ थांबला आणि चक्कर येऊन पडला. पुढे त्यांना बार्शीच्या दवाखान्यात नेऊन उपचार करण्यात आले. याचा एक फायदा झाला तो म्हणजे दत्तू जाधवाचा नारू कायमचा बरा झाला.

पोलीस गावभर फिरत होते. थोड्याच वेळात त्यांच्या ध्यानात आले की, गावकरी हे धोंडीबा जाधवाच्या वाड्यात लपलेले आहेत. समोर हल्ला करण्यासाठी शत्रू सरसावले परंतु वरून फायरिंग होताच त्यात दोन पोलीस किंवा रझाकार असावेत ते मारले गेले. पोलिसांना अंदाजच येईना म्हणून त्यांनी मागच्या बाजूने हल्ला करावा या हेतूने घरामागे असणाऱ्या खिंडीतील बोळातून एक टोळी हमल्यासाठी पाठवली. खबऱ्या तयार होता. त्याने ठरलेल्या इशाऱ्याने आपल्या घरावरच्या सहकाऱ्यांना सावध करून शत्रूची बातमी पोहाचविली.

आता खऱ्याखुऱ्या युद्धाला सुरुवात झालेली होती. छत्रपती शिवरायांच्या काळात घरातील अवजारांनी हत्याराची जागा घेऊन प्रत्येकजण हा सैनिक बनलेला होता. आता पाळी होती चिलवडीकरांची. करा नाही तर मरा. एकदा का शत्रू घराला भिडला की, माणसांचे मुडदे पडले असते तर बायकांच्या बांगड्याचा चक्काचूर झाला असता. परंतु हा जर तरचा विषय आहे. हे बघायला अजून मराठी माणूस मेलेला नव्हता. प्रभाकर म्हणजे सूर्य या आपल्या नावानुसार प्रभाकर जाधवाने दोन बाँब हातात घेऊन एकदम सोलून काढले आणि दत्त महाराज की ऽऽ जय ऽऽ म्हणत बोळात दिले फेकून. आवाज एवढा मोठा होता की, कोस दोन कोसाचा सारा परिसर हादरून गेला. शत्रूकडील ८ जणांचा मुडदा पडला. एवढी हानी झाली म्हटल्यावर शत्रूने परतीचा रस्ता धरला. संख्येपेक्षा जिगर महत्त्वाची असते हे चिलवडीकरांनी दाखवून दिले होते.

शत्रू चिलवडीवर चालून आल्याची बातमी गौडगाव कँपबरोबरच

वैरागच्या पोलिसांनाही मिळालेली असल्याने गौडगावरून स्वातंत्र्य सैनिकांसह रामभाऊ जाधव आणि वैरागचे फौजदार माने मोठया फौजफाट्यासह धावून आले. गावाच्या दक्षिणेकडून त्यांनी निजामी सेनेवर हल्ला केला. संख्या आणि ताकतीने शत्रू वरचढ ठरायला लागला होता त्यातच रागाच्या भरात रामभाऊंनी आपली स्टेनगन एका झटक्यातच रिकामी करून टाकली. तर मानेसाहेबांच्या गाडीचे टायर फुटले. त्यामुळे त्यांनी पुढील धोका ओळखून माघार घेतली. आपण माघार घेतली परंतु शत्रूतर कुठे शेर राहिला होता. मुडदे घेऊन जायलासुद्वा त्यांची हिंमत होत नव्हती.

रात्र झाली तसा सर्वत्र सन्नाटा पसरला. याचा फायदा दोन्ही पक्षांनी घेतला. चिलवडीकरांनी पुढील धोका ओळखून वैरागच्याबाजूने बोळातून स्वत:ची सुटका करून घेतली. जिवाच्या आकांताने जो-तो वाट दिसेल त्या दिशेला पळत सुटले. कोण गौडगावला कोण झरेगावला तर कोणी रूई भालगावला गेले. खरं तर पानिपताप्रमाणे चिलवडीवर यमाच्या विमानाने घिरटया घालायला सुरूवात केलेली होती. वेळ आली होती परंतु काळ आला नव्हता. जर आणि तरच्या अंतराने चिलवडीकरांना जीवदान दिले. रात्रीचा फायदा घेऊन पोलिसांनी आपल्या सहाकाऱ्यांची प्रेतं उचलून गावाबाहेरच्या आपल्या तंबूजवळ घेऊन गेले. अर्धवट जळाल्यामुळे यात कोण आहे आणि कोण नाही हे ओळखायलासद्धा येत नव्हते. त्यामुळे तिथल्याच एका तुराटीच्या गंजीत घालून त्यांचा अंतविधी उरकण्यात आला. परंतु ते पुन्हा एकदा अर्धवटच जळालेले होते. परंतु हे पाहण्याकरिता पोलिसांकडे वेळ नव्हता.

चिलवडी गावात स्मशान शांतता पसरली. जनावर मेल्यावर गिधाडं तुटून पडतात तशी रझाकारी सेना गावावर तुटून पडली. जे दिसले ते ओरबाडले. कामाचे ते घेतले बाकीच्याला बरबाद करून सोडले. हातात बंदुका घेऊन सारा गाव पिंजून काढला. गावाबाहेरच्या एका झोपडीत नुकतीच एक बाई बाळंत झाल्याने तिला सोडून जाणे शक्य नसल्याने सत्तरी पार केलेला नरसू कदम नावाचा म्हातारा आपल्यासारख्या म्हाताऱ्याला कोण खातंय म्हणत दाराला टेकून बसला होता. हजाराच्या शत्रूसाठी टार्गेट एकच राहिले होते. बस्स ! गोळीला वय आणि जात नसते. एका निर्दयी पोलिसाने नरसूला गोळी घालून त्याची झोपडी पेटवून दिली. त्यात लहान मुलासह बाळंतीन आणि आणखी एक बाई या आगीत जळून खाक झाली. एवढे झालेतरी मराठी माणसाने आणखी

माणुसकी सोडलेली नव्हती. रात्री दीड दोनच्या सुमारास गावातील काही ठरावीक माणसांनी नरसू कदमाचे शव गौडगावच्या बाजूला नेऊन त्यांचा अंत्यविधी पार पाडला.

१९ तारखेला आल्यानंतर पहिल्या चार पाच तासातच एवढ्या घटना घडून आल्या. आता गाव तर रिकामा झालेला मग राग काढायचा कोणावर? हैदरसाहेबांचा पारा आणखी वर गेला. त्यातूनच आदेश आला, जला के राख कर दो. आदेशाचे सक्तीने पालन करण्यात आले. साऱ्या चिलवडीला आग लावण्यात आली. घराचा कानाकोपरा आगीच्या भक्षस्थानी पडला. पुढचे दोन दिवस चिलवडी जळत होते.

आलो एकासाठी अन् झाले दुसरेच. शत्रू निसटला आणि आपलीच आठ माणसे जाया झाली. दुसऱ्या बाजूला गाव संपलातरी माणसं जिवंत होती. त्यांना ठेचून मारावे म्हणून हैदरीने आपला मोर्चा आता गौडगावच्या कँपकडे वळविला. रस्त्याने जाताना माळावरून एक बैलगाडी दिसली. दिसला माणूस की घाल गोळी याप्रमाणे कारण नसताना रस्त्यावरच्या वाटसरूला गोळी घालण्यात आली. अशा रितीने बैलगाडीत बसलेला एक ब्राह्मण नाहकपणे मारला गेला.

दुश्मन आपल्यावर चालून येतोय म्हटल्यावर कँपवरची मंडळी सज्ज झालेली होती. सर्कशीत सारेच काही वाघ नसतात तर काही जोकरही असतात. त्याप्रमाणे काही विघ्नसंतोषी मंडळी कँपवाल्यावर दोष ठेवायला लागली. निजामाचे पोलीस आणि रझाकार चालून येतात म्हटल्यावर रामभाऊंनी वेशीवर जाऊन आपला मोर्चा सांभाळायला सुरुवात केला. दुसऱ्या बाजूला पोलिसासह बरेचजण पळून चालले. स्वातंत्र्य सेनानींना मरणाची भीती थोडीच होती? पळून जाणाऱ्याला रोखण्यासाठी रामभाऊंनी वेशीवरून खाली उडी घेतली. पळून जाणाऱ्या पोलिसांच्या बंदुका हिसकावून घेण्यात आल्या. रामभाऊंना आता सिंहगडावर लढणाऱ्या शेलारमामासारखा जोश आला होता.

तोपर्यंत निजामाचे पोलीस गौडगावच्या जवळ येऊन ठेपले होते. आजच्या शाळेच्यामागे चिलवडी रस्त्यावर एक मोठे पटागंण असून तेथेच कँपचा सराव चालायचा. त्यामुळे कँपवाल्यांना या भागाची चांगलीच माहिती असल्याने रझाकार गावात येण्यापूर्वी त्यांचा रस्त्यातच मुकाबला करावा म्हणून स्वातंत्र्य सेनानी पुढे सरसावले. पुन्हा एकदा भारतीय बंदुका धडाडल्या. त्यांनी

८ रझाकारांचे मुडदे पाडले. त्यांनी दाखवून दिले की, एकदा विचाराने डोके पेटले की डोक्याच्या गणतीची आवश्यकता पडत नाही. चार राहावी पण एका विचाराची राहावी हेच खरे.

पाहुण्याच्या गावातून आपला जळणारा गाव पाहताना चिलवडीकरांचे काय हाल झाले असतील. त्याची आपणास कल्पना नसलीतरी जाणकारांच्या म्हणण्यानुसार गावकरी बेभान झालेले होते. आपण रझाकारांचा कसा बंदोबस्त केला याचा आनंद त्यांना स्वत:च्या दुख:पेक्षा अधिक होता. काही मंडळी तर जोशाने घोषणा देत होती, भारतमाता की ऽऽ जय ऽऽ परंतु आगीने आपले काम चोखपणे बजावले. संपुर्ण चिलवडी गाव बेचिराख झाला. आग एवढी भयानक होती की घराच्या दारावरील लांब छावण्याचेसुद्धा दोन तुकडे झाले. देणाराचे हातच जर गळयाभोवती फास आवळायला लागले तर सांगायचे कोणाला? तीच गत चिलवडीकरांची झालेली होती. लोकांचे प्रश्न सोडविण्यासाठी नेमलेला कलेक्टरच जर तीन दिवस ऑफीसचे काम सोडून गाव जाळत बसला तर याला काय म्हणावे? १९, २० आणि २१ मार्च असे तीन दिवस चिलवडी उभी आडवी जळून खाक झाली होती. होळीचा सण साजरा करण्याऐवजी लोकांच्या प्रपंचाचीच होळी झाली होती.

सरकारी आकडेवारीनुसार उस्मानाबाद परिसरातील गावांचे जे नुकसान झाले त्यात चिलवडीच्या नुकसानीचा आकडा देण्यात आलेला आहे.

चिलवडी - १, ७२, ८१० रुपये

धानोरा - ६, ७६, ८२० रुपये

नंदगाव - १०, ३६, ६०० रुपये

अचलेर आणि गुंजोटी - ४९, ५०० रुपये

ईट, चांदवड आणि अंजनसोंड - १, ९१, ००० रुपये

दुसऱ्या दिवशी गाव रिकामं झालंतरी आपल्या बैलबारदान्याच्या आशेने काहीजण गावात भोवती फिरताना दिसले. लगेच या ७ जणांना अटक करून उस्मानाबादला नेण्यात आले. यात गोविंद शंकर जाधव, जयवंत जाधव, महादेव आणा जाधव, माधव जाधव, गणपती निवृत्ती जाधव, खंडू महार आणि केरबा सरवदे यांचा समावेश होता. गणपती पूर्वी पोलिसात असल्याने निजामाकडच्या एका धनगर समाजातील पोलिसाबरोबर त्यांनी संधान बांधले.

संडासला जायचे निमित्त करून गौडगावच्या दिशेने पळून गेले. ठरल्याप्रमाणे त्या पोलीसाने फुकट हवेत गोळीबार करून तो रिकामा झाला.

इकडं आपल्या गावातील माणसं धरून नेल्याची बातमी जवळपासच्या लोकांना समजली. तशी लोकांनी गावाकडे धूम ठोकली. आता कलेक्टर जिवंत सोडणार नाही याची त्यांना खात्री होती. कारण गावकऱ्यांनी पोलिसांची आठ दहा माणसे मारलेली होती. गावाबाहेर जिथं पोलिसांचा तंबू पडलेला होता तिथं ही माणसे पोहोचली. त्या ठिकाणी त्यांना आठ-दहा माणसाचे मुडदे जळलेल्या अवस्थेत दिसले. झालं, जे होते ते मोठमोठ्याने रडायला लागले. कोण म्हणतयं आमच्या आण्णाचा पाय असा होता, कोण म्हणतयं यांचे पाय असे होते. आपापल्यापरीने तर्कवितर्क लावून लोकांनी आपल्या तथाकथित पूर्वजांची तिथंच मूठमाती उरकून टाकली. पाहुण्या-रावळ्यांनी येऊन सांत्वन केले. मातीला आपला हात लागला नाही म्हणून दु:ख व्यक्त केले. वास्तविक पाहता ही अर्धवट जळालेली प्रेतं ही पहिल्या दिवशी मारलेल्या रझाकारांची होती तर पकडलेल्या लोकांना उस्मानाबादच्या पोलीस स्टेशनमध्ये नेण्यात आले होते.

तिसऱ्या दिवशी कावळ्याने घास शिवणे वगैरे सारा प्रकार व्यवस्थित पार पडला. पाहता-पाहता दहावा-अकरावा आला. आपल्या माणसाच्या विधीला हात लागावा म्हणून झाडून सारे पै पाहुणे जमा झालेले होते. प्रत्येकजण आठवणी काढून दु:खात सामील झालेला तर कारभाऱ्याच्या घरची परिस्थिती पाहण्या पलीकडे होती. अगोदरच घरावरचे छप्पर पोलिसांनी जाळलेले, त्यात आपल्या जिवाभावाचा माणूस गेल्याने हातातल्या बांगड्या आणि कपाळावरचे कुंकू पुसलेले होते. आता कसं होणार म्हणून जो तो चिंतेत होता. काळापुढे कुणाचे काय चालणार म्हणून तात्पुरत्या उभ्या केलेल्या खोपटात विधी पार पाडला जाऊ लागला. वेळ दुपारची होती. स्वयंपाकपाणी होऊन आता नैवेद्याची वेळ झालेली होती. तेवढ्यात काय आश्चर्य? एक पोरगं ओरडत आलं, दादा आलं, अण्णा आलं, भाऊसुदीक दिसत्यात. पोलिसांनी अटक करून उस्मानाबादला नेल्यानंतर दहा दिवस मारहाण करून त्यांच्याकडून लिहून घेतल्यानंतर त्यांची सुटका झाली होती. आतामात्र साक्षात दत्तमहाराज पावले म्हणून प्रत्येकाच्या आनंदाला पारावार उरला नव्हता. साऱ्या गावाने आनंद साजरा करत गेलेल्यांच्या उपस्थितीत गोड जेवण केले. जिवंतपणी दहावा घालण्याचा आणि दहाव्याच्या दिवशीच मेलेल्या माणसाने परत येण्याचा हा

प्रसंग खरंच मनाला चटका लावून जातो.

वाऱ्यासारखी ही बातमी सर्वत्र पसरली. सीमेवरील गावाकरिता नेहमीच धावून येणारे सोलापूरचे कलेक्टर संभाजीराव घाडगेसाहेब तातडीने चिलवडीत दाखल झाले. डोक्यावर काळा कपडा टाकत झापडीने फोटो काढून ते भारत सरकारला पाठविण्याची व्यवस्था घाटगेसाहेबांनी केली. कित्येक दिवस गावाकडे फिरकायला माणूस धजावायचा नाही. मग हळूळू परिस्थिती सावरायला लागली. पुन्हा एकदा गावात खोपटं उभारायला लागली. सरकारने प्रत्येकी ६ पत्रे देऊन लोकांची बोळवण केली. घरं उभारली पण घाबरलेल्या मनाचे काय? कित्येक दिवस लहान मुलं दचकून उठायची.

बायापोरांनी धीर सोडलातरी बापड्यांनी कंबर धरली. पुन्हा नव्या जोमाने गाव उभारला जाऊ लागला. पाहुण्यांनी कुळवकाटी, बैलबारदाना, बी-भरण आणि धीर देऊन चिलवडीच्या शेतात पुन्हा एकदा तिफन चालवली. नव्या अंकुराची नवी उभारणी तशी स्वातंत्र्याची खुमखुमी पुन्हा नव्या स्वरूपात पुढं यायला लागली. आता तर हे सरकार घालविल्याशिवाय चैन घ्यायची नाही अशी जणू शपथच साऱ्या गावाने घेतली आणि ते पुन्हा कामाला लागले.

हद्द ठरविण्यासाठी पांढरी फक्की मारावी लागते. परंतु जर शिरजोराला हद्द सांगायची असेल तर कोणत्या रंगाची फक्की मारावी? तोही प्रश्न चिलवडीकरांनी सोडविला होता. निजामाकरिता चिलवडीच्या आगीतली काळी फक्की आता घाटाखालची जणू हद्दच झाली होती. आता चिलवडीचं सोडा, चिलवडीच्या आसपासही निजामाच्या घोडयाच्या टापा वाजू द्यायच्या नाहीत असा निर्धार स्वातंत्र्य सैनिकांनी केला. सर्वत्र एकच आरोळी उठली भारतमाता की जय ऽऽ .

सारे झटून कामाला लागले. सारा लेव्ही थकली होती. आता तर भरायचाच नाय अशी सर्वांनी भूमिका मांडली. खेळ एवढ्यावरच थांबला नाही. गौडगाव परिसरातले करोडगिरी नाके, पोलीस स्टेशन, रझाकाराचे अड्डे उध्दवस्त करायला सुरुवात झाली. नान्नज, काटी, चौधरी मसले, आळणी अशी कितीतरी पोलीसठाणी बंद करून टाकण्यात आली. उर्दू शाळा बंद करून मराठी शाळा उघडण्यात आल्या. शाळेत मोठया जोशात प्रार्थना ऐकायला मिळू लागल्या , भारत माझा देश आहे, वंदे मातरम !

ही वाटचाल एवढ्यावरच थांबली नाही तर स्वातंत्र्यवीरांनी आता

निजामाचे शासन धुडकावून लावले आणि आपल्या स्वतंत्र सरकारची घोषणा करून टाकली आणि त्याला नाव दिले मुक्तापूर स्वराज्य ! याविषयी आपण सविस्तर चर्चा करणारच आहोत. तरीपण चिलवडीच्या घटनेमुळे आता लोकांची मानसिकता जिंकू किंवा मरू अशी झाल्याचे स्पष्टपणे दिसून येते. पुढे हळूहळू गावाने पुन्हा एकदा आपली उभारणी सुरू केली. सरकारनेही देताना कुठली कसर ठेवली नाही. तब्बल ६० च्यावर स्वातंत्र्य सैनिकांना केंद्राची पेन्शन मंजूर करण्यात आली.

चिलवडीचे दत्त महाराज काही गप्प बसलेले नव्हते. चिलवडीच्या जखमा बऱ्या झाल्या असल्यातरी त्याची निशानी कायम मनात सलत होती. 'भगवान के घर मे देर है, लेकिन अंधेर नही', हेच खरे. महंमद हैदरला हिंदी समजत असल्याने त्याला हिंदीतला हा दोहा पुढे चांगलाच उमजला.त्याचे कारण पुढे जेव्हा १४ सप्टेबर, १९४८ ला भारतीय फौजा उस्मानाबादमध्ये घुसल्या तेव्हा गोरगरीब जनतेशी लढणारे हैदरसाहेब आता पाठीला पाय लावून बेंबळीमार्गे हैद्राबादला पळाले. त्यांच्या दुष्ट कार्याची हिंदी सेनेने माहिती घेतली आणि हैद्राबाद स्वतंत्र झाल्यानंतर दुसऱ्याच दिवशी म्हणजे १८ सप्टेबरला हैदरला नौकरीतून बडतर्फ करण्यात आले. त्यानंतर जवळपास तीन महिने त्यांचा मुक्काम जेलमध्येच होता. पुढे त्याच्यावर जे वेगवेगळे खटले भरण्यात आले त्यात चिलवडीला डकैती म्हणजे लूटमार केली म्हणून खटला भरण्यात आला होता. पुढे एका प्रकरणात याचा आढावा आपण घेणारच आहोत. परंतु चिलवडीची विटंबना केली म्हणून त्याला सुख मिळाले नाही नोकरी तर गेलीच परंतु पुढे १९५६ पर्यंत दत्ताच्या फेऱ्या कराव्यात त्याप्रमाणे महमंदसाहेब कोर्टाच्या पायऱ्या झिजवत होते.

बुबासाहेब जाधव या वेळी १२ – १३ वर्षाचे असतील, त्यांनी हा लढा जवळून पाहिला होता. म्हणून सरकार–दरबारी न्याय मागण्यासाठी त्यांनी स्वत:च्या नावे न्यायालयात खटला भरला. आणि त्यात त्यांना यश येऊन २००५ ला साठ वर्षांनंतर चिलवडीच्या प्रत्येक घराला दोन लाखांची मदत जाहीर झाली. मोठ्या दिमाखात याचे वाटप झाले. विशेष म्हणजे एका कलेक्टरने गाव जाळले तर दुसऱ्या कलेक्टरच्या हस्ते गावाच्या पुनर्वसनाच्या रकमेचे वाटप व्हावे हा एक योगायोगच. या कामासाठी उस्मानाबादचे तत्कालीन कलेक्टर दत्तात्रय बनसोड यांनी भरपूर मेहनत घेऊन शासन दरबारी

चिलवडीकरांना न्याय मिळवून दिला. तर न्यायमूर्ती बी.एन.ऐशमुख काटीकर यांची गावावर कृपा झाली. गाव जाळायला निघालेल्या कलेक्टरने काय मिळविले ? त्याच्या गोळीने एकही स्वातंत्र सैनिक मेला नाही म्हणून निरपराधांवर गोळी चालविली. तर स्वत:चेच डझनभर सैनिक त्याला गमावावे लागले.

चिलवडी जळाली मात्र तिच्या आगीने स्वातंत्र्याचा वणवा पेटला आणि पाहता पाहता याने उग्र रूप धारण केले. जशास तसे अशी भाषा सुरू झाली. त्याचाच परिणाम अपसिंग्यावर हल्ला करण्याचा बेत आखण्यात आला.

***



स्वा.से.रामभाऊ जाधव, चिलवडी

# १३. देव धानोरा ते जळकं धानोरा

ढोकीवरून कळंबला निघालात की, गोविंदपूरच्यापुढे गेल्यावर रस्त्यापासून उजव्या हाताला एक किलोमीटर अंतरावर देव धानोरा गाव लागते. धानोऱ्याच्या इतिहासावर प्रकाश टाकताना असे दिसून आले की, गावाला जुना इतिहास असलातरी इथली वसतीमात्र तीनचारशे वर्षांपलीकडची नाही. गावाच्या जागेवर पुर्वी फार मोठे तळे असून आजही गावात कुठेही खोदकाम केले की, चार फूटांवर वाळू लागलीच म्हणून समजा. मोठा तलाव, त्याच्या बाजूला दहावीस एकरांवरची आंबराई, बाभळबन, भली मोठी वडाची झाडे रस्त्यावरून जाणायेणाऱ्याला थांबण्याकरिता मोहात पाडायची. एक वड तर एवढा मोठा होता की, त्याच्या विस्तारामुळे झाडाखाली अंधार पडायचा म्हणून लोक त्याला अंधाऱ्या वड म्हणायची. गावालगत दोन नद्यांचा संगम आणि त्यातून झुळूझुळू वाहणारे पाणी निसर्गाचे रूप उजळून टाकायचे.

गावाच्या प्राचीन अवशेषाचा बारकाईने आढावा घेतला असता गावात गोसाव्यांच्या २७ समाध्या सापडल्या. यावरून फार पूर्वी इथं दसनाम गोसाव्यांची वस्ती असावी. कठोर तपश्चर्या करून विविध विद्या प्राप्त करून घेण्यासाठी दूरदूरवरचे गोसावी इथं जमा व्हायचे. मोक्षप्राप्तीतून इच्छामरण घेण्यासाठी जिवंत समाधी घेतली जायची. यामुळे तळ्याकाठी कितीतरी समाध्या निर्माण झाल्या. पुढे इथे लोकांनी वस्ती केली असलीतरी आजही आपणाला कुणाच्या घरात तर कुणाच्या दारात, मंदिरात किंवा भर रस्त्यात अशा समाध्या दिसतील. गावात बसायला पार तो समाधीचाच आणि खेळताना लपायला जागी तीपण समाधीचीच. एकदा पोरांचा विटीदांडूचा खेळ रंगात आला असता विटी उडून मंदिराशेजारच्या वाघ्याच्या वाड्यातील समाधीच्या बाजूला पडली. विटी आणण्याकरिता गेलेल्या गुरवाच्या अनंताने विटी घेताना समाधीवर बारकाईने नजर टाकली तर समाधीच्या आत त्याला जटाधारी साधू

दिसला. महाराज! महाराज ! म्हणत अनंता बडबड करू लागला, भयंकर ताप येऊन संध्याकाळी अनंता अनंतात विलीन झाला. अशा काही चित्रविचित्र कथा इथं ऐकायला मिळतात.

गोसाव्याच्या वस्तीमुळे इथे एक म्हणही पडली होती, 'गोसायाची वस्ती अन् नमनारायण सस्ती' कारण गोसावी एकमेकाला भेटल्यानंतर नमस्काराऐवजी 'ओम नमनारायण' आणि दुसरा 'नारायण नारायण' असे संबोधतात. गोसाव्याच्या धुपाला भरपूर सरपण लागते म्हणून देव धानोऱ्यात सरपण पुरत नाही अशी नेहमीची ओरड असते. गुरुशिष्य परंपरेतून ज्ञानाची पारख आणि कधीकधी यातून होणारी चढाओढ यामुळे तंत्रमंत्र असे महाभयानक प्रकार अनुभवायला मिळायचे.

असेच एकदा इथे राहणारे रेवापुरीबुवा आणि त्यांच्या सहकाऱ्यांत कशावरून तरी जुंपली. आणि त्यांच्या विरोधकाने रेविपुरीबुवावर मूठ मारून त्यांच्या देहाचे तुकडे केले. त्यांचे अवशेष जिथं पडले त्यावरून आजूबाजूच्या वस्तीला तशीच नावं पडली. जिथं शिर पडला ते शिरपूर, डोळा पडला ते डोळा पिंपळगाव, जिथं बुवाचा कोथळा पडले ते कोथळा गाव आणि जे शिल्लक घड राहिले ते धानोरा. दसनाम गोसाव्यांमुळे इथं माहूरच्या देवीचे ठाणे आले. तर प्राचीन काळापासून महादेवाचा तहसीलदार जो खंड वसूल करतो तो खंडोबा! तळ्याकाठी विराजमान होता. अशा रितीने तळ्याकाठी साक्षात देवांची वस्ती पडली म्हणून गावाला नाव पडले देव धानोरा.

मोगल कालखंडात बैलांवरून सैन्याला रसद पुरविणारी वंजारीमंडळी औरंगजेबासोबत राजस्थानातून मराठी मुलूखात आली आणि स्वातंत्र्य युद्धातील मराठ्यांच्या गनिमीकाव्यामुळे मोगलांचीच दैना उडाली म्हणून ती मंडळी शेवटी माळावर पाणी बघून इथंच राहिली. अशाच बहुसंख्य वंजाऱ्याचे गाव म्हणजे देव धानोरा.त्यामुळे धानोऱ्याची वस्ती तीनचारशे वर्षांपलिकडची नाही हे सिद्ध झाले आहे.

खंडोबा कुलदैवत मानून सर्वजण त्याची मनोभावे पूजा करतात. दरवर्षी चंपाषष्ठीला इथं मोठी यात्रा भरते. पूर्वी प्रत्येक गावाला पैलवानांची परंपरा होती. नव्हे तर गावाची ओळखच पैलवानाच्या नावावरून व्हायची. त्याप्रमाणे धानोऱ्याच्या पंचक्रोशीत नारायण किसन बोंदर, विठ्ठल वामन बोंदर, जनार्दन विठ्ठल बोंदर, ज्ञानोबा धनगर, जगन्नाथ मोतीराम बोंदर, ज्ञानबा सुतार

यांसारखे कसलेले पैलवान होते. तर गोफणीने कुठलीही शिकार सहजपणे टिपणारे भागवत बोंदर, बळवंत बोंदर, नारायण घाडगे असे नेमबाज तरुण इथं होते. कुठल्याही फडात गेले की, कुस्ती हाणावी ती देव धानोऱ्याच्या पोरांनीच. याचा एक फायदाही होता, तो म्हणजे गावाकडे वाकड्या नजरेने पाहायची कुणाची हिंमत व्हायची नाही.

पाण्यामुळे शेतीचे उपन्न भारी. तर गुलाबचंद मारवाड्यामुळे धानोऱ्याला बाजारपेठेचे रूप आलेले. हजार हजार पोती धान्य साठवून तो शहराच्या बाजारात पाठवायचा. यासोबतच किराणा, कापड आणि इतर अनेक वस्तूंचा व्यापार एवढा मोठा होता की, खरेदीसाठी त्याचे मुनीम हैद्राबाद, मुंबई इथंपर्यंत जायचे. धानोऱ्यात भरणारा शनिवारचा बाजार सुरक्षिततेसाठी आणि होलसेलसाठी प्रसिद्ध असल्याने मोठी गर्दी व्हायची. गावचे रंगनाथ पाटील आपल्या कचेरीतून गावचा निवाडा करायचे. बाजारातही त्यांचा मोठा धाक होता. तर गावच्या राखणाला मांगाचा आप्पाराव थोरात असल्याने गाव निवांत झोपायचा. खंडोबाच्या यात्रेत माणसाने भरलेल्या ११ बैलगाड्या ओढणारा विठ्ठल थोरात मांग गावाची ताकत होती. अशा प्रकारे तन म्हणजे शरीर, मन म्हणजे निग्रह आणि धन म्हणजे संपत्ती अशा सर्वच बाजूने देवाचे धानोरा खुशालीत नांदत होते.

जुनी एक म्हण आहे, गरिबाच्या घरी सुंदर मुलगी जन्मली की अडचणी वाढतात म्हणे. त्याप्रमाणे धानोऱ्याचे वैभव हीच मोठी अडचण ठरली. पाहतापाहता भारत स्वतंत्र झाला आणि मराठवाड्यात निजामाचा हैदोस सुरू झाला. रझाकारांच्या टोळ्या सर्वत्र धुडगूस घालत असताना गुलाबचंद मारवाडी आर्य समाजाच्या झेंड्याखाली गावात प्रभातफेरी काढून भारतमातेचा जयघोष करायचे. संपत्तीबरोबरच मनाची संपत्तीही या गावाने जपली होती.

केवड्याच्या बनाचा वास सर्वत्र दरवळत असतो. त्याच वेळी त्या परिसरात नागाची मोठी वस्ती असते म्हणतात. हे बिरूद या गावाला लागू पडलं. कारण धानोऱ्यापासून दोन मैलांवर असणाऱ्या बोरवंटीत रझाकारांचा म्होरक्या कासिम रझवीचा भाच्चा गुंडूपाशा नागाच्या रूपात वाढत होता. काळाभोर गुंडूपाशा तेवढाच बुटका परंतु करारी होता. त्याचा साथीदार शेख मकबूल होता. घोड्यावरची स्वारी आणि शंभर माणसांतून पाहिजे त्याला बरोबर टिपणारा पाशा बंदुकीशिवाय कधी फिरत नव्हता. मामाप्रमाणे सर्वसामान्यांची

लूट आणि दहशत असल्याने कळंबच्या पंचक्रोशीत गुंडूपाशाचा मोठा दरारा होता. काही केलेतरी पोलीस त्याच्या बाजूला आणि कोर्टात गेले तर मामा सोडवायला. त्यामुळे गुंडूपाशा मस्तवाल झालेला होता.

बाहेर दहशत असलीतरी पैलवानांच्या धानोऱ्याला तो दचकूनच होता. माणसाला विषानेच मारावे असे काही नाही. गुळानेही मारता येते म्हणतात. त्याप्रमाणे पाशाने अगोदर गावात उठबस सुरू केली. गावचाच विठ्ठल बापू आगवान त्याचा घरापर्यंतचा दोस्त झाला होता. खाण्यापिण्यापासून ते सर्वकाही मिळत असल्याने पाशा जरा जास्तच मिसळला होता. त्याच वेळी पैलवानांना खुश करण्यासाठी धानोऱ्याचा पैलवान जिंकला की, तो जागेवरच मोठे बक्षिस तर द्यायचाच परंतु त्याच वेळी हवेत फायरिंग करायचा. लोकांना त्याचे मोठे कौतुक वाटायचे. अशा रितीने गावात नको तिथे हात घातल्यावरही त्याला त्यांच्या मनाला कधी शिवता आले नाही. गुंडूपाशाचे गावात कौतुक असलेतरी सर्वजण चार हात दूर ठेवूनच त्याच्याशी वागायचे. बाहेरचे त्याचे धंदे सर्वांना माहीत असलेतरी आपणाला त्रास देत नाही म्हणून गावात त्याला विरोध नव्हता.

लांडग्याशी दोस्ती नसलीतरी चालेल मात्र दुश्मनी चालणार नाही. याचा अनुभव देवधानोऱ्याच्या लोकांना लगेच आला. गुंडूपाशाचे गुंड आणि रझाकारांनी एकदा शेजारच्या गोविंदपूरवर हल्ला करून लुटालूट सुरू केली. तेव्हा गोविंदपूरचा शाहूराव मुंडे मधल्या वाटेने पळतपळत देवधानोऱ्यात आला आणि गावाला वाचविण्यासाठी लोकांना विनंती करायला लागला. पैलवानांचे रक्त अन्यायाविरूद्ध खवळत असतेच. शाहूरावचा निरोप मिळताच गावातील पाचपन्नास पैलवान गोविंदपूरच्या रक्षणासाठी धावून गेले. धानोऱ्याचे पैलवान आल्याचे कळताच रझाकारांनी तेथून पळ काढला. मात्र या घटनेने गुंडूपाशाची सटकली. आतापर्यंत आपण या गावाला एवढे सांभाळले आणि आता ते आमच्याच आड येताहेत म्हटल्यानंतर गावालाच आडवे करावे असा आडवाउभा विचार तो करायला लागला.

काळ घोंगावत असताना तो वेळेची वाट पाहत असतो. आता हा काळ देवधानोऱ्यावर घिरट्या घालायला लागला. त्यांनी जणू प्रत्यक्षात यमाच्या रेड्यालाच अव्हान दिले. अव्हान हे नेहमी ठरवूनच दिलेले असते त्यामुळे देणाऱ्याला त्याची कधीच चिंता नसते. गुंडूपाशा आतून जाम खवळला होता. याची माहिती खरं तर गावातील त्याच्या काही खास माणसाला असावी. मात्र

तोही आता गावचा तमाशा बघायला सज्ज झाला होता. बस्स! पाशाची सर्व तयारी झालेलीच होती, आता फक्त संधीची वाट पाहयचा अवकाश होता. वणवा आणि जंगल यांच्यात आता काही क्षणाचेच अंतर होते. आणि वणवा एकदा का लागला की तो सहजासहजी विझत नाही. याची प्रचिती धानोरकरांना आता येणार होती.

नेहमीप्रमाणे शनिवारचा बाजार भरलेला. त्या दिवशीची तारीख होती १७ एप्रिल, १९४८. आज रामनवमी असल्याने जो तो लवकरात लवकरात बाजार करून घराकडे जायला उत्सुक होता. बाजार म्हटले की, तिथं माले पाटील आलेच. निजाम दरबारात कुठल्याही गावात दोन पाटील असायचे, एक पोलीस पाटील आणि दुसरा माले पाटील. फौजदारी गुन्हे पोलीस पाटलाकडे तर दिवाणी माले पाटलाकडे. त्यामुळे बाजारचा सारा तोच जमा करणार. साहजिकच धानोऱ्याचे रंगनाथ पाटील तेथे हजर होते. पाटील हजर असला की, लोक वचकून असायचे. बाजारात खरेदीची लगबग चाललेली, काळ सुकाळाचा होता. बाजारातही तेवढीच स्वस्ताई असायची. एक टुकडा नेला की काहीही घेतलेतरी पैसे संपायचे नाहीत. कापड, मसाला, तेल सारं काही स्वस्त. माळव्याला तर कोणी खातसुद्धा नव्हतं. माणसाच्या उंचीएवढा चिवड्याचा ढिगारा बघितला की, पोरं आईबापाच्या मागे लागायची. ही होती बाजारची अवस्था.

सकाळच्या ९ ते १० ची वेळ. चारपाच शेतकरी आपली बैलगाडी घेऊन बाजारात दाखल झाले. कुठलाही माल नाही की कुठली पिशवी नाही. मग ही माणसं काय खरेदी करायला आली होती? त्यांनी इकडेतिकडे पाहिले तर त्यांना समोरच पाटील दिसले. पाटलांनी त्यांना हटकले. कोण रे तुम्ही ? अन् इथं काय करायला आलाव ? एकाने उत्तर दिले, पाटील आमी बारीवाले! तुमच्या गावात बारी लावायची हाय. आमच्या बाया मागणं येताहेत. देवाचे धानोरे आणि त्यातही सारं गाव पंढरीच्या पांडुरंगाला न चुकता वारी करणारं. पाटलाचं टाळकंच हालल. अजिबात नाय. या गावात बायाच काय, तर गड्यालासुदिक नाचू देणार नाही.

बारीवाले साधेसुधे नव्हते तर शेतकऱ्याच्या वेषात रझाकार, गुंडूपाशाचे गुंड आणि कळंब पोलीस स्टेशनचा एक पोलीस म्हणजे अमिनही त्यात होता. गाडी वरून कडबा तर त्याच्याखाली हत्यारं होती. बैलगाडी नुसती

चिनगारी होती तर आग अजून बाकी होती. त्यांना पुढे करून गुंडूपाशा गावच्या मागच्या बाजूने नेहमीच्या घरी येऊन दाखल झाला होता. पंढरीचा विठोबा माणसाला पापापासून मुक्ती मिळवून देतो तर इथला विठोबा पाप करायला प्रवृत्त करतोय. हा माणसातला अन् देवातला फरक आहे. याच वेळी शेकडो रझाकार गावाला वेढा टाकत टाकत पुढे यायला लागले होते. बाजारात बारीवाले आणि पाटील यांच्यात कुरबूर सुरू झाली. गाडीतल्या लोकांना बारी नाही तर गावाचा तमाशाा करायचा होता. म्हणून ते कारण काढून भांडायला लागले. प्रकरण हमरीतुमरीवर गेलं.

बघताबघता एकाने काठी काढून पाटलावर वार केला. पाटलाने तो घाव हातावर घेतला. मात्र त्यात पाटलाला जबर मार बसल्याने हात मोडून रक्ताची धार लागली. गावाला ही गोष्ट कळली की, बाजारात मारामारी सुरू झाली आहे. तेव्हा गावातले मन्मथ वाणी, कृष्णा माने, ग्यानबा मिरगणे, मारुती गायकवाड, देवराय शेवाळे, जनार्दन बोंदर ही मंडळी बाजारकडे धावली. पाटलाला मारणाऱ्या अमिनकडे पाहिल्यानंतर जनार्दनबापूचं डोकंच भडकलं. त्यांनी गाडीत काय मिळतंय का म्हणून बघायला सुरुवात केली तर कडब्याखाली बंदुका दिसल्या. बापूने बंदूक उचलली आणि आपल्या पद्धतीने ती फिरवून अमिनच्या डोक्यात घातली. रक्ताची चिळकांडी उडाली. रझाकार अन् गावकरी यांच्यातील भांडण आता टोकाला पोहोचले.

गावात खबर गेली तसा गुंडूपाशा तयारीतच होता. खांद्यावर काडतुसाचा पट्टा आणि हातात बंदूक घेऊन तो बाजारच्या दिशेने पळत सुटला. गावकऱ्यांच्या नरडीचा घोट घेत असताना हातात नंगी तलवार घेऊन गावचाच एकजण कायम त्याच्या संरक्षणासाठी मागे उभा होता. गावात आणि नावात देव असला म्हणून काय? माणूस देव होत नसतो. पाशा बंदूक घेऊन बाजारच्या दिशेने पळत सुटला. वाटेत चावडीच्या आडावर त्यांना बोंदराचा नारायण भेटला. नारायण नावाप्रमाणे भोळा निघाला. तो पाशाला कवळ्यात धरून उचलून आडात टाकायला निघाला. गुंडूपाशाने विनंती केली, मित्रा मला जीवदान दे. बस्स ! हिंदूच्या मनाने इथंच मार खाल्ला आहे. तराईच्या युद्धात पृथ्वीराज चौहानने महमंद घोरीला सोडण्याची केलेली चूक इथल्या नारायणाने केली.

पुढे होऊन गुंडूपाशाने बाजारचे दृश्य पाहिले. आणि कसलेल्या

शिकाऱ्याप्रमाणे त्याने पोझीशन घेऊन आता सावज टिपण्यासाठी नेम धरला. आपल्याच गावचा एक बहाद्दर त्याच्या रक्षणासाठी तलवारीचे छत्र धरून अजूनही उभाच होता, हे आता वेगळे सांगायला नको. बाजारात कोण कोणाला मारतंय हे कळायला मार्ग नव्हता. समोरून सारं काही पाहणारा गुंडूपाशाचे कृष्णराव मान्यांशी तसे चांगले संबंध. मात्र शिकारी एका दगडात दोन पक्षी मारण्याचा नेहमीच प्रयत्न करतो, त्याप्रमाणे माने समोर दिसताच तेवढ्या गर्दीतही गुंडूपाशाने आपल्या बंदुकीचा बार भरून चाफ ओढला. सूंसूं करत निघालेली गोळी अगदी कृष्णा मानेचे नाव कोरल्याप्रमाणे त्याच्या हनवटीला छेदून बाहेर गेली. तसा कृष्णा माने चारपाच फूट हवेत उडून कायमचा जमिनीवर पडला. पोलिसापेक्षा चोराचा नेम चांगला असतो म्हणतात ना? हेच खरे.

गोळीबारामुळे जोतो सैरावैरा पळायला लागला. तसे गुंडूपाशाने आपणाला हवी असणारी शिकार टिपायला सरुवात केली. बस्स ! गुंडूपाशाकडे प्रत्येकाच्या नावाची गोळी जणू तयारच होती. त्याने दाजी बुधवंताच्या पोटात गोळी घातली तेव्हा पोटातला कोथळा सावरत दाजी घराकडे पळाले. कुणाला कळायचा आत घरातल्या शेंगाच्या ढिगाऱ्यावर जाऊन या शेतकऱ्याने आपले प्राण सोडले. तीच अवस्था व्यंकटेश बोंदराची झाली, अंगातली गोळी घेऊन ते घरातल्या न्हानीत पडलेले घरच्यांना समजलेसुद्धा नाही. गल्लीबोळातून पळणाऱ्यांनी त्यांना पाणी पाजले मात्र ते शेवटचेच. या प्रकारे त्या यमाने बाजारातच पाचसहा जणांचा मुडदा पाडला. गावातील लहानथोर दिसेल त्या वाटेने पळायला लागली.

आता वेळ होती ऐकेकाला टिपून मारण्याची. मी तुझ्यासाठी सारं काही करतोय म्हटल्यावर माझं एवढंतरी काम करावं अशी गावातील खबऱ्याची अपेक्षा. आपल्या घरापुढे राहणारा वटाणे नेहमीच आपणाशी भांडतो म्हणून खबऱ्याने पाशाला घराकडे आणले. गल्लीबोळं चिडीचूप होती. सर्वांनी दरवाजे बंद केलेले, तर हा यमदूत भररस्त्याने निघालेला. वाटेत ग्यानबाचे घर होते. ग्यानबाला दोन बायका म्हटल्यावर काळजी जरा जास्तच. बायांनी त्याला घरात कोंडून ठेवल्याने रस्त्यावर चाललेली गावची राखरांगोळी त्याला सहन झाली नाही. त्याने बायाला मागे लोटले आणि दरवाजा मोडतच वाक्य उच्चारले, माझ्या गावावर काळ आला असता गप्प बसायला मी काय गुंडूपाशाचा भडवा नाही. रस्त्यातून जाणाऱ्या रझाकाराला एका काठीत ग्यानबानं आडवं केलं. पण

काळ त्याच्या मागे उभा होता. दुसऱ्या रझाकाराने ग्यानबाच्या पाठीची चाळणी केली. पुढे जाऊन खबऱ्याच्या मर्जीसाठी गुंडूपाशाने रामनवमीसाठी शेतातून घरी आलेल्या लक्ष्मण आणि आंबू वटाणे यांना गोळ्या घातल्या.अशा प्रकारे सात आठ लोकांना गोळ्या घालून गुंडूपाशाने पहिला दिवस आपल्या नावावर केला.

गावात स्मशान शांतता पसरली. सारं गाव रिकामं झालं. कोण गोविंदपूरला, कोण ढोकीला गेलं. जखमी झालेले देवराव शेवाळे, जयवंत बोंदर, दत्तू आणि मारुती गायकवाड, दासा गुरव यांना गोळ्या लागल्याने बैलगाडीतून बार्शीच्या हिरेमठ हॉस्पिटलला दाखल केले. रस्त्याने रक्ताची धार लागलेली होती. त्यामुळे जणू धानोऱ्याला आता देवानेही वाऱ्यावर सोडलं होतं. तर गुंडूपाशाच्या भीतीने आसपासचे पाहुणेही त्यांना आश्रय द्यायला तयार नव्हते. सारं गाव फाकलं, कोण कुठं गेलं कुणालाच माहिती नाही. पानिपतच्या रणसंग्रामाप्रमाणे धानोऱ्याची अवस्था झाली. रात्र झाली. गिधाडं फिरावी तशी रझाकार घराघरांत घुसले. रोख पैसे, किडुकमिडूक सोनं, सारं काही ओरबाडलं. परंतु मराठ्यांना आपली इज्जत सोन्यापेक्षा भारी असते याची प्रचिती देव धानोऱ्याने दिली. सारं काही सोडून अख्खा गाव पसार झाला होता.

दुसऱ्या दिवशी म्हणजे १८ एप्रिल, १९४८ सकाळी ९ च्या दरम्यान कळंबमधील रझाकारांचे प्रमुख नबाब शरीफ यांनी आपल्या होलसेल दुकानातून एक ट्रकभर घासलेट देऊन आणखी ज्यादा कुमक पाठविली. गावाबाहेर ट्रक थांबला. कुठंतरी लपून बसलेले जगन्नाथ बोंदर हळूच ट्रकजवळ आले आणि त्यांनी ट्रक चालू करायचा हँडल काढून तो भटणीच्या आडात टाकून दिला. तेव्हा रझाकारांनी बैलाने ओढत आपली गाडी गावाबाहेर नेली.

धानोऱ्याची चर्चा कानोकानी दूरवर गेली होती. धारूर तालुक्यातील घागरवाडीची एक मुलगी धानोऱ्यात दिली होती. आपल्या बहिणीचे गाव जाळले म्हणून तिचा सैन्यात असलेला भाऊ राम नागरगोजे संरक्षण म्हणून अगदी पोषाखात भेटायला आला. परंतु रझाकारांना वाटले की, भारतीय सैन्यच आले किंवा काय म्हणून त्यांनी त्या मिलीटेरीवाल्याला गोळी घातली.

घासलेटचे १०० डबे घेऊन रझाकार गावात घुसले. माणसं गेली, आता निवाऱ्याची बारी होती. जेजे सापडेल ते ओरबाडले आणि दुसऱ्याने लगेच बोळ्याने तेल टाकायला सुरुवात केली. काडीने आपले काम चोख बजावले, तसे देव धानोरा उभ्याने जळायला लागले. गावात एक खण माळवद शिल्लक

राहिले नाही. सारं काही जळून खाक झालं होतं. आपला आवडता माणूस, बैल, कुत्रं, शेळी मेंढी सारं काही संपलं होतं. धुराचे लोट लांबलांबपर्यंत दिसत होते. पाटलाची गढी उंचावर असल्याने त्यात ठेवलेला गूळ आगीने पगळला आणि त्याचा पाट नदीपर्यंत गेला.अशाही अवस्थेत गावची राखण करणारा मांगाचा आप्पा थोरात गढीच्या आत लपलेला होता. तो शेवटपर्यंत रझाकारांना सापडला नाही. पुढे सहा महिने माणूस म्हणून गावाकडे फिरकला नाही. मृग निघालातरी त्या वर्षीची पेरणी झाली नाही.

गावची ही माणसं शहीद झाली.

१. भिमराव गोविंद मिटकरी,

२. येडबा तुकाराम थोरात,

३. ईसा थोरात,

४. मल्हारी धनगर,

५. मनोहर रघुनाथ पाठक,

६. मन्मथ शिवराम बिडवे,

७. दाजी तुका बुधवंत,

८. विठ्ठल केशव बोंदर,

९. व्यंकट रावजी बोंदर,

१०. कृष्णा गेनबा माने,

११. ग्यानबा यशवंता मिरगणे,

१२. लक्ष्मण बापू वटाणे,

१३. अंबू बापू वटाणे,

१४. रामभाऊ शहाजी नागरगोजे

माणसं गेली म्हणून पैलवानांनी अजून धीर सोडलेला नव्हता. एके दिवशी आपल्या रॉकेलने काय करामत केली हे बघायला कळंबचा नबाब देवधानोऱ्यात आला. तेव्हा शेतात दबलेल्या काहीजणांनी त्याला घेरलं आणि पाहिजे त्याप्रमाणात बदडून जळकं गाव दाखविण्यासाठी जनावर मेल्यावर जसं ओढतात त्याप्रमाणे ओरबाडत गावात फिरविलं. त्याला मारायचं ठरवलं तेव्हा एकाने सल्ला दिला की, हे मेल्यावर गावाला भूत होऊन लागेल म्हणून शिवेवर

नेऊन त्याचे एका घावात दोन तुकडे केले.

गावाला जाळणारा गुंडूपाशा पुढे धनेगावच्या एका वाण्याच्या दुकानदाराने माहिती दिल्यामुळे नायगावच्या शिवारात लोकांनी ठेचून मारला. ही वार्ता लागताच देवधानोऱ्यातील लोक धावून गेले आणि त्यांनी त्याच्या चार साथीदारांना पकडून गावात आणून जळलेल्या गावाच्यासाक्षीने चिरून टाकले. तेव्हा कुठं गावाला आणि माणसाला समाधान लाभलं. आता रझाकार संपलेतरी शासन दरबारी लढा चालू झाला. कारण हा लढा देशासाठी होता, राज्यासाठी नाही. म्हणून राज्य की केंद्र हे ठरविण्यात ४० वर्षे गेली. आपले उपोषण वगैरे मार्ग अवलंबवत शेवटी ११९ पैकी ४५ लोकांना राज्याची तर ५ लोकांना केंद्राची पेन्शन मंजूर झाली. गावच्या नुकसान भरपाईसाठी २००५ पर्यंत वाट पाहवी लागली. दोन टप्प्यांत मिळून १३० घरांना प्रत्येकी २ लाखांची मदत मिळाली.

गाव जळाला, माणसं मेली, तरी माणुसकी जिवंत होती. गावचे ग्रामदैवत खंडोबाची यात्रा पुन्हा भरू लागली. सटीला नऊ दिवसांचे घट आणि त्यानंतर लंगर तोडण्याचा कार्यक्रम जोरात सुरू झाले. साखळी दगडावर आपटून तिची कडी तुटली की त्यावरून गावाचे पुढील भविष्य वर्तविले जाते. कधी लंगर लवकर तर कधी दुसऱ्या दिवसापर्यंत झटून तुटतो. परंतु आज गावाने पुन्हा एकदा उभारी घेतली आहे. रझाकाराच्या तावडीतून सुटलेला आप्पाराव पुढे तमाशात गेला आणि स्वत:ची पार्टी घेऊनच गावाकडे आला. या परिसरात त्याच्या पार्टीचा मोठा दबदबा होता. गावालाही त्याचा अभिमान होता. परंतु या ठिकाणी एक प्रश्न उपस्थित झाला की, बारीसाठी पडलेले मुडदे विसरून गावाने आपल्यातल्या बारीवाल्याला मात्र अभयदान दिले हे मात्र जरा विशेषच म्हणावे लागेल. या घटनेतून माणसाचा स्वभाव बदलला, तसं गावाचं नावही बदललं. कारण यामुळे देवधानोरा हे 'जळकं धानोरा' या नावाने प्रसिद्ध झाले आहे.

***

# १४. उपळा मर्डर केस

उस्मानाबाद जिल्हा हा निजामाचा सर्फेखास जिल्हा म्हणून परिचित होता.स्वातंत्र्यापूर्वी लातूर जिल्ह्याचा समावेश असल्याने उस्मानाबादच्या सीमा या नांदेडपर्यंत विस्तारित झालेल्या असल्यातरी उस्मानाबादलगतची वाघोली, काजळा आणि उपळा यांसारखी गावे सोलापूर जिल्ह्यात मोडत असल्याने ती हैद्राबाद संस्थानात मोडत नव्हती. उपळे म्हटले की, माकडाचे हा शब्द आपसूकच तोंडामध्ये येऊन जातो. माकड म्हटले की रामायणातील रामभक्त हनुमानाची आठवण येते. त्यामुळेच कदाचित उस्मानाबादच्या पश्चिमेला रामनाथाचे उपळे आहे तर पूर्वेला माकडाचे उपळे आहे.

उपळ्याला माकडाचा संदर्भ कोठून चिकटला हे निश्चितपणे माहीत नसलेतरी फार पूर्वीपासून उपळ्यामध्ये माकडांचा वावर आहे हे निश्चित आहे. गावच्या प्राचीनत्वाचा अभ्यास करायचा झाल्यास उपळ्यात हेमाडपंथी शैलीची मंदिरे आहेत. ज्यांचा कालखंड हा हजार वर्षांपर्यंत जातो. त्याचसोबत गावच्या वेशीतून आत गेल्यानंतर एक प्राचीन बारव लागतो. या बारवे लगत महादेवाचे मंदिर आणि उपळेकर महाराजांची समाधी आहे. मात्र हे उपळेकर कोण? याविषयी कोणालाही माहिती नाही. यासोबत उपळ्यात प्राचीन राममंदिर आहे, याचा संबंध माकडाशी लागू शकतो.

उपळ्याच्या जवळच निसर्गरम्य वातावरणातील रामलिंग आहे. या स्थळाचा संबंध थेट रामायणाशी जोडला जातो. त्यातून रामाच्या लंका प्रवासात उपळ्याचा संबंध आलेला असू शकतो. त्यामुळेच या वाटेवर रामाचे परमभक्त सैनिक माकडे राहिली असावीत, असे दिसून येते. संदर्भ कुठलाही असू देत. उपळ्यामध्ये फार पूर्वीपासून माकडांची वस्ती होती, हे मात्र निश्चित आहे. गावच्या वेशीलगत भले मोठे पिंपळाचे झाडे होते. या झाडालगत गावकऱ्यांनी दोन मजली माडी खास माकडाकरिता बांधून दिली होती. याच ठिकाणी

माकडांची वस्ती होती.

माकड म्हटल्यानंतर सर्वसामान्यांना त्याची भीती वाटत असली तरी उपळ्यातील माकडे माणसांत मिसळून गेलेली होती. माकडांपासून कधी कोणाला त्रास झाल्याचे ऐकिवात नाही. खरं तर माकडाला आपलं मानून चालणाऱ्या उपळ्याने माकडाला आपले दैवतच मानले होते. त्यामुळे लग्न असो की एखादा सणसमारंभ माकडाला आहेर चढविल्याशिवाय पुढच्या कार्यक्रमाला सरुवात व्हायची नाही. मंडप वगैरे टाकून माणसांची लगबग वाढली की, मानाच्या आहेराकरिता माकडे माणसात येऊन बसायची. अगदी गंध, टिळा लावून टॉवेल टोपी घालून प्रसाद दिल्यानंतर ती निघून जायची. उपळेकरांची माकडावर अफाट श्रद्धा होती. त्यामुळे एका भक्ताने तर माकडाला चक्क सोन्याची अंगठी घातली होती. बरेच दिवस ती त्याच्या हातात असल्याने लोकही त्याला 'मुद्या माकड' म्हणून ओळखायचे.

उपळ्याच्या माकडाचा महिमा दूरपर्यंत पसरलेला असावा. कारण १७८० साली सोलापूर जिल्ह्याचे तत्कालीन कलेक्टर स्प्रे यांनी सर्व्हे नं. गट न.२३४ मधील ३३.५ एकर जमीन माकडाच्या देखभालीसाठी इनाम करून दिली होती. उपळ्याचे पाटील आणि कुलकर्णी यांच्या मार्गदर्शनाखाली रामा सातलिंगप्पा घोंगडे यांच्याकडे कसण्याकरिता ती देण्यात आल्याचा उल्लेख एका सनदेत सापडतो. यावरून उपळ्याचा माकडाशी पूर्वीपासूनच स्नेहभाव होता हे स्पष्ट होते. मध्यंतरी दुष्काळ पडला आणि गावातील माकडे गायब झाली. परंतु गावातील कर्त्या माणसांनी पुन्हा एकदा माकडांना गावात आणून लळा लावल्याने उपळ्यात रामराज्याची संकल्पना देणाऱ्या माकडांची वस्ती आहे.

संपूर्ण मराठवाडा निजाम राजवटीचे चटके खात असतानाच उस्मानाबाद शहरालगतचे उपळा मात्र इंग्रजाकडून अखंड भारताबरोबर स्वतंत्र झाले. आपण स्वत: व्यवस्थित असून भागत नाही तर आपला शेजारीसुध्दा तेवढाच चांगला असणे हा नशिबाचा भाग लागतो. उपळ्याच्या चारही बाजूंनी निजामाची राजवट होती. तर गड, आळणी, शिंगोली या हाकेच्या अंतरावरील गावांत हैद्राबाद संस्थानचे करोडगिरी नाके होते. याच परिसरात उपळेकरांच्या शेतजमिनी असल्याने अप्रत्यक्ष संबंध हा आलाच. परंतु तरीही काही कुरबुर घडलीच तर इंग्रजांच्या भितीने उपळेकरांना कुठलाही त्रास होत नव्हता.

१९४७ ला भारतभर स्वातंत्र्याचे वारे वाहात असताना उपळेकरांना

अखंड हिंदूस्थानासोबत स्वातंत्र्य मिळून गेले. परंतु वर उल्लेख केल्यानुसार आपण व्यवस्थित असलो तरी उपळेकरांना निजाम राजवटीचा त्रास व्हायला लागला. निजाम राजवट उपळेकरांना परराज्यातील समजत असलीतरी उपळ्याची माती ही मराठी मनाची माती होती हे विसरता येणार नव्हते. त्यामुळे उस्मानाबादची मुलगी उपळ्याची सून होती तर उपळ्याची मुलगी चिलवडीत दिलेली असल्याने अंतर्गत जिव्हाळ्याचे संबंध कोणी तोडू शकत नव्हते. त्यामुळे हैद्राबाद संस्थानातील आपल्या पै पाहुण्यांना त्रास झाल्यावर उपळेकरांच्या मनाला जखम ही होणारच.

१९४७-४८ ला हैद्राबाद संस्थानात मोठ्या हालचाली सुरू झाल्या. निजामाच्या विरोधात जो जनक्षोभ उसळला त्यात उस्मानाबाद जिल्हा आघाडीवर होता. निजाम संस्थानाचे अनेक रस्ते सोलापूर जिल्ह्यातून जात असल्याने थोड्याफार प्रमाणात संघर्ष हा होतच होता. त्यातच उस्मानाबाद जिल्ह्याचे कलेक्टर म्हणून महमंद हैदरची नियुक्ती झाली. हैदरने दडपशाहीचे धोरण आखल्यामुळे जिल्ह्यात अनेक ठिकाणी खून, जाळपोळ आणि लुटालुटीला सुरुवात झाली. उपळ्याचे संरक्षण करण्याकरिता पांगरी पोलीस ठाणे होते. शिवाय गावपातळीवर संरक्षणासाठी रत्नागिरी पोलीस ठाण्याचे काही पोलीस उपळ्यात ठेवण्यात आले होते. उस्मानाबाद जिल्ह्यात गुन्हा करून आरोपी उपळ्यात असेल तर नियमाप्रमाणे निजाम पोलीस त्यांना पकडू शकत नव्हते. त्यामुळे निजाम पोलिसांचा उपळेकरांवर दात होता.

दुसऱ्या बाजूला आळणी आणि गडावरील नाके जवळच असल्याने उपळेकरांची त्यांच्याशी कुरबुर व्हायची. २१ मे, १९४८ ला उपळ्याचे श्री. भगवान आप्पा भोरे हे आळणी नाक्यावरून जात असताना तेथील रझाकारांनी त्यांना पकडून नाहकपणे मारहाण केली. स्वातंत्र्यानंतर केस नं. ५०१३ पी.एफ. १०८/३/४८ दिनांक ११ जून, १९४८ नुसार भोऱ्यांची केस कोर्टात चालली. गावच्या लोकांपेक्षा आपल्या पाहुण्यांच्या गावकऱ्यांना होणारा त्रास उपळेकरमंडळी उघड्या डोळ्यांनी पाहत होती. शेजारी अन्याय होत असताना तो उघड्या डोळ्यांनी पाहून गप्प बसेल तर तो मराठा कसला ?

सोलापूरहून औरंगाबादला जाणारा मुख्य रस्ता हा उपळ्यावरुनच जातो. या रस्त्यावरून निझाम लष्कराच्या अधिकाऱ्यांच्या, रझाकारांच्या गाड्या जायच्या. ते पाहून सर्वसामान्य माणसाच्या मनात द्वेषाची भावना

व्हायची. स्वतंत्र भारताच्या बससेवेपूर्वीच निजामाची बससेवा आघाडीवर होती. उस्मानाबाद सिव्हिल हॉस्पीटलच्या बाजूला निजाम बससेवेचे बसस्थानक होते. त्या ठिकाणाहून सोलापूर, हैद्राबाद, लातूर, औरंगाबाद अशा प्रत्येक मार्गावर गाड्या धावत होत्या. कुठलाही रस्ता पक्का नसला तरी गाड्यांचे आवागमन कायम होते. उस्मानाबाद सोलापूरचे तिकीट होते फक्त २ आणे. सायकलची किंमत केवळ ५ रुपये. तरीपण प्रवाशांची संख्या नगण्य होती. बसस्थानकावर गाडी आली की, क्लिनर गाडी आली म्हणून लोकांना वर्दी देत फिरायचा. जर एखाद्याचे अवजड सामान असेल तर घरापासून गाडीपर्यंत ते पोहोच व्हायचे.

संपूर्ण भारत देश स्वतंत्र झालातरी हैद्राबाद संस्थान हे भारतात सामील व्हायला तयार नसल्याने स्थानिक लोकांतून स्वातंत्र्यसेनानी तयार व्हायला लागले. प्रशासनाकडून चळवळ दडपून टाकण्यासाठी हर प्रकारचे प्रयत्न सुरू झाले. आपल्या नातलगाचे गाव चिलवडी जळताना उपळेकरांच्या मनाला काय वेदना झाल्या असतील? आपल्या हातातली चतकोर भाकरी पुढ्यच्याला देऊन दुसऱ्याची भूक भागविणारा मराठी माणूस दुसऱ्याच्या दु:खातही तेवढ्याच तीव्रतेने सहभागी होतो. आपल्या शेजारी लोकांवर अन्याय होत असताना आपण काहीच करत नाही याची त्यांच्या मनात खंत असायची. याप्रमाणे दुसऱ्याच्या दु:खासाठी रडणारी काही मंडळी आता हळूहळू एकत्र यायला लागली.

लिंबा यादव घोगरे ऊर्फ बळवंतराव त्यापैकीच एक. गप्पाचे रूपांतर आता बैठकीत व्हायला लागले. बळवंतरावांच्या शेतात बसून काहीतरी केले पाहिजे म्हणून चर्चा सुरू झाल्या. बैठकीसाठी शिवा पडवळासारखा माणूस स्वत:हून पुढे आला. तर हिरा आब्बास नावाचा मुस्लीम युवक रझाकारांचा प्रतिकार करण्याची भाषा बोलू लागला. तसे जगदीश चुनिलाल गौडसारख्या मारवाड्यालाही यामुळे बळ यायला लागले. जगन्नाथ आणि आटब्या मांग, नागा नरसु वडर, श्रीपती माळी यांच्यासारखी प्रत्येक जाती धर्माची माणसं या विचारात सामील होऊन खुलेपणाने पुढे आली. स्वत: देशमुख असूनही निवृत्ती प्रल्हादआबा देशमुखतर बंदूक घेऊनच बैठकीला हजर! चर्चा काय करत बसताय? कुणाला गोळी घालायची तेवढे सांगा? म्हणत निवृत्तीराव बंदुकीच्या घोड्यावर हात लावून तावातावाने बोलायचे.

बऱ्याच चर्चेनंतर आपण काय करायचे हे ठरायला लागले. कोण म्हणाले, उस्मानाबादचे मालाचे गोदाम लुटू, तर कोण म्हणाले, आळणीच्या करोडगिरीवर हल्ला करू. त्या वेळी बळवंतरावांनी समजुतीने घेतले. राजाराम पडवळ जरा गडबड्याराम होता. शिवा पडवळ म्हणाले, तिथं जाऊन काय गोळ्या खायच्यात काय? याप्रमाणे प्रत्येकाने आपली मत मांडायला सुरुवात केली. तेव्हा निवृत्तीराव देशमुख गप्प ऐकून घेत होते. सर्वांचे झाल्यावर त्यांनी बंदूक पुढे करून सांगितले, तुम्हाला काय ठरवायचे ते ठरवा. माझी बंदूक भरलेली आहे. याप्रमाणे विचारविनिमय होऊन आपल्याच शिवारात थांबून निजामाच्या बसवर हल्ला करण्याचा बेत पक्का करण्यात आला.

शत्रूशी लढाई करायची असेल तर तयारीनिशी उतरावे लागते. कोण, कुठं आणि कशाप्रकारे लढणार याची आखणी महत्त्वाची असते. ठरल्याप्रमाणे हल्ल्याची वेळ रात्री ८ ते ८.३० होती. शत्रूवर हल्ला करायचा म्हटल्यानंतर त्याची इत्थंभूत माहिती ठेवायला नको का? परळी-उस्मानाबाद बस दुपारी ३.४५ मिनिटांनी निघाल्यानंतर अंबाजोगाई, कळंब, येरमाळा, येडशीमार्गे जवळपास २७ थांबे घेत ८.३० वाजता उस्मानाबादला पोहोचते. हे गणित पक्क होते. त्यानुसार शिवा पडवळ, गणपती माळी, जगदीश गौड हे येडशीवरून बसमध्ये बसले. गाडीमध्ये जेमतेम ९-१० माणसे होती. इकडे बळवंतराव घोगरे, निवृत्ती देशमुख, जगन्नाथ मांग, साहेबराव लामकाने, मल्हारी बळी पडवळ, गेना केरू माळी, पुंडलिक रामचंद्र घोगरे, बाबू चंदू काळे, विठू बळी निंबाळकर, हिरा अब्बास शेख, दगडू गना घोगरे, आटब्या एकनाथ मांग, नागा नरसू वडार, वजीर कोंडोजी उस्मान, नागाआप्पा पडवळ ही मंडळी आजच्या विमानतळालगतच्या खोंगाळीला दबा धरून बसलेली होती.

दिनांक १४.२.१३५७ फसली म्हणजे १४ फेब्रुवारी, १९४७ ची रात्र. निजाम ट्रान्सपोर्टची बस क्रमांक ८७, बसचालक महंमद हसन घराच्या ओढीने निवांतपणे बस चालवितोय तर वाहक महंमद उस्मान सिद्दीकी आपला हिशोब करतकरत उपले को किसको उतरना है क्या ? म्हणून ओरडत होता. गाडीत बसणारे उपळ्याचे तीन प्रवाशी उपळ्याच्या शिवारात निश्चितच उतरणार होते. परंतु याकरिता वाहकाच्या घंटीची त्यांना गरज नव्हती. खिडकीतून एकजण बॅटरी दाखविणार होता. तर पुढे थांबलेले गाडी अडविणार होते. महंमद हसन आपल्या तंद्रीत गाडी चालवीत असताना विमानतळाजवळ येताच गाडीच्यासमोर उजेडात रस्त्यावर दगड पडलेले दिसले. ए पत्थर किसने डाले?

म्हणत महंमद ने गाडीचा ब्रेक दाबला. तेवढ्यात रस्त्याच्या बाजूला दबा धरून बसलेली बाकीची मंडळी पुढे आली. गणपती माळी आणि जगदीश गौड मारवाड्याने बसच्या मागच्या बाजूने गाडीतून उडी टाकली तर शिवा पडवळ बसच्या दरवाज्यातून उतरायला लागले. कुणाला काही कळायच्या आत सर्वांनाच याची जाणीव झाली. बसवर हल्ला झालेला आहे.

बस थांबली तसे बळवंतराव घोगरे, निवृत्ती देशमुख आपल्या ९-१० साथीदारांसह पुढे आले. अचानकपणे निवृत्तीरावांनी आपल्या बंदूकीतून एक गोळी झाडली. नशीब शिवा पडवळच्या बाजूने ती गोळी बसला लागून गाडीचा काच फुटला. ड्रायव्हरसह सर्वजण एकदम घाबरून गेले. विशेष म्हणजे या बसमध्ये कळंब पोलीस ठाण्याचा एक पोलीसही होता. परंतु कोणाचा काही प्रतिकार झाला नाही. त्यामुळे उपळ्याच्या स्वातंत्र्य सैनिकांनी गाडीवर दगडफेक केली तर देशमुखांनी पुन्हा एक राऊंड फायर करून बसचे मागचे टायर फोडून टाकले. आपले काम फत्ते झाल्याचे समजताच 'भारत माता की जय', म्हणत ही मंडळी अंधारात पसार झाली. ड्रायव्हर, कंडक्टरने स्वत: खाली उतरून रस्त्यावरचे दगड काढून पंक्चर गाडी घेऊन आहे त्या अवस्थेत उस्मानाबाद गाठले.

महंमद हसनने आपली गाडी सरळ पोलीस ठाण्यात नेली. त्याठिकाणी शेख महेबूब हे सब इन्स्पेक्टर होते. त्यांनी गाडीभोवती फिरून पंचनामा केला. साक्षीदार चालक महंमदने रीतसर तक्रार नोंदविली. या वेळी शेख महबुबने पंचनामा तयार करून साक्षीदार म्हणून तेथे उपस्थित असलेल्या लोकांच्या सह्या घेतल्या.

त्यात साक्षीदार म्हणून उमाशंकर विश्वनाथराव वय ३९ जात लिंगायत, नायब तहसीलदार कळंब, सालेम बिन महेमूद वय ३०, शिक्षक माणकेश्वर, मिर्झा आरीबेग महेबूब वय २२, करोडगिरी नाका नोकर, रा. गौर यांचा समावेश होता. उस्मानाबाद पोलीस ठाण्याच्या दसरी केस क्रमांक ३२/२, १३५७ फसलीनुसार परळी उस्मानाबाद बस उपळ्याच्या शिवारात अज्ञातांनी लुटल्याची तक्रार नोंद करण्यात आली.

या बसमधील बहुतांश मंडळी ही उस्मानाबादची होती. कुणीतरी या आरोपींना ओळखलेलेही असणार? परंतु कुणीही त्यांची नावे सांगितली नाहीत. आपण निजामाच्या गाडीवर हल्ला केला म्हणून गावातील मंडळी जरा जोशातच

वागायला लागली. असेच एक दिवस राजाराम पडवळ आणि बळी पडवळ कुस्ती खेळण्याकरिता तुळजापूरजवळच्या मसला या ठिकाणी निघाले. उपळ्याहून उस्मानाबादला येण्याकरिता पूर्वी मधला रस्ता होता. तेल्याच्या चौकातून ओढा पार करून उजनकराच्या शेतातून आजच्या उस्मानाबाद एम.आय.डी.सी.च्या बाजूला चिरक्याच्या माळावरून अंबाबाईच्या मंदिराजवळून जेलच्या बाजूने पोलीस लाईनमध्ये निघायचा.

उस्मानाबादहून तुळजापूरला जाण्यासाठी निजामाच्या बस होत्या. सरकारी दवाखान्याच्या बाजूला असलेल्या बसस्थानकावर तुळजापूरची बस लागलेली होती. राजाराम आणि बळी घाईघाईत येऊन बसमध्ये चढले. जागा धरण्यावरून राजारामची शेजाऱ्यासोबत कुरबुर झाली. राजाराम अगोदरच पहिलवान त्यातून बस फोडल्यामुळे जरा जास्तच जोश चढलेला. राजारामने पुढच्याला एकेरीवर घेतले आणि शिव्या देत देत म्हटले, आम्ही निजामाची बस फोडून टाकली, तुझी काय कथा? या दोघांचे भांडण तिथं उभे असलेल्या एका पोलिसांने ऐकले. मागच्या तीनचार महिन्यांपूर्वी उपळ्याजवळ बस फोडलेली होती. पोलिसाने राजारामाला पकडून पोलीस ठाण्यात नेले.

ठाण्यात आल्यानंतर पोलिसांनी त्यांना बराच त्रास दिला. त्यामुळे राजाराम पडवळांनी वाटेल ती नावे सांगण्यास सुरूवात केली. तरी शेवटी १८ लोकांची नावे निश्चित करून त्याच्यावर खटला भरण्यात आला. केस क्रमांक ५३/२ १३५७ फसलीनुसार सरकारविरुद्ध राजाराम व इतर याप्रमाणे खटला उभा राहिला. वारंवार कोर्टाचे वारंट निघत होते. एक तर उपळा बार्शी तालुक्यात असल्याने उस्मानाबादच्या निजामी पोलिसांना त्यांना पकडणे कठीण होते. कारण त्या ठिकाणच्या सरकारची परवानगी घ्यावी लागत होती. शिवाय ही मंडळी बरेच दिवस भूमिगत राहत होती. तरीसुद्धा एकदा शिवा पडवळ आळणी नाक्यावर पकडले गेले.पोलिसांनी त्यांना करोडगिरी नाक्यात बसवून ठेवले. त्या वेळी त्यांची नजर चुकवून शिवाजी आग्य्राहून सुटावे तसे खिडकीतून उडी टाकून जे पसार झाले ते पुन्हा कधी तिकडे फिरकले नाही. अशा रितीने उपळ्याच्या या अठरा जणांनी १८ पगड जाती एकत्र येऊन स्वातंत्र्य संग्रामात आपल्यापरीने सिंहाचा वाटा उचलून उपळ्याचा इतिहास उज्ज्वल केला.

सुरुवातीला उपळ्याला निजाम पोलिसांचा त्रास नव्हता परंतु पुढे या प्रकरणामुळे उपळेकरांना त्रास व्हायला लागला. एकतर उपळे गाव उस्मानाबादच्या बाजूला असल्याने त्यांचे पाहुणेरावळे अपसिंगा, बेगडा,

पोहनेर, मसला, चिलवडी, उस्मानाबाद या गावांत असल्याने त्यांची ये-जा असायची. क्रिकेटच्या खेळात फलंदाजावर दडपण आणण्यासाठी ज्याप्रमाणे सर्व बाजूंनी अगदी चिकटून फिल्डिंग लावल्यागत उपळ्याच्या बाजूला आळणी, गड, शिंगोली, तेर याप्रमाणे नाके होते. त्यामुळे सिली पॉईंटच्या खेळाडूने फलंदाजावर करडी नजर ठेवावी तशी यांची गत झाली होती. खरं तर बसवर आक्रमण झाले त्याच दिवशी उपळेकरांची खैर नव्हती. परंतु गांव सोलापूर जिल्ह्यात होते म्हणून वाचले. रझाकार आणि पोलीस यांचा राग काय असतो हे चिलवडी, नंदगाव आणि देवधानोऱ्याला विचारा म्हणजे समजेल.

पहिल्यापासून उस्मानाबादची बाजारपेठ जेमतेम, शिक्षण उर्दूमधून, निजामी लेहजा आणि रझाकारांचा त्रास! यामुळे बऱ्याच लोकांचे उस्मानाबादकडे दुर्लक्ष. निजाम राजवटीत उपहासाने एक म्हण होती. उस्मानबाद में क्या है ? हवा, पाणी और तुळजाभवानी. असे असलेतरी धाराशिव जिल्ह्याकडे उस्मानअली जंग बहाद्दूर साहेबांचे लक्ष गेले. त्यांनी धाराशिवचे नाव बदलून जिल्ह्याला स्वत:चे नाव दिले, ‘उस्मानाबाद’. त्यानंतर उस्मानाबाद हा निजामाचा सर्फेखास जिल्हा झाला. एवढे असूनही उस्मानाबादच्या बाजारपेठेने कधी पकड घेतली नाही. स्वातंत्र्याच्या वेळी सुद्धा उपळ्याचे लोक बाजार करायला येडशी किंवा बार्शीला जायचे. उपळ्यावरून बार्शीला जाण्यासाठी गडाच्या बाजुने गाडीरस्ता होता. सकाळी लवकर गाड्या जुंपल्या की दुपारी आडतींच्या सौद्यापर्यंत गाडी बार्शीत जायची.

स्वातंत्र्यानंतर भारताबरोबर स्वतंत्र होऊन उपळा बार्शी तालुक्यात गेले. पूर्वीपासून भौतिक ज्ञान आणि इंग्रजीची आवड असणाऱ्या उपळेकरांनी शिक्षणासाठी मराठी आणि इंग्रजी शाळा निवडली. याकरिता बहुतेक मुले बार्शीच्या शाळेत घातलेली असायची. स्वत: स्वयंपाक करून खायचा तर कधी गावाकडून मालाच्या बैलगाड्या आल्या की गावाकडून गोडधोड यायचे. सुट्टीच्या दिवशी त्याच गाडीत बसून पोरं उपळ्याला यायची. त्यामुळे बार्शीला शिकणाऱ्या मुलांसाठी बैलगाडी हे दळणवळणाचे एक मोठे साधन झाले होते.

१९४८ ला हैद्राबाद संस्थानात सर्वत्र स्वातंत्र्याचे वारे जोरात वाहायला लागले होते. निजाम सरकारला धडा शिकविण्यासाठी स्वातंत्र्यवीर आता आतुर झालेले होते. सोलापूर जिल्ह्यातील गौडगाव आणि चिंचोलीच्या कँपवरुन लढ्याच्या हालचाली गतिमान झाल्या होत्या. शेतसारा बंद करणे, लेव्ही बंदी,

सिंदीची झाडे तोडणे, करोडगिरी नाके उदध्वस्त करणे अशा प्रकारचे कार्यक्रम आखून स्वातंत्र्य सैनिकांनी सरकारला बेचैन करुन सोडले होते. याचाच एक भाग म्हणून गौडगांवच्या कँपवाल्यांनी आळणीच्या नाक्यावर हल्ला चढविला तर चिंचोलीच्या कँपने गडावरील करोडगिरी नाका उदध्वस्त करून टाकला. अगोदरच चिडलेले निजाम प्रशासन यामुळे आणखी चवताळून उठले.

उस्मानाबादचे कलेक्टर महंमद हैदर हे प्रशासनात अतिशय कडक अधिकारी म्हणून प्रसिद्ध होते. याच वेळी वरिष्ठ पातळीवरून तपासणी पथक आलेले होते. लागलीच हे पथक गडाच्या करोडगिरी नाक्याकडे रवाना झाले. यात पोलीस उपसंचालक हमीद्दोउद्दीन राणा, कस्टमचे उपसंचालक कुतुबउद्दीन, तालुकदार (कलेक्टर) महंमद हैदर, डी.एस.पी. अबुल हसन, लाईन इन्स्पेक्टर (गस्ती पथकाचे फौजदार) मोहमंद खान व झामन खान त्याचबरोबर पोलीस आणि कस्टमचे कर्मचारी तसेच पठाण आणि रझाकारही होते. सर्वांच्या जीपला पाठीमागे ट्रेलर लावलेले होते. धुरळा उडवत या गाड्या गडाच्या नाक्यावर जाऊन पोहोचल्या. लुटलेल्या नाक्याची आणि सुरक्षा व्यवस्थेची पाहणी चालू केली.

निजामाच्या करोडगिरी नाक्यावर बहुतांशकरून पठाणांचा भरणा अधिक होता. मदतीला पोलीस आणि रझाकारही होते. नाकेदारांना आदेश देण्यात आला, अब मामला बहुत ही संगीन चल रहा है, सब के साथ सक्ती से पेश आओ. १९४८ चे वर्ष हैद्राबाद संस्थानात फारच भयावह गेले. खून, लुटालूट, जाळपोळ यांनी थैमान घातले होते. वाघाने डरकाळी फोडल्यावर जंगलही हादरून जाते. तेव्हा कोल्ह्या, कुत्र्याला प्राणी घाबरायला लागतात. तीच गत रझाकारांची झाली होती. उपळ्याची कथा तर शिवाजी महाराजांच्या सिंधुदुर्ग किल्ल्यासारखी झाली होती. चारही बाजूंनी पाणी आणि किल्ल्यात गोड्या पाण्याच्या विहिरी. त्या प्रमाणे उपळ्याच्या चारही बाजूनी निजामाची हद्द असल्याने परगावला जायची पंचाईत!

भारत सरकार आणि निजामाच्या वाटाघाटीनुसार फक्त सोमवारच्या दिवशी येडशीच्या बाजारनिमित्ताने आळणीची सीमारेषा ओलांडायची. बाजारासाठी वाघोली, काजळा इथल्या बैलगाड्या उपळ्यात जमा व्हायच्या तेव्हा उपळ्याच्या आऊट पोस्टवरच भारत सरकारचा पोलीस खांद्याला बंदूक लावून आळणी नाक्यापर्यंत जाऊन त्यांना पुढे पाठवून द्यायचा. त्याचाही एक नियम होता, बाजारला गेलेल्या बैलगाडीने सोमवारी येडशीत मुक्काम करायचा

आणि मंगळवारी बंदोबस्तात पुन्हा परत फिरायचे. पुन्हा आठवडाभर मीठ संपलेतरी तसेच आळणी खावे लागायचे.

पाहुण्यांना भेटायचे किंवा काही वेळेला लग्न जमवायलासुद्धा येडशीच्या बाजारचा दिवस धरायचा. स्वातंत्र्याच्या वर्षात लोकांची अशी बिकट परिस्थिती होती. कधी काय होईल ते सांगता येत नव्हते.

परिस्थिती कशीही असलीतरी जीवन-मरण कुणाला चुकले आहे का? प्रपंच तर करावाच लागतो. उपळ्याला मोठा बाजार बार्शीचा. शाळा, दवाखाना, तहसील कोर्ट सब कुछ बार्शी. त्यामुळे वर्षभर कष्ट करून पिकलेला माल बार्शीच्या आडतीला घालायचा आणि त्यातून मुला बाळांची लग्ने आणि इतर व्यवहार व्हायचे. २९ एप्रिल, १९४८ सकाळची वेळ. नेहमीप्रमाणे गावकऱ्यांनी बैलगाड्या जुंपल्या. त्या वर्षी पाऊस चांगला असल्याने शेंगा भरपूर पिकल्या. गाडीत घालून येडशीला न्यायच्या. तेथून मालमोटारीने बार्शीला जायच्या. गाड्या जुंपल्या की पोरं मागं लागायची. मला बी यायचंय. कोण स्वत:ची गाडी घेऊन निघाले होते तर कोणी दुसऱ्याच्यात नोकरीला होते. चंद्रकांत गणपत नायकल हा सांज्याचा पोरगा शिकायला आपले मामा दगडू पडवळाकडे होता. चंदू मागे लागला म्हणून मामाने घेतले गाडीत. प्रभू यशवंत तोडकर, शंकर आंबादास सावळकर, राजाराम सोलापुरे अशीच १४-१५ वर्षांची पोरं गाडीत बसून निघाली.

बंदोबस्तात गाड्या आजच्या गडपाटीच्या कमानीजवळ आल्या तसे एका बैलगाडीचे एटन तुटले.मोटारगाडीचे व्हील अलायनमेंट एकदमच बिघडल्यावर गाडी चालवायची कशी? तीच अवस्था झाल्याने उपळ्याच्या ७ ही गाड्या तिथंच थांबल्या. याच वेळी उस्मानाबादचे कलेक्टर म्हणजे त्या वेळचे तालुकदार महंमद हैदरीचा ताफा तिथं आला. शिपाई अहमदखान मागे बसलेला तर जीपचा चालक गुलाम रसुल शांतपणे गाडी चालवत होता. तेवढ्यात गाड्या दिसताच हैदरने आदेश दिला, गाड्या रोख दो! गाडी थांबताच मोहंमद खान आणि झामन खान हे लाईन इन्स्पेक्टर धावत पुढे आले. कौन से गाव की गाडी है ? मुरलीधर देशमुखाने सांगितले,उपळे की है । भारत सरकारकडे असल्याने उपळ्याच्या लोकांवर वचक बसविणे निजाम प्रशासनाला अवघड झाले होते. त्यातच बस फोडून उपळ्याच्या पोरांनी सरकारला आव्हान दिलेतरी त्यांना पकडणे शक्य नव्हते. त्यामुळे उपळ्यावर पोलीस, रझाकार,

नाकेदार असा सर्वांचाच दात होता.

महंमद हैदरने आदेश दिला, इनको पकड के ठाणे ले जाओ। जिल्ह्याच्या कलेक्टरने आदेश दिले म्हटल्यानंतर एकाहून एकजण पुढे आले. बारा गाडीवानांना अटक करण्यात आली. पूर्वीची परिस्थिती बरी होती. मात्र १९४८ ला निजामाच्या लोकांनी सर्वत्र हैदोस घातला होता. करोडगिरी नाके म्हणजे लूटमारीचे अड्डे झाले होते. त्या ठिकाणी पठाण, रोहिले, रझाकार मन मानेल तसे वागत होते. उस्मानाबाद जिल्ह्यासाठी कस्टमचे एस.पी. मोहंमद खान याने तर सुलतानशाही कारभार सुरू केला होता. कलेक्टर महंमद हैदरने गाडीवाल्यांना अटक करण्याचा आदेश देताच कस्टमवाल्यांनी आपले हात धेऊन घेतले. पठाणांनी बैलगाडीला चारीबाजूंनी घेरले. तसे ढोराचा शंकर सावळकर मोठमोठ्याने रडायला लागला. तर नायकलाचा चंदू आपले मामा दगडू पडवळाच्या धोतराला धरून कापायला लागला. मुरलीधर देशमुख आणि इतरांना काही कळायच्या आत बेड्या ठोकल्या.

उपळ्याच्या ७ ही बैलगाड्या गडाच्या माळावर राहिल्या तर कस्टमच्या पठाणांनी उपळ्यांच्या १२ गाडीवांनाना जबरदस्तीने मोटारगाडीत कोंबले. कलेक्टरच्या सोबत १० ते १२ गाड्यांचा ताफा होता. कलेक्टरच्या जीपला पाठीमागे नेहमी दोन चाकी टेलर जोडलेले असायचे. उपळेकरांना अटक करण्याचे आदेश देऊन कलेक्टर उस्मानाबादकडे निघाला. तेव्हा रस्त्यात त्यांना एक बाई आणि सोबत दोन पुरुष दिसले. त्या बाईच्या हाताला फार मोठी जखम झाली होती. कलेक्टरने गाडी थांबवून त्यांना नाव विचारले. बाईचे नाव मालनबाई होते तिच्यासोबत तिचा नवरा व मुलगा असावा.

कलेक्टरने त्या तिघांना जीपच्या मागे असलेल्या टेलरमध्ये बसविले. त्यांच्यासोबत आपला ड्रायव्हर गुलाम रसुल व शिपाई अहमदखान यांनाही बसवले. मालनबाईला दवाखान्यात पोहोचविण्याची व्यवस्था करण्यात आली. वारंवार चर्चा केल्याप्रमाणे १९४८ चे हैद्राबाद संस्थानचे वातावरण खूपच तापलेले होते. त्यामुळे प्रशासनातील खालचा वर्ग जरा जास्तच भडकला होता. उपळ्याच्या गाडीवानाचे दुर्दैव एवढे विचित्र होते की, गडावर अटक केल्यानंतर त्या बिचाऱ्या पोरांचे नेमके काय झाले हे निश्चितपणे कधीही पुढे आलेले नाही. सर्व काही जर आणि तरच्या गोष्टी आहेत. ज्यांच्या काळात या घटना घडल्या त्यांनासुद्धा याविषयी निश्चितपणे सांगता येत नसेल तर बाकीच्यांची काय

कथा? स्वातंत्र्यानंतर उपळ्याच्या गाडीवानांच्या खुनाची केस उस्मानाबादच्या न्यायालयात उभी राहिली होती. त्यामध्ये अनेक मुद्दे पुढे आले आणि त्यानुसार अनेक बाबींवर चर्चा झाली. त्यातून ज्या काही बाबी पुढे आल्या त्यानुसार सत्यता पडताळून ऐतिहासिक विश्लेषण करावे लागणार आहे.

सुरुवातीला अशी चर्चा होती की, कस्टम डि.एस.पी.च्या आदेशानुसार पठाणांनी गाडीवाल्यांना पकडून उस्मानाबादला आणले. या ठिकाणी आणल्यानंतर त्यांना ओळख परेडसाठी त्यांच्या पाहुण्यांच्या घरी नेण्यात आले. पाहुण्यांनी पोलिसांच्या भीतीने त्यांना ओळखले नाही. तेव्हा या निरपराध मुलांना आजच्या ज्ञानेश्वर मंदिरामागील माळावर नेऊन गोळ्या घातल्या. बैलगाड्या नेमक्या कुठे गेल्या हे निश्चित नाही.

उपळ्याची घटना घडली ती तारीख होती २९ एप्रिल, १९४८. त्या वेळी पोलिसांच्या विरोधात तक्रार नोंदवायची कुणी? सोलापूरचे कलेक्टर संभाजीराव घाटग्यांनी घटनेचा अहवाल मुंबईला पाठवून सरकारला माहिती दिली होती. परंतु त्या वेळी निजाम आणि भारत सरकारचे संबंध गरम होते. अखेर हैद्राबादचे विलीनीकरण झाले आणि उस्मानाबादचे कलेक्टर महंमद हैदरला १८ सप्टेंबर, १९४८ ला सेवामुक्त करण्यात येऊन उस्मानाबादच्या जेलमध्ये टाकण्यात आले. तेव्हा उपळेकरांना आपल्या मुलांची आठवण येणे स्वाभाविक होते. त्यानुसार उपळ्याचे एक स्थानिक राजकारणी माणिकराव पडवळाच्या मदतीने गावकऱ्यांनी उस्मानाबादचे पुढारी फुलचंद गांधी, भाई उद्धवराव पाटील, नरसिंगराव देशमुख यांची भेट घेऊन त्यांच्या सल्ल्यानुसार २४ जानेवारी, १९४९ ला उस्मानाबादचे कलेक्टर महंमद हैदरच्या विरोधात केस ठोकली.

त्यानुसार उस्मानाबादच्या कोर्टात महंमद हैदरवर कलम २४३, ६६ आणि ३३० एच.पी.सी. नुसार खटला सुरू झाला. हैदरने आपली केस त्या वेळचे नामांकित वकील नरसिंगराव देशमुख काटीकर यांनी घ्यावी म्हणून भरपूर प्रयत्न केले परंतु हैदरच्या विरोधात कुणीही केस घेऊ नये अशा प्रकारच्या ठराव इथल्या बार कौन्सिलने मांडल्याने हैदरला उस्मानाबादचा कुठलाही वकील मिळाला नाही. तेव्हा हैद्राबादचे प्रसिद्ध वकील काझी अब्दुल कयामखानला दरदिवशी ५० रुपयांची फी देऊन आणण्यात आले होते. त्या वेळी उस्मानाबाद जिल्हा न्यायालयाचे न्यायाधीश जसवंतराव होते. या केसमध्ये एकूण २१

कागदपत्रे आणि ४२ साक्षीदारांनी आपल्या साक्षी नोंदविल्या.

त्यानुसार शिंगोलीच्या नारायण महाराने साक्ष देताना सांगितले की, घटनेच्या दिवशी ४ रोहिले, ३ बैलगाड्यांतून ४ लोकांना उस्मानाबादकडे पकडून घेऊन चालले होते. तेव्हा गाडीतील लोकांनी आपली टोपी दाखवून रझाकार अत्याचार करत असल्याबद्दल सांगण्याचा प्रयत्न केला होता. पोलीस ठाण्यातील पेशी कारकून अब्दुल करीमची साक्ष झाली. दि. २८ जुलै, १९५० ला सोलापूरच्या कलेक्टरची साक्ष झाली. तर या दिवशी कळंबच्या सब-इन्स्पेक्टरने वसंत नावाच्या माणसाला पकडून आणून उस्मानाबादच्या पोलीस कस्टडीत ठेवल्यानंतर त्याला तेथील झाडांना पाणी घालायला सांगितले होते. तेव्हा त्याने पाहिले की, पोलिसांनी उपळ्याच्या ८ लोकांना पकडून आणले होते. तर कलेक्टरच्या घरचा शिपाई रामचंद्रने साक्ष दिली की, त्या रात्री कस्टमचा डि.एस.पी. झामनखान हैदरच्या घरी आला आणि त्याने विचारले की, उपळ्याच्या लोकांचे काय करावे? त्या वेळी हैदरने आदेश दिला त्यांना संपवून टाका. अशा अनेक बाजूने तपास झाला.

खटल्याच्या दरम्यान काही मुद्दे पुढे आले. त्यानुसार अहमद लतीफ नावाच्या माणसाने केरोसीनच्या दुकानातून रॉकेलचे ५ डबे आणले होते. याशिवाय त्याच रात्री काही रोहिले ट्रकमधून आले आणि रॉकेल घेऊन गेले. रेशन दुकानदाराने अशा प्रकारची साक्ष नोंदविली. कदाचित याच रॉकेलचा वापर उपळ्याच्या लोकांना आणि त्यांच्या गाड्या जाळण्यासाठी केला असेल? आणखी एका उलट तपासणीनुसार सय्यद इब्राहिमने ४४ पोती शेंगा उस्मानाबादच्या प्रेमराज नावाच्या व्यापाऱ्याला विकल्या परंतु इब्राहीमने नंतर जबानी बदलली व शेंगा स्वत:च्या शेतातील असल्याचे सांगितले. तर झामनखानने ३ बैलगाड्या आणि ६ बैल अब्दुल रशिद नावाच्या व्यापाऱ्याला विकले. याचबरोबर घटनेच्या दिवशी गडाच्या दौऱ्यावर असणाऱ्या अधिकाऱ्यांची प्रवास भत्त्यांची बिले तपासण्यात आली.

पुढे उपळा मर्डर केसमध्ये हैदरभोवती फास आवळण्यात आला. आपला बचाव करताना त्याने सांगितले की, घटनेच्या दिवशी मी कस्टमच्या लोकांना उपळ्याच्या गाडीवाल्यांना फक्त अटक करण्यास सांगितले होते. त्यानंतर काय झाले मला माहीत नाही. पोलीस ॲक्शनमध्ये पोलीस ठाणे आणि जेलमधील कागदपत्रे जळाल्याने याविषयी ठोस कागदपत्रे उपलब्ध झाली

नाहीत. अद्यापपर्यंत कुणीही गाडीवाल्यांना मारून टाकल्याचे ठोस ठिकाणा पर्यंत दाखविले नाही. हे काम कस्टमचे ६ क्लार्क आणि ६ पठाणांनी केल्याचा अंदाज होता. कदाचित कस्टम एस.पी. जमानखानाने माहिती असूनही हैदरला याची कल्पना दिली नाही. केसला सुरुवात झाली तेव्हा समजले की, तो पाकिस्तानला पळून गेला आहे.

हैद्राबाद संस्थान स्वतंत्र झाल्यानंतर हैदरचे दिवस फिरले. अटक केल्यानंतर त्यांच्यावर एकामागून एक केस पुढे यायला लागल्या. तेव्हा उपळ्याच्या केसमध्ये साक्षीदार म्हणून मदत करण्याकरिता हैदरने कस्टमचे डेप्युटी डायरेक्टर कुतूबउद्दीन खानाकडे गेल्यानंतर कुतूबउद्दीनचे उत्तर होते, मला मुलबाळे आहेत, मिस्टर हैदर! मी आपणाला काहीही मदत करणार नाही. याउलट त्याने हैदरला सल्ला दिला की, तुम्ही पाकिस्तानला पळून जावा परंतु हैदरने याला स्पष्ट नकार देत आपण शेवटपर्यंत संघर्ष करू! असे ठणकावून सांगितले. संघर्ष करताना हैदरच्या अडचणी वरचेवर वाढत गेल्या.

हैदरच्या म्हणण्यानुसार तो उस्मानाबादच्या जेलमध्ये आल्यानंतर यशवंत गणपतराव पडवळ यांनी सांगितले की, कस्टमच्या पठाणांनी उपळ्याच्या गाडीवानांना अटक करून उस्मानाबादला नेलेले आहे. त्यात माझा मुलगा प्रभाकरही होता. बरेच दिवस झाले त्याचा पत्ता लागत नाही. काही दिवसानंतर माहिती मिळाली की, त्यांना गुलबर्ग्याच्या जेलमध्ये घातलेले आहे. तेव्हा गावकऱ्यांनी शंकर श्रीपती पडवळ आणि अंबऋषी साहेबराव पडवळ यांना गावातून प्रत्येकी २५ रुपयांची पट्टी करून गुलबर्ग्याला पाठविले होते. परंतु ते रिकाम्या हातांनी परत आले. याचवेळी जेलमध्ये उपळ्याचे बापूराव सोनार होते. त्यांनीसुद्धा हीच माहिती दिली. मग हैदरचे म्हणणे होते की, घटनेच्या वर्षभरानंतरही लोकांना गाडीवानांविषयी ठोस माहिती नव्हती की, ते कुठे आहेत? मग त्यांचा खून कधी आणि कसा झाला? हे निश्चितपणे सांगता येत नाही.

५ जानेवारी, १९४८ ला हैदरने उस्मानाबादचे तालुकदार म्हणून सूत्रे हाती घेतल्यानंतर चिलवडी, नंदगरव व देवधानोरा ही गावे जाळली. २७ खून झाले, लुटालूट आणि अत्याचाराने परिसीमा गाठली होती. म्हणून उपळ्याच्या खटल्यात सर्वांचाच दात त्यांच्यावर होता. खटला दाखल झाल्यानंतर आरोपींची ओळख परेड जेलमध्येच घेण्यात आली. न्यायाधीशांनी आरोपींना

ओळखण्यासाठी साक्षीदाराला जेलमध्ये नेले. तेव्हा त्याने अटकेत असलेल्या तुळजापूरचे तहसीलदार सय्यद मोहम्मद काद्रीकडे बोट करून सांगितले की, हाच तो आरोपी आहे. तेव्हा न्यायाधीशाने खुणेने हैदरकडे इशारा करून त्याला ओळखायला सांगितले. तर दुसरा साक्षीदार बाहेरूनच तयारी करून पाठविल्यामुळे तो थेट हैदरच्या बराकीकडे जाऊन त्याने आरोपीची ओळख दाखविली.

त्यामुळे हैदरची बाजू मजबूत होत गेली. हैदरच्या जबानीनुसार २८ एप्रिल, १९४९ ला उस्मानाबादचे डि.एस.पी. बेडेकर हे जेव्हा जेलमध्ये गेले तेव्हा त्यांनी हैदरला सांगितले की, हैदरसाहेब, आपल्या विरुद्धच्या कुठल्याही खटल्यात दम नाही, ही सरकारची एक चाल आहे. त्यात तुम्हाला अडकाविले जात आहे. अशा प्रकारची अनेक रोमहर्षक माहिती हैदरने आपल्या october coup नावाच्या पुस्तकात लिहून ठेवली आहे.

हैद्राबाद सरकारने आपल्या श्वेत पत्रिकेत सीमावर्ती भागातील हालचाली नोंद करताना उपळ्याची नोंद याप्रमाणे केलेली आहे. नं.एफ १५१-पी/४८ तारीख ७.५.१९४८ नुसार दिनांक २९ एप्रिल, १९४८ रोजी उपळ्याचे १२ लोक आपल्या बैलगाडीत ५४ पोती शेंगा घेऊन चालले होते. तेव्हा त्यांना गुंडांनी पकडून उस्मानाबादला आणले. आरोपपत्र दाखल करायला झालेला उशीर आणि साक्षीतील विसंगती, कागदपत्रांचा अभाव यामुळे हैदरच्या विरोधात जोरदारपणे केस उभी राहिली नाही. हैदरसोबत उस्मानाबादचे कस्टम डि.एस.पी. मोहमद खान आणि लाईन इन्स्पेक्टर मोहमद खान व झामन खान व इतर लोक सहआरोपी होते. हैदरला अटक झाल्यानंतर थोड्याच दिवसांत दोन्ही मोहमद खान आजारी पडून उस्मानिया हॉस्पिटलमध्ये मरण पावले. तर झामन खान पाकिस्तानला पळाला. परंतु हैदरला लोकांनी पाकिस्तानला पळून जाण्याचा सल्ला देऊनही तो इथेच राहून भारतीय न्यायव्यवस्थेवर विश्वास ठेवून लढत राहिला.

आज उपळ्याच्या घटनेला ६५ वर्षे पूर्ण होऊन गेली. काळानुरूप घटना विस्मरण होणे स्वाभाविकच असते. गडावर उपळ्याच्या निरापराध मुलांचे बळी गेले. त्यांची चूक ती काय? त्यांनी डोक्यावर गांधी टोपी घातलेली आहे. ते आझाद हिंदुस्थानातील उपळ्याचे रहिवाशी आहेत. चिमुकल्या जीवांना जिथं आमचं आणि तुमचं यातला फरक कळत नाही. त्या ठिकाणी त्यांना देशपरदेश

काय कळणार ? १९५० ला उपळ्याचे प्रकरण गुलबर्गा कोर्टाच्या उस्मानाबाद जिल्हा न्यायालयात 'उपळा मर्डर केस' या नावाने खूप गाजले होते. तत्पूर्वी १८ मे, १९४८ ला केसरी वर्तमानपत्राने याविषयी ठळक बातमी देऊन आवाज उठविला होता. गावचे पोलीस पाटील अंबऋषी साहेबराव पाटील आणि शंकर श्रीपती पडवळ तसेच माणिकराव पडवळ, बळवंतराव घोगरे यांनी या खटल्यासाठी मेहनत घेतली.

उपळ्याचे प्रकरण कायद्यालाही आवाहन देणारे ठरले. गावातील बैलगाड्या शेंगाची पोती घेऊन बाजारला निघाल्या असता गड देवधरी या ठिकाणी निजामाच्या कस्टम विभागाने त्यांना अटक केली. उस्मानाबादच्या पोलीस ठाण्यात आणले होते. त्यानंतर त्यांचे काय झाले? हे शेवटपर्यंत कुणालाही सांगता आलेले नाही. कारण १९४८ ला पोलीस कारवाईच्या दरम्यान हैद्राबाद संस्थानात फारच गोंधळाची परिस्थिती होती. पोलिसांच्या आडून रझाकार आणि पठाणांनी हैदोस घातला होता. त्यामुळे उपळ्याच्या १२ निष्पाप जीवांना या नराधमांनी कुठे आणि कसे संपविले हे शेवटी गूढच राहिले. कोण म्हणतंय, गुलबर्ग्याच्या जेलमध्ये नेताना रस्त्यातच मारले, तर काहीजण म्हणतात, त्यांना उस्मानाबाद एम.आय. डी.सी. परिसरातील माळावर नेऊन गोळ्या घातल्या. बरीच वर्षे आपली पोरं माघारी येतील म्हणून त्यांचे आई - वडिल, मित्र, शाळा आणि सारं गाव आशेवर जगलं. नियतीचा खेळ मोठा विचित्र असतो. यातील बरीचची मुलं १४ ते १५ वर्षांची होती. पालवी फुटून कळी फुलायच्या आत त्याच्या मुळावर घाव घातला.

उपळ्याच्या निरपराध मुलांना निशस्त्रपणे ठार केले. कुठे आणि कधी मारले हे शेवटपर्यंत कुणालाही समजले नसलेतरी उपळ्याच्या हुतात्मा स्मारकाच्या कोनशिलेवर या निरापराधांची नावे कोरली गेली. उपळा मर्डर केसमध्ये एकूण १२ लोकांची हत्या करण्यात आली, पैकी ९ जण उपळ्याचे तरुण होते. त्यांची नावे याप्रमाणे :

(१) हुतात्मा जगन्नाथ माधव कळमकर

(२) हुतात्मा प्रभू यशवंत तोडकर

(३) हुतात्मा गणपती भगवान दीक्षित

(४) हुतात्मा आप्पाराव तुळजाराम पडवळ

(५) हुतात्मा दगडू बापूराव पडवळ

(६) हुतात्मा शंकरराव अंबादास सावळकर
(७) हुतात्मा राजाराम मनोहर सोलापुरे
(८) हुतात्मा शंकरराव बापूराव सोनार
(९) हुतात्मा मुरलीधर प्रल्हाद देशमुख

उपळ्याच्या या केसमध्ये बाहेरगावचे ३ तरुण होते. त्यात चंद्रकांत गणपती नायकल व सदाशिव गणपती नायकल हे दोन तरुण सांज्याचे होते. उपळ्याच्या दगडू पडवळाचे हे भाच्चे असल्याने मामाकडे आलेली ही पोरं मामासह मारली गेली. तर येडशीचा तुकाराम एकनाथ गव्हारे हा तरुण येडशीचा असला तरी उपळ्यात मारला गेला.

१२ निरपराधांची अमानुषपणे हत्या करूनही मुख्य आरोपी शेवटपर्यंत मोकाटच राहिले. तरी सुध्दा घटनाप्रमुख म्हणून उस्मानाबादचे कलेक्टर महमंद हैदर आरोपीच्या पिंजऱ्यात सापडले. अपहरण, खून आणि लूट याप्रमाणे अनेक गुन्ह्याची कलमे लावली गेली. निकालाचा दिवस होता ६ नोव्हेंबर, १९५० फाईल नंबर ९/२, १९५० नुसार उस्मानाबाद जिल्हा न्यायालयाचे न्यायाधीश जसवंतराव यांनी आरोपी महंमद हैदर याला कलम २४३, ६६, ३३१, ३०१ एच.पी.सी.नुसार १० वर्षांचा सश्रम कारावास आणि ५००० रुपये दंड ठोठावला. ज्या वेळी कलेक्टरला १६०० रुपये पगार होता. तेव्हा पाच हजारांची रक्कम भारी होते. परंतु आरोपीच्या शिक्षेने बळी गेलेल्यांचा जीव माघारी येत नसतो.

शंकर सावळकराची आई जिजाबाई मोठ्या धीराची निघाली. दुसऱ्या एका आंधळ्या मुलाला सांभाळत तिने आपले आयुष्य काढले तर दगडू पडवळांना तीन मुली आणि एक मुलगा विक्रम ३ वर्षांचा होता. विक्रम पडवळांनी पुढे राजकारणात आघाडी घेतली. यामागे आई प्रयागबाई आणि उस्मानाबादचे त्यांचे नातलगत श्री. माणिकराव कोकाटे यांचे फार मोठे योगदान होते. कोकाट्यांनी शेवटपर्यंत या शहीद कुटुंबाला धीर दिला. नियतीचा खेळही जरा विचित्रच असतो. हुतात्म्याच्या पुढच्या पिढीतही अनेक संघर्ष घडून आले. बऱ्याच वारसांनी गाव सोडले तर काहींना वारसदारच नाही. इतिहासाची जाण नसणाऱ्या नादान मंडळींनी हुतात्मा स्मारकाला जुगाराचा अड्डा बनविला. आपणाला त्याची जाणीव भलेही नसेल परंतु स्वातंत्र्य मिळवून दिलेल्या वीरांना भारत माता कशी विसरेल? कारण रावणाशी यद्ध करताना रामासाठी बलिदान

करणारे माकडरूपी हनुमान म्हणजे उपळ्याचे हुतात्मे ?

अनेकांच्या बलिदानातून हैद्राबाद संस्थान अखंड हिंदुस्थानात विलीन झाले. १९४७ ला आपण स्वतंत्र झालो. आता आपल्या पाहुण्या-रावळ्यांची गावं मुक्त झाल्याचा आनंद उपळेकरांच्या चेहऱ्यावर दिसायला लागला. स्वातंत्र्य संग्रामात लोकांची मन पेटविण्याकरिता क्रांतिसिंह नाना पाटील यांनी आपल्या भाषणातून उपळ्याचा शिवार गर्जून सोडला. त्यामुळे मारवाड्याच्या पगा मायसारखी बाईसुद्धा पुरुषांच्या वेशात हातात दंडुका घेऊन माळवदावर राखण करायला लागली तर त्र्यंबक आण्णा पडवळ आणि गोवर्धन पाटलाची घोडी गावाभोवती फिरून रक्षण करायला लागली. हातात सोडगा घेऊन गावचे रक्षण करण्याकरिता तरुणांनी 'सोडगा टोळी' तयार केली अशा अनेकांच्या त्यागातून स्वातंत्र्याची वेल फुलत असते

बजरंग, छन्नुसिंगसारख्या पोलिसांना उपळ्याचे संरक्षण करताना गावचा लळा लागला होता. गावची कीर्ती ऐकून विनोबा भावे यांनी उपळ्याला भेट देऊन भुदान चळवळीची माहिती देताच अनेकांनी आपल्या ५-५ एकर जमिनी गरिबांना दान केल्या. तर १९५३ साली पंतप्रधान जवाहरलाल नेहरु उस्मानाबादला जात असताना उपळा पाटीवर थांबून त्यांनी गावकऱ्यांच्या सत्कार स्वीकारून त्यांची विचारपूस केली. १९४५ साली स्थापन झालेल्या उपळ्याच्या शाळेने अनेक सुशिक्षित तरुण निर्माण केले. गावचे नाव माकडाचे उपळे असून, गावचे नागरिक नावानुसार चांगल्या कामाला मदत तर वाइटांना पंजा हाणायला कमी करत नाहीत. त्यामुळे इथल्या माणसाबरोबर इथली मातीही विरांची भूमी आहे.

***



हु.आनंदराव देशमुख



हु.दगडू पडवळ

# १५. उस्मानाबादच्या राणी लक्ष्मीबाई गोदावरी टेके

हैद्राबादच्या निजामाचा सर्फेखास जिल्हा म्हणजे वैयक्तिक उत्पन्नासाठी लावून दिलेला जिल्हा म्हणून उस्मानाबादची ओळख असलीतरी रझाकाराचा प्रमुख कासिम रझवीसुद्धा याच जिल्ह्यातला होता हे विसरून चालणार नाही. त्यातच उस्मानाबाद जिल्ह्याच्या सीमा या स्वतंत्र भारताच्या सोलापूर जिल्ह्याला लागून असल्याने गुन्हेगारावर कारवाईची वेळ आल्यानंतर अशा प्रकारचे लोक हे सोलापूर हद्दीत प्रवेश करत. त्यामुळे इतरांच्या तुलनेने उस्मानाबाद परिसरात हैद्राबाद मुक्तिसंग्रामाचा लढा अधिक तीव्रतेने लढला गेल्याचे स्पष्टपणे दिसून येईल. याचाच एक भाग म्हणून सरहद्दीवरील गावांत स्वातंत्र्य सैनिकांनी आपल्या चळवळीचे केंद्र बनविले. ज्याला कँप म्हटले जाते. अशा प्रकारचे कँप सोलापूर हद्दीत असून येथूनच स्वातंत्र्य सैनिकांनी आपला लढा चालू ठेवला. या कँपमध्ये नगर जिल्ह्यातील खडर्याच्या गढीचा समावेश असून येथूनच स्वातंत्र्य सेनानींनी आपल्या कारवाईस सुरुवात केली.

उस्मानाबाद जिल्ह्यातील ईट हे गाव देशमुखाचे गाव म्हणून प्रसिद्ध असून मांजरा नदीमुळे गावची जमीन सुपीक असून उत्पन्नामुळे गावात सधन शेतकऱ्यांचा भरणा होता. गावात बारा बलुतेदाराबरोबरच येथे कोष्ट्यांची घरे भरपूर असल्याने हातमागाचा व्यवसायही मोठा तेजीत होता. बाजूच्या पंचक्रोशीतले लोक व्यापारासाठी ईटमध्ये गर्दी करायचे. गावात सापडलेला दगडी रांजन आणि कोष्ट्यांच्या हातमागावरून या गावाला प्राचीन परंपरा असावी असे वाटते. कारण सातवाहन काळातील व्यापारात रस्त्यावर मुख्य ठिकाणी अशा प्रकारचे दगडी रांजन असल्याचे पुरावे सापडले आहेत. तोच सिद्धांत ग्राहय धरला तर प्राचीन काळातील वैभवशाली तगर म्हणजे तेरवरून नाशिक आणि जुन्नरकडे जाण्याचे महत्त्वाचे केंद्र म्हणून ईटला महत्त्वाचे स्थान असावे. त्यामुळे प्राचीन काळापासूनच ते मोगलांपर्यंत ईटचा उल्लेख सातत्याने

आल्याचे संदर्भ सापडतात. मोगलांचे सरदार मिर्झाराजे जयसिंह यांचा मुक्काम ईटला असल्याचा संदर्भ सापडल्याने ईटचे महत्त्व ध्यानात येते.

मध्ययुगातील एक थोर सत्पुरुष माधवस्वामी यांचे वास्तव्य या गावात राहिले असून त्यांनी रचलेली काकडारती आजही सर्वांच्या मुखी पोहोचलेली आहे. त्यांच्या समाधीसमोर अन्नपूर्णा नावाची मोठा बारव असून याठिकाणी मोठ्या प्रमाणावर भक्तांची रेलचेल होत असावी हे यावरून सांगता येईल. तर आजसुद्धा कुठल्याही शुभकार्यात अन्नपूर्णेतले थोडेसे पाणी टाकलेतरी अन्न कमी पडत नाही अशी धारणा कायम आहे. गावात श्रीसिद्धेश्वर आणि खोपेश्वर नावाने हेमाडपंती शैलीतील दोन महादेवाची मंदिरे असून चैत्रात खोपेश्वराची फार मोठी यात्रा भरते. विशेष म्हणजे ही यात्रा अगदी अलीकडच्या कालखंडातील असून गावात मुस्लीम वस्ती नगण्य असूनही एका काझी नावाच्या सद्ग्रहस्ताने स्वत: महादेवाचा पितळी मुखवटा आणून बसविला आहे. हाच मुखवटा पालखीत ठेवून यात्रेदरम्यान खोपेश्वराची गावातून मिरवणूक काढली जाते. गावात पालखी आल्यानंतर एका पारावर ती टेकविली जाते तो पालखीचा पार आजही कायम आहे.

पुढे यात्रेत मोठे बदल होत गेले. देवाला लागणाऱ्या अप्सरा माणसाला नको का? यातूनच पालखीपुढे कलावंतिणी नाचविण्याचा प्रघात सुरू झाला. याकरिता दूरदूरवरून १०० ते १५० नर्तकींचा ताफा ईटमध्ये दाखल होऊ लागला. देवाच्या नावावर बाया नाचवून पुरुषांनी आपला पुरुर्षार्थ दाखविण्याचा हा अनोखा मार्ग ईटमध्ये नव्याने सुरू झाला. यामध्ये एवढी वाढ झाली की आजूबाजूच्या गावातील पैपाहुण्यांपासून ते अनेक तथाकथित रसिक या यात्रेकरिता? आपली हजेरी लावतात. पुढारी येतात म्हटल्यावर अधिकाऱ्यांनी काय घोडे मारले का? कामाच्या दिवशी सतत गैरहजर राहणारी ही मंडळी या यात्रेकरिता न चुकता हजर राहू लागली. हे कलेमुळे घडलेले परिवर्तन म्हणायचे का? असा प्रश्न पडतो. पुढारी आणि अधिकारी एकत्र आलेले पत्रकारांना कधीच भावत नाही. बाटलीला सोबत घेऊन बाईवर पैसे सोडणाऱ्या अशा रसिकांना त्यांनी चॅनेलवरून दाखविल्यामुळे काही काळ गोंधळ जरूर झाला. परंतु कलेला जोपसणाऱ्या गावच्या रसिक मायबापांनी गावातून बायका नाचविण्याऐवजी एका स्वतंत्र व्यासपीठावर सोय केल्याने आता तुम्ही निवांत एके ठिकाणी बसून हा आस्वाद घेऊ शकता. या ठिकाणी हा विषय सांगण्याचा

हेतू एवढाच की, गावात वेगवेगळया प्रकारचे लोक राहत असतात आणि त्यांच्या आवडीनिवडी या प्रकारे जपल्या जात असतात. मात्र महादेवाच्या यात्रेत कलावंतिणीचा नाच हाही प्रकार जरा निराळाच म्हणावा लागेल.

ईटमध्ये देशमुखांचे दोन मोठे वाडे असून निजामकाळात त्यांच्याकडे आजूबाजूच्या पाचपन्नास गावचा सारा जमा करण्याचा अधिकार असावा. तर याच वेळी या देशमुखांकडे वंशपरंपरागत असणाऱ्या २७ एकर जमिनीचे नाव रोजा आहे. या क्षेत्रातच पीर आणि दस्तगीर अशा दोन मुस्लीम सत्पुरुषांच्या समाध्या असून याची व्यवस्थाही देशमुखांकडेच आहे. खुदब्याचा सण साजरा करताना मुस्लीम बांधव मश्जिदीतून नमाज अदा केल्यानंतर देशमुखांच्या रोजा बागेत जाऊन अगोदर दस्तगीरांचे दर्शन घेतात आणि त्यानंतरच अन्न भक्षण करतात. अशा रितीने हिंदुंचा सण एका काझीने सुरू केला तर मुस्लीम फकिराची देखरेख हिंदू समाजातील खानदाणी देशमुख करतात हे भाईचाराचे नाते या गावाने मोठया खुबीने सांभाळले होते. ईटमध्ये विनायकराव शामराव पाटील हे खानदानी देशमुख असून त्यांच्याकडे असणाऱ्या टोलेजंग वाडयाचे नावच मुळी रोहिल्याचा वाडा असे आहे. यावरून हिंदूमुस्लीम समाजातील संबंध किती चांगले होते हे दिसून येईल.

ईटच्या गत वर्णनावरून असे सांगता येईल की, रझाकारांच्या आगमनापूर्वी गावात हिंदू आणि मुस्लीम यांच्यात सौख्य असून गाव गुण्यागोविंदाने नांदत होते. परंतु पुढे निजाम राजवटीत रझाकारांची मुजोरी ज्याप्रमाणे वाढत गेली त्याप्रमाणे गावातील काही टवाळ मुस्लीम बांधवही त्यांना सामील झाले. त्यामुळे गुण्यागोविंदाने नांदणाऱ्या ईटसारख्या गावाला दृष्ट लागली. गावातील स्थानिक मुस्लिमांना बाजूला सारून रझाकार, रोहिले आणि पठाणांच्या टोळ्या गावात दाखल झाल्या. पाहतापाहता धर्माच्या बंधाऱ्याला कधी तडा गेला हे कळलेसुद्धा नाही. बंधुभावाचे पाणी बरेच वाहून गेले आणि शिल्लक राहिला तो जातीचा विषारी गाळ. या गाळात अनेक भल्याभल्यांचे पाय रूतायला लागले. एका काझीने गावच्या ग्रामदैवताची यात्रा सुरू केली त्याच वेळी इसामोद्दिन नावाच्या काझीने रझाकरांना पोसायला सुरुवात केली. त्याला साथ होती गावातीलच एका शेर महंमद पठाणाची.

ईटच्या शामराव नरसिंगराव देशमुखांचा रुबाब एखाद्या सार्वभौम राजासारखाच. शेतातल्या भल्यामोठ्या वाड्यात त्यांचा मुक्काम असून परंडा ते

हैद्राबादला जाणारा माणिकदंड नावाचा रस्ता आपल्या शेतातून जातोय म्हटल्यानंतर देशमुखांचा हा गडी वाटसरूंना उपाशी थोडंच जाऊ देणार. सकाळपासून जात्यांवर धान्य दळायला सुरुवात व्हायची. जात एवढं मोठं होतं की, त्याला एका भल्यामोठ्या रेडयाने फिरविले जायचे. शामराव हे निजाम राजवटीतील एक वजनदार देशमुख असून ईटच्या आजूबाजूच्या सर्व गावची देशमुखी त्यांच्याकडे असल्याने आलेला सारा सरकारदरबारी जमा करण्यासाठी ते मधल्या वाटेने हैद्रालाबादला जायचे तेव्हा त्यांना उतरण्यासाठी हैद्राबादमध्ये स्वतंत्र देवडी होती. तर हैद्राबादचे सर्पदिन पीर यांना त्यांनी आपले गुरू मानल्याने घोड्याच्या पायातून सर्पदिन ईटला आले आणि त्यांनी देशमुखांच्या शेतात तळ ठोकला. आजही सर्पदिन साहेबांची समाधी देशमुखांच्या शेतात कायम आहे. त्यांच्या गावातील वाड्याला रोहिल्यांचा वाडा हे नाव असावे, यात बराच इतिहास दडलेला आहे. कारण या वाड्याला चार बुरूज असून वाड्यात पाच चौक आणि कारंजे होते. पाण्यासाठी स्वतंत्र विहीर याच वाड्यात होती.

ईटचे शामरावदादा देशमुख निजामाच्या सर्फेखास जिल्ह्यातले नामांकित देशमुख असलेतरी ज्या वेळी निजामाची पावलं वाकडी पडायला लागली तेव्हा सत्ताधारी असूनही शामरावाचे सुपुत्र विनायकराव यांनी स्वत: पाटीलकीच्या वतनाची चिंता न करता रझाकारांना विरोध करायला सुरुवात केली. गावातील आणखी एक वतनदार संभाजीराव किशनराव देशमुख यांनीही हाच पवित्रा घेतला. देशाच्या अन्य भागात स्वातंत्र्याचे वारे वाहत असताना ईटच्या देशमुख मंडळींनी शिवरायांच्या सोबतीला वतनावर पाणी सोडून जाणाऱ्या कान्होजी जेध्यांचा आदर्श घेतला आणि वतनाचा लोभ सोडून ते देशकार्याला लागले.

इंग्रजांना हादरून सोडणारे क्रांतिसिंह नाना पाटील ईटला सभा घेणार म्हणून शामरावांनी आपल्या रोजा नावाच्या शेतातल्या फडात संपूर्ण तयारी करून ठेवली. परंतु ऐन वेळी सरकारी आदेश येऊन ही सभा रद्द करण्याची घोषणा करण्यात आली तेव्हा मात्र देशमुखांच्या गड्यांनीच नाही तर बायकांनीही आपला पवित्रा बदलला आणि कृष्णाबाई संभाजीराव देशमुख ऊर्फ काकीसाहेब यांनी गावातील गोदावरीबाई टेकेसारख्या बायकांना एकत्र करून निजाम सरकारविरूद्ध दंड थोपडले. आमच्या बाप्यांना अटक केली तर

आम्हीसुद्धा काही कमी नाहीत हे त्यांनी दाखवून दिले.

अशा ईटमध्ये देशमुखाच्या सर्वसमावेशक वृत्तीमुळे गावातील बारा बलुतेदारही आता स्वातंत्र्यासाठी पुढे यायला लागला. त्यांना सोबत झाली ती म्हणजे किशनराव नाथबा टेक्यांची. कोष्टी समाजाचे किशनराव मूळचे अकलूजचे. त्यामुळे त्यांचा विवाह सांगोयाच्या टकले घराण्यातील गोदाबाईंशी झालेला होता. १९४२ च्या स्वातंत्र्य आंदोलनात भाग घेऊन त्यांनी क्रांतिसिंहाच्या नेतृत्वाखाली अकलूज भागात ब्रिटिश पोलिसांना यमदानास पाठविले होते. त्यामुळे पोलिसांचा ससेमिरा चुकवून ते हैद्राबाद संस्थानात भूमिगत झाले होते. प्रथम त्यांनी बीड जिल्ह्यातील पाटोदा या ठिकाणी रझाकारांविरुद्ध लढा उभा केला आणि त्यानंतर ते आपल्या समाजबांधवाची वस्ती असणाऱ्या ईट या ठिकाणी येऊन दाखल झाले. गावात हातमागावर कापड तयार करण्यातही त्यांचा मोठा हातखंडा होता. आपल्या पत्नीसाठी आवर्जून फक्त एकच इरकलची साडी ते तयार करायचे. एवढी आपुलकी त्यांच्याकडे होती. आपल्या व्यवसायाबरोबरच त्यांचा पिंड हा बंडखोरीचा असल्याने ते ईटमध्ये राहून स्वातंत्र्य संग्रामाकडे वळले.

गावात राहून ते नारायण कथल्यांच्या नेतृत्वाखाली लोकांना एकत्र करून स्वातंत्र्य लढ्यासाठी प्रेरणा देऊ लागले. या कामी त्यांना घाटप्रिंपीच्या बाबूराव मास्तरांचे मोठे योगदान मिळाले. तर गावातील  केशव देशमुख, अंबु काळे, नामदेव भोसले या मराठ्यांबरोबरच रंगा कुंभार, बासलिंग जंगम, सदाशिव माळी, चिंतामण टेके, माणिक कोळी, किशन सोनार यांसारख्या अठरा– पगड जातींनी स्वातंत्र्यासाठी रणसिंग फुंकले हे अतिशय महत्त्वाचे आहे. ईटसोबतच आद्रुड, घाट पिंपरी, ईजोरा, गिरवली, डोकेवाडी या गावांनी आपला मोठा सहभाग नोदविला. या लोकांना काँग्रेसच्या पुढाऱ्यांची मोठी साथ होती. तसेच खर्डा हे या लोकांच्या कँपचे ठिकाण असून शाहूराज जाधव आणि दत्तोबा मास्तर तसेच व्यंकटराव वकील ही मंडळी प्रमुख होती. यातही ईटचे किसनराव टेके नेहमी हत्यारबंद राहून खर्डा कँपवरून देशासाठी लढा देत होते. याच वेळी त्यांना त्यांचा मुलगा चिंतामणी आणि पत्नी गोदावरीची मोठी साथ लाभली होती. या परिसरात किशनराव म्हणजे एक धाडशी माणूस म्हणून त्यांची ख्याती होती.

गावात रोज प्रचारफेरी निघायची. याकामी आर्यसमाज चे कार्य मोठे

प्रेरणादायी होते. आपल्या घरावर तिरंगा आणि आर्यसमाजाचा झेंडा नेहमी फडकत राहावा अशी त्यांची धारणा कायम होती. याचा राग गावातील कट्टरपंथी मुस्लिमांना आणि रझाकारांना होता. आपल्या सत्तेला धोका पोहाचतो आहे हे दिसताच निजामाने सर्वत्र रझाकार, रोहिले आणि पठाण पाठवून लोकांची कोंडी करण्याचा प्रयत्न केला होता. त्यानुसार ईटमध्येही ही मंडळी मुक्कामाला असायची. रझाकारांची गावात रोज परेड होऊन लोकांवर दहशत बसायची. गावाबाहेर मंदिर परिसरातील पालखीच्या पाराकडे हिंदू माणसांचे येणे आता बंद झाले. गावात इसामोद्दीन काझी आणि शेर महंमद पठाण यांनी दहशत बसवायला सरुवात केली होती. तर गावातील हरिजन समाजातील काही मंडळी रझाकारांना सामील झाली होती. अगोदरच ठिकठिकाणी निजामाविरूद्ध उठाव होत असताना ईटच्या लोकांनीही उठाव केल्यास अवघड होईल म्हणून तो दडपून टाकण्याच्या हालचाली सुरू झाल्या.

१९४८ चा मे महिना तसा उस्मानाबादसाठी मोठा वाईटच. ५ मेला अपसिंग्यात मोठा संघर्ष होऊन श्रीधर वर्तकसारख्या मोठ्या देशभक्ताला आपण गमावले होते. यामुळे उस्मानाबादचे कलेक्टर महंमद हैदरी जाम वैतागलेले होते. ईटप्रमाणेच घाट प्रिंपीचे दत्तू मास्तरही संघर्षात आघाडीवर असल्याने त्यांचा काटा काढावा म्हणून रझाकार आणि पठाणांनी त्यांच्यावर हल्ला केला. ही बातमी ज्या वेळी ईटमध्ये समजली तेव्हा ईटमधील बरीच मंडळी तिकडे धावून गेली. तेव्हा ईटच्या लोकांनी रझाकार असलेल्या ९ पठाणांना एका खिंडीत गाठून ठार केले. ज्या वेळी ही बातमी कलेक्टरला समजली तेव्हा ते ईटला जाण्यासाठी बाहेर पडले. आता काहीतरी मोठा अनर्थ होणार? प्रत्येकजण चिंताग्रस्त झाला.

५ मे, १९४८ सकाळची वेळ होती. उस्मानाबादचे एस. पी. महमंद खान, डी. एस. पी. अबुल हसन, वाशी पोलीस स्टेशनचे फौजदार जामा खान आपल्या फौजफाट्यासह ईटमध्ये येऊन दाखल झाले. हा हा म्हणता अख्खा गाव वाट दिसेल तिकडे पळायला लागला. गावातल्या जोशी नावाच्या माणसाने ही बातमी सगळीकडे सांगितल्यामुळे प्रत्येकजण सतर्क झाला होता. तसाच तो पळत पाटील शामराव देशमुखांकडे आला, अहो पाटील ! पळा ! पळा ! रझाकार आणि पोलीस आलेत. गाव लुटणार आहेत म्हणे ! दादा म्हणाले, आरं ते रोजचंच चाल्लया! काय होणार? नायऽऽ नायऽऽ पाटील, येळ खराब हाय,

तुम्ही निघा. बामणानं सांगितल्यावर विनायकदादा हे पोलीस पाटील आणि माले पाटील संभाजीराव देशमुख यांच्यासारख्यांनी गाव सोडला म्हटल्यावर बाकीच्यांची काय कथा ?

सारा गाव रिकामा झालाय म्हटल्यावर रझाकार गावात घुसले. मिळेल ती वस्तू लुटायला सुरुवात केली. हाती मिळेल ते घेत वर शिव्यांची लाखोली वाहत या बहाद्दरांनी अख्खा ईट लुटून फस्त केली. एकट्या विनायकराव पाटलाच्या घरात त्यांना अर्धा दिवस लागला. ३०० पोती शेंगा, १३०० गुळाचे डाग, पिठी साखर, ६ खण माळवदात ठेवलेली तंबाखू आणि रोख किती मिळाले हिशोब राहिला नाही. बरं चोर तो चोर वर शिरजोर. पाटील पळून गेलेत म्हटल्यावर मायबाप राज्यकर्त्यांनी त्यांची सारी संपत्ती जप्त करून टाकली. पुढे कोर्टात अनेक दिवस हा खटला चालवून त्यांनी आपली संपत्ती परत मिळविली.

लोकांनी गाव सोडला पण धीर सोडला नव्हता. ईटची मंडळी डोकेवाडीच्या शिवारात गेली. पुढची आखणी करण्याकरिता डोकेवाडी शिवारात भानुदास पवाराच्या शेतातील उसाच्या फडात या स्वातंत्र्यसेनानींची बैठक सुरू झाली. पुन्हा एकदा मराठ्यांच्या फितुरीचा कीडा वळवळला. डोकेवाडीच्या कोण्या गोविंद नावाच्या खंडोजी खोपड्याच्या अवलादीने ही खबर पोलिसांना दिली. अगोदरच पोलिसांना घाट पिंप्रीत पठाणांना मारल्याचा राग अनावर झालेला होता. त्यामुळे त्यांनी आपला मोर्चा डोकेवाडीकडे वळविला. साऱ्या शेताला रझाकार आणि पोलिसांनी वेढा टाकला. ईटची मंडळी बाहेर येत नाहीत म्हटल्यावर रझाकारांनी ऊस कापायला सुरुवात केली.

सशाची शिकार करताना हाकाट्या पिटाव्या त्याप्रमाणे रझाकार ओरडायला लागले, अबे सालो, बाहर निकलो! हमसे टक्कर लेतो हो अब देखो उसका क्या अंजाम होता है, असं म्हणतम्हणत शिकारी सावज शोधायला लागले. एकाची नजर केकताडीकडं गेली. त्याला काहीतरी दिसलं. त्यानं शेजाऱ्याला तोंडावर बोट ठेवत गप्प राहण्यासाठी खुणावलं. आपल्या भारमार बंदुकीचा घोडा मागेपुढे करत बार भरला. त्याला कुणाच्यातरी पायाचा तळवा दिसला होता. हळूच सरकत सरकत एक रझाकार तिथं आला आण त्याने परवर दिगारचे नाव घेत चाफ ओढला. धाड! धाड! धाड ! पाठीवर गोळ्या घालून एका स्वातंत्र्यवीराला खलास करण्यात आलं. त्याचं नाव होतं, विश्वनाथ तेली !

विश्वनाथ ईटमधल्या सर्वसामान्य तेल्याचा पोरगा परंतु स्वातंत्र्याच्या

विचाराने भारलेला होता. क्रांतिसिंहासारखे गर्जून रझाकारांचा खातमा करावा या विचाराने सदा पेटलेला असायचा. त्यातही त्याची मोठी अडचण व्हायची. कारण त्याचं घर हे मुसलमान वस्तीत असल्याने तो फार लवकर रझाकारांच्या हिटलिस्टवर आला. खर्डा कँपमध्ये काम करताना विश्वनाथ बहुरुप्याच्या वेशात कुठलीही बातमी काढण्यात मोठा तरबेज होता. कधीकधी बाईसारखं सेलगाट पांघरून तो घराकडं कधी येऊन गेला हे रझाकरालाही माहिती व्हायचं नाही. आज त्याचा डाव फसला होता.

विश्वनाथच्या बाजूलाच दुसऱ्या एका केकताडाच्या आळ्यात मारुती माळी बसले होते. त्यांनी बघितलं की, आपल्या मित्रावर मागणं वार केलाय, मारतीनं आपली बंदूक काढली आणं अंधाधुंद गोळ्या झाडायला सुरुवात केली. किती मेले माहीत नाही परंतु प्रत्युत्तर भयानक होतं. मिटा दो साले को! एकाच वेळी साऱ्यांनी गोळ्या झाडायला सुरुवात केली. बघताबघता मारुतीच्या देहाची चाळणी करून टाकली.

मारेकरी पोलीस असले म्हणजे काय झालं ? निजामाचा कायदा कडक होता म्हणतात ना? मग मेलेले अतिरेकी ठरवायला बाकीचे सोपस्कार पार पाडावे लागणार होते. एका सिपाय सालारने सांगितले की, इसका पंचनामा करके कलंब थाणे को ले जाव। पोलिसांनी प्रेतं उचलून आपल्या डुगडुगीत घातली अन् चालायला लागले. मेलेल्या माणसाबरोबर वैर संपतं हे सांगण्यासाठी त्यांना कुणी छत्रपती शिवाजीमहाराज भेटलेला नव्हता.

यामुळे इटकूर मांडव्याजवळ गाडी आल्यावर त्यांच्यातला रझाकार जागा झाला. जिवंतपणी ज्याला आपण पकडू शकलो नाही, त्याचा त्यांना राग आला आणि कोल्ह्याच्या लबाडीने पोलीस बहाद्दरांनी दोघांच्याही गर्दन काढून धड तिथंच टाकून दिलं. काय हा कायदा ? आणि त्याचे हे रक्षक !

पोलीस पुढे निघून गेले. परंतु गावातील कुणीतरी एकाने ही बातमी गावच्या कारभाऱ्याला सांगितली आणि त्यांचा ऊर भरून आला. छत्रपती संभाजी महाराजांच्या देहाची विटंबना केल्यानंतर औरंगजेबाने अशाच प्रकारे राजांचे कलेवर फेकून दिले होते. तेव्हा वढू कोरेगावच्या पाटलाने ज्याप्रमाणे त्यांचा अंत्यविधी केला त्याप्रमाणे मांडवा आणि इटकूरच्या लोकांनी ईटच्या या सुपुत्रांचा अंत्यविधी केला. फक्त अंत्यविधी करून ही मंडळी थांबली नाहीत तर या बहाद्दरांनी विश्वनाथ तेली आणि मारुती माळी या शूरांची आठवण राहावी

म्हणून त्या ठिकाणी छानशी समाधी बांधली.

५ मे, १९४८ ही तारीख उस्मानाबादच्या इतिहासात काळ्या अक्षरानी लिहावी अशीच आहे. कारण याच दिवशी दुसऱ्या बाजूला अपसिंग्याच्या लढाईत श्रीधर वर्तक शहीद झाल्यानंतर ज्याप्रमाणे त्यांचे प्रेत जीपला बांधून ओढत उस्मानाबादला आणून त्यांची विटबंना करण्यात आली त्याप्रमाणे ईटच्या या दोघा वीरांचीही तीच गत करून माणुसकीला काळिमा फासण्याचा प्रताप निजामी पोलिसांनी दाखविला. या प्रकरणाने लोकांच्या मनातला राग आणखी ऊफाळून आला आणि जोतो स्वातंत्र्यासाठी मरायला तयार झाला. कारण कुणाचेतरी बलिदान दुसऱ्यासाठी प्रेरणादायी ठरत असते.

ईटमधील घटनांमुळे उस्मानाबादचे कलेक्टर निजाम राजवटीत ज्याला तालुकदार म्हणायचे ते महंमद हैदरीसाहेब जाम वैतागले, बडबडायला लागले, अब कुछ तो करना पडिंगा, पानी शिर से ऊपर गया है; त्यांनी चालकाला गाडी काढायला सांगितले. जमेल तेवढ्या वेगात तालुकदाराची गाडी ईटमध्ये येऊन दाखल झाली. ६ मेची तारीख, सकाळची वेळ होती. सारा गाव भीतीनं परागंदा झालेला. रझाकार गावात घुसले. दोन दिवसांत लूटही भरपूर मिळाली होती. आता बदल्याची आग बाकी होती. गाव रिकामा होता. तरीही गावात एक शेर बाकी होता, त्याचं नाव होतं – किशनराव नाथबा टेके. आणि जिथं शेर आला की, शेरणी आलीच. त्यानुसार त्यांच्या धर्मपत्नी गोदावरीबाईसह कुणालाही न जुमानता आपल्या घरातच थांबले होते.

किशनराव एक रुबाबदार गडी. डोक्यात स्वातंत्र्याचं वारं आणि हातात बंदुक म्हटल्यावर कुणाच्या बापाला भ्यायचं काम नाही असा त्यांचा खाक्या. रोज सकाळी गावात प्रभातफेरी काढून स्वातंत्र्याचे गीत म्हणायचे –

अवकळा अशी का आली रे भारता !
तुझ्या देहाला !
किती धनिक तुझे कुळ होते.
तुज भानची याचे नव्हते!
ही विघ्नं कुठोनी आली रे ,
भारता तुझ्या देहाला ।
निघू दे दिवस मंगल तो

बघाया भारता तुजला
आवकळा लोपुनी सारी
मिळो सुखी शांती सकळांना
अब काय को धूम मचाते हो
दुखवा कर भारत सारे
आते है तात हमारे
रावण धुमधाम मचाये
लंका नाश कराये

मुक्तिसंग्रामाचे म्होरके स्वामी रामानंद तीर्थ आणि फुलचंद गांधीवर त्यांची नितांत श्रद्धा होती. ज्या वेळी कलेक्टर महंमद हैदरी गावात शिरले तेव्हा याची कल्पना त्यांनाही असावी. परंतु आपल्याकडे हत्यार आहे आणि त्यातून पळायला आपण काय कोणाची चोरी केली का? असे म्हणत किशनराव टेके आपल्या घरातच थांबले. सारा गाव रिकामा झालाय आणि गावातील एक बहाद्दर घरावर काँग्रेसचा झेंडा लावून निवांत बसलाय म्हटल्यावर हैदरीसाहेबाचं डोकंच हाललं. साहबजादे रागातच ओरडले, ये किसका घर है? उसकी ये हिंमत की, हमारे इला के मे काँग्रेस का झेंडा? कलेक्टरसह रझाकार, पठाण आणि रोहिले यांचा मोर्चा किशनरावांच्या घराकडे वळला, किसनरावांना हे जणू यमाचे आमंत्रणच होते.

हैदरीसोबत त्यांचे एस. पी., डी. एस. पी., वाशीचे पोलीस ठाण्याचे फौजदार हजर होते. मुक्तिसंग्रामाचे वातावरण जसे जोर धरायला लागले तसे जिल्ह्यात हैदरीसाहेब अधिकच आक्रमक बनले. चिलवडीला आग लावली तर नळदुर्गला काँग्रेसचे कार्यकर्ते बाबूराव बोरगावकरांना गोळ्या घालून संपविण्यात आले. आज बारी होती ईटच्या टेक्यांची. किशनरावालामात्र याची काहीच माहिती नव्हती. गाव पातळीवर नेहमीच गोंधळ व्हायचे आणि त्यातून किरकोळ काही झालेच तर आपणाकडे हत्यार आहे म्हटल्यावर कशाला भ्यायचे? हैदरी आपल्या लवाजम्यासह जसे पुढे निघाले तसे खबरेही सरसावले. त्यांनी किशनरावाकडे हत्यारे असल्याची कल्पना दिल्याने कलेक्टर गोंधळात पडले. आता कुठला उपाय करावा ?

जिल्ह्याचा फौजफाटा सोबत रझाकारांची टोळी असतानाही लबाडीचा

डाव खेळायची सवय लागलेल्या माणसाला समोरासमोर सरळमार्ग थोडाच दिसणार आहे. डी. एस. पी. अबुल हसन, फौजदार जामाखान आपल्या साथीदारासह टेक्यांच्या घरासमोर जाऊन उभे राहिले. त्यांच्यामागे उस्मानाबादचे कर्तव्यदक्ष कलेक्टर महंमद हैदरी उभेच होते. आता किशनरावाला बाहेर कसे काढायचे? म्हणून त्याने रडीचा डाव खेळला. आणि एकाला मोठ्याने दरवाजावर थाप मारून ओरडून सांगायला लावले की, तुम्हारा बच्चा चिंतामणी को शेख महंमद पठाण ने पकडा है। आखरी बार उसको देखना है तो देख लो।

बापाचं काळीज हललं. दरवाजामागची आगळ खर्र्र् करत सरकली. किसनरावाने दरवाजा उघडला तर दारात साक्षात यमदुताच्या वेशात शत्रूचा गराडा होता. आसिफजाही सल्तनत में कॉंग्रेसी झेंडा ? हैदरी रागाने बेभान झाला होता. काय? कशाची चौकशी करायचे भानही त्याला राहिले नाही. हैदरीने आपल्या फौजदाराकडे बघत एकच वाक्य उचचारले, खल्लास कर दो. नि:शस्त्र किशनरावावर अंधाधुंदपणे गोळ्यांची बरसात करण्यात आली. दरवाजाच्या आत हा खेळ चालू असताना पत्नी गोदाबाई सारं काही उघड्या डोळ्यांनी पाहत होत्या.

गोदावरीचं माहेर सांगोला. याच सांगोल्याने औरंगजेबाला कायमचे लंगडे करून सोडले होते. याचा इतिहास हैदरीला माहीत नसावा. नवऱ्याच्या सोबत रोज स्वातंत्र्याचे गोडवे गाणाऱ्या गोदावरी या वेळी मागे थोडेच पडणार? त्यांनी घरातली स्टेशगन उचलली आणि आपल्या नवऱ्याला मारणाऱ्यावर अख्खा मॅगझीन रिकामा केला. भडव्यांनो, तुम्ही यमाचा निरोप घेऊन आलात ना? मग काम अर्धवट का सोडता? त्यांना वरपर्यंत घेऊन जावा ना? कुणाला काही कळायच्या आत तिघांचे मुडदे पडले. रागाने बेभान होऊन एखाद्या वाघिणीसारखी झडप घालत नवऱ्याला घरात ओढून दरवाजा बंद करून घेतला.

अख्खा ईट गाव पळून गेलाय आणि इथंतर ही बया आपल्याशी मुकाबला करतेय म्हटल्यावर त्याचं डोकं आणखी भडकलं. गावाचे नाव ईट असलेतरी गोदाबाईचा सामना 'ईट का जबाब पत्थर से' याप्रमाणे सुरू झाला. नवऱ्याचे कलेवर अंगणात ठेवून त्या बाईने बंदूक हातात घेत एखाद्या सैनिकासारखी पोझीशन घेतली. माळवदावर जाऊन त्यांनी दुश्मनावर फायरिंग चालू केली. त्यात काहीजण टिपले हैदरी बघतच राहिला.

मग त्याने आपले नेहमीचे शस्त्र बाहेर काढले. रागाच्या भरातच तो ओरडला, आग लगो दो, जला के राख कर दो. याच बहाद्दराने दोन महिन्यांपूर्वी चिलवडी जाळून टाकण्याची बहाद्दुरी गाजविली होती. कलेक्टरच्या हुकुमाची तामील झाली. रझाकार आणि पोलीस गोदावरीला जणू सती जाण्यासाठी मदत करायला लागले. धुराचा लोट पसरला. पाहतापाहता टेक्यांच्या घरातून गोळ्यांचा आवाज बंद झाला. गोदावरीबाईने आपल्या नवऱ्याला कवटाळून आता देवाचा रस्ता धरला. नवऱ्याच्या खांद्याला खांदा लावून चालावं म्हणतात ते यालाच. आगीन उग्र रूप धारण केलं आणि थोड्याच वेळात हे दोन्ही स्वातंत्र्य सेनानी स्वातंत्र्य देवतेला अर्पण झाले! एकाच वेळी लढतलढत पती आणि पत्नी शहीद व्हावेत असे भाग्य टेके दांपत्याला लाभले.

सारं गाव आणि परिसर सुन्न झाला. दाद मागायची कुणाकडं? लोकांच्या अडी अडचणी सोडविण्याकरिता नेमलेला जिल्ह्याचा कलेक्टरच जर गोळ्या घालायला सांगतो म्हटल्यावर कुणापुढं हात पसरायचे? बापानंच मारलं तर सांगावं कुणाला? परंतु जगात बापालाही बाप असतो हा निसर्गाचा नियम आहे. गोदावरीबाई आपल्या पतीसोबत फक्त लढल्याच नाहीत तर परलोकीसुद्धा गेल्या. खऱ्या अर्थाने गोदावरीबाईनी मराठे आणि रजपूत अशा दोन्ही पद्धतीने शत्रूंशी मुकाबला केला. शत्रू समोर आल्यावर त्या वाघिनीसारख्या त्यांच्यावर तुटून पडल्या तर वेळ येताच त्यांनी रजपुताप्रमाणे जौहारही केला. मृत्यूनंतरही शत्रूला हाती लागू नये अशी भूमिका घेणाऱ्या झाशीच्या राणीची शेवटी मराठी मातीतल्याच ना! वारे निजामाचे शिलेदार ! काय तुमची मर्दुमकी ? एका भोळ्या भाबड्या बाईचा मुकाबला तुम्ही करू शकला नाहीत ?

टेकेसारख्यांनी आपले आयुष्य या भारतमातेच्या चरणी खर्ची घातल्यानेच निजामाची हकालपट्टी व्हायला वेळ लागला लागला नाही. देश स्वतंत्र झाला. टेक्यांच्या पुत्रांना आपल्या आईबापांचा मोठा अभिमान होता. आणि त्याच वेळी सुडाची आगही होती. जालियनवाला बागेतल्या जनरल डायरप्रमाणे हैदरीचा बंदोबस्त करावा अशी भावना पुत्र रघुनाथच्या मनात कायम असायची. परंतु आता काळ पुढे गेला होता. लोकशाहीवादी देशात अशा प्रकारचे कृत्य आता कायद्याच्या चौकटीत बसणारे नव्हते. मग करायचे काय ? कायद्याचीच लढाई लढायची असा ठाम निर्यण घेऊन रघुनाथराव कामाला

लागले.

१९५१ पर्यंत उस्मानाबादचे हायकोर्ट गुलबर्ग्याला होते. रघुनाथरावांनी तिथंपर्यंत आपला लढा उभा केला. २२ / २ / १९५० या नंबरने सरकारचे सी. आय. डी. पोलीस विरुद्ध उस्मानाबादचे माजी कलेक्टर महमंद हैदरी असा खटला उभा राहिला. यात मुख्य आरोपी म्हणून कलेक्टरवर खटला उभा केला होता. हैदरीचा वकील झियाउल अफरीन विरुद्ध सरकारी वकील एन. एस. अनारकर असा सामना झाला. आरोपीच्या वकिलाने बाजू मांडली की, किशनराव आणि गोदावरीबाई टेके हे रझाकाराबरोबर झालेल्या चकमकीत ठार झालेले असून वाशी पोलीस स्टेशनमध्ये एफआरआय ६७ / १० आबान १३५७ फसली याप्रमाणे गुन्ह्याची नोंद झालेली आहे. आमचे अशील घटनेच्या दिवशी सदरच्या ठिकाणी उपस्थित नव्हते.

चोर एक चोरी करून पकडला गेला की, दुसरी चोरी आपोआप उघडी पडते. हैदरीसाहेबांनी आपल्या दौऱ्याच्या रजिस्टरमध्ये ईटचा दौरा दाखवून त्या दिवसाचे टी. ए. बील उचलेले होते. हातच्या काकणाला आरसा कशाला? रुक्मीणीबाईसह दहा एक जणांनी आपले जबाब दिले. परंतु कुणीही प्रत्यक्ष पुरावे सादर करू शकले नसल्याने खटल्याची चिंता होतीच. परंतु देवालाही काळजी होती.खटला जसजसा उभा राहायला लागला तसा एक एकजण ताळ्यावर यायला लागला,डि.एसपी. अगोदरच देवाघरी निघून गेला तर फौजदार जामाखान आता पोपटासारखा बोलायला लागला. आपणाला कलेक्टरसाहेबांनी लेखी आदेश दिल्याचे त्याने कोर्टाच्या निदर्शनास आणून दिले. तसेच रझाकारांना वाटलेल्या पैशाची कबुलीही दिली.तारीख होती ६ नोव्हेंबर, १९५० !

उच्च न्यायालयाचे न्यायाधीश होते राय वासुदेव प्रसाद. दोन्ही बाजूंचे म्हणणे ते शांतपणे ऐकून घेत होते. आता वेळ होती निकालाची. एखाद्या कलेक्टरच्या विरुद्ध याप्रमाणे उभा राहिलेला असा एकमेव खटला असावा. पिनलकोड २४३ / ६६ नुसार हैदरीवर खुनाचा गुन्हा निश्चित झालेला होता. आता सर्वांनी श्वास रोखून धरले होते. भारत स्वतंत्र झालेला असल्याने खालवर करायला आता जागा नव्हती. सर्वत्र शांतता पसरली. प्रसादसाहेबांनी आपली लेखणी चालू केली आणि त्यात लिहिले, I Ordered That for instigating murder of Kishan & Godavari Teke. The accused Md.Hyder under section 243/66 H.P.C.( Hyderabad Penal Code ) be

hanged until death. याचा अर्थ होतो किशनराव आणि गोदावरीबाई टेके यांच्या हत्येच्या आरोपावरून महमंद हैदर याला मरेपर्यंत फाशी देण्यात येत आहे.

सारे वातावरण सुन्न होऊन गेले. कायदा आणि सुव्यस्थेच्या आडून जनतेला पिळणाऱ्या कलेक्टरसारख्या उच्च अधिकाऱ्याने अशा प्रकारे कायदा हातात घ्यावा ही शरमेची बाब होती. परंतु निजाम राजवटीत अशा लोकांना लाज होतीच कोठे? तमाम जनता म्हणजे आपले गुलाम समजणाऱ्या अशा बेताल अधिकाऱ्याला लोकशाही म्हणजे काय असते याची ही झलक होती. ना जाणे अशा नराधमांनी किती निष्पापांचे बळी घेतले असतील? पण म्हणतात, ना भगवान के घरमे देर है, अंधेर नही, चिलवडी, देवधानोरा आणि नंदगाव ही गावे जाळली, अपसिंग्यात श्रीधर वर्तकाच्या देहाची विटंबना केली. एवढी पापं कशी रे पचणार?

आतापर्यंत उस्मानाबादमध्ये आपली काळी कारकीर्द गाजविणाऱ्या हैदरला स्वतंत्र भारताच्या कायद्याने धडा शिकविला होता. आपल्या नवऱ्यासोबत सौभाग्याचे मरण पत्करलेल्या गोदाबाईच्या खुनाचा बदला मिळाला होता. उस्मानाबाद जिल्ह्याच्या इतिहासात गोदावरीबाई किसनराव टेके या स्वातंत्र्य वीरांगणेची कथा खऱ्याअर्थाने वेगळी आहे. कारण हातात शस्त्र घेऊन शत्रूशी दोन हात करणाऱ्या त्या एकमेव स्त्री होत्या. त्यामुळेच आम्ही त्यांना उस्मानाबादच्या राणी लक्ष्मीबाई अशी दिलेली उपमा सार्थ ठरते.

किसनराव आणि गोदावरीबाई टेके या परिवाराची कथा १७ सप्टेंबर, २०१३ च्या ''दै.दिव्य मराठी'' या वर्तमानपत्रात पहिल्या पानावर छापली होती. टेके हे नाव वाचून या परिसरातून स्थलांतरित झालेले मुंगी पैठण येथील टेके आडनावाचे अनेक ग्रहस्थ मला भेटायला आले. त्यानुसार मुंगी पैठण येथील शिवाजी गंगाधर टेके, बाबुराव पुंजाराम टेके, विठ्ठल टेके या लोकांनी किसनरावाचा आम्हाला सार्थ अभिमान असून दर वर्षी आम्ही आमच्या भागात त्यांची जयंती मोठ्या उत्साहात साजरी करणार असल्याचे सांगितले. मुंगी पैठण –मध्ये हैद्राबाद मुक्तिसंग्रामाविषयी असे सार्थ अभिमना बाळगणारे टेके आणि अपशिंदे परिवार आहेत. अशाच लोकांकडून इतिहास घडविला जात असतो.

***


हु.गोदावरीबाई टेके


हु.किसनराव टेके


स्वातंत्र्य सैनिकांसी चर्चा करताना लेखक



# १६. काटीचे हुतात्मा गणपतराव देशमुख

उस्मानाबाद आणि सोलापूर जिल्ह्याच्या सीमेवरील महत्त्वाचे गाव म्हणून काटीचे नाव घेतले जाते. प्राचीन काळापासून काटीला महत्त्वपूर्ण स्थान आहे. इथं असणाऱ्या निळकंठेश्वराच्या मंदिराची बांधणी हेमाडपंथी असून मंदिराच्या बाजूला असणाऱ्या विशाल बारवेमुळे त्या कालखंडात या परिसरात मोठी वस्ती असावी असे स्पष्टपणे जाणवते. त्यानुसार माहिती घेतली असता निलकंठेश्वराच्या बाजूला गोसाव्यांची मोठी वस्ती असून मंदिराच्या पूजाअर्चेची व्यवस्था करण्यासाठी जमीन इनाम देण्यात आलेली आहे. १३ व्या शतकात बहामनी सत्तेचा उदय होण्यापूर्वी दक्षिण भारतात नाथपंथीय सांप्रदायाची मोठी चळवळ सुरू होती. त्याचेच एक केंद्र काटीत असावे असे दिसते. त्यानंतर गुलबर्गा, बिदर या ठिकाणी बरिदशाही सत्तेला सुरुवात झाल्यानंतर काटीचा परिसर फिरोजशहा बहामणीच्या ताब्यात होता. काटीतील देशमुखांच्या वाडयासमोर हेमाडपंथी शैलीतील मारुतीचे मंदिर असून मंदिराच्या मागच्या बाजूला एक शिलालेख आहे. त्याचा कालखंड शके १३२० असून त्यावर लिहिलेल्या माहितीवरून फिरोजशहा बहामणीचा सेवक परसराम गोसावी याने तुळजापूरला जाऊन श्री तुळजाभवानीच्या मूर्तीची प्रतिष्ठापना केली आणि बाजूच्या ओवऱ्या बांधल्याचा उल्लेख शिलालेखात दिलेला आहे. त्यामुळे तुळजाभवानीच्या नावाचा पहिला लिखित पुरावा हा काटीत सापडतो ही उल्लेखणीय बाब आहे.

प्राचीन काळात काटीचे नाव काय होते हे ज्ञात नसलेतरी बहामणी सत्तेच्या कालखंडात काटीचे नाव इदलाबाद असून देशमुख घराण्यातील एका पराक्रमी पुरुषाने या गावावर आपले वर्चस्व निर्माण करून झेंड्याची काटी उभी केली. तेव्हापासून या गावची देशमुखी त्यांना मिळाली आणि इदलाबादचे नाव पडले काटी. त्यामुळे प्राचीन काळापासून काटीचे अस्तित्व आणि त्याचे महत्त्व

किती मोठे होते हे ध्यानात येऊ शकते.

पुढे मोगल आणि मराठ्यांचा इतिहास अभ्यासला असता काटी हे महत्त्वाचे गाव असून अदिलशहा किंवा मोगल सत्तेच्या हद्दीतील शेवटचे गाव म्हणून काटीकडे पाहता येईल. त्यानुसार औरंगाबाद, अहमदनगरहून विजापूर किंवा सोलापूरला जायचे असेल तर तो मार्ग परंडा, मानेगाव, नरखेड, धामनगाव, काटी, मार्डी, सोलापूर असा होता. त्यामुळे काटी हे मध्यवर्ती ठिकाण असून इतिहासात याचा लिखित पुरावा सापडतो. औरंगजेब बादशहा दक्षिणेच्या स्वारीवर असताना त्याचा खजिना घेऊन जाणारा रावदल्पत बुंदेला वर सांगितलेल्या मार्गावरून विजापूरकडे जात असताना त्याच्यामागे धनाजी जाधव लागलेला होता. तेव्हा मराठ्यांपासून बचाव करण्यासाठी मोगल सेनापती राव दल्पत बुंदेला खजिना घेऊन काटीत मुक्कामास होता. विशेष म्हणजे या वेळी औरंगजेबाचा बक्षी (कायदा मंत्री) अगोदरपासूनच काटीमध्ये मुक्कामास होता. बक्षी बहरामंदखान आणि रावदल्पत बुंदेला काटीत मुक्कामाला असणे ही बाब सामान्य नसून यावरून काटीचे महत्त्व ध्यानात येऊ शकते.

अहमदनगरची चांदबिबी विजापूरला जात असताना त्यांचा मार्ग काटीवरूनच जात होता. याच काटीत पुण्याजवळीत पाटस गावातून आलेल्या बहिर्जी साळुंके यांनी आपल्या पराक्रमाच्या जोरावर काटीची देशमुखी मिळवली. ती पुढे स्वातंत्र्यापर्यंत चालू राहिली. काटी परगण्याअंतर्गत ५२ गावे येत असून त्याची सीमा पाकणीजवळील चिंचोलीपर्यंत होती. त्यामुळे आजही काटी परगण्यातील गावामागे काटी लावले जाते. उदा. सावरगाव काटी, अकोले काटी, काटी चिंचोली. तत्पूर्वी विजापूरचा आदिलशहा बुऱ्हाणशहाच्या काळात काटी हे लष्कराचा तळ असणारे मोक्याचे ठिकाण असून आदिलशहाचा एक सेनापती सिपेसालार याकूतजंग हा काटी परगण्यावर कामाला होता. त्या वेळी त्याचे लग्न झाले. तेव्हा हिजरी सन १०१२ म्हणजे इ.स. १४९२ मध्ये याकूतच्या पत्नीने दिलेल्या मेहेरमध्ये पत्नीसाठी काटीची मश्जिद बांधली. इराणी शैलीतील मश्जिदीचे बांधकाम अतिशय आकर्षक असून मश्जिदीमध्ये एक वेगळाच शिलालेख आहे. एका गुळगुळीत फरशीवर एका वेगळ्याच शाईने कुराणमधील आज्ञा लिहिलेल्या असून ते वाचण्याकरिता फरशीवर पाणी टाकावे लागते. शिलालेखावर पाणी टाकल्यानंतर शाई स्पष्ट होऊन वाचन करणे सोपे होते.

पेशव्यांच्या काळात १७६३ पासून काटी परगणा पेशव्यांचा एक सरदार मानसिंग खलाटे यांच्याकडे होता. सत्ता कुठलीही असलीतरी काटीची देशमुखी एकाच घराण्याकडे कायम होती. त्यामुळे देशमुख घराण्याचा ५ एकरावरील वाडा अतिशय भव्य आहे. माहुरच्या देशमुख घराण्यातील मुलगी काटीत दिली होती. त्यामुळे माहुरगडाची देवी काटीत आली. विशेष म्हणजे या देवीच्या पूजेचा मान मराठा, माळी आणि ढोर समाजाला आहे. त्याचबरोबर काटीचे महत्त्वाचे वैशिष्ट्य् म्हणजे गावात येणाऱ्या प्रत्येक रस्त्यावर मारुतीचे मंदिर आहे. याबरोबरच काटीतील विठ्ठलाचे मंदिर आहे. प्राचीन काळापासून ते निजाम राजवटीपर्यंत काटी हे गाव मुस्लीम सत्तेच्या आधिपत्याखाली असलेतरी काटी हे मंदिराचे गाव म्हटल्यास वावगे ठरू नये. छत्रपती शिवरायांचे आध्यात्मिक गुरु बोधलेबाबा धामनगांवकर यांना मोगलाकडून जे दानपत्र मिळाले आहे. त्या जमिनी काटी हद्दीतच मोडतात. तर तुळजाभवानीचे भोपे व कदम घराण्याचे मूळ पुरुष भुतोजीराव कदम यांचे आजोळ काटीच्या देशमुख घराण्यातील असल्याने देवीच्या हक्कावरून चाललेल्या संघर्षात काटीच्या देशमुखांनी कदमांना मोठी मदत केली होती.

अशा रितीने प्राचीन काळापासून स्वातंत्र्यापर्यंत काटी हे गाव सत्तेच्या केंद्रस्थानी राहिले. सीमावर्ती भागाच्या हमरस्त्यावरील मुख्य ठिकाण असल्याने पूर्वीपासूनच काटीत लष्कराचा तळ होता. निजाम राजवटीत काटीची देशमुखी बाळासाहेबांकडे होती. दोन हजार एकर जमीन, नोकरचाकरांचा राबता, बलुतेदारांची जपवणूक यामुळे पंचक्रोशीत त्यांचा दबदबा होता. बैलपोळा, गौरी गणपती, नागपंचमी, लग्न अशा सर्वच सणसमारंभांचा मान देशमुखांनी जपला होता. हिंदूचे लग्न देशमुख आल्याशिवाय लावले जात नव्हते तर मुस्लिमांच्या लग्नात देशमुख गेल्यानंतर शादी मंजूर है क्या ? असे देशमुखाला मानाने विचारल्याशिवाय पुढील विधीला सुरुवात होत नव्हती. त्यामुळे निजाम राजवटीतही देशमुखांचा दबदबा कायम होता. शिवाय हिंदू-मुस्लीम संबंधही व्यवस्थित होते. तरीपण अंतर्गत वादातून आबासाहेब देशमुख वैरागहून गावाकडे परतत असताना सर्जापूर शिवारात एका मुस्लीम युवकाने त्यांचा खून केला. त्यानंतर त्यांची देशमुखी मुलगा आनंदरावांकडे आली.

खरंच, सत्तेची गादी ही काटेरी मुकूट असतो हे काटीच्या देशमुखीकडे पाहिल्यानंतर वाटते. १९४७-४८ ला काटीची मालेपाटीलकी सांभाळणारे

गणपतराव ऊर्फ गणेश देशमुखांच्या नशिबात काय वाढून ठेवले होते पहा, गणपतरावांचे आजोबा आबासाहेब यांना सर्जापूरच्या शिवारात निर्दयपणे मारण्यात आले. पुढे आनंदरावांचा सावरगावात खून करण्यात आला. आजोबा गेले आणि आता वडीलही गेले. या वेळी गणपतरावांचे वय जेमतेम १०-११ वर्षांचे होते. पूर्वी पाटील, देशमुख, कुलकर्णी यासारखी पदे वंशपरंपरेने एकाच घराण्याकडे राहायची. त्यातही घरातील मोठ्या मुलाकडे हे पद जायचे. भलेही तो नाबालिक म्हणजे वयाने अज्ञान असलातरी त्याच्या नावाने पदाचा कारभार चालायचा. आणखी एक महत्त्वाचा अलिखित नियम म्हणजे या वेळी संबंधित वतनदाराचा धाकटा मुलगा कर्तबगार आणि सज्ञान असलातरी किंवा कुठल्याही अन्य कारणामुळे पहिल्या मुलाला डावलून दुसऱ्याकडे कारभार दिला जात नव्हता. त्यामुळे जुन्या काळात एक म्हण पडली होती, 'पहिल्याने कारभार करावा आणि दुसऱ्याने मुलूखगिरी' याचा अर्थ दुसऱ्याने वडिलार्जित संपत्तीच्या मागे न लागता बाहेर पडून आपल्या कर्तृत्वाने सत्ता आणि संपत्ती मिळवावी.

हिंदू धर्मशास्त्रात बरेच अलिखित नियम आजही पाळले जातात. वडिलांची गादी मोठया मुलाकडे म्हणजे संपत्तीचा वाटा मोठ्याकडेच. तोच प्रकार सर्वसामान्यातही होता. संपत्तीची वाटणी करताना घराची पहिली वाटणी उचलण्याचा हक्क मोठ्याला होता तर याच वेळी शेती आणि इतर संपत्तीचे वाटप करताना धाकट्याची पसंती पहिली होती. आईवडिलांचे विधी मात्र थोरल्याकडे असायचे. अशा या अलिखित नियमाप्रमाणे वडिलांच्या मृत्यूनंतर काटीची देशमुखी वयाने अज्ञान असलेल्या गणपतरावाकडे चालून आली. काटीची देशमुखी आणि पाटीलकी बहामनी काळापासून याच घराण्याकडे होती. त्यामुळे पुढे हैद्राबाद संस्थानात पाटीलकीचे हक्कही आपोआप चालून आले. वाघाच्या बछड्याला पंजा मारायला शिकवावे लागत नाही. त्याप्रमाणे गणपतराव वयाने लहान असलेतरी त्यांच्यात चुणूक होती. पूर्वीच्या काळी ब्राह्मणाव्यतिरिक्त मुलं शिकायची ती म्हणजे पाटील आणि देशमुखांचीच. त्याचे कारण म्हणजे आपणाला राज्यकारभार करताना अडचण येऊ नये म्हणून.

काटीच्या देशमुखांचे हेच झाले. गणपतरावांना कारभारासाठी गरज म्हणून त्यांच्या शिक्षणाकडे मुद्दामहून लक्ष देण्यात आले. आपल्या गावातील मदरसे तहतानिया म्हणजे प्राथमिक शिक्षण पूर्ण केल्यानंतर गणपतराव माढा तालुक्यातील धानोरे आणि त्यानंतर तुळजापूरला शिक्षणासाठी गेले. आपल्या

कुशाग्र बुद्धीने त्यांनी पहिलीपासून ते सातवीपर्यंत वर्गात आपला ठसा उमटविला. याच वेळी शिक्षणात त्यांना चुलतबंधू नरसिंगराव देशमुख आणि उद्धवराव पाटील यांची चांगलीच सोबत लाभली. गणपतराव अभ्यासात हुशार असूनही गावकी करायची असल्याने इच्छा असूनही त्यांनी पुढील शिक्षण थांबविण्याचा निर्णय घेतला. तर याच वेळी नरसिंगरावांनामात्र पुढील शिक्षणासाठी प्रोत्साहन दिले. त्यामुळे नरसिंगरावाच्या रूपाने काटीचे एक देशमुख मराठा समाजातील मराठ्वाडयातील पहिले पदवीधर वकील म्हणून पुढे आले. तर स्वातंत्र्यानंतर ज्यांनी शेतकरी आणि कामगारांच्या हक्काचा पाया रचला ते भाई उद्धवराव पाटील यांना शिक्षणाचे बाळकडू काटीतच मिळाले होते. गावातील श्रीरंग साळुंके, हिराचंद विभुते ही मंडळी त्यांना लहानपणापासून जवळून ओळखत होती.

कामापुरती शाळा संपली, आता गावची मास्तरकी करायची होती. देशमुख म्हटल्यानंतर रीतिरिवाज, मानापान, स्पृश्य-अस्पृश्य या बाबी आल्याच. परंतु गणपतराव हे सत्यशोधक चळवळीकडे वळल्यामुळे त्यांना या गोष्टी कदापि मान्य नव्हत्या. सर्व मानव एकच आहेत यावर त्यांचा गाढा विश्वास होता. त्यामुळे गणपतराव न्यायनिवाडा करायला बसले की, जात-पात किंवा उच्च-नीच हा भेदभाव नव्हता. साहजिकच गणपतराव देशमुखांच्या चावडीपुढे न्याय मागण्यासाठी गावकऱ्यांची गर्दी जमा व्हायची. जुन्या वळणाचे गाव असल्याने हिंदू-मुस्लिमांत अत्यंत सलोख्याचे संबंध होते. एवढंच कायतर मुस्लिमांच्या डोल्याच्या सणाला देशमुखांचा मान असल्याने डोला बसण्याकरिता पहिली कुदळ मारून खड्डा त्यानंतर त्यात केलेला विस्तव हातात घेवून ते डोल्यात ठेऊन तो डोला प्रथम देशमुख खेळायचे. मग हिंदूमुस्लीम वाजतगाजत डोल्याची मिरवणूक काढायचे. देशमुखांचा पट्टेवालासुद्धा गफूरच होता. त्यांच्या मदतीला विष्णूपंताकडे कुलकर्णीपद होते.

एकंदर गणपतरावामुळे काटीचा कारभार सुरळीतपणे चालला होता. पत्नी रंगूबाई या बंकलगीच्या देशमुख घराण्यातील असल्यामुळे गणपतरावाच्या कारभारावर इंग्रजी आणि निजाम असे दोन्ही सत्तांचा प्रभाव पडला होता. आपण जे काम करतो त्यात शिस्त असली पाहिले हा त्यांचा खाक्या होता. पोलीस पाटील, माले पाटील किंवा कुलकर्णी यांनी गावचा कारभार करताना चोख असावे, आपल्या नोंदी व्यवस्थितपणे केलेल्या असाव्यात, यावर त्यांचा कटाक्ष

होता. एवढ्यावर थांबतील ते गणपतराव कसले ? गावपातळीवरील प्रशासनात ही शिस्त यावी म्हणून १९३६ साली त्यांनी काटी या ठिकाणी पाटील आणि कुलकर्ण्यांना कारभाराचे धडे देण्याकरिता १ महिन्याचे प्रशिक्षण शिबिर घेतले होते. व्यवहाराचे धडे देण्याकरिता एक इंग्रज अधिकारी महिनाभर काटीत मुक्कामाला ठेवला होता. वाळूज, देगाव, भोयरे, सासुरे यासारख्या अनेक गावांतील पाटील या प्रशिक्षण शिबिराला उपस्थित होते. विशेष म्हणजे या शिबिराचा अस्सल फोटो उपलब्ध आहे.

गावकारभार करताना चोखपणे न्यायदान आणि व्यवहार याकरिता त्यांनी कधी तडजोड केली नाही. लोकांनी आपला शेतसारा वेळेत भरावा याकरिता ते दक्ष असायचे. जमा झालेला सारा तुळजापूरच्या कोषागार कार्यालयात भरण्याकरिता गणपतरावांची स्वारी घोड्यावर निघायची. पैसे ठेवण्याकरिता तीन-चार इंच रुंद आणि फूट-दीड फूट लांबीची पिशवी कमरेभोवती बांधून घोड्यावर घोंगडे टाकले की, निघाली स्वारी तुळजापूरला. तुळजापूरच्या कोषागार कार्यालयात सारा जमा करण्याकरिता आलेल्या पाटलांची मोठी गर्दी व्हायची. तुळजापूरचे तहसीलदार सय्यद काद्री यांनी याकरिता मोठी शिस्त लावलेली होती. अगोदर चलन भरून घ्यायचे आणि त्यानंतर मोजून पैसे भरायचे. गणपतरावांनी चलन भरले आणि पैसे भरायचे राहून गेले. संध्याकाळी कोषागार कार्यालयात जमा आणि कीर्द यांच्यात घोळ आला. अधिकाऱ्यांच्या लक्षात आले की, काटीच्या भरण्याचा गोंधळ झालेला आहे. झालं ! काटी के पटेल ने कुछ गडबड किया है, म्हणत त्यांच्यावर कारवाई करण्याचे लेखी पत्र तयार झाले. संध्याकाळची वेळ झालेली, सर्व कार्यालये बंद झालेली, तेवढ्यात एक शिपाई पळत-पळत आला आणि त्यांनी सांगितले काटी के पटेल तो सामने बैठे है। एका कारकुनाने मुद्दामहून त्यांना अडकाविण्याकरिता ही चाल केली होती. परंतु, गणपतरावांनी निश्चय केला होता. वरच्या अधिकाऱ्याला भेटून पैसे भरल्याशिवाय गावाकडे जायचेच नाही म्हणून ते कार्यालय परिसरात घोंगडे टाकून बसलेले होते. दुसऱ्या दिवशी पैसे भरूनच ते काटीला परतले.

१९४७ साली भारताला स्वातंत्र्य मिळाले. सर्वत्र आनंदाने झेंडावंदन करायला लागले. सच्चा देशभक्त असणाऱ्या गणपतरावांच्या मनात या दिवशी काहूर माजले. काही झालेतरी आपण आपला तिरंगा फडकावयाचाच या

उद्देशाने ते देगावला गेले. त्या ठिकाणी पाटलाच्या वाड्यात त्यांनी आपला स्वातंत्र्यदिन साजरा केला. याच वर्षी आपल्या परिसरात दुष्काळ पडला तेव्हा त्यांनी आपला ज्वारीचा पेव लोकांसाठी रिकामा केला. तर देश स्वतंत्र झाला तेव्हा आपला परिसरही स्वतंत्र व्हावा म्हणून सर्वत्र हैद्राबाद मुक्तिसंग्रामाच्या माध्यमातून निजामाविरोधी उठाव व्हायला लागले. आपण मालेपाटील असल्याने प्रत्यक्षपणे आपणास या चळवळीत भाग घेता येत नसल्याने त्यांनी गौडगाव, पानगाव या ठिकाणच्या कँपबरोबर संपर्क करण्यास सुरुवात केली. यापूर्वीच ते हिप्परग्याच्या शाळेत जाऊन अनेक स्वातंत्र्य सेनानींच्या संपर्कात आले होते. सरकारविरोधात सर्वत्र रान उठायला सुरुवात झाली होती. त्यामुळे उस्मानाबादच्या सीमेवरून आता निजामविरोधी कृतिदले आक्रमक झाली होती.

ज्याप्रमाणे हैद्राबाद संस्थानातील स्वातंत्र्यसैनिक सरकारविरोधी कारवाईसाठी सज्ज झाले होते. त्याच वेळी निजाम सरकार आपल्या विरोधकांना दाबून टाकण्यासाठी हरएक प्रयत्न करत होते. झेंडा वंदन, प्रभातफेरी, वर्तमानपत्रे यांवर कडक निर्बंध घालण्यात आले होते. याचसोबत निजामाने रझाकारांसारख्या जातीयवादी संघटनेला हाताशी धरून गावोगाव त्यांचे अड्डे निर्माण केले होते. लोकांचे डोळे पुसण्यासाठी निजामाने ग्रामरक्षक दले उभी करण्याचे नाटक केले होते. परंतु यात जास्तीत जास्त लोक रझाकार असतील याची व्यवस्था करण्यात आली होती. स्वातंत्र्य सेनानींना दडपून टाकण्यासाठी गावोगाव रझाकारांची फौज उभे केलेली होती. गणपतरावांनी गुप्तपणे आपल्या हालचाली चालू केल्या. सोलापूर जिल्ह्याच्या परिसरात राहून हैद्राबाद मुक्तिसंग्रामाची चळवळ चालविण्याकरिता आपल्यापरीने पाहिजे ती मदत करण्यास सुरुवात केली. यासाठी काटीचे बाबुराव साळुंके, हिराचंद विभुते (कासार), देगावचे जनार्दन पाटील, धामगावचे सोपान मारुती भोसले, दत्तू कृष्णाथ जाधव, चंद्रकांत तात्यासाहेब जाधव, राळेरासचे किसन निवृत्ती भोसले, जवळगावचे ज्ञानोबा कापसे यांसारख्या तरुणांची फळी उभी केली.

काटीच्या जवळ असणारे धामनगाव ब्रिटिश अमदानीत मोडत असल्याने या लोकांनी गांधीजीच्या नेतृत्वाखाली चळवळीत भाग घेतलेला होता. याशिवाय धामनगावच्या जमिनी काटीच्या शिवारात असल्याने त्यांना निजाम शासनाकडून त्रास व्हायचा. तेव्हा धामनगावचे चंद्रहास देशमुख

खुलेआम पुढे आले आणि त्यांनी लेव्ही वसुलीसाठी पुढे आलेल्या निजामाच्या माणसाला बदडून काढले. तेव्हापासून धामनगांव निजाम पोलिसांच्या हिटलिस्टवर आले. त्यामुळे रझाकारांची फौज येऊन धामनगाववर आक्रमण करायची. मात्र गावातील लोक एकत्रित येऊन त्यांना पळवून लावायचे. रझाकाराचा त्रास कसा होता याबाबतची माहिती मला गावडी दारफळचे, श्री. सुखदेव धोंडीबा कदम,जवळगावचे शंकर कापसे, धामनगावचे सोपान देशमुख यांनी भेटीदरम्यान सांगितले. धामनगावचे गौस आणि लाला मारुती वाघमारे नावाचा एक न्हावी समाजाचा मुलगा या दोघांनी प्रत्यक्षपणे हैद्राबाद मुक्तिसंग्रामात भाग घेतला होता. कँपवरची पत्रके वाटून गुप्तपणे माहिती पुरविण्याचे काम या दोघांनी केले. त्यात लाला मारुती वाघमारे हा झांज वाजवून स्वातंत्र्यगीते म्हणण्यात फार तरबेज होता. वैराग-गौडगावहून आणलेली पत्रके वाटताना गौस आणि लाला वाघमारे हे दोघे पकडले गेले. निजाम पोलिसांच्या मदतीने दोघांना काटीच्या चावडीजवळ जिवंत पुरण्यात आले. धामनगावला लाला मारुती वाघमारे याचे स्मारक आजही हैद्राबाद मुक्तिसंग्रामाची आठवण म्हणून उभे आहे. हैद्राबाद संस्थानच्या बाहेरील हद्दीत असणारे धामनगावचे हे एकमेव स्मारक असावे.

रझाकारामुळे गावोगावचे वातावरण अधिकच तापायला लागले होते. त्यामुळे रझाकारांकडून गणपतरावांनाही थोडाफार त्रास सुरू झाला. तरीपण गणपतरावांचे गुमास्ते (हाताखाली काम करणारे) गोपीनाथ साळुंके व दत्तू पाटील यांच्या सहकार्याने त्यांनी आपला गाडा चालूच ठेवलेला होता. पट्टेवाला गफूर अंगरक्षकासारखा त्यांच्यामागे सावलीसारखा उभा असायचा. १९४८ चे साल उजाडले. भारताच्या स्वातंत्र्याला वर्षाचा कालावधी उलटत चाललातरी निजाम आपले राज्य देशात सामील करायला तयार नव्हता. त्यामुळे भारतीय स्टेट काँग्रेसने आपला लढा आता अंतिम टप्प्यात नेला होता. त्याला प्रत्युत्तर म्हणून निजामाने रझाकारांचे भूत गावोगाव सोडून दिले होते. काटीतही रझाकारांची परेड व्हायला लागली. तरीपण काटीतला मुसलमान यात सामील झाला नाही. गणपतरावांना कारभार करताना अडचणी तर यायला लागल्या. सरकारी अधिकारीसुद्धा रझाकारांना मदत करायला लागले. त्यामुळे गावोगाव रझाकार आणि स्वातंत्र्य सेनानी यांच्यात कुरबुरी सरू झाल्या. रझाकारांपासून गावाला ताप व्हायला लागला. आणि याच लोकांनी आता

गावच्या रक्षणाची जबाबदारी घेण्याचा ठेका उचलायला सुरुवात केली.

१९४८ ला निजामाने गश्ती निशान (अध्यादेश) काढून सर्वांची हत्यारे पोलीस स्टेशनला जमा करून घेतली. त्यामुळे ग्रामरक्षक दलाकडेही आता हत्यारे उरली नाहीत. तेव्हा हत्यारे घ्यायची असतील तर पैशाची गरज भासणार होती. याकरिता चर्चा करावी म्हणून ग्रामरक्षक दलाची एक बैठक चावडीवर बोलाविण्यात आली. रझाकार मोठ्या संख्येने यात सहभागी झाले होते. काटीचे रक्षण करण्याकरिता हत्यारे घेणे गरजेचे असल्याने सर्वांनी वर्गणी द्यावी अशा प्रकारचा ठराव रझाकारांनी मांडला. गावात असलेल्या पोलीस ठाण्याचा सब-इन्स्पेक्टर म्हणजे नायब अमीर अक्तर हुसेनची रझाकारांना फूस होती. ज्यांच्यापासून गावाला भीती त्यांनाच हत्यारे घेण्याकरिता पैसा द्यायचे म्हणजे स्वत:च्या पायावर दगड मारून घेण्यासारखे होते. त्यामुळे गणपतराव देशमुखांनी एक ठराव मांडला की, हत्यारे घ्यायची असतील ती हिंदू आणि मुस्लीम अशा सर्वांना समान वाटून द्या. त्यामुळे रझाकारांचे पित्त खवळले. तर गणपतरावांच्या भूमिकेमुळे लोकांना बळ मिळाले. चावडीवरचे वातावरण एकदमच गरम झाले. कुणीही वर्गणी दिली नाही, गंभीर वातावरणात बैठक संपली.

आता रझाकार गावाऐवजी गणपतराव देशमुखांच्याच मागे लागले. त्यांच्याविरोधात खोटेनाटे आरोप करून त्यांना वरपर्यंत बदनाम करण्याचे कट रचले जाऊ लागले. काही उपटसुंभ रझाकारांनी तर त्यांना धमक्या देण्यास सुरुवात केली. त्यामुळे त्यांनाही कळून आले की, आता आपणाला काहीतरी धोका आहे. म्हणून त्यांनी आपले कुटुंब बंकळगीला हलविण्याचा निर्णय घेतला. आवश्यक सामान आणि बायकामुलं बैलगाडीत घालून गावडी दारफळ, वडाळा, नान्नजमार्गे बंगलगीला घेऊन चालले. रस्त्यातही त्यांना रझाकारांपासून भीती होती म्हणून दारफळचे आनंदराव पाटील, वडाळ्याचे साठे, नान्नजचे गवळी यांनी मोठी मदत केली. गणपतरावांनाही सर्वांनी विनंती केली. परंतु आपणच निघून गेलो तर गावकऱ्यांनी कुणाच्या जिवावर रहायचे ? असा प्रश्न ते करायचे. त्यांच्या मनाने आता ठाम निश्चय केला होता. जे व्हायचे असेल ते होईल परंतु मी गाव सोडून जाणार नाही. मोठा मुलगा शिवाजीरावाला त्यांनी पाटीलकीचे धडे द्यायला सुरुवात केली होती. वर्तमानपत्रातील बातम्याने ते खिन्न होऊन गेले होते. त्यांना रझाकारांपासूनचा

त्रास वाढलातरी ते कोणाला सांगत नसायचे. तरीपण ३० एप्रिल, १९४८ ला घरी जेवत असताना अचानकपणे ते आपला मुलगा शिवाजीरावांना म्हणाले, 'गावासाठी मलापण एक ना एक दिवस सोलापूरचा हुतात्मा मलप्पा धनशेट्टी व्हावे लागेल. गावात रझाकाराच्या अड्ड्यावर आता भरपूर खलबते व्हायला लागली होती. सर्व हैद्राबाद संस्थानात रझाकारांची दहशत असताना काटीतील देशमुखाने आपल्याला विरोध करावा ही गोष्ट आता खपवून घेतली जाणार नव्हती. असेच एकेकाला मोकळे सोडलेतर सर्व मोकाट सुटतील या भावनेने पहिला म्होरक्याच हाणला तर ? रझाकारांच्या मनात हा विचार घोळायला लागला.

रझाकारांच्या मनात गणपतरावाविषयी भयानक चीड निर्माण झाली होती. याची कुणकुण काटीतील एक राष्ट्रवादी मुस्लीम हनीफ खाटीक (सौदागरला) लागली. तो पळत-पळत पाटलांच्या वाड्यावर आला. पटेलसाबऽऽ पटेलसाबऽऽ बहुत खतरा है । गणपतरावांना तो काय बोलतोय तेच कळेना. अरे हनिफ काय झालय ते नीट सांग. हनिफने श्वास भरला आणि सांगितले, पाटील तुमच्या जिवाला धोका आहे. तुम्ही गाव सोडून कुठं बी जावा. तेव्हा गणपतराव त्याच्यावरच खेकसले आणि म्हणाले, अरं ! मी गावचा पाटील हाय ! मीच पळून गेलो तर गावकऱ्यांनी कुणाकडं जावं ! झालं ! पाटील पुन्हा एकदा गाफिल राहिले. उस्मानाबाद जिल्हा दिवसेंदिवस आक्रमक होत चालला होता. चिलवडी, नंदगाव, देवधानोरा ही गावे तर जाळून टाकण्यात आली होती. स्वातंत्र्यसैनिक करोडगिरी नाके, सिंदीची जंगले उद्ध्वस्त करून निजामाची कोंडी करत होते. अशा परिस्थितीत कुठल्याही गावचा माणूस निजामशाहीच्या विरोधात वागल्यास त्याचा काटा काढण्याचे जणू आदेशच देण्यात आले होते. त्यामुळे गणपतराव देशमुख काटीच्या रझाकारांच्या डोळ्यात खुपायला लागले होते.

५ मे, १९४८ पहाटे सुमारे दोनची वेळ. उकाड्यामुळे रात्रभर झोप येत नसल्याने बरीच मंडळी माळवदावर झोपलेली असलीतरी गणपतराव आपला मुलगा शिवाजीला घेऊन घरातच झोपले होते. रझाकारांनी या बारीकसारीक गोष्टींची पूर्ण माहिती घेतलेली असावी. गफूर आपले हत्यार घेऊन दरवाजाबाहेर पहारा देत आहे. तेवढ्यात पंधरावीस माणसं पाटलाच्या वाड्यावर येऊन थडकली. जो जागा झाला त्याला वाटलं की, गस्त चालू आहे. तेवढ्यात

एकजण पुढे आला आणि त्याने गफूरला सांगितले आम्ही पावणं आहोत. लांबच्या गावावरून आलो आहोत. स्वातंत्र्याचं काम करताना अस रात्री बेरात्री फिरावं लागतय. गफूरने दरवाजा उघडला तेवढ्यात त्याच्यावर घोंगडं टाकून गफूरच्या मुसक्या बांधून त्याला काहीजण चावडीकडे घेऊन गेले. इतर चारपाच जण गणपतरावांच्या दिशेने सरसावले. वाड्यातल्या ओसरीत पाटील पलंगावर शांत झोपलेले होते. मुलगा शिवाजी दुसऱ्या बाजूला तसाच झोपलेला आहे. तेवढ्यात रझाकारांचे म्होरके सिरोजोउद्दीन, अजिमोद्दीन, नजीर आणि सय्यद मुबारक, मुमताज महबुब घरामध्ये घुसले. कुणाला काही कळायच्या आत एकाने सरळ बंदुकीची गोळी झाडली. अगदी छातीवर आणि डोक्यात गोळी घुसल्याने गणपतराव ऊर्फ गणेशराव देशमुख जागीच ठार झाले.

काटीचे मालेपाटील मारले गेले, ही बातमी वाऱ्यासारखी सर्वत्र पसरली. लोकांचे लोंढेच्या लोंढे काटीकडे निघाले. तुळजापूरचे तहसीलदार काद्री यांनी चौकशीचे आदेश पारित केले. त्यानुसार तुळजापूरचे अमिन (फौजदार) अब्दुल गफूर यांनी घटनास्थळाला भेट देऊन पंचनामा केला आणि प्रेताचे शवविच्छेदन करण्यासाठी प्रेत तुळजापूरला पाठविण्यात आले. पत्नी रंगूबाई आपल्या चिमुरड्यांना घेऊन माहेरी बंकलगीला राहत होत्या. त्यांच्यावर दु:खाचा डोंगरे कोसळला. हजारो लोकांच्या साक्षीने गणपतराव देशमुख अनंतात विलीन झाले. लोकांनी किती सांगितलेतरी त्यांनी गावकऱ्यांना वाऱ्यावर सोडून जाणार नाही अशी भूमिका घेऊन ती कायम ठेवली. त्यामुळे गावासाठी आणि पर्यायाने देशासाठी गणपतराव देशमुख अखेर शहीद झाले.

दुसऱ्याच दिवशी घटनेची फिर्याद देण्यात आली होती. परंतु, रझाकारांच्या दृष्टीने ५ मे ही 'कत्तल की रात' असावी. कारण याच दिवशी उस्मानाबाद परिसरात रझाकारांनी नंगानाच घालून अनेकांचे जीव घेतले होते. आपला जिवाभावाचा माणूस गेला म्हणून गावकरी चिडले आणि त्यांनी या खुनातील चौघांच्या सकाळीच मुसक्या बांधून भर चौकात त्यांना चिरून टाकले. काहीजण सावरगावकडे पळून जात असताना रस्त्यातच संपविले. आजही काटी सावरगाव रस्त्यावर यांची ३-४ समाधिस्थळे असल्याची माहिती संबंधिताने दिली. देश स्वतंत्र झाल्यानंतर खटला उभा राहिला. गुलबर्ग्याच्या कोर्टात अतिरिक्त नाजमसाहेब रशीद अहमद यांच्यासमोर प्रकरण क्र. ४१/८ चा दि. १३ जानेवारी, १९५१ रोजी खटल्याचा निकाल लागला.

त्यानुसार मुलगा शिवाजी आणि शेजारच्या माळवदावर झोपलेले काशिनाथ यांनी रझाकार सिराजने बंदुकीच्या गोळीने गणपतरावांचा खून केल्याचे पाहिल्याचे कोर्टाच्या निदर्शनास आणून देण्यात आले. विशेष म्हणजे काटीचा सब-इन्स्पेक्टर (मुतजम पोलीस) अख्तर हुसेन हा घटनेच्या वेळी दरवाजासमोर उभा असल्याची साक्ष नोंदविण्यात आली. त्यानंतर या खटल्यातील एक आरोपी सरुखान पठाण याला २८/५/१९५० ला पकडून पोलिसांच्या हवाली केले होते. परंतु, स्वातंत्र्यानंतर रझाकार गेले आणि त्यांची जागा आपल्या पोलीलिसांनी घेतली. जमादार बलभीम आणि त्याचे दोन मदतनीस पोलीस मुरलीधर आणि हरी यांनी शेण खाऊन आरोपीला सोडून दिले. भारत स्वतंत्र झाला. आपण इंग्रजांची न्यायप्रणाली स्वीकारली. अंधार होता, जवळ कंदिलाचा प्रकाश, तलवार होती का बदूंक, केस करायला उशीर का केला. अशा वकिली मुद्दयांवर निकाल काय लागणार ?आरोपींची निर्दोष मुक्तता झाली.

गणपतरावांना मार्गदर्शन करणारे अण्णासाहेब देशमुख, पत्नी रंगूबाई यांनी स्वत:ला सावरत गावाला धीर दिला. गणपतरावांचा अंगरक्षक गफूरलाही रझाकारांनी सोडले नाही. परंतु रंगूबाईंनी त्यांच्या कुटूंबाची काळजी घेतली. पोलीस-ॲक्शननंतर मुसलमानाला वाचवायला त्याच पुढे आल्या. म्हणून काटीवरून सोलापूरला गेलेला एक मुसलमान बैलपोळ्याला देशमुखांच्या घरी येऊन बैलाचे सामान आणून त्यांना सजवायचा. तर असाच एकजण हैद्राबादवरून येऊन चोळीबांगडी करायचा.

काळ बदलला १९८२ ला शासनाच्यावतीने गणपतरावांना हुतात्मा म्हणून घोषित करून पत्नी रंगूबाईंचा ताम्रपत्र देवून गौरव करण्यात आला. गणपतरावांमुळेच आजही काटीतला सामाजिक सलोखा टिकून आहे. त्यांची मुले आनंदराव, शिवाजीराव, दत्तात्रय, माणिक, जयसिंग आणि अमरसिंग यांनी त्यांचा वारसा पुढे चालविला. देशासाठी शहीद झालेले गणपतराव देशमुख माले पाटलांपैकी कदाचित एकमेव असावेत.

गणपतराव, ॲड.नरसिंगराव देशमुख,ॲड.उद्धवरावजी पाटील यांच्या सारखे अनेक स्वातंत्र्य सेनानी काटीच्या मातीने दिले. म्हणून काटीत फक्त देशमुखांचे वाडेच आहेत असे नाही तर एका देशमुखाचे हुतात्मा स्मारकही या गावात आहे. त्यामुळे काटीचे साळुंके देशमुख हे फक्त सत्ताधाऱ्यांचे अधिकारीच नसून ते जनतेचे सेवकही होते, हे यावरून स्पष्ट होते.

# १७. नंदगावची राखरांगोळी

उस्मानाबाद जिल्ह्यातील तीन जळीत गावांपैकी नंदगावचा इतिहास मोठा रोमांचकारी असून रामराज्याच्या कथेमध्ये ज्याप्रमाणे रावणाचा समावेश झाल्यानंतर सारी कथाच बदलून जावी त्याप्रमाणे नंदगावची अवस्था होऊन गावकारभारी बाप्या आणि गोट्याच्या एका दुष्कृत्यामुळे गावचा भौगालिक, सांस्कृतिक इतिहास बदलून गेला. अगदी शुल्लक वाटणाऱ्या दोन माणसांनी गावच्या इतिहासाला कलंक लावून आपल्या गावची राखरांगोळी करून हैद्राबाद मुक्तिसंग्रामाचा इतिहास लिहिताना नंदगाव म्हणजे रझाकारांनी जाळलेले गाव असा सीमित इतिहास करून ठेवला.

एवढ्याने गावचा इतिहास संपत नाही तर नावावरून गावचा नंदादीप अखंड तेवत राहावा असा प्राचीन वारसा या गावाला लाभलेला आहे. संपन्न अशा नंदगावाला बाप्या, गोट्यासारखे क्षणिक सुखाला भुलणारे कफल्लक उगवल्याने बारा हुतात्म्यांना आपल्या प्राणाची आहुती द्यावी लागली. गावाला आग लावणारी ही मंडळी पुढे कुठे गेली याचा पत्ता लागला नाही. समुद्र मेलेल्या जीवाला आपल्यात सामावून न घेता ज्याप्रमाणे किनाऱ्याबाहेर फेकून देतो, त्याप्रमाणे गावाशी गद्दारी करणाऱ्यांना गावाने त्यांना गाव सोडायला भाग पाडले हा स्वातंत्र्य संग्रामाचा इतिहास आहे.

नंदगावच्या ऐतिहासिक बाबींचा आढावा घेतला असता या गावाला प्राचीन वारसा लाभलेला आहे. गावाला चारही बाजूंनी भक्कम अशी तटबंदी असून गावाची वेस अजूनही चांगल्या अवस्थेत आहे. नंदगावच्या नावावरून इथं बाराव्या शतकातील वीरशैव चळवळ मोठ्या प्रमाणावर उभी राहिल्याचे स्पष्टपणे जाणवते. त्यानुसार गावकुसाबाहेर जवळपास चाळीस फूट उंचीचे नंदादीप आहे. कन्नडमध्ये देगल आणि धार्मिक भाषेत त्याला नंदादीप म्हणतात. यावरून गावाला नंदगाव असे नाव पडले असावे असे म्हटले जाते. वेशीच्या

आत आल्यानंतर आज दिसणारे महादेवाचे मंदिर मूळचे तेराव्या शतकातील हेमाडपंथी बनावटीचे असून त्याच्या बांधकामात वरचेवर बदल झाले असलेतरी त्याचे अवशेष हे त्याच परिसरात विखुरलेले स्पष्टपणे नजरेस पडतात. तर गावाबाहेर भलामोठा बुरूज होता ज्यावरून गावच्या सुरक्षिततेची टेहळणी व्हायची.

हैद्राबाद संस्थानच्या रूपाने या परिसरावर दोनशे वर्षे असाफिया घराण्यातील निजामाची सत्ता असलीतरी निजाम काळात पिण्याच्या पाण्याचे आड सोडलेतर गावपातळीवर कुठल्याप्रकारचे ठोस बांधकाम उभारल्याचे दिसत नाही. त्यामुळे नंदगावचे वैभव हे प्राचीन असावे असे यावरून स्पष्ट होते. गावातील भली मोठी मंदिरे, गावाभोवतीची तटबंदी, वेस, यासोबतच गावाबाहेर असणारा सय्यद बाशाचा दर्गा या सर्व ऐतिहासिक वास्तूंमुळे नंदगाव हे किमान हजारएक वर्षांपासून वैभवशाली गाव होते हे सांगण्यासाठी कुठल्या ज्योतिषाची गरज नाही.

कुठल्याही गावकुसाच्या दक्षिणेला असणारी दलितांची वस्ती इथं त्याच साच्याप्रमाणे असून महार समाजाला जोडून मातंग वस्ती, त्यानंतर धनगर, चांभार, मुस्लिम, सोनार आणि तेली गल्ली आणि शेवटी लिंगायत आणि मराठ्यांबरोबरच इतर समाजाची घरे आहेत. १९४८ ला नंदगावला पाचशे उंबरा असलातरी गाव एवढे मोठे होते की, गावात फिरताना एखाद्या शहरात फिरल्याचा भास व्हावा अशी परिस्थिती होती. आज तर गावची लोकसंख्या आठ दहा हजारांवर गेलेली असून गावात गेल्यानंतर प्राचीन अवशेषांवरून इथल्या वैभवाची साक्ष पटते.

गावाची रचना बारा बलुतेदार पद्धतीने करण्यात आलेली असून त्यात सोनारगल्ली, चांभारगल्ली, कापडगल्ली अशी नावे ऐकली की, गावच्या व्यवसायिकतेचा अंदाज येतो. कोष्ट्याच्या मागावर तयार होणारा कपडा सर्वत्र विक्रीसाठी जायचा. तर नंदगावचं सोनं डोळे झाकून घ्यावं एवढी इथल्या सोनाराची पात्रता होती. फकीरजी स्वामीचे होलसेल दुकान म्हणजे आजच्या काळातील एक शॉपिंग मॉलच. १०० एच. पी. च्या इंजिनावर चालणाऱ्या पिठाच्या गिरणीतील दळण नेण्यासाठी पंचक्रोशीतून मोठी गर्दी व्हायची. गावात लिंगायत समाजाची वस्ती मोठ्या प्रमाणावर असलीतरी इथं सर्वांनाच न्याय होता. हिंदूमुस्लिम समाजातही सलोख्याचे संबंध असून गावात पिराची आणि बसवेश्वराची मोठी यात्रा भरत असून पूर्वीच्या काळी या दोन्ही यात्रेला

समाजातील सर्वच मंडळी एकत्र येऊन हे सण साजरा करायची.

गाव म्हटले की, कारभारी आलेच. निजाम राजवटीच्या रीतिरिवाजानुसार गावचे पोलीस पाटील आणि माले पाटील हे अनुक्रमे फौजदारी आणि महसुली व्यवस्थेचे महत्त्वाचे घटक असून पूर्वीच्या काळी गावच्या संपूर्ण कारभाराची जबाबदारी यांच्यावर असायची. आपण ज्या वेळी स्वतंत्र संग्रामाचा आढावा घेतो त्या वेळी गावच्या दुर्दैवाने गावाला लाभलेले दोन्ही कारभारी हे सज्ञान नसल्याने गावकारभार हा भलत्याच माणसाच्या हाती होता. त्यानुसार माले पाटलांचा कारभार हा विश्वनाथ पाटलांकडे तर पोलीस पाटलांचा कारभार हा निलकंठराव पाटलांनाकडून तो बापूराव पाटलांकडे आलेला होता. निलकंठराव वयाने अज्ञान असल्याने कारभारी म्हणून ठेवलेला बापूराव हाच पुढे गावचा कर्दनकाळ ठरला. गावात मुस्लिमांची वस्ती बऱ्यापैकी असलीतरी त्यावरून गावात कधी दंगे झाल्याची नोंद नव्हती. कारण हसनसाहेबासारखे देशभक्त नंदगावचे वेगळेपण होते.

बलभीमराव आणि व्यंकटराव नळदुर्गकर यांनी पुढे आपल्या बुद्धिने देशभर आपला ठसा उमटविला, ते मूळचे नंदगावचेच. गावची माहिती घेतल्यानंतर खरंच गावं किती संमृद्ध होते हे नंदगावकडे पाहिल्यानंतर ध्यानात येत.धुळाप्पा कलशेट्टी हे भले मोठे सावकार इथले कुबेर तर दुसरे धुळप्पा चिनगुंडे यांनी हैद्राबाद स्टेट काँग्रेसच्या स्थापनेत आपला मोठा वाटा उचलला होता. बारा बलुतेदारांनी नंदगावची बाजारपेठ पंचक्रोशीत गाजवून सोडली होती. त्यामुळे अक्कलकोटपर्यंतचे लोक नंदगावच्या बाजारला यायचे. गावच्या स्थानिक इतिहासात रुची ठेवणारे श्री. महोदवराव घंटेगरुजी सांगतात की, नंदगावची नाटककार मंडळी पुण्याच्या कलावंतानाही भारी पडायची. एकच प्यालासारखी नाटकं गावात व्हावीत यावरून गावच्या रसिकतेचा मापदंड समजतो. गौराबाई कोळणीलाही गावचा अभिमान होता म्हणूनच गावच्या साफसफाईत कधी कसूर झाला नाही. कोरे, कुलकर्णी, कामशेट्टी, पाटील यांच्यासोबतीला हसनसाहेबही गावकारभारात तेवढेच वजनदार होते.

आज तुळजापूर तालुक्यातील नंदगाव हे भौगोलिकदृष्ट्या एका टोकाला असणारे गाव. गावातून फेरफटका मारल्यानंतर त्याच्या गतवैभवाची साक्ष पटते. गावची भक्कम तटबंदी पाहिल्यानंतर पूर्वीच्या कालखंडात इथलं वैभव कल्पनेतून समोर आणावं लागतं. शेतीतल्या समृद्धीतून नंदगाव हे कुठल्याही नंद घराण्यापेक्षा निश्चितच कमी नव्हतं हे सहज पटतं. गावात हातमागावर कापडं

विणली जात होती. म्हणजे प्राचीन कालखंडातील स्वयंपूर्ण गावची संकल्पना इथं तंतोतंतपणे लागू पडते. याप्रमाणे सारं काही व्यवस्थितपणे चालू असताना मग बिघडलं कुठं ? हा प्रश्न समोर उभा राहतो. त्याचं उत्तर अगदी सोपं आहे. जिथं समृद्धता आहे तिथेच परकीय आक्रमणे झालेली आहेत हा इतिहास आहे. आणि त्यानुसार जर उस्मानाबाद जिल्ह्यातील तीनही गावच्या जळीत प्रकरणाचा आढावा घेतल्यास असे दिसून येईल की, इथली सुबत्ता हीच याला कारणीभूत ठरलेली आहे.

महत्त्वाकांक्षा असावी परंतु ती अतीव नसावी. आणि स्पर्धा असावी तर ती निकोप असावी. वास्तवात हे सूत्र पाळले जात नाही. त्यात जीवघेण्याची तयारी सुरू होते. तशीच काही परिस्थिती या गावात सुरू झाली. माले पाटील आणि पोलीस पाटील ही वंशपरंपरागत पदे असल्याने ती एकाच घराण्याकडे कायम असायची. यातून पद जाण्याची भीती नव्हती मात्र त्यातून वरचढपणा आला. आणि पोलीस पाटलाचा कारभारी हा माले पाटलावर कुरघोडी करायला लागला. माले पाटील असणारे विश्वनाथराव भारदस्त व्यक्तिमत्त्व तर बापूराव त्याच्या उलट. स्वत:च्या स्वार्थासाठी पोलीस पाटील लोकांना वेठीस धरायला लागला तेव्हा लोकांनी याला विरोध करायला सुरुवात केली. विश्वनाथ पाटलासह गाव बापूरावाला विरोध करायला लागला तसा गडी बिथरून गेला. पैलवान जमू देत नाही म्हटल्यानंतर लंगोट धरण्याचा प्रकार सुरू होतो, तोच प्रकार बापूने चालू केला. गाव आपणाला ऐकत नाही म्हणून त्याने थेट त्याने रझाकारांशी संधान बांधायला सुरुवात केली. आणि त्याला सोबत मिळाली इमाम इनामदाराची.

पुढे नंदगावचा कारभार हा पोलीस पाटलाचा मुनीम बापू आणि त्याचा दोस्त इमाम यांच्याभेवतीच फिरू लागला. इमाम हा खरं तर गावातील एक सद्‌गृहस्थ हसनसाहेबांचा पुतण्या असलातरी त्याची चाल रझाकारी होती. इमाम हा लहानपणी गोटया खेळण्यात पटाईत असल्याने त्याला गोट्या हे टोपननाव पडलेले होते. तर आपल्या कर्तृत्वाने बापूरावाला लोक बाप्या म्हणत. त्यामुळे गावाला नीट करण्यासाठी बाप्या आणि गोट्या आता कामाला लागले. चांगल्या माणसांचं संघटन असतं तसच ते वाइटांचंही असतं. बाप्यागोट्यासाठी गावातील काही स्वार्थी पिलावळ पुढे यायला लागली. उपकाराची फेड अपकारांनी करण्याचा आपला जुना इतिहास आहे. पोरगा शिकतोय म्हटल्यानंतर गावची शान म्हणून अशाच एका शहाण्याला गावाने मदत करून

उच्च शिक्षणासाठी काशीला पाठविले. मोठी पदवी घेऊन तो गावात आला आणि तोसुद्धा बाप्यागोट्याच्या नादाला लागला यासारखे शिक्षणाचे दुर्दैव काय?

आता गाव एका बाजूला तर ही गावकारभारी मंडळी दुसऱ्या बाजूला असा सामना सुरू झाला. नंदगावसाठी मुरूमचे पोलीसठाणे असून नळदुर्गला तालुक्याचे कोर्ट होते. जवळच हंगरग्यात रझाकारांची रायफल पलटन होती. त्यामुळे अधूनमधून रझाकारांची कवायत नंदगावच्या रस्त्यावर पाहून बापूरावाची छाती अहंकाराने भरून यायची तर गावातील सिद्रामाप्पा शरणार्थ, बाळप्पा कुंभार, आणप्पा वाले, आप्पासाहेब पाटील, विश्वनाथ मटगे, सोमलिंग परीट, धोंडू जमादार, चनप्पा पाटील यासारख्या मुलांची डोकी भडकायची. हातात तिरंगा घेऊन या मंडळींनी गावात स्वतंत्र भारताचे स्वप्न पाहायला सुरुवात केली होती. यातूनच वरचेवर भडका उडायला सुरुवात झाली.

गाव तसं कुठलंही चांगलंच असतं. मात्र गावात एखादा बाप्या घुसला की परिस्थिती बिघडायला वेळ लागत नाही. गावात पूर्वीपासून बसवेश्वराची यात्रा भरते तर त्याच वेळी सय्यद बाशाचा उरूसही तेवढ्याच भक्तिभावाने साजरा व्हायचा. बसवेश्वराची काठी मुसलमानाने पकडावी आणि उरसाच्या डोल्यापुढे हिंदूनी दिमाखात मिरवावे अशी एकात्मता कुठल्याही गावाप्रमाणे नंदगावातही होती. मग झालं काय? पोलीस पाटलाच्या मुनिमाला जशी खुमखुमी आली तशीच गोट्याची अवस्था झाली. चुलते हसनसाहेब गावच्या सुरक्षिततेसाठी उभे असताना त्यांचा पुतण्या गोट्या रझाकाराच्या वळणाला लागला. गावात आपला वट बसावा म्हणून बाप्याने गोट्याची दोस्ती वाढविली. त्यामुळे नंदगाव आता बाप्यागोट्याच्या दहशतीखाली जाऊ लागलं. गावकऱ्यांनी याला जमेल त्याप्रमाणे विरोध करण्यास सुरुवात केली.

नंदगावात करोडगिरी नाका होता. तर त्याच वेळी जवळच घोळसगाव आणि वागदरी या ठिकाणी स्वातंत्र्य सैनिकांचे कँप होते. हंगरगा आणि अचलेर येथे रझाकारांचे अड्डे असल्याने धुसफूस व्हायची. गावाला कँपचा तर बाप्यागोट्याला रझाकारांचा आधार वाटायचा. रझाकारांची गावात परेड झाली की ही बेंडकं फुगायची. करोडगिरी नाक्यावर बसून लुटालूट करायची आणि सर्वसामान्यांना लुटायचे हा या मंडळीना छंद जडला होता. पाहतापाहता हसनसाहेबांना डावलून गावातील मुस्लिम पोरांना गोट्याने आपल्याकडे ओढायला सुरुवात केली तर गावच्या मुळावर उठलेल्या बाप्याने त्याला फूस

लावायला सुरुवात केली. त्यामुळे हिंदूमुस्लिमांत दरी पडायला सुरुवात झाली.

गावात स्वातंत्र्य सेनानी ज्याप्रमाणे वंदे मातरम् म्हणत रोज प्रभातफेरी काढायचे त्याप्रमाणेच रझाकारांचीही परेड व्हायची. दिवसेंदिवस वातावरण तापायला सुरुवात झाली. बाप्यागोट्या गावावर कब्जा करू पाहत होते तर गावकरी मात्र त्यांना जुमानायला तयार नव्हते. त्यामुळे या कपाळकरंट्यांनी रझाकारांना आमंत्रण देऊन गावावर हमला करून कत्लेआम करण्यास सांगितले. झालं ! २०० रझाकारांची एक टोळी गावात धडकली. गावकरी घाबरून गेले. कुणीतरी ही खबर हसनसाहेबांच्या कानावर घातली. हसनसाहेब धावत जाऊन रझाकारांच्यासमोर उभे राहून मोमोठ्याने बोंबलायला लागले. मेरे गांव से तुम्हें क्या करने का है ? हम हिंदूमुसलमान सब मिलकर रहते हैं कै कू गाव की नासाडी कर रहे हो। असे म्हणत त्यांनी रझाकारांना दर्ग्यात नेऊन कसम देऊन कसेबसे माघारी लावले. अशा रितीने पहिले आक्रमण परत गेले.

रझाकार माघारी वळले परंतु मनातली ईर्षा माघारी फिरलेली नव्हती. बाप्यागोट्या बैचेन होते. ते सारखे घोकायचे, साले, नंदगाववाले नहीं सुनते हैं ना? सालों को जला के राख कर देंगे, हमारे नाद को नहीं लगने का त्यामुळे पुन्हा एकदा रझाकारांची धाड पडली. गावाशेजारच्या शिलवंती तलावाजवळ रझाकार येऊन थांबल्याची बातमी कुणीतरी गावकऱ्यांना दिली. सारं गाव हादरून गेलं. देवाचा धावा करताना हसनसाहेबासारखा फकीर माणूस पुन्हा एकवार धावून आला. ते तडक तलावाजवळ गेले. त्यांनी गोट्याला झापायला सुरुवात केली. आबे कै कू गाव के पीछे पडा है? सब लोगा मिलजुलकर रहते हैं, तेरे को तकलीब होती है क्या? रझाकारांना विनंती करत ते म्हणाले, देका भाईसाब इसके नाद को मत लगो, ये बेकूफ है, असे म्हणत त्यांच्या विनंतीवरून पुन्हा रझाकार माघारी फिरले. दुसरा धोका टळला.

रझाकार कधीही येऊ शकतात याची सर्वांनाच धास्ती लागून राहिली. तर स्वातंत्र्याच्या नशेत इतर पोरंही आता पार बिघडल्यागत वागायला लागली. 'ईट का जबाब पत्थर से' अशी भाषा आता सुरू झाली. असेच एकदा खुदब्याचा सण होता. गोट्या आपल्या निवडक माणसांसह प्रार्थनेला निघाला असता गावात पाहुणा म्हणून आलेल्या भैरू कदमाने झाडावर चढून गलोलीतून जो दगड सोडला तो थेट गोट्याच्या कपाळावर बसला. अगोदरच सापासारखा वागणारा गोट्या या घटनेने जाम चिडला. मुरूमच्या जमादाराला याची खबर देण्यात आली. इब्राहिम नावाचा जमादार नंदगावला आला. गोट्यासह सर्वांनी

हे काम गावच्या आप्पासाहेब पाटलाच्या पोरांनी केल्याचे सांगितल्याने पोलीस त्यांना पकडायला लागले. परंतु विश्वनाथ पाटलांनी १४०० रुपये देऊन तडजोड करून प्रकरण तात्पुरते मिटवले. अशा रितीने आग तिसऱ्यांदा विझविण्यात आली. आग विझलीतरी धूर कायम होता. कारण ती पूर्णत: विझलेली नव्हतीच. आता बाप्यागोट्याचा जोर वाढत असतानाच गावकऱ्यांनी त्यांना डिवचले होते. त्यामुळे नंदगावचे वातावरण दिवसेंदिवस तापतच चालले होते.

माघ पौर्णिमेचा दिवस. म्हणजे नव्याची पौर्णिमा. तारीख होती २२ मे, १९४८. नंदगावकरांच्या नशिबात नव्याने काय वाढून ठेवले आहे याची मात्र कुणालाच कल्पना नव्हती. सकाळची वेळ होती. गावाला पिडणाऱ्या या दोन टोळधाडांचा कायमचा बंदोबस्त करावा म्हणून घोळसगाव कँपवरील स्वातंत्र्य सैनिकांनी गावच्या एका बाजूला मुद्दामहून धुराडा केला. कारण बाप्यागोट्या पळत आले की त्यांना पकडून त्यांच्या पायात क्रांतिसिंह नाना पाटलाच्या पत्र्या ठोकायच्या असा बेत होता. परंतु रझाकारांपासून गाव जसे सावध होते तसे बाप्यागोट्या सेनानीपासून सावध राहत होते. सेनानींचा डाव गावावर उलटला.

सर्व लोक सारखेच असतात असे नाही. स्वत:च्या स्वार्थासाठी आपल्या मुलाबाळांना विकायला मागेपुढे न पाहणाऱ्या अवलादीसुद्धा असतात. असेच काही हरामी निजामाला मिळाले होते. परंतु दु:ख होते ते एका गोष्टीचे. ते म्हणजे गावाने ज्याला आपल्या गावचे नाव मोठे करील म्हणून शिकायला बाहेर धाडले तो बहाद्दर शिकल्यानंतर गावाच्या नरडीचा घोट घ्यायला निघाला होता. अशाच बहाद्दरांनी गावात गोंधळ उठल्याची बातमी मुरूमचे पोलीस आणि रझाकारांना दिली. तेव्हा आता मात्र सोडायचे नाही म्हणत रझाकारांची टोळधाड नंदगावच्या दिशेने झेपावली. बाप्यागोट्या सापडले नाहीत मात्र रझाकारापुढे काहीच इलाज चालत नाही म्हटल्यावर स्वातंत्र्य सैनिकांनी तेथून काढता पाय घेतला. गावात रझाकार घुसले तेव्हा दलित वस्तीकडे आग लागलेली होती. जिवाच्या आकांताने जोतो घरदार सोडून वाट दिसेल त्या दिशेने पळायला लागला.

गावात असलेल्या दुकानातून घासलेट घेऊन रझाकारी फौज गावच्या नरडीचा घोट घ्यायला निघाली. आग आणि रझाकार दलित वस्तीतून आता धनगरवाड्याकडे सरकले. मेंढरं राखून किडूकमिडूक जमा केलेले चार पैसे आणि पोटासाठीचे धान्य आता जळून खाक झाल्यावर पोटच्या पिलांना काय खाऊ घालायचं म्हणून गाव गेलंतरी सोमाबाई बिरू गुटे ही अहिल्या बनून

घरातच राहिली. तिच्याकडे पाहिल्यानंतर रझाकारांचे डोके जाम भडकले. अख्खा गाव आपणाला भिऊन पळून गेल्यानंतर ही बाई आपणाला चॅलेंज देतेय म्हटल्यावर जरा जास्तच होतंय म्हणून त्यांनी शामाबाईला उचलून सरळ आगीत टाकून दिलं. त्यामुळे नंदगावचा पहिला बळी हा एका बाईचा गेला.

वाघ निघून गेल्यानंतर लांडग्याचं फावतं. त्याप्रमाणे रझाकार गावावर तुटून पडले. दिसेल ते लुटायला सुरुवात केली. कष्टाने जमविलेलं कसं सोडावं या भावनेनं दुकानदार ओंकारप्पा कुट्टे त्यांचा मुलगा शिवलिंग असे दोघजण भीतभीत आपल्या दुकानाला वाचविण्यासाठी पुढे सरसावले. हे पाहून एकजण मोठ्याने ओरडला, पकडो सालों को, इसकी इतनी जुर्रत की अपने सामने आया है दोघांना पकडून अगोदर मुलगा शिवलिंगला आपल्या बापासमोरच गोळी घालण्यात आली. बापाला यापेक्षा मोठे दु:ख कोणते असणार? ओंकारप्पा जोरजोराने ओरडायला लागले. भडव्यांनों मलापण मारून टाका, मला नाय जगायचं. म्हातारा जास्तीच बडबड करतोय म्हटल्यावर रझाकाराने दुसऱ्या गोळीसाठी वेळ न घेता ओंकाराप्पाला कायमचं शांत केलं.

अशाच रितीने रामलक्ष्मणासारखे सतत सोबत राहणारे मलिकार्जुन आणि शरणाप्पा वाले या दोन्ही बंधूंना दिसताक्षणी कुठलीही चौकशी न करता गोळ्या घालून आपली रझाकारी चाल दाखवून दिली. दिसेल त्याला गोळ्या घालत रझाकारांनी सर्वत्र हैदोस घातला. ही लूट अशीच कित्येक दिवस चालू होती. पुढे सापडेल त्याला गोळया घालून ठार मारण्यात आले. बळी नारायण डांगे हा ८० वर्षांचा म्हातारा आपल्या गोठ्यात झोपलेला असताना त्याच्यावर तेल टाकून जिवंतपणे जाळण्यात आले. कसली शिक्षा म्हणायचं याला ? आणि कारणतर काय होतं ? केवळ वरचढपणाच ना? या घटनेने साऱ्या गावाची राखरांगोळी झालेली पाहून बाप्या गोटूयालासुद्धा शरम वाटली असेल. आपण करायला गेलो एक आणि झाले दुसरेच अशी त्यांची अवस्था झाली होती. परंतु आता उशीर झाला होता.

पाहतापाहता रझाकारांनी गावातील बारा लोकांचे मुडदे पाडले. ओंकारप्पा कट्टे, शिवलिंग कट्टे, गोविंद काटे, शरणाप्पा कलशेट्टी, लक्ष्मण कामशेटी, मलिकार्जुन वाले, शरणाप्पा वाले, शामाबाई धनगर, भिमराव कोळी, धानाप्पा माशाळकर, शिवरुद्र स्वामी, बसलिंग स्वामी यांच्या हौतात्म्याने नंदगाव पावन झाला. शासनाने १९८१ साली त्यांच्यासाठी स्मारकाची व्यवस्था केल्यानंतर खऱ्याअर्थाने त्यांना येथे चिरशांती मिळाली.

गावातून जीव वाचवून लोकांनी किणी, काझी कणबस याठिकाणी आश्रय घेतला. वर्षभर गावाकडे कुणी फि रकलंसुद्धा नाही. रानं उजाड झाली. गुराढोरांचे काय झाले असेल याची कल्पना करवत नाही. व्यंकटरावकाका नळदुर्गकर सोलापूरच्या जिल्हाधिकाऱ्यांना भेटले. त्यांनी किणी, घोळसगाव याठिकाणी राहणाऱ्या लोकांना अन्नधान्याची व्यवस्था केली. सरकारने पुढे ५०० कुटुंबांना ६ फुटी पत्रे दिले. आणि लोकांच्या जमिनी हिंदुस्थान ट्रॅक्टरने नांगरून दिल्या. काही प्रमाणात मदत मिळाली परंतु गावाचे गेलेले वैभव कोण परत देऊ शकेल ?

गावातील ३१३ लोकांना भूमिगताची पेन्शन मंजूर झाली परंतु ज्या हसनसाहेबांनी गावासाठी अखेरपर्यंत लढा दिला होता, त्यांनामात्र या यादीतून वगळले गेले. एखाद्या मुस्लिमाला स्वातंत्र्य सैनिक म्हणून सन्मान करावा यासाठी सरकार दरबारी आवाज उठविणारे नंदगाव हे एकमेव गाव असावे. बारा हुतात्म्यानंतर गावात स्वातंत्र्यसेनानींची रीघच लागली. यात काही अनपेक्षित नावाचाही समावेश करण्यात आला. तुळजापूर तालुक्यातील जेष्ठ स्वातंत्र्य सेनानी विश्वंभरदादा हराळकर, आबासाहेब हंगरगेकर, कृष्णराव जगताप यांच्यासमोर काही जणांनी खोटी माहिती देऊन आपल्या नातलगांची नावे थेट स्मारकावर कोरून घेतली. यामुळे बराच वाद निर्माण होऊन शेवटी अशा प्रकारची नावे यातून वगळली.

उस्मानाबाद जिल्ह्यातील चिलवडी, धानोरा आणि नंदगाव ही तीन गावं रझाकाराच्या अत्याचाराला बळी पडली. तेव्हापासूनच कदाचित हिंदीमध्ये डायलॉग म्हटला जाऊ लागला, जला के राख कर दूंगा या जळीत गावाविषयी माहिती घेत असताना त्यांच्या मानसिकतेत जाऊन पाहिले असता या गावकऱ्यांचे करावे तेवढे कौतुक थोडेच आहे. आपली शंभर पन्नास रूपयाची नोट हरवलीतरी माणूस दिवसभर परेशान होतो. इथं तर या गावकऱ्यांनी आपला संपूर्ण संसारच हरवला होता. त्यातून त्यांनी जी उभारणी केली त्याला मुजरा केल्याशिवाय मनाला शांतता मिळत नाही.

***

# १८. अपसिंग्याचा रणसंग्राम

भारताला स्वातंत्र्य मिळून वर्ष भर झालेलं होतं, आता बारी होती हैद्राबादची. पण निजाम काही हटत नव्हता. त्यामुळे भारत सरकारने काही भूमिका घेण्याअगोदरच सर्वसामान्य जनता पेटून उठली होती. मिळेल त्या मार्गाने सरकारला विरोध करण्याचे काम स्वातंत्र्यवीरांनी हाती घेतले. भारताला अहिंसेच्या मार्गाने स्वातंत्र्य मिळाले असलेतरी ती भाषा निजामाला समजणे शक्य नव्हते म्हणून लोकांनी हातामध्ये शस्त्र घेतले. या सशस्त्र उठावाला धार चढावी म्हणून स्वातंत्र्य सेनानींनी सरहद्दीवरील गावांचा आश्रय घेतला आणि हत्यारे मिळवून त्यांनी सशस्त्र क्रांतीची हाक दिली. काय असतं, हाक दिली की, साद मिळते आणि साद मिळाली की प्रतिसाद मिळतो. घोषणा ह्या मनं पेटविण्याचे काम करतात तर मन पेटली की, हात चालायला उशीर लागत नाही. आणि हात चालायला लागले की, मागण्या दौडायला चालू करतात. शिकलेला वर्ग तर याने पेटूनच उठला होता. प्रत्येकाच्या मनात क्रांतीच्या ज्वाला भडकायला लागल्या.

खरंतर कँपची कल्पनाच मुळी अफलातून असून इथं भारतात राहून अखंड भारतासाठी लढण्याची तयारी व्हायची. मिळेल तसे अन्न, हाती लागेल ती शस्त्रं घेऊन ही मंडळी मिळेल त्या वाटेन स्वातंत्र्याकडे निघालेली होती. कँपची जागा म्हणालतर कुणाचा तरी वाडा नाहीतरी गोठा, जिथं मिळेल तिथे आपला संसार थाटायचा. त्याच गावच्या आयाबाया आपल्या स्वातंत्र्यवीरांना भाकरी बडवायच्या. आपल्या हाताने खाऊ घातलेल्या अन्नाचे चीज होतय म्हटल्यावर त्यांनाही बरं वाटायचं. त्यामुळे ज्याची डोकी पेटली त्यांनी घराचा प्रपंच सोडून जगाचा गाडा हाकायला सुरुवात केली.

हैद्राबाद राजवटीत उस्मानाबाद जिल्हा निजामाचा सर्फेखास म्हणजे

वैयक्तिक उत्पन्नाकरिता असणारा जिल्हा असलातरी त्याच वेळी तो सोलापूर जिल्ह्याला म्हणजे स्वतंत्र भारताला लगत असल्याने या भागात क्रांतिकारी उठाव मोठ्या प्रमाणावर झालेले दिसून येतात. त्यामुळे गौडगाव, चिंचोली यासारख्या कँपवर शस्त्राचा मोठा साठा असायचा. सोलापुरात नागणेगुरूजी आणि व्यासाचार्य संदीकरांनी शस्त्रे बनविण्याची कला अवगत केल्याने साठ रूपयाचा बाँब आता तीन रुपयात पडायला लागला होता. वस्तू स्वस्त असली की, माणूस जरा जास्तीच वापरायला लागतो.

भारतीय स्टेट काँग्रेसची कितीही धडपड असलीतरी निजामाचा पायाही तेवढाच मजबूत होता. आपणाला विरोध केल्यावर काय गत होते त्याची झलक त्यांनी चिलवडी जाळून दाखविलेली होती. परंतु आगही जरा जपूनच लावावी लागते नाहीतर लावणाराचे हात भाजायला वेळ लागत नाही. त्याच वेळी दुसऱ्याचे घर पेटविताना आपणही शेजारी राहतो याचे भान असले पाहिजे. नाही तर एखादा निखारा आपल्याकडेही येऊ शकतो. काहीशी तीच गत निजाम आणि पर्यायाने रझाकारांची  झालेली होती.

चिंचोली कँपचा सर्वत्र बोलबाला झालेला होता. चंद्रशेखर बाजपेयींच्या नेतृत्वाखाली स्वातंत्र्य लढ्याला धार चढायला लागली होती. तर श्रीधर वर्तकासारखा शिकलेला तरुण या ठिकाणी दाखल झाल्याने चिंचोली कँपची चर्चा सुरू होती. हैद्राबादच्या टाकसाळीत काम करणाऱ्या एका सुखवस्तू बापाच्या पोटी जन्मलेला श्रीधर बी. ए. एल. एल. बी.  सारखे शिक्षण घेऊन तो मोठा  झाला. वकिलीचे शिक्षण घेऊनही पुण्याच्या विवेकवर्धिनी शाळेत शिक्षकाची नोकरी पत्करली. ज्याचं मन निजामालाच धडा शिकवायला निघालेलं होतं ते पोरांना शिकवून थोडंच थांबणार होतं? खरंच पुर्वीचे शिक्षण, मास्तर, पोरं सारं काही वेगळंच होतं. मुलं शिकल्यावर पोटासाठी बाहेर पडतात तर श्रीधर वर्तक हा तरुण सारं काही सोडून देशासाठी बाहेर पडला. हैद्राबादमध्ये राहिल्याने निजामाच्या साऱ्या हालचाली त्याला माहीत होत्या. त्याची पक्की खात्री झाली होती की, अहिंसक मार्गाने आता स्वातंत्र्य मिळू शकतं नाही. म्हणून त्याने थेट चिंचोलीचा कँप गाठला.

सशस्त्र क्रांतीने आता जोर धरलेला होता. त्यातच चिंचोलीचा कँप हा येडशीला लागून असल्याने भारताची रेल्वेगाडी रामलिंगच्या घाटात जरा हळू झाली की, स्वातंत्र्यवीर आणि त्यांच्याकडील सामान उतरायला सोपे जायचे.

त्यामुळे या कँपवर हत्यारे सहजासहजी मिळायची. त्यातच सोलापूरहून त्यांना बाबासाहेब पराजंपे, फुलचंद गांधी, विमलचंद गांधी यांनी हत्यारे पुरवायला सुरुवात केली होती. हातात हत्यार आलं की, हात शिवशिवायला लागतात. त्यामुळे चिंचोली कँपवरील लोकांनी निजामाच्या कचेरीवर हल्ला करण्याच्या हालचाली सुरू केल्या. या लोकांनी प्रथम बार्शीजवळील शेंद्रीच्या पोलीस स्टेशनवर हल्ला करावा असे ठरले. परंतु या परिसराची जास्तीची माहिती नसल्याने तो बेत रद्द करण्यात आला.

या दरम्यान चिलवडीसारखे गाव निजाम राजवटीने जाळून टाकल्याने स्वातंत्र्य सैनिकांची डोकी आता चांगलीच भडकली होती. बदला घेण्याविषयी सल्लामसलत सुरू झाली. तोडीस तोड द्यावी म्हणून सर्वांनी अपसिंग्याविषयी माहिती घेण्यास सुरूवात केली. तुळजापूरपासून चार किलामीटरवर असणाऱ्या अपसिंग्यात करोडगिरी नाका, पोलीस स्टेशन आणि रोहिलेपठाणांसह रझाकारांचा अड्डा पडलेला होता. त्यामुळे निजाम राजवटीला हादरून सोडायचे असेल तर अशा ठिकाणी हल्ला केल्यास निजाम राजवटीवर मोठा दबाव येईल अशी भावना निर्माण होऊन अपसिंग्यावर चढाई करण्यावर सर्वांचेच एकमत झाले. बेत पक्का झाला.

चिंचोलीतून ट्रक भरली. त्यातून रामचंद्रजी मंत्री, शेषराव वाघमारे, चंद्रशेखरजी बाजपेयी, श्रीनिवास खोत, काशीनाथराव मुकदम, नरहरराव मालखरे, राघवेंद्र दिवाण, श्रीधर वर्तक यांसारखी मंडळी गौडगावच्या दिशेने निघाली. गौडगावात आल्यानंतर इतर सर्वांची भेट झाली. आपली माणसं आता पराक्रम गाजवायला निघाली म्हणून सर्वांना त्यांचा हेवा वाटायला लागला. गौडगावच्या गणा काकड्यांच्या वाडयात स्वातंत्र्य सेनानीच्या राहण्याखाण्याची व्यवस्था करण्यात आलेली होती. आपल्या पतीसह स्वातंत्र्याच्या अग्निकुंडात झोकून दिलेल्या मेडसिंग्याच्या लक्ष्मीबाई पाटील, राहीबाई किशनराव शिंदे आणि चिलवडीचे रामा सुरवसे या मंडळीनी मन लावून जेवण तयार करण्याचे काम केले.

हैद्राबाद मुक्तिसंग्राम हा सर्वसामान्य लोकांनी उभा केलेला एक असामान्य लढा होता. चार लोकांनी याचे नेतृत्व केले असलेतरी लढयाची शिस्त ही एखाद्या सैनिकी छावणीपेक्षा कुठेही कमी नव्हती. स्टेट पातळीवरून आदेश आल्याशिवाय कुठलेही मोठे निर्णय घेतले जात नव्हते. आपसिंग्याची

चढाईसुद्धा याला अपवाद नव्हती. सारं काही जणू तयारीन चालू झाल होत. सोलापूरच्या विभागीय कार्यालयासाठी बाबासाहेबांनी पुण्याहून हत्याराची व्यवस्था केलेली होती. तर ती सोलापूरपर्यंत आणण्याचे काम श्यामराव शिवणगीकर यांनी केले होते. त्यामुळे सारेजण कसे आता लढाईसाठी अगदी सज्ज झाले होते.

वर सांगितल्याप्रमाणे स्वातंत्र्य सेनानींच्या हालचाली कशा एखाद्या कसलेल्या सैनिकांप्रमाणे चालू होत्या. मराठी मातीतला गनिमी कावा अजूनही त्यांच्या मना मनात रुजलेला होता. त्यामुळे रात्रीची वेळ गाठून अपसिंग्यावर चढाई निश्चित करण्यात आली. त्यानुसार सेनानींच्या तीन वेगवेगळया तुकडया करण्यात आल्या. पहिली तुकडी रामचंद्रजी मंत्री यांच्या नेतृत्वाखाली गावात घुसून रझाकाराच्या अड्ड्यावर हल्ला करणार होती. दुसरी तुकडी चंद्रशेखर बाजपेयींच्या नेतृत्वाखाली अपसिंग्याच्या वेशीवरून पुढील लढ्याच्या तयारीत राहणार होती. तर तिसऱ्या तुकडीत श्रीधर वर्तक आणि श्रीनिवास खोत यांचा समावेश होता. यात सर्वांत मोठी जबाबदारी याच तुकडीवर टाकण्यात आलेली होती.

अपसिंगा गाव तुळजापूरपासून चारपाच किलोमीटरवर असल्याने जास्तीची कुमक इथे ठेवणे सोपे होते. आदिलशाही कालखंडापासून अपसिंग्याला महत्त्वाचे स्थान असून आदिलशाही सरदार व तुळजापूरचे जहागीरदार रावरंभा निंबाळकर यांची जहागिरीसुद्धा अपसिंग्यातच राहिल्याने त्यांनी अपसिंग्याची गढी मोठी मजबूत केलेली होती. गावात प्रवेश केल्यानंतर टोलेजंग असणारी वेस गावाच्या वैभवाची साक्ष देते. एखाद्या दरीत ठेवल्याप्रमाणे गावाची रचना असल्याने इथं पाण्याचा नेहमी सुकाळ असतो. त्यामुळे गावचे उत्पन्नही भारी होते. नगरकडून तुळजापूरला जाणारा मार्गही याच अपसिंग्यावरून जात असल्याने इथं करोडगिरी नाका होता. त्याचबरोबर सोलापूरच्या हद्दीला लागून असल्याने निजामाकडूनही अपसिंग्याची सुरक्षितता वाढविण्यात आलेली होती.

बाकीच्या साधनतेबरोबरच इथं तेराव्या शतकातील शहावलीचा एक दर्गा तुळजापूरकडच्या बाजूला उंच टेकडीवरअसून याचा आश्रय रझाकारांनी घेतलेला होता. तर त्यांना मदतकरण्यासाठी रोहिल्यांची फौज दुसऱ्या बाजूने तयारीत होती. आता या लोकांना काहीच काम नाही म्हटल्यानंतर नसते उद्योग

करणारच. गावातील लोकांना त्रास देण्यासाठी ते नेहमीच पुढे असायचे. पाहिजे त्याप्रमाणात लुटालूट व्हायची. रझाकार, रोहिले आणि पठाण अशी सर्वंच मंडळी एकत्र आली होती. येणाजाणाऱ्या मंडळीची छेडछाड करायची आणि त्यांना लुटायचे असा त्यांचा धंदा बनलेला होता. तरीपण गावात भीमराव गोरे नावाचा एक बलदंड पहिलवान असल्याने लोकांना त्याचा मोठा आधार वाटायचा.

एकट्या भीमरावाला ही सारी मंडळी थोडीच आवरणार होती. निजाम राजवटीची मुजोरी एवढी वाढलेली होती की, दसऱ्याला नगरहून निघालेला देवीचा पलंग आणि पालखी बार्शीवरून मधल्यामार्गे अपसिंग्यातून तुळजापूरला जाते. अनेक शतकांपासून ही परंपरा चालू असलीतरी अपसिंग्याच्या रझाकारांनी गावात पालखी नेण्यासाठी मनाई केली. त्यामुळे पालखी गावाबाहेरून जायला लागली. अशा प्रकारचे अनेक अन्याय अत्याचार व्हायला लागले. गरीब जनतेला ते सहन करण्यापलिकडे पर्याय राहिलेला नव्हता. कुणाचाही काळ यावा लागतो. तो आता अपसिंग्याच्या रझाकारांचा आला होता.

स्टेट काँग्रेसकडून आदेश येताच स्वातंत्र्य सेनानी अपसिंग्यावर चढाई करण्यास सज्ज झालेले होते. अपसिंगा गाव तुळजापूर, उस्मानाबाद आणि गौडगावच्या कँपपासून जवळ असल्याने या गावाविषयी सर्वांनाच माहिती होती. त्यानुसार गावाकडे येणारे तिन्ही रस्ते नाकेबंदीने मजबूत करण्याची योजना आखल्याने प्रत्येकजण दिलेल्या कामाप्रमाणे तयारीला लागला. गनिमी काव्याप्रमाणे या लोकांनी हल्ल्यासाठी रात्रीची वेळ निवडली. गौडगावच्या कँपवर एक छोटेखानी निरोप समारंभ होऊन विजयी होण्यासाठी प्रार्थना करण्यात येऊन त्यांना निरोप देण्यात आला. आता वाट पहायची ती म्हणजे पुढील बातमीची !

रोहिले, पठाण, रझाकार आणि निजामाचे पोलीस अशा सर्वांनाच धडा शिकविण्याकरिता आपली मंडळी पुढे सरसावली. गावात रझाकार तर गावाबाहेर तुळजापूरच्या दिशेने एका टेकडीवर दर्ग्याशेजारी रोहिल्यांची छावणी होती. कोण कुठं जायचं आणि कोण कुठं राहतय याची संपूर्ण माहिती स्वातंत्र्य सेनानींनी घेतलेली होती. त्यामुळे सर्वजण अगदी ठरल्याप्रमाणे आपापला मोर्चा लढवायला निघाले. या तुकडीत सर्वांत महत्त्वाची जबाबदारी श्रीधर वर्धक आणि श्रीनिवास खोत यांच्यावर होती. त्यानुसार त्यांची तुकडी गौडगाववरून

ढेकरीमार्गे मधल्या वाटेने अपसिंग्याकडे निघाली. परंतु ढेकरीकडून अपसिंग्याच्या दर्ग्याकडे जाताना रझाकारांना दिसू नये म्हणून अक्षरश: सरपटत ही तुकडी आपल्या लक्ष्याकडे निघाली. मैलभर अंतर पार करायला श्रीधर वर्तकांना रात्रीचे दीडदोन वाजले.

मराठ्यांचा इतिहास जेवढा पराक्रमांनी गाजलेला आहे तेवढाच तो फितुरीने बरबटलेला आहे. साहजिकच मराठ्यांचा पराभव हा मराठ्यांनीच केला असे म्हटल्यास वावगे ठरू नये. औरंजेबासारख्या शत्रूला छत्रपती संभाजीराजांना कधी पकडता आले नसते. मात्र गद्दारीची लागण झालेला शिर्के ज्याप्रमाणे वतनाच्या एका तुकडयासाठी स्वराज्याच्या जिवावर उठला त्याप्रमाणे शिर्केसारख्या अवलादी अजूनही संपलेल्या नाहीत याची प्रचिती स्वातंत्र्य संग्रामातही पाहायला मिळाली. एका बाटलेल्या हिंदूने शिर्केप्रमाणे स्वकीयाचा गळा घोटायचे ठरविले. आणि चिंचोली कँपवरील स्वातंत्र्य सैनिक अपसिंग्यावर चालून येणार असल्याची माहिती अगोदरच एका बाटक्याने दिल्याने रोहिले आणि रझाकारांसह पोलीसही सतर्क झालेले होते.

गावात गेलेल्या तुकडीला कुठलाही विरोध झाला नाही. कारण अगोदरच सर्व काही माहिती मिळाल्याने रझाकार तेथून परागंदा होऊन माळावरील मशिदीत आश्रयाला गेलेले होते. तर माळावरच्या टेकडीवरील छावणीतही यापेक्षा वेगळी परिस्थिती नव्हती. त्याठिकाणचे रोहिलेही तेथून निसटले होते. मिळालेल्या माहितीनुसार श्रीधर वर्तक आणि त्यांचे सहकारी सरपटत पुढे येत होते. त्यांना हे माहीत नव्हते की, आपण येणार असल्याची बातमी अगोदरच रझाकारांना समजलेली आहे. त्यामुळे ते अगदी निवांतपणे परंतु लढाईच्या पवित्र्यात रोहिल्यांच्या तंबूबाहेर येऊन दाखल झाले. लष्करात ज्याप्रमाणे सरपट जाऊन शत्रूवर हल्ला चढविला जातो त्याप्रमाणे श्रीधर वर्तकांनी आपला पवित्रा घेतलेला होता. दगडधोंड्यांचा आडोसा घेत ही मंडळी सरपटत सरपटत दर्ग्याच्याबाजूला असणाऱ्या रोहिल्यांच्या छावणीला येऊन भिडली.

श्रीधर वर्तकांच्या हातात स्टेनगन असून त्यांच्यासोबत श्रीनिवास खोत आणि इतर मंडळीही हत्याराने अगदी सज्ज होती. छावणी आणि सेनानी यांच्यात आता फक्त वीस फुटांचे अंतर राहिले होते. तोच वर्तकांनी आपली स्टेनगन धडाडायला सुरुवात केली. जोश आणि होश दोन्ही कायम ठेवत त्यांनी पाहता पाहता पाच सहा जणांना परलोकी धाडले. त्यांच्या शस्त्राची ताकत एवढी प्रचंड

होती की, त्यांनी संपूर्ण छावणी आडवी केली असती. मात्र त्यांना आपलेच दुर्दैव आडवे आले. खबऱ्याच्या बातमीमुळे सारी छावणी रिकामी झालेली होती. त्यामुळे छावणीतून त्यांना अपेक्षितपणे प्रत्युत्तर मिळाले नाही. त्यांना वाटले की, रझाकार आपणाला घाबरले की काय? परंतु नशिबात दुसरेच काहीतरी लिहून ठेवलेले होते. याची कल्पना वर्तकांना किंवा इतर कोणालीही नसणे स्वाभाविक होते.

आपली बंदूक रिकामी करत करत श्रीधर वर्तक आणखी पुढे पुढे सरकत थेट दर्ग्याजवळच्या छावणीला जाऊन भिडले. परंतु वर सांगितल्याप्रमाणे खबऱ्याच्या बातमीमुळे रझाकारासह सर्वांनी दर्ग्यासारख्या पवित्र स्थळाचा आश्रय घेतलेला होता. भारतीय सेनानी जवळ आल्याची खबर मिळाल्याने रझाकारांसह सर्वजण एकतर पळून गेलेले होते किंवा दर्ग्यात आश्रयाला आलेले होते. सेनानींच्या फायरिंगला उत्तर देण्यासाठी आता ते दर्ग्यातून बंदुक झाडू लागले. दोन्ही बाजूंकडून फायरिंग चालू झाली. श्रीधर वर्तक आणि श्रीनिवास खोत हे एखाद्या कसलेल्या योद्ध्याप्रमाणे शत्रूवर बरसायला लागले होते.

सामना बराबरीचा असलातरी त्यात ध्येयाचा फरक होता. स्वातंत्र्य सेनानी स्वातंत्र्य मिळविण्यासाठी तर शत्रू हे त्यांना कायम पारतंत्र्यात ठेवण्यासाठी लढत होते. कोण किती पाण्यात आहे हे ज्याचे त्यालाच माहीत असते. त्याप्रमाणे स्वातंत्र्याच्या या लढाईत कशाचीही पर्वा न करता श्रीधर वर्तक हे आपल्या बंदुकीतून स्वातंत्र्याची ज्योत पेटवीत पुढे निघाले होते. रात्री दीड दोनपासून सुरू असणारी चकमक पहाट उजाडलीतरी चालूच होती. दगडाच्या आडोशाने पुढे सरकत सरकत थेट शत्रूच्या अड्ड्यावर एखादा बॉंब टाकून सारा खेळच खलास करावा या भावनेने वर्तक पुढे जात होते. अचानकपणे त्यांची स्टेनगन थांबली, त्यांची गोळी अडकली म्हणून त्यांनी तुराटीची काडी घेण्यासाठी डोके वर केले. परंतु जीवन आणि मरण या दोन्ही अक्षरात शब्द तीनच असलेतरी वास्तवातला फरक हा मोजण्यापलिकडचा असतो. शत्रूची एक गोळी सूं सूं करत आली आणि श्रीधर वर्तकांच्या डोक्याला छेदून आरपार झाली. प्राण गेला पण त्यांची बंदूक सुटली नाही.

बाजूला श्रीनीवास खोत त्यांच्या खांद्याला खांदा लावून लढत होते. त्यांना काहीच समजेनासे झाले. कारण श्रीधर वर्तकांची हालचालतर दिसत नाही

आणि बंदूकही सुटत नाही. त्यांनी त्याही अवस्थेत त्यांना स्पर्श करून पाहिला तर अंग थंडगार पडलेले दिसून आले. वरून शत्रूच्या बंदुका आग ओकत होत्या. परंतु श्रीनिवासांना त्याची तमा नव्हती तर काळजी होती आपल्या सहकाऱ्याची. त्यांनी हळूच एकच शब्द उच्चारला, बाबूजी गेले !! श्रीधर वर्तकांना सर्वजण आदराने बाबूजी म्हणत असत. आज त्यांचे बाबूजी हैद्राबाद मुक्तीसाठी लढताना शहीद झाले होते. दु:ख निश्चितच मोठे असलेतरी थांबून भागणार नव्हते. कारण शत्रू छाताडावर बसून नरडीचा घोट घ्यायला उत्सुक झालेला होता.

श्रीनिवास खोतांनी आपल्या सहकाऱ्यांना परतीचा आदेश दिला. सोबत बाबूजींचे शव आणि त्यांची बंदूक दोन्ही गोष्टी महत्वाच्या होत्या. परंतु रात्रभर चाललेल्या लढाईने आता सूर्योदय पाहिला होता. सकाळचा सूर्य दिसायला लागला तसा शत्रूचा आवेश आणखी वाढायला सुरूवात झाली होती. इच्छा असूनही बाबूजींचे कलेवर एकटे सोडून श्रीनीवास खोत आणि त्यांच्या सहकाऱ्यांनी तेथून माघार घेतली. गावात दुसऱ्या दोन टोळ्यांना याची कल्पना देण्यात आली. वेळ घालविण्यात अर्थ नव्हता. कारण उस्मानाबाद आणि तुळजापुरातून निजामाच्या पोलिसांची कुमक अपसिंग्याच्या रोखाने निघाली होती. म्हणून परतीचा बिगूल वाजवला गेला. सर्वजण गावच्या वेशीजवळ जमा होऊन गौडगावच्या दिशेने निघून गेले. मात्र त्यांच्या मनात बाबूजी सोबत नसल्याची खंत कायम होती म्हणून कोण कोणाला बोलत नव्हते. सारे काही अगदी शांत शांत !

चढाईवर निघालेल्या आपल्या वीरांचे तोंड गोड करावे म्हणून गौडगावच्या कँपवर आंबरसाचा बेत आखण्यात आला होता. चिलवडीचे रामा सुरवसे, मेडसिंग्याच्या लक्ष्मीबाई पाटील आणि राहीबाई किशनराव जाधव यांच्यासारखी माणसं झटून स्वयंपाकाला लागली होती. चिंचोली आणि गौडगाव अशा दोन्ही कँपवरील बहाद्दर वीर आज एकत्र आलेले होते. मग जरा गोडधोड व्हायला नको का? म्हणून गावातूनच ढिगाराभर आंबे आणले. त्याचा रस करून दोन रांजन भरण्यात आले. बस्स ! आपले बहाद्दर शिपाई आता अपसिंग्याची चढाई फत्ते करून आले की, सर्वांनी मिळून निजामाचे गोड जेवण करायचे हे निश्चित केले होते. त्यानुसार अपसिंग्याच्या मोहिमेवर गेलेल्या जवानांची सर्वजण अतुरतेने वाट पाहत होते.

भेटीची आतुरता आता संपली. कँपवाल्यांपैकी कुणीतरी सांगितले की, अपसिंग्याला रात्री गेलेला स्वातंत्र्य सेनानींचा ट्रक आपल्याकडे येताना दिसतोय. आता काम फत्ते झाल्याची बातमी ऐकली की, एकमेकांना मिठ्या मारायच्या आणि नंतर गोडधोड खाऊन विजय साजरा करायचा असा बेत ठरवून सर्वजण उत्सुकतेने ट्रकची वाट पाहत होते. ट्रक जवळ आला. त्यातून एक एकजण उतरायला लागला परंतु कोणी कोणाला बोलताना दिसत नव्हते. शंकेची पाल चुकचुकली. दहा माणसात उठून दिसणारा हैद्राबादहून मुद्दाम देशसेवेसाठी आलेला आपला एक सहकारी श्रीधर वर्तक ऊर्फ बाबूजींची अनुपस्थिती सर्वांना खट्टकन जाणवली. इशाऱ्यावर काही ते समजायचे ते समजले. एकच आक्रोश सुरू झाला. आमरसाचा राजंन पालथा करण्यात आला. गौडगाव कँपने त्यादिवशी नुसते सुतकच पाळले नाहीतर पूर्ण दिवसभर कोणी कोणाला साधे संभाषणही केले नाही.

वर्दी गेल्यामुळे निजामाची जादा कुमक अपसिंग्यात येऊन दाखल झाली. उस्मानाबादच्या डी. वाय. एस. पी. ने श्रीधर वर्तकांचा मृतदेह पाहिला आणि तोंडाला येईल त्याप्रमाणे तो बडबडायला लागला. त्याच रागात त्याने बाबूजींचे शव आपल्या गाडीला बांधून एखाद्या क्रूरकर्म्याप्रमाणे फरफटतच उस्मानाबादला नेले. पोलीस स्टेशनात नेऊन त्याची विटबंना केली. अफजलखानाला मारल्यानंतर त्याच्या प्रेताची विटंबना करू नका म्हणून सांगणाऱ्या जीजाबाईसारख्या माता त्याला लाभलेल्या नसल्याने तो असा हैवानासारखा वागला असेल. चिलवडी जाळणारा हैदरीसारखा कलेक्टरही या घटनेने संतप्त झाला. आणि त्याच आवेशात त्याने वाक्य उच्चारले की, मर्द आदमी की इज्जत करना मर्दो का काम है, अगर कोई इसके खिलाफ अपना रवैया अपनाता है तो वह उसकी नामर्दगी है।

अपसिंग्यात करफ्र्यूची परिस्थिती होती. भिक्षा मागत असताना देशासाठी हेरीगिरी करणारे रेवणसिद्व आणि विरप्पा स्वामी आणि काँग्रेसचे काम करणारे बाबूराव तेली तसेच प्रभाकर कुलकर्णी यांना अपसिंग्यातच गोळया घालण्यात आल्या. देशाच्या रक्षणासाठी प्राणांची बाजी लावणाऱ्यांच्या कमतरता नसते. आपलं सुखवस्तू कुटुंब सोडून जगाचा प्रपंच करायला निघालेल्या श्रीधर वर्तकांना हा संसारही कमी पडला. परंतु चार भजनीकरांमुळेच गावात रामनामाचा जप होत असतो. त्याप्रमाणे स्वातंत्र्य सैनिकांना स्वत:च्या

प्रपंचाची चिंता थोडीच होती? माणूस मेलातरी आठवणी कायम असतात आणि त्या वस्तूच्या रूपात असतील तर? याची जाणीव होऊन गावातील रामचंद्र गायकवाडांनी वर्तकांनी प्राण सोडला त्याजागी एक वडाचे झाड लावून त्याला पाणी घातले. आजही त्याचा वटवृक्ष आपणास पाहण्यास मिळतो.

याच वेळी उस्मानाबाद जिल्ह्यातील वाशी या तालुक्याच्या ठिकाणी श्रीधर वर्तकांच्या नावाने चौक उभा करून श्रद्धांजली अर्पण करण्यात आली. आजही आपण गावाच्या जुन्या भागात गेलो म्हणजे जहागीरदाराच्या वाड्यासमोर जो दर्गा आहे त्यालगत असणाऱ्या चौकात एक फलक लावलेला आहे. त्यावर नाव आहे – 'श्रीधर वर्तक चौक'. संशोधनाच्या निमीत्ताने आमचे वरिष्ठ सहकारी मित्र श्री बुबासाहेब जाधव, चिलवडीकर यांच्यासह एकदा वाशीला जाण्याचा योग आला होता. या वेळी उस्मानाबाद आकाशवाणीवर माझी ''असे झुजलो आम्ही'' नावाची मालिका जोरदारपणे सुरू होती. त्यामुळे श्रीधर वर्तकांचे नाव पाहून निश्चितच अभिमान वाटला. परंतु त्याठिकाणी असलेल्या एकाही माणसाला श्रीधर वर्तक कोण हे सांगता आले नाही.

श्रीधर वर्तकांचे बलिदान हैद्राबाद मुक्तिसंग्रामात एक मैलाचा दगड ठरला. बाबूजींच्या बलिदानाचा बदला घेण्यासाठी जोतो आपापल्यापरीने कामाला लागला. आजही आपण तुळजापुराकडून अपसिंग्यात प्रवेश करायला लागलो की, टेकडीवरचा वटवृक्ष श्रीधर वर्तकांच्या रूपाने देशाची सेवा करण्याचा मंत्र देण्यासाठी उभा आहे.

काळ गेला त्याप्रमाणे विसरही पडायला लागला. अपसिंग्याच्या माळावर अगदी दर्ग्याच्यासमोर स्वातंत्र्य सेनानी श्रीधर वर्तकाचे स्मारक आहे. याची गावातील अनेक तरुणांना साधी कल्पनाही नाही. स्मारकाच्या बाजूला त्याची आठवण म्हणून रामचंद्र गायकवाड यांनी लावलेल्या वडाच्या रोपट्याचे आज वटवृक्षात रूपांतर झालेले आहे. झाड हे सावलीसाठीच असलेतरी इतर गावाप्रमाणे इथंसुद्धा रिकामी ठोळकी पत्ते किंवा इतर व्यसनं उरकताना दिसतात. त्यामुळे दु:ख होत असलेतरी श्रीधर वर्तकाचे बदलीदान प्रेरणा देण्यासाठी उभे आहे.

***

# 'नान्नज डे'ला होतात आज ६५ वर्षे पूर्ण

**सोलापूर / शरीफ सय्यद**

पंधरा ऑगस्ट १९४७ रोजी भारत स्वतंत्र झाला तरी हैदराबाद संस्थानातील मराठवाडा आणखी पारतंत्र्यात होता. सध्या सोलापूर जिल्ह्यातील उत्तर सोलापूर तालुक्यात असणारे नान्नज हे गाव त्याकाळी तुळजापूर तालुक्यात होते. निजामाचा करोडगिरी नाका, पोलीस स्टेशन तसेच कष्टकरी कॅम्प हे नान्नज येथे होते. ५ मे १९४८ रोजी स्वातंत्र्यसैनिकांनी नान्नजच्या निजामी पोलीस स्टेशन आणि करोडगिरी नाक्यावर हल्ला केला. निजाम राजवटीत याची खूप चर्चा झाली. त्यामुळे या दिवसाला 'नान्नज डे' म्हणून ओळखले जाते. या घटनेला आज ६५ वर्षे पूर्ण झाली आहेत.

उत्तर सोलापूर, मोहोळ, बार्शी आणि माढा तालुक्यातील काही गावे निजाम राजवटीत होती. त्यात कारंबा, नान्नज, मसलेचौधरी, भोयरे, वाळूज, देगाव, मानेगाव, सासुरे, इर्ले, जामगाव, शेंद्री, श्रीपत पिंपरी यासारख्या गावांचा त्यात समावेश होता. भारतातील ५६४ संस्थाने भारतात विलीन झाली. परंतु हैदराबादचे सातवे निजाम मीर उस्मान अलीसा जंगबहाद्दूर आसल जहाँ यांनी पाकिस्तानप्रमाणे स्वतंत्र होण्याची तयारी सुरु केली होती. या परिसरातील हिंदू-मुस्लिम समाजातील नाजूक संबंधामुळे भारताच्या स्वातंत्र्याला वर्षाचा कालावधी लोटला, तरी हा भाग हा निजामाच्या अधिपत्याखाली असणारा भाग पारतंत्र्यातच होता.

नान्नज हे सोलापूर-बार्शी रस्त्यावरील मुख्य ठिकाण असल्याने त्याकाळी या गावाला 'वाघा बॉर्डर'चे स्वरूप होते. सध्या नान्नज येथे असणाऱ्या स्टेट बँक आणि पोलीस स्टेशनच्या दरम्यान असणाऱ्या जागेत निजामशाहीचा करोडगिरी नाका आणि पोलीस ठाणे होते. बार्शी- सोलापूरकडून आणलेल्या कुठल्याही मालाच्या गाड्या साखळी लावून अडविल्या जायच्या. दादागिरी केली जायची. याकरिता निजामाचे बंदुकधारी पोलीस तैनात-सज्ज असायचे. लष्करी ताकद वाढवायला युनोकडून आणि इंग्रजांकडून बंधने येत असल्याने निजामाने लातूरच्या कासीम रझवीच्या नेतृत्वाखाली रझाकारांची एक स्वतंत्र समांतर फौज उभी केली होती. या फौजेत अफगाण, पठाण रोहिले यांचा मोठ्या प्रमाणात भरणा होता. मोठ्या गावात रझाकारांचे अड्डे होते. त्यात नान्नजचा समावेश होता. निजाम सरकारपेक्षा स्थानिक जनतेला रझाकारांकडून होणारा छळ सहन करावा लागत होता. त्यामुळे रझाकारांची प्रचंड दहशत होती.



हैदराबाद मुक्ती संग्रामात सहभाग घेतलेले जिगरबाज स्वातंत्र्यसेनानी विठ्ठलराव पाटील- जामगावकर, रामभाऊ जाधव (चिलवडी), भगवान तोडकरी (उस्मानाबाद) व त्यांचे सहकारी स्वातंत्र्यसेनानी.

हैदराबाद मुक्ती संग्रामाची चळवळ जोर धरायला लागली होती. सशस्त्र लढा उभा करण्यासाठी स्वातंत्र्य सैनिकांनी गौडगाव, पानगाव, बार्शी, चिंचोळी या ठिकाणी कॅम्प उभे केले होते. उस्मानाबादचे उद्योगपती माजी मंत्री फुलचंद गांधी यांनी तरटी नाक्याच्या मागे असलेली स्वतःची माणिक ऑईल मिल बंद करुन ती स्वातंत्र्यसैनिकांना हत्यारे बनविण्यासाठी देऊन टाकली होती. या ठिकाणी मुंबई-पुणे येथून आणलेली शस्त्रे ठेवली जायची. याच मिलमध्ये दररोज ३०० ते ४०० हातबॉम्ब बनविले जायचे. ही हत्यारे व हातबॉम्ब हैदराबाद मुक्तीसाठी झटणाऱ्या सर्व केंद्रांना पुरविले जायचे. नान्नजच्या करोडगिरी नाक्यामुळे हैदराबाद मुक्ती संग्रामात काम करणाऱ्या स्वातंत्र्यसैनिकांची अडचण व्हायची. या मार्गावरुन जाणारी हत्यारे निजाम सैन्याच्या हाती लागत. भगवान तोडकरी, प्रभाकर जाधव, रावसाहेब माने यांच्यासह अनेक स्वातंत्र्यसैनिक सोलापूरहून हत्यारे घेऊन टुरिंग गाडीतून गौडगावच्या कॅम्पकडे निघाले. सकाळची वेळ. गाडी करोडगिरी नाक्यावर आल्याबरोबर निजाम सैन्याने साखळी लावून गाडी अडविली. त्याबरोबर गाडी चालकाने त्या सैनिकाची मान बगलेत आवळली. बाजूला पोलीस ठाण्यातील बंदुका स्टॅन्डला लावून ठेवल्या होत्या व इतर पोलीस नाष्टा करत होते. याचा फायदा घेत स्वातंत्र्यसैनिकांनी पोलिसांच्या २२ बंदुका घेऊन पळ काढला. या घटनेने वातावरण फार बिघडले. निजाम पोलिसांनी भारताच्या ३ पंजाब रेजिमेन्टच्या गाडीवर हल्ला केल्याने दोन जवान शहीद झाले. त्यामुळे भारतीय सैन्याने सरळ बॉम्ब टाकून नान्नजचे पोलीस स्टेशन, नाका सर्व काही उद्ध्वस्त केले. नान्नजच्या घटनेमुळे पुढे स्वातंत्र्याचा लढा तीव्र होऊन १७ सप्टेंबर १९४८ रोजी हैदराबादच्या पाडावामुळे नान्नजसह इतर गावे स्वतंत्र झाली.

प्रा.डॉ. सतीश कदम यांनी याविषयी बोलताना, याकामी सोलापूरचे तत्कालीन जिल्हाधिकारी संभाजी मोहिते, पोलीस अधीक्षक पंत, वैरागचे फौजदार माने यांनी मोठी कामगिरी बजावली. जे इतिहास विसरतात त्यांना भविष्य नसते. परंतु आपला सुवर्ण इतिहास आजच्या तरुणाईला माहीत नाही. तो इतिहास सगळ्यांना माहीत झाला पाहिजे, अशी अपेक्षा व्यक्त केली.

- निजाम राजवटीतील गावे १५ ऑगस्टला नाही तर १७ सप्टेंबर १९४८ रोजी स्वतंत्र झाली. त्यामुळे मराठवाड्याप्रमाणे हा दिवस साजरा व्हायला हवा.
- निजाम राजवटीला लोक मोगलाई म्हणत, हा चुकीचा शब्द
- हैदराबादच्या निजाम घराण्याने २२५ वर्षे राज्य केले
- शेवटचा निजाम उस्मान अली हा जगातील सर्वात श्रीमंत माणूस
- निजाम हा पेपरवेट म्हणून १३६ कोटींचा जेकब हिरा वापरायचा
- हैदराबाद मुक्ती संग्राम हा सर्वसामान्यांचा लढा होता

# १९. हैद्राबाद संस्थानात नान्नजचे महत्त्व

इतिहासाला जो विसरून जातो त्याचे भविष्य अंध:कारमय असते. देश स्वतंत्र्य झाला तशा भौगोलिक सीमा बदलल्या, राजकारण आणि समाजकारणात आमूलाग्र बदल होत गेले. आजचा सोलापूर जिल्हा कधी काळी नगर जिल्ह्यात तर उस्मानाबाद गुलबर्ग्यात होते हे सांगूनही पटणार नाही. अकलूज आणि अक्कलकोट ही जिल्हयाची ठिकाणं होती. अशा अनेक आश्चर्यकारक घटना जाणून घेण्यासाठी इतिहासाचे स्मरण केले पाहिजे. स्वातंत्र्यपूर्व कालखंडात सोलापूर जिल्ह्यातील अनेक गावे हैद्राबाद संस्थानात होती. तर उस्मानाबादलगतची काजळा, वाघोली, उपळा, येडशी, तडवळा, अंबेजवळगा ही गावे सोलापूर जिल्ह्यात होती, हे आता आवर्जून सांगावे लागते.

निजाम राजवटीचा इतिहास जाणून घेताना सोलापूर जिल्हयातील लोकांचा एक समज असतो की, यात आमचा काय संबंध ? परंतु, आश्चर्य वाटेल की सोलापूर जिल्ह्यातील जवळपास ५३ गावे अगदी १९४८ पर्यंत उस्मानाबाद जिल्ह्यात मोडत होती. एवढेच नाहीतर या गावांवर कधीही इंग्रजांचे शासन नव्हते. त्यामुळे या भागातील लोकांनी १९४२ चे चलेजाव आंदोलन, मिठाचा सत्याग्रह केला नाही. यापेक्षा सिंदीची झाडे तोडणे, निजामाचे करोडगिरी नाके लुटणे, लेव्ही बंदी या प्रकारची आंदोलने केलेली आहेत. रझाकाराविरुद्ध तर त्यांनी हातात शस्त्र घेऊन थेट क्रांतीची हाक दिली.

आपले गाव निजाम राजवटीत होते का? हे ओळखण्याचा सोपा मार्ग आहे. त्यानुसार निजाम राजवटीच्या पाऊलखुणा ओळखायच्या असतील तर ज्या गावात राहात असलेला सिमेंट काँक्रेंटचा आड आहे ते गाव निजाम राजवटीत होते हे सहज ओळखता येते. बाकी काही असेल परंतु त्याकाळात

निजामाचे बांधकाम खाते अतिशय कृतिशील होते हे मान्यच करावे लागते. निजामाचे अर्थमंत्री मोईन नवाब जंग, सुधारणा मंत्री नबाब झैन यारजंग, इंजिनिअर महंमद इस्माइल यांनी पाण्यासाठी आडांची निर्मिती केलेली होती. या ठिकाणी मुद्दा एवढाच की, ज्या गावात पाण्याचा मजबूत आड असला की, तेथे निजाम राजवट होती असे समजावे. आजही हे आड पाण्यासाठी उपयोगात आणले जात असून ते भक्कम अवस्थेत आहेत हे विशेष.

निजामाची राजधानी हैद्राबाद असून आजच्या प्रशासनाप्रमाणे प्रत्येक जिल्ह्याला कलेक्टरपासून गावपातळीपर्यंत सर्व यंत्रणा सारखीच होती. फक्त फरक एवढाच, त्यांचे शासन कडक आणि कृतिशील होते. लाच देण्याघेण्याची घाण अजून झालेलीच नव्हती. झटपट निकाल हा निजाम राजवटीचा गाभा होता. म्हणून आजही म्हातारी माणसं निजाम राजवट बरी होती म्हणतात.

निजामशाही म्हणजे अनियंत्रित राजेशाही. निव्वळ जहागिरीतून निजामाला १५ कोटींचे उत्पन्न मिळायचे. उस्मानाबाद जिल्हा हा निजामाच्या सर्फेखास म्हणजे वैयक्तिक उत्पन्नाकरिताच्या जहागिरीचा भाग होता. दुसरे म्हणजे निजामाचे सर्वात मोठे उत्पन्नाचे साधन म्हणजे अबकारी कर. याकरिता सिंदीचे उत्पादन मोठ्या प्रमाणावर केले जात होते. लेव्हीतून धान्य जमा केले जायचे तर जागोजागी जकात नाके बसविलेले होते. (या नाक्यातून निजामाला करोडो रुपयांचे उत्पन्न मिळायचे म्हणून त्याला करोडगिरी नाके म्हटले गेले.) उस्मानाबादलगत सोलापूर जिल्हा असून सीमेवर पोलीस चौक्या तैनात करण्यात आलेल्या होत्या. करोडगिरी नाक्यावर बहुतांश प्रमाणात पठाणांचा भरणा असून त्याच वेळी काही रझाकारमंडळी त्या ठिकाणी बसलेली असायची. त्यामुळे येणाऱ्या जाणाऱ्याला या लोकांचा मोठा त्रास व्हायचा.

अशा व्यवस्थेत सोलापूर जिल्हयातील नान्नज, काक्रंबा, वाळूज, देगाव, भोयरे, मसला चौधरी, सासुरे, इर्ले, उंडेगाव, मानेगाव, जामगांव, श्रीपत पिंपरी यांसारखी अनेक गावे उस्मानाबाद जिल्ह्यात समाविष्ट होती. यात श्रीपत पिंपरीला धान्याचे मोठे गोडावून, सिंदीचे बन आणि पोलीस ठाणे होते. १९४८ ला रामचंद्रराव हे इथले फौजदार होते. याप्रमाणे चौधरी मसले, मानेगाव येथेही पोलीस ठाणी होती.

यामध्ये नान्नजचे महत्त्व थोडया वेगळया दृष्टीने घ्यावे लागणार आहे. कारण या गावात निजामाचे पोलीस ठाणे, करोडगिरी नाका, लेव्हीचे गोडावून,

लष्कराचा तळ आणि रझाकारांचा मोठा अड्डा होता. त्यातच नान्नज हे सोलापूर-बार्शी रस्त्यावर मोक्याचे गाव असल्याने सुरक्षिततेच्या दृष्टीने काळजी घेणे गरजेचे होते. त्यामुळे नान्नजला महत्त्व प्राप्त झालेले होते. ब्रिटिशांमुळे सोलापूर-बार्शी सिमेंटचा रस्ता तयार करण्यात आलेला होता. या रस्त्यावरून मालाची वाहतूक मोठ्या प्रमाणावर व्हायची. तर सोलापूरच्या भागवत कंपनीच्या कोळशावर आणि क्रूड ऑईलवर चालणाऱ्या टुरिंग गाड्या प्रवाशाला घेऊन जायच्या. मालमोटारीबरोबरच बैलगाडीची वाहतूक व्हायची.

त्यामुळे नान्नजला असलेला करोडगिरी नाका रात्रंदिवस कार्यरत होता. जकात वसुलीकरिता निजामाचे स्वतंत्र कस्टम (अबकारी) विभाग असून प्रत्येक यासाठी जिल्ह्याकरिता स्वतंत्र कस्टमचा  म्हणजे पोलीस प्रमुख असून नाक्याची वसुली पठाणाकडे देण्यात आलेली होती. त्यांच्याकडून मुख्य रस्त्यावर साखळी लावून गाडया अडविल्या जायच्या. कधीकधी अर्वाच्य भाषेत शिवीगाळ केली जायची. सोबत पोलीस ठाणे असून त्या ठिकाणी २०-२५ हत्यारबंद पोलीस असायचे. शंका वाटल्यास गाडीतला माल मोजला जायचा. याकरिता बाजूला भला मोठा वजनकाटा ठेवलेला होता. गावातच रझाकारांचा अड्डा असल्याने त्यांनी मोठी दहशत निर्माण केली होती. तर लेफ्टनंट कर्नल हिमायत बेग यांनी अधून-मधून लष्कराची गस्त चालूच ठेवली होती. त्यामुळे नान्नजच्या नाक्यावर भारतीय लष्कर आणि निजाम पोलीस यांची चकमक व्हायची.

१५ ऑगस्ट, १९४७ भारताला स्वातंत्र्य मिळाल्यानंतर हैद्राबाद संस्थानातील लोकांनी उचल खाल्ली. आर्यसमाज, हिंदू महासभा, स्टेट काँग्रेसच्या रूपाने उठावाला सुरुवात झाली. संस्थानातील स्वातंत्र्य सैनिकांना सरहद्दीवरील गावात सशस्त्र केंद्र उघडण्यास भारत सरकारकडून उघडपणे मदत करण्यात आली. सोलापूरचे तत्कालिन कलेक्टर संभाजीराव घाडगे यांनीतर उघड-उघड मदत केली. एवढेच नाहीतर पुण्याच्या लष्करी छावणीतून हत्यारे पुरविण्यात येऊ लागली. मराठवाड्यातील स्वातंत्र्य सैनिकांना लागणारा शस्त्रसाठा उस्मानाबाद जिल्हा काँग्रेस कमिटीचे अध्यक्ष मा.फुलचंद गांधी यांच्या सोलापूर येथील माणिक ऑईल मीलमध्ये तयार होऊ लागला. त्यामुळे सोलापूर जिल्ह्याच्या सरहद्दीवरील गावात नेहमी तणावाचे वातावरण निर्माण झाले.

उस्मानाबाद जिल्हा परिसरात गौडगाव, चिंचोली, पानगाव, काजळा, तडवळा या गावात कँप चालविले जात होते. ही गावे सोलापूर जिल्ह्यात मोडत असल्याने उस्मानाबाद जिल्ह्यातील गावात सरकारविरोधी गोंधळ घालून कँपवर पळून जाणे सोपे जात होते. शिवाय सोलापूरहून या कँपला शस्त्रांचा पुरवठा केला जात होता. त्यामुळे जाता-येता नान्नज नाका ओलांडणे भाग पडत होते. त्यातूनच वरचेवर कुरबुरी वाढत होत्या.

५ मार्च, १९४८ उस्मानाबादच्या कलेक्टरपदी महंमद हैदर यांची नियुक्ती झाली. निजाम उस्मानअलीच्या अत्यंत जवळचा माणूस म्हणून हैदरसाब ओळखले जात होते. निजामाबादचे उपजिल्हाधिकारी असताना बढती देऊन मुद्दाम त्यांना उस्मानाबादला पाठविले होते. कर्तव्यदक्ष हैदरने अगदी दुसऱ्याच दिवशी म्हणजे ६ मार्च, १९४८ रोजी सोलापूरचे कलेक्टर संभाजीराव घाटगे आणि पोलीस प्रशासन यांच्यासोबत तुळजापूर तालुक्यातील तामलवाडी येथे एक बैठक घेतली. त्यात सीमा भागातील हालचालीविषयी भरपूर चर्चा करण्यात आली. दिवसेंदिवस सीमावर्ती गावे आता संवेदनशील झाली होती.

गौडगांवच्या कँपवर चिलवडीच्या रामभाऊ जाधवांनी निजामाविरुद्ध हालचाली वाढविल्या होत्या. परिणामी २० मार्च, १९४८ ला चिलवडी जाळण्यात आली. चिंचोली कँपवर चंद्रशेखर बाजपेयी, काजळ्यात भाई उद्धवराव पाटील आणि दत्तोबा भोसले तर पानगावच्या कँपवर इर्लेवैरागचे ज्ञानेश्वर पाटील आणि जामगावचे विठ्ठलराव पाटील निजामसेनेशी दोन हात करत होते. चिलवडी जळीत प्रकरणामुळे अगोदरच वातावरण तंग असतानाच पानगावच्या कँपवाल्यांनी श्रीपत पिंपरीच्या पोलीस स्टेशनसह ६० लोकांना बंदी बनवून टाकले होते. अशा रितीने वातावरणातील दाहकता दिवसेंदिवस तीव्र बनत चालली होती. रझाकार आणि स्टेट काँग्रेसचे स्वातंत्र्य सैनिक यांच्यातील धुमश्चक्री वाढली होती.

१९४८ उजाडला तरी हैद्राबादचा निजाम आणखी स्वतंत्र होण्याची भाषा सोडत नव्हता. पाकिस्तान आणि गोव्यातून शस्त्र घेऊन विमानं रात्रीच्या वेळी बिदर विमानतळावर उतरत होती. याची खबर भारतीय लष्कराला नसावी हे थोडेच शक्य होते ? त्यामुळे भारतीय लष्कराने आपल्या हालचाली तीव्र केल्या होत्या. अहमदनगर, सोलापूर या ठिकाणी लष्कराचा तळ ठोकून आता या परिसरात युद्ध सराव सुरू केलेला होता. याला ऑपरेशन कबड्डी हे नाव देण्यात

आले होते. याचीही खबर हैद्राबादपर्यंत जात होती. याकरिता  चे अधिकारी सय्यद अब्दुल लतिफ  हे लक्ष ठेवून होते. साहजिकच निजामाचे सर्व नाके, पोलीस चौक्या आणि लष्करी प्रशासन सतर्क झाले होते. त्यातूनच नान्नजच्या करोडगिरी नाक्यावरील यंत्रणा अधिक कडक होणे स्वाभाविक होते. बैलगाडी असो की मालगाडी किंवा टुरिंग गाडी सर्वांनाच साखळी टाकून अडविल्यानंतर त्यांची कसून चौकशी केल्याशिवाय पुढे जाता येत नव्हते.

दुसऱ्या बाजूला संस्थानातील लढा आता अधिक तीव्र झालेला होता. अशा वेळी सोलापूरचा शस्त्रसाठा इतरत्र घेऊन जाताना नान्नजचा नाका अडकाठी ठरत होता. तर नान्नजमध्ये राहणारे रझाकार आजूबाजूच्या गावात जावून धुमाकूळ घालत होते. याचाही राग स्वातंत्र्य सेनानींच्या मनामध्ये धुमसत होता. नाकेदारांना चुकवून हत्याराची लपवालपवी करावी लागायची. असेच एकदा गौडगाव कँपचे लोक सोलापूरमधून हत्यारे घेऊन निघाले. मोठी टुरिंग गाडी आणि मागे एक मालमोटार ज्यात फक्त हत्यारे भरलेली होती. ड्रायव्हरसह सर्वजण स्वातंत्र्यसैनिक गाडीमध्ये बसलेले होते. ट्रकचा चालक दुसरा तिसरा कोणी नसून खुद्द स्वातंत्र्य सेनानी विजयेंद्र काबरा होते. चिलवडीचे प्रभाकर जाधव, भगवान तोडकरी, रावसाहेब माने यांनी या वेळी मोठी कामगिरी केली होती. प्रभाकर जाधवांनी स्वत: याविषयी जी माहिती दिली, ती अंगावर शहारे आणणारी होती.

नान्नजचे पोलीस स्टेशन आणि करोडगिरी नाका नेहमीप्रमाणे बंदोबस्ताने सज्ज होता. बार्शी-सोलापूर रस्त्यावर गाड्या अडविण्यासाठी साखळी लावून तयार आहे. वेळ दुपारची. १ ते १.३० वाजले असतील, नाक्यावर जिथं साखळी लावलेली तिथंच पोलीस ठाणे, पुढच्या बाजूला एका ओळीत संगीन लावलेल्या बंदुका ठेवलेल्या होत्या. दुपारची वेळ असल्याने पोलीसासह इतर पठाण आणि रझाकार नमाजासाठी गेलेले असावेत. तरीपण डयुटीवर असलेला एक पोलीस खांद्यावर बंदूक अडकावून तयार होता. साखळी टाकलेली असल्याने तो जरा निवांतच झाला होता.

तेवढ्यात सोलापूरकडून एक टुरिंग गाडी (जीपसारखी प्रवाशी वाहतूक करणारी गाडी) आली. त्या गाडीच्या मागच्या बाजूला एक मालमोटार होती. गाडी पाहताच पोलिसाने पुन्हा एकवार साखळीला हात लावला. भरधाव वेगाने धावणाऱ्या गाडीला पुढे साखळी आडवी दिसताच गाडीच्या चालकाने कचकन

ब्रेक दाबला. नाक्याची चाहूल लागल्याने मागची मंडळी अगोदरच सावध झालेली होती. नाक्यावरची तपासणी एकदा झाली की, आपण आता मोकळे होणार याची त्यांना जाणीव होती. त्यामुळे नान्नजच्या नाक्यावरील तपासणीची एवढी बला टळली की, पुढे रान रिकामेच होते. गाडी थांबली तशी सर्वांची धकधक वाढली. हत्यारं व्यवस्थितपणे लपवून ठेवलेली होती. तरीपण पुढे काय होणार ? याची सर्वांनाच उत्सुकता लागलेली होती.

बंदूक सावरत पोलीस मोठया गुर्मीत हळूहळू गाडीजवळ आला. चालकाजवळ जाऊन त्याने प्रश्न केला, क्या है रे गाडी में ? ड्रायव्हरने उत्तर दिले, ए, सरळ बोल ना ? शिवी कैको देता ? पोलिसाला वाटले आपणाला कोणीच उलटे बोलत नाही. आज हा कोण आहे जो उद्धटपणे आपणाला उत्तर देतो आहे. त्यामुळे तो आणखीनच बिथरला. बोलण्या बोलण्यात त्यांच्यात काहीतरी बाचाबाची झाली. ड्रायव्हरचे डोके फिरले आणि त्याने एक हात स्टेअरिंगवर ठेवून दुसऱ्या हाताने पोलिसाची गर्दन पकडून बगलेत दाबून धरली. रात्रीचा दिवस करणाऱ्या शूराचा हात पोलिसाच्या गळ्याभोवती जाम आवळलेला होता. आता बिळात हात घातल्यानंतर सापाला पकडल्याशिवाय भागणारे नव्हते त्यामुळे त्याने आपला हात आणखीनच घट्ट केला. दुसऱ्या बाजूला गुदमरून पोलीस तडफ डायला लागला होता.

मागच्या बाजूला बसलेला तडफदार सेनानी भगवान तोडकरीने गाडीतून उडी टाकली. भगवानच्या नजरेने परिस्थितीचा जायजा घेतला. पाहतो तर पोलीस ठाणे रिकामे पडलेले. त्यांनी प्रभाकर जाधवांना खुणावले तसे गाडीतून पाच-दहा जणांनी उड्या घेतल्या. हे सर्वजण सरळसरळ पोलीस ठाण्यात घुसले आणि लाकडाची मोळी बांधावी त्याप्रमाणे २०-२२ रायफ ली बांधून सरळ गाडीत कोंबल्या. काम फत्ते होताच दाबून धरलेल्या बिचाऱ्या पोलीसाचीही बंदूक घेतली. तोपर्यंत रावसाहेब मानेने साखळी सोडून रस्ता खुला करुन दिला.

गळ्याचा फास सुटल्याने पोलिसाने सुटकेचा निःश्वास टाकला. तोपर्यंत ड्रायव्हरने गाडी पुढे दौडायला सुरुवात केली. परिस्थिती सावरून आपल्या सहकाऱ्यांना बोलावून घेईपर्यंत स्वातंत्र्यवीरांचा रथ आता वडाळा-गावडी दारफळच्या पुढे सरकला होता. देव देतो तेव्हा 'छप्पर फाड के', याप्रमाणे आपली हत्यारे लपवून निघालेल्या स्वातंत्र्य सेनानींना निजामाचे आयतेच घबाड

हाती लागले होते. हत्यारे घेऊन ही मंडळी जेव्हा गौडगांवला पोहोचली तेव्हा रामभाऊ जाधवांनी सर्व बहाद्दरांची पाठ थोपटली. अशा रितीने ५ मे, १९४८ ला आपल्या सेनानींनी निजाम पोलिसांच्या हातवर तुरी देऊन नान्नजचा खजिना लुटला. होय, बंदुका म्हणजे स्वातंत्र्यवीरांसाठी खजिनाच असतो. अगदी दिवसाढवळ्या निजामाचे पोलिसठाणे लुटल्यामुळे पोलिसांची नाचक्की झाली. तर गावातच सिंदीच्या नशेत असणारे रझाकार खडबडून जागे झाले. याचा बदला कसा घ्यायचा यासाठी रझाकारांकडून हालचाली सुरू झाल्या. रझाकाराचा प्रमुख कासिम रझवीपर्यंत याची बातमी पोहोचवली. रझवीने आदेश दिला तुटून पडा. त्यामुळे पोलिसासह रझाकारांनी आपली हत्यारे पुन्हा एकदा बाहेर काढली.

दिवसेंदिवस निजाम आणि भारतीय सैनिक यांच्यात संघार्षाचे वातावरण निर्माण व्हायला लागले. सरदार पटेलांनी आपले लक्ष आता हैद्राबादकडे केंद्रित केले होते. हिंदुस्थान स्वतंत्र होताना इतर ५०० च्यावर संस्थाने विनाशर्त भारतात सामील झाली होती. आता हैद्राबाद आणि काश्मीरचा प्रश्न बाकी होता. तूर्त हैद्राबादकडे लक्ष पुरवणे गरजेचे होते. त्याकरिता हैद्राबाद संस्थानच्या बाजूला चारही दिशांना भारतीय लष्कराची जमवाजमव सुरू झाली होती. त्यानुसार सोलापूर आणि नगर या भागात सैन्याने तळ ठोकला होता. सोलापूरच्या तळावरून भारतीय सैन्य बार्शी, पांगरी, येडशी, काजळा आणि वाघोली या भागात गस्त घालत होते. तर नळदुर्ग रस्त्यावर तांदळवाडी, अक्कलकोटपर्यंत फिरते पथक कार्यरत होते. गस्त घालत शत्रूच्या गोटात जाऊन माघारी येण्याच्या लष्करी कारवाईला त्या वेळी ऑपरेशन कबड्डी नाव सार्थ होते.

५ मे, १९४८ ला गौडगावच्या कँपवाल्यांनी नान्नजच्या पोलीस चौकीवर हल्ला चढविला होता. त्याचा राग आणखी शांत झालेला नव्हता. त्यामुळे नान्नज करोडगिरी नाका आणि पोलीस ठाण्यातील लोकांनी रझाकारांना हाताशी धरून सर्वसामान्यांना त्रास द्यायला सुरुवात केली होती. त्याचे एक उत्तम उदाहरण म्हणजे २३ मे ला मार्डी, ता. उत्तर सोलापूर येथील श्री इंद्रवाहन गोरे आपल्या आईला घेऊन बाजाराला जात असताना नान्नजच्या नाक्यावर त्या दोघांना जबरदस्ती बसवून घेण्यात आले. शेवटी २० रु. ची लाच घेतल्यानंतर त्यांची सुटका करण्यात आली.

रझाकारांच्या कारवायांनी उच्छाद मांडला होता. मे महिन्यात नंदगाव जाळून टाकण्यात आले, अपसिंग्यात श्रीधर वर्तक आणि चार-पाच लोकांना गोळ्या घालण्यात आल्या, ईटच्या किशनराव आणि त्यांच्या पत्नी गोदावरी टेके यांना राहत्या घरात गोळया घालून जाळण्यात आले, गौर, ता.कळंब येथील सात लोकांना येरमाळयाच्या पोलिसाने रझाकारांच्या मदतीने कडब्यात घालून जिवंत जाळण्यात आले. किल्लारीच्या चौघांना अटक करून घेऊन जाताना रस्त्यातच गोळ्या घालण्यात आल्या, उपळ्याच्या बैलगाडीवाणांना गोळया घालण्यात आल्या. सोलापूर जिल्ह्यातील काटी गावाजवळीत सारोळा या ठिकाणी तीन पोलिसांना गोळया घालण्यात आल्या, ढेकरी गाव लुटून तेथे दिसेल त्याच्यावर बंदूक चालविली. तर ८ जुलै, १९४८ ला नेवळी आणि मुरुडच्या दरम्यान रझाकारांनी विनाकारण बार्शी लाइट रेल्वेवर गोळीबार केला. खरंतर रझाकाराची अजिबात ताकद नव्हती. परंतु सत्ता पाठीमागे असल्याने नसती उठाठेव चाललेली होती. याविषयी सध्या हयात असलेले ९४ वर्षीय पोलीस कर्मचारी श्री सदाशिव बुद्रुक यांनी स्वत: याविषयी माहिती दिली. एकदा ते सरकारी कामानिमीत्ताने अंबेजवळग्याला गेले असता अचानक रझाकांरानी गावावर हल्ला चढविला तेव्हा एका सुट्टीवर आलेल्या सैनिकाला घेऊन रझाकाराला पळवून लावल्याचे त्यांनी सांगितले. त्यामुळे भारतीय पोलिसापुढे रझाकार हे नगण्य असल्याचे ते आवर्जून सांगतात.

आळजापूर आणि सारोळा परिसरात रझाकाराकडून ३ भारतीय पोलिसांची हत्या झाल्याने वातावरण चांगलेच तापले होते. चर्चा करण्यासाठी भारतीय आणि हैद्राबाद प्रशासनातील वरिष्ठ अधिकारी एकत्रित बसले. परंतु त्यामुळे विशेष फरक पडला नाही. उलट भारतीय लष्कराची एक गाडी २४ जुलै, १९४८ वार शनिवार या दिवशी सोलापूरवरुन बार्शीकडे जात असताना नान्नजच्या नाक्यावर आली असताना तेथे उपस्थित असलेल्या पठाण, रोहिले आणि हैद्राबाद पोलिसांनी मिळून लष्कराच्या गाडीवर अचानकपणे हल्ला केला. ही गाडी सोलापूराहून लष्कराचे रेशन घेऊन बार्शीकडे निघाली होती. यामध्ये जवळपास २०० रझाकारांनी बंदुकीतून गोळया झाडून गाडीवर एक बॉम्बही टाकण्यात आला. या गाडीत भारतीय सेना २/३ पंजाब रेजिमेंटचे जवान असावेत. त्यांनीही प्रत्युत्तर दिले. परंतु या हल्ल्यात ५ जवान जखमी झाले आणि एक हवालदार आणि एक नाईक गंभीर जखमी झाल्याने त्यांचे पुढे निधन

झाले.

या घटनेने भारतीय लष्करात संतापाची लाट उसळली. लगेचच लेफ्टनंट कर्नल प्रितीपालसिंग यांनी नान्नजला भेट देऊन परिस्थितीची माहिती घेतली. वरिष्ठांशी विचारविनीमय करून लगेचच सोलापूरहून जादा कुमक पाठवून कारवाईला सुरुवात केली. रझाकारांना पकडण्यासाठी जवानांनी हैद्राबाद संस्थानच्या सरहद्दीत प्रवेश केला. त्याचबरोबर त्याच दिवशी नान्नजचे पोलीस ठाणे बाँब टाकून उडवून देण्यात आले. त्यात हैद्राबाद संस्थानचे ७ पोलीस मारले गेले. त्यामुळे सीमावर्ती भागावर मुख्य केंद्र असणारे नान्नज खऱ्या अर्थाने २४ जुलैलाच मुक्त झाले. निजामाचे मुख्यमंत्री लायकअलीने या सात पोलिसांना शहीद म्हणून घोषित केले. नान्नज जाणे म्हणजे निजामाच्या अस्ताची सुरुवात होती. बार्शीसोलापूर रस्त्यावर असणाऱ्या नान्नजच्या करोडगिरी नाक्याची यामुळे खूप चर्चा झाली. सोलापूर-हैद्राबाद या ठिकाणच्या वर्तमानपत्रात नान्नजवर खूप लिखाण झाले. पात्वी इंग्रजी वर्तमानपत्रानेही याची दखल घेतली.

उस्मानाबादचे तत्कालीन कलेक्टर महंमद हैदर यांनी तर या प्रकरणाची गंभीर दखल घेतली. ते स्वत: ७ मेला नान्नजला जाऊन त्यांनी परिस्थितीची केली आणि त्वरित आपला अहवाल शासनाला पाठवून नान्नज प्रकरणाची दखल घेण्याची विनंती केली. त्यामुळे पोलीस मंत्री अब्दुल हमिदखान यांनी तुळजापूर तालुक्याचा दौरा केला. तर लेफ्टनंट कर्नल वेटसन आणि लेफ्टनंट कर्नल हिमायत बेग यांनी तातडीने नान्नजला भेट दिली. परंतु, नान्नज हे भारतीय लष्कराने आपल्या ताब्यात घेतले होते. २६ जुलैला निजाम लष्कराचे ब्रिगेडिअर भाटिया आणि भारतीय लष्करी अधिकारी गुरुबचनसिंग यांनी सकाळी ९.०० वाजता तामलवाडीत बैठक घेतली. परंतु आता तोडगा निघाण्याचा प्रश्नच नव्हता.

या वेळी रझाकारांचा प्रमुख कासिम रझवी हा लातूरच्या दौऱ्यावर असल्याने २५ जुलैला म्हणजे घटनेच्या दुसऱ्याच दिवशी उस्मानाबादला भेट दिली. कलेक्टर मोहमंद हैदर, तुळजापूरचे तहसीलदार सय्यद हसन काद्री, तुळजापूरचे फौजदार अब्दूल गफूर, काटी पोलीस स्टेशनचे सब इन्पेक्टर अक्तर हुसेन अशा सर्व वरिष्ठांची एक बैठक घेतली. या वेळी कलेक्टर महंमद हैदरने कासिम रझवीला सांगितले की, उस्मानाबाद जिल्हयात रझाकारांचा

मनमानीपणा वाढला असून ते जनतेवर अत्याचार करत आहेत. त्याचप्रमाणे कळंब तालुक्यातील गौर याठिकाणी ७ लोकांना जाळून मारणाऱ्या रझाकाराविषयी रझवीला माहिती देण्यात आली. तेव्हा कासिम रझवी एकदम भडकला, त्याने सांगितले की, अशा लोकांना ठेचून काढा, अशा प्रकारचे वर्तन खपवून घेतले जाणार नाही. कासिम रझवीची दुसरी बाजू या वेळी पाहायला मिळाली.

नान्नजच्या घटनेचे दुरगामी परिणाम झाले. नान्नजचे ठाणे उडाल्याने भारतीय सेनेला सोलापूर-बार्शी परिसरात वावरायला सोपे झले. त्यामुळे सोलापूरवरून कँपला हत्यारे पुरविणे सहज शक्य झाले. लोकांचे मनोधैर्य वाढल्याने पानगाव कँपचे प्रमुख ज्ञानेश्वर पाटील यांच्या नेतृत्वाखाली स्वातंत्र्य सैनिकांनी श्रीपत पिंपरीच्या पोलीस ठाण्याचा फौजदार रामचंद्रावला त्याच्या कुटूंबासह पकडून आपल्या ताब्यात घेतले. तर गौडगाव, चिंचोली, काजळा, पानगांव अशा सर्व कँपवाल्यांनी मिळून या परिसरातील ५२ खेडी मुक्त झाल्याचे घोषित करून माढा तालुक्यातील जामगाव येथे विठ्ठलराव पाटलाच्या वाडयात स्वतंत्र सरकारची स्थापना करून राज्यकारभार सुरु केला.

कलेक्टर महंमद हैदरला काही वाटत असले तरी त्यांना लष्कराकडून अपेक्षित प्रतिसाद मिळत नव्हता. म्हणून त्यांनी सरळ हैद्राबाद गाठले. हैदरसाहेब थेट उस्मान अलीखान निजामाला जाऊन भेटले. तेव्हा त्यांनी एक विशेष बैठक बोलावली. या वेळी लष्कराचे प्रमुख जनरल सय्यद अल अड्रयूस, पोलीस मंत्री अब्दुल हमिदखान, हैद्राबाद संस्थानचे पोलीस प्रमुख (कोतवाल) नबाब दिनयार जंग यांच्यासारखे अनेक वरिष्ठ लोक उपस्थित होते. उस्मानाबाद जिल्हयाचा नकाशा काढून हैदरने नान्नजचे महत्त्व पटवून देण्याचा प्रयत्न केला तेव्हा निजामाने स्वत: बारकाईने नान्नजविषयी माहिती जाणून घेतली.

निजाम लष्कराला आता नान्नज घेणे जमत नसेल तर त्याऐवजी त्यांनी भारतीय हद्दीतील येडशी गावावर आक्रमण करून ते ताब्यात घ्यावे. आणि याकरिता मुरूडला असलेला फौजफाटा मदतीला द्यावा अशा प्रकारची सूचना कलेक्टरने मांडली. परंतु, निजाम लष्कराची मानसिकता भारतीयापुढे कच खात होती. अशा प्रकारची माहिती खुद्द महंमद हैदरने आपल्या आत्मचरित्रात लिहून ठेवलेली आहे. स्वत:च्या कार्याविषयी इमानदारी ठेवणाऱ्या हैदरला लष्कर आणि प्रशासनाविषयी नितांत आदर होता. परंतु त्यांच्याकडून अपेक्षित प्रतिसाद

मिळत नसल्याने उस्मानाबादच्या सीमावर्ती भागात दिवसेंदिवस गोंधळाची परिस्थिती निर्माण होऊ लागली. साहजिकच त्यामुळे महंमद हैदरनी ६ ऑगस्ट, १९४८ ला उस्मानाबादच्या कलेक्टरपदाचा राजिनामा दिला होता. अर्थातच तो मंजूर झाला नाही हा भाग वेगळा.

निजाम राजवटीतील सीमावर्ती भागामध्ये असणारे मुख्य ठिकाण नान्नज गेल्यामुळे निजामापासून ते कासिम रझवीपर्यंत सर्वजण चिंताग्रस्त झाले होते. नान्नजमुळे उस्मानाबाद जिल्ह्यातील प्रशासनावरील पकड ढिली झाली होती. त्यामुळे कासिम रझवीच्या मनात नान्नजची आग कायम धगधगत होती. १९ ऑगस्ट, १९४८ ला झमरुद महाल याठिकाणी बोलताना रझवीने नान्नजच्या त्या घटनेचे स्मरण 'नान्नज डे' या नावाने केले होते. यावरून निजाम शासनात नान्नजचे महत्त्व ध्यानात येऊ शकते. कुठल्याही प्रकारे नान्नज परत घ्यावे अशी कासिम रझवीची भावना कायम होती.

रझाकाराचा अर्थ होतो स्वयंसेवक. इत्तेहादुलचे रझाकार हे मुस्लीम धर्माच्या उद्धाराकरिता झटणारे स्वयंसेवक होते. परंतु, मराठवाडयातील रझाकारांत धर्मांतरित केलेल्या लोकांचा भरणा अधिक होता. त्यातही मागासवर्गीयांना वेगवेगळया प्रकारची आमिष दाखवून बाटवण्याचे प्रकार मोठ्या प्रमाणावर सुरू होते. याकरिता प्रत्येक तहसिलवर स्वतंत्र कारकून ठेवलेला असायचा. काही आमिषाने तर काही जबरदस्तीने मुस्लीम धर्मात गेले. त्यामुळे अफगानिस्तानमधून आलेल्या अरब, पठाण, रोहिल्यातला कडवेपणा इथल्या 'पोस्ता कोम' (नव्याने बाटलेला) मुसलमानामध्ये अजिबात नव्हता. साहजिकच स्वार्थापलीकडे एकाही रझाकाराची झेप नव्हती. दारू आणि बकऱ्यासाठी लोकांना वेठीस धरणारा रझाकार लढणार कोठून ? दिल्लीच्या लाल किल्ल्यावर निजामाचा आसफजाही झेंडा फडकवायला निघालेल्या कासिम रझवीने स्वत: भरपूर कष्ट घेतले असतील. परंतु, त्याच्याकडे असणाऱ्या २ लाख रझाकारांची ताकद अगदी नगण्य होती. तरीपण वल्गना मोठया होत्या. त्यातच रझाकारांचे हिंदूवरील अत्याचार वाढले होते. जुलूम जबरदस्तीमुळे सर्वसामान्य जनता मूग गिळून गप्प होती. परंतु १९४८ मध्ये रझाकाराची गाठ भारतीय सेनेबरोबर पडली होती. हैद्राबाद सेनेचा प्रमुख जनरल एद्रुस स्वत: जिथं भारतीय सेनेसमोर कचरत होता तिथं रझाकारांची डाळ कोठून शिजणार ? कुस्ती धरावी ती बरोबरीची नसता गाडी अंगलट येणारच. नान्नज या ठिकाणी भारतीय

स्वातंत्र्य सैनिकांवर राग काढण्याकरिता खऱ्याखुऱ्या सैनिकांवर हल्ला करण्याची चूक रझाकारांनी केली. पोराने केले आणि बापाला भोगायचे आले, अशीच काही अवस्था नान्नजच्या प्रकरणात निजामाची झाली होती.

रझाकारांचे वाढते लाड सर्वांनाच पसंत होते असे नाही. निजाम संस्थानातील काही बुजूर्ग मंडळींना रझाकारांच्या कुवतीचा अंदाज आला होता. ज्याच्या भरवसावर निजाम स्वतंत्र होण्याचे स्वप्न पाहतोय त्या रझाकारांना वेळीच आवरले नाही  तर अनर्थ अटळ आहे, याची जाणीव असणारी काही मंडळी होती. परंतु कासिम रझवीच्यापुढे बोलण्याची हिंमत नव्हती. तरीसुद्धा धाडस करून मुस्लीम पुढाऱ्यातील बाकरअली मिर्झा, नबाब मंजूजंग, अहमद मिर्झा, सेवानिवृत्त मुख्य अभियंता अफजल मुनिम, अर्थ सचिव एस.एन. जाफरी, निवृत्त सल्लागार संचालक व इतर अनेक ज्येष्ठ मंडळींनी १४ ऑगस्ट, १९४८ ला निजामाला एक पत्र पाठवून आवाहन केले की, रझाकार संघटनेवर बंदी घालावी आणि ज्या सरकारची किंमत रझाकाराच्या कर्तृत्वामुळे गेलेली आहे त्या मुख्यमंत्री लायकअलीचे मंत्रिमंडळ बरखास्त करून टाकावे. परंतु याकडे जाणिवपूर्वक डोळेझाक करण्यात आली. एवढेच नाही तर अलीयावर जंगने सांगितले की, रझाकार हे शूर असून तेच शत्रूसाठी धोकादायक ठरु शकतात. तेव्हा मुस्लीम मंडळीतील या जाणत्या मंडळींनी कपाळावर हात मारून घेतला. यापेक्षा आपल्या शासनाचा सर्वांत मोठा विश्वासघात कोणता असू शकतो ? याची त्यांना जाणीव झाली. परंतु, खरे बोलण्याची त्यांना शिक्षा मिळाली, शासनाकडून त्याची पेन्शन बंद करण्यात आली. अशा प्रकारे खुशमस्कऱ्यांनी आता परिसीमा गाठली होती.

खालपासून ते वरपर्यंत सर्वच आघाड्यांवर नान्नजच्या घटनेचा परिणाम झाला होता. भारतीय सरहद्दीवरील अतिशय मोक्याचे ठिकाण आपण गमावल्याची खंत उस्मानाबादचे कलेक्टर महंमद हैदर आणि कासिम रझवीच्या मनात कायम होती. पुढचा इतिहास जर आपण पाहिला तर नान्नज एक सुरुवात होती. याच नान्नजपासून निजाम राजवटीच्या पतनास सुरुवात  झाली. त्यामुळे ५ मे आणि २४ जुलै, १९४८ अशा दोन्ही घटना हैद्राबाद मुक्तिसंग्रामास वेगळ्या दिशा देणाऱ्या ठरल्या.

***

# २०.मराठवाड्यातील प्रतिसरकार मुक्तापूर स्वराज्य

ज्या वेळी अनपेक्षित सत्ता वर्षानुवर्षे आपल्या बळाचा वापर करून सर्वसामान्यांना वेठीस धरतात तेव्हा त्यांच्याकडून प्रतिक्रिया येणे अपेक्षित असते. हिंदुस्थानचा इतिहास अशा अनेक प्रतिक्रियांचा साक्षीदार आहे. १० व्या शतकापासून देशावर मुस्लीम सत्तेच्या मनमानी कारभारास सरुवात झाली. तर महाराष्ट्रात १३ व्या शतकात देवगिरीच्या यादवांचा पराभव झाल्यानंतर सुरू झालेल्या मुस्लीम सत्तेचा कारभार भारत देश स्वतंत्र झालातरी चालूच होता. मराठवाड्यालगतच्या प्रातांत इंग्रजाचे शासन असल्याने काही प्रमाणात लोकशाही शासनप्रणाली अनुभवाला मिळाली होती. परंतु हैद्राबाद संस्थानात मागील २२५ वर्षांपासून आसिफजाही घराण्याची सत्ता असून त्यांच्याकडून होणाऱ्या अत्याच्याराला जनता कंटाळलेली होती.

भारतीय काँग्रेसने हिंदुस्थानच्या स्वातंत्र्य संग्रामात महत्त्वाची भूमिका पार पाडल्यानंतर आता हैद्राबाद संस्थानात लक्ष घालायला सुरुवात केली होती. काँग्रेसच्या शिस्तबद्ध कार्यक्रमामुळे निजाम शासन पुरते बेजार झाले होते. याचाच एक भाग म्हणून हैद्राबाद संस्थानच्या सीमेवर असणाऱ्या गावालगत स्वातंत्र्य सैनिकांचे कँप उघडून आसपासच्या खेड्यांतून निजाम राजवट उदध्वस्त करण्यासाठी विविध कार्यक्रम राबविले जात होते. त्यामुळे निजामाचे करोडगिरी नाके लुटणे, लेव्ही भरणा बंद करणे, रझाकाराचे अड्डे नष्ट करणे यांसारखे कार्यक्रम राबविले जात होते.

हैद्राबाद मुक्तिसंग्रामाचा इतिहास लिहिताना आपण मध्य प्रदेशचे मुख्यमंत्री शुक्ला, काँग्रेसचे नेते क्रांतिसिंह नाना पाटील, शेजारच्या जिल्ह्यातील नेते भाई छन्नुसिंह चंदेले यांचे महत्त्व गांभीर्याने घ्यावे लागणार आहे. एवढेच नाहीतर उस्मानाबाद परिसरातील लढ्याकरिता सोलापूरचे कलेक्टर संभाजीराव

घाडगे यांचा उघडपणे मिळालेला पाठिंबासुद्धा तेवढाच महत्त्वाचा ठरला. अशा अनेक लोकांनी आपापल्यापरीने या लढ्याला आपला पाठिंबा दिला. त्यामुळे सोलापूर जिल्ह्यातून होणाऱ्या हल्ल्यामुळे उस्मानाबाद जिल्ह्यातील प्रशासन कोलमडून गेले होते.

सन १९४८ ला उस्मानाबादचे कलेक्टर महंमद हैदरी हे असून त्यांचे धोरण म्हणजे गावोगावच्या लोकांना वेठीस धरणे. याकरिता रझाकारांना खुलेआम पाठिंबा देऊन त्यांच्याकडून सर्वसामान्य जनतेवर अत्याचार होत होते. रझाकाराला जशासतसे उत्तर देण्यासाठी आपले स्वातंत्र्य सैनिकही आता पुर्णपणे सज्ज होते. चिलवडीसारखे गाव तर आता पूर्णपणे या संग्रामात उतरले होते. लेव्ही भरणा बंद, राष्ट्रीय शाळेची निर्मिती, करोडगिरी नाका उदध्वस्त करणे यासारख्या भूमिका घेतल्या जात होत्या. एवढ्यावरच न थांबता वसुलीला आलेल्या गिरदावरला चिलवडीतल्या लोकांनी पकडून गोळया घातल्या.

साहजिकच उस्मानाबादचा कलेक्टर हैदरीने चिलवडी गाव पुर्णपणे जाळून टाकले. गाव उदध्वस्त झालेतरी गाववाल्यांची मनं निर्धास्त होती. त्यामुळे कोणीही न डगमगता चळवळीच्या पुढील हालचालींकरिता सज्ज होते. चिलवडीचा बदला म्हणून गौडगाव आणि चिंचोलीच्या कँपवरील स्वातंत्र्य सेनानींनी आपसिंग्याच्या रझाकारी अड्ड्यावर हल्ला चढविला. यात श्रीधर वर्तक शहीद झाले. वर्तकांना वीरमरण आले याचे कुणाला दु:ख नव्हते परंतु मृत्यूनंतर पोलिसांनी त्यांच्या देहाची क्रूरपणे विटंबना केली. याविषयी सर्वांच्या मनात भयंकर चीड निर्माण झाली.

औरंगजेबाने छत्रपती संभाजीराजांची क्रूरपणे हत्या केल्यानंतर स्वराज्यातील सर्वसामान्य जनता पेटून उठली होती. आपल्या हातातील खुरप्याची जागा आता तलवारीने घेतली होती. गवतालाही भाले फुटले होते. त्याप्रमाणे आपसिंग्याच्या चकमकीत श्रीधर वर्तक गोळी लागून ठार झाले. तेव्हा निजामाच्या पोलिसांनी वर्तकांच्या देहाची विटंबना केली. त्यामुळे उस्मानाबाद परिसरातील स्वातंत्र्य सेनानी भयंकर संतापले. या वेळी गौडगावच्या कँपवर सामूहिकपणे शपथ घेण्यात आली की, जोपर्यंत निजामाचे जुलमी शासन उलथून टाकल्याशिवाय आता स्वस्थ बसायचे नाही.

इंग्रजाचे शासन झगारून क्रांतिसिंह नाना पाटलांनी सातारा भागात प्रति सराकारची स्थापना केली होती. या सरकारच्या माध्यमातून नानांनी आदर्श

प्रशासन दिले. अन्यायकारी शासन आणि गुन्हेगारांवर नानांनी एवढा वचक बसविला होता की, प्रति सरकारच्या माध्यमातून नाना पायात बेडी ठोकतात अशी गुन्हेगारांना भीती असायची. नानांचा वचक फक्त पश्चिम महाराष्ट्रापुरता मर्यादित नव्हता तर हैद्राबाद संस्थानातील रझाकारांना नुसत्या नानांच्या नावाची भीती होती. याच नानांचा आदर्श आपल्या स्वातंत्र्य सेनानींच्या नजरेसमोर होता.

उस्मानाबाद परिसरातील सीमेवरच्या गावांत नानांची सभा लाखोंच्या साक्षीने व्हायची. निजाम आणि कासिम रझवींना उद्देशून नाना दंड थोपडून आवाहान करायचे. आरे, निजामा ? गरिबाशी काय लढतोयस, लढायचे असेलतर या नानाशी लढ. मग बघ, नाना तुझ्या नरडीच्या घोट कसा घेतो ते. अरे! कासिम रझवी, मी नुसते फुंकले ना तरी तू उडून जाशील. सर्वत्र रझाकारांची प्रचंड दहशत असताना नानांच्या या डरकाळीने लोकांच्या अंगात जोश निर्माण व्हायचा. चिलवडी, तडवळा, आष्टा कासार, येडशी अशा कितीतरी गावांत नानांच्या सभा ऐकणारे आजही आपल्या आठवणी ताज्या करून सांगतात.

नाना गावात येणार म्हटल्यावर आसापासच्या गावांतील लोक बैलगाडया भरून गर्दी करायचे. ना स्पीकर, ना लाईट. नाना मंदिराच्या ओट्यावर बोलायला उभे राहिले की, लोक आपले फेटे हवेत भिरकावयाचे. 'भारत माता की जय' असा जयघोष व्हायचा. नाना सभा घेऊन गेले की, समजायचे दुसऱ्या दिवशी रझाकाराचे काही खरे नाही. स्वातंत्र्य सेनानींची मस्तके पेटलेली असायचे. त्या मुळे कुठे ना कुठे हल्ला झालाच म्हणून समजा. सांगायचा हेतू एवढाच आहे की, हैद्राबाद मुक्तिसंग्रामात क्रांतीसिंहाचे योगदान फार मोठे आहे.

अशीच एक सभा उस्मानाबाद जिल्ह्यातील चिलवडी गावात झाली होती. नानांच्या एका सभेने चिलवडी गावाने निजाम सरकारला साराबंदी केली, लेव्ही भरायला नकार दिला. हे गाव एवढे निर्ढावले होते की, लेव्ही वसूल करायला आलेल्या पठाणाला गौडगावच्या माळावर नेऊन गोळ्या घातल्या. अशीच एक सभा तडवळ्यात झाल्यावर कळंब तालुक्यातील गौरच्या लोकांनी गावातील रझाकार आयदुल्यावर हल्ला करून त्याला ठार केले होते. याप्रमाणे नानाचे बोल म्हणजे आगीचा गोळा असायचा. जिथे तो बरसला की, समजायचे

आग लागलीच.

शेवटच्या वर्षात उस्मानाबादचे तत्कालीन कलेक्टर महंमह हैदरने सरकारी नोकरीत असूनही वेगळेच पराक्रम केले होते. या बहाद्दराने एकाच वर्षात चिलवडी, देव धानोरा आणि नंदगाव ही गावे जाळून टाकली होती. तर ईंटच्या गोदावरी टेक्यांची घरात घुसून त्यांची हत्या केली होती. याशिवाय आपसिंग्याच्या रणभूमीत शहीद झालेल्या श्रीधर वर्तकाची केलेली विटंबना तर अजुनही ताजी होती. गावागावांत रझाकारांचे अन्याय अत्याचार सहन करण्यापलीकडेचे होते. याची कुठेही नोंद नसल्याने अनेक घटना काळाबरोबर मागे पडल्या आहेत.

सर्वसामान्य माणसाच्या मनामध्ये दिवसेंदिवस उबग यायला लागला होता. निजाम सरकारची मुस्कटदाबी चालूच होती.परंतु उस्मानाबाद जिल्ह्याचा बराचसा भाग हा सोलापूरला लगत असल्याने या परिसरातील स्वातंत्र्य सैनिकांना सोलापूरचा जिल्ह्याचा आश्रय घ्यायला जागा होती. त्यातच सोलापूरचे कलेक्टर श्री संभाजीराव घाडगे आणि डी. वाय. एस. पी. श्री पंत आणि वैराग पोलीस ठाण्याचे फौजदार माने यांनी हैद्राबाद मुक्तिसंग्रामासाठी स्वत:हून भरघोस मदत केली. घाडगेसाहेब तर स्वातंत्र्य सैनिकांना आपल्या गाडीत बसवून नेत असत. अशा प्रकारचा दुर्मीळ कलेक्टर आज सापडणार नाही. घाडगेसाहेबांच्या आठवणी सांगताना स्वातंत्र्य सैनिकांचा ऊर भरून आल्याशिवाय राहत नाही.

उस्मानाबाद कलेक्टरकडून होणारे अत्याचार आणि सोलापूर कलेक्टरकडून मिळणारी मदत यामुळे वैराग परिसरातील नागरिकांच्या मनात संतापातून साहस वाढले होते. त्यामुळे चिलवडीसारख्या गावाचा आदर्श घेत आता या भागातील अनेक गावांनी निजामाविरोधात आघाडी उघडली होती. सारा बंदी, लेव्ही बंदी, कुलकर्णी आणि माले पाटलांचे राजनामे घेऊन त्यांचे दफ्तर जाळणे यांसारखे धाडशी कार्यक्रम हाती घेतले होते. लोकांच्या भितीने आता निजामाचे अधिकारी उस्मानाबादच्या पलीकडे जायला घाबरायला लागले. त्यांच्या मनात भीती होती, चिलवडीच्या गिरदावरला मारले तसे आपली गत झाली तर काय घ्या ?

आता निजामाचे सारे कायदे संपलेले होते. शेकडो वर्षांची सत्ता सेनानींच्या धाडसापुढे हतबल व्हायला लागली होती. एकजण घाबरला की,

दुसऱ्याला चेव चढत असतो. असेच काहीसे निजाम राजवट आणि उस्मानाबाद परिसरातील लोकांचे झाले होते. काँग्रेस कमिटीत विचार विनिमय झाला. आता निजाम राजवटीचा संबंध संपला. मग आपले स्वतंत्र शासन द्यायला नको का? त्यातूनच हैद्राबाद संस्थानात उस्मानाबाद जिल्ह्यातील ५२ खेड्यांनी आपण स्वतंत्र झाल्याची घोषणा केली. यालाच नाव देण्यात आले 'मुक्तापूर स्वराज्य.' त्यामुळे हैद्राबाद संस्थानात सर्वांत जास्त नुकसान उस्मानाबाद जिल्ह्याचे झाले असलेतरी याच उस्मानाबादने जून,१९४८ मध्ये सर्वांत अगोदर स्वातंत्र्याची घोषणा केली.

नाना पाटलांचे प्रति सरकार मराठवाड्यात अवतरले होते. स्टेट काँग्रेसचे नेते फुलचंद गांधी, बाबासाहेब पराजंपे, चंद्रशेखर बाजपेयी यांच्या मार्गदर्शनाखाली मुक्तापूर स्वराज्याची वाटचाल सुरू झाली. माढा, मोहोळ, परंडा तालुक्यातील ५२ गावे आता २२४ वर्षांनंतर स्वत:चा कारभार स्वत: करणार होती. या रामराज्याची राजधानी आजच्या माढा तालुक्यातील जामगावला ठेवण्याचा निर्यण घेण्यात आला. जामगावच्या विठ्ठलराव पाटलांनी आपला टोलेजंग चिरेबंदी वाडा राजधानीसाठी रिकामा करून दिला. याचे नाव ठेवण्यात आले 'मुक्ती नगर'.

राजधानीचा थाट तो काय? पाटलाचा वाडाच नाहीतर जामगावला आता राजधानीला साजेसे रूप आले होते. आजूबाजूचे रस्ते आता मुक्तापूर स्वराज्यातील सैनिकांच्या निगराणीखाली आले होते. हातात बंदुका घेतलेले कमांडो राजधानीच्या रक्षणासाठी अहोरात्र सज्ज होते. आश्चर्याची बाब म्हणजे जामगावला येणाऱ्या रस्त्यावर माईन्स पेरण्याची जबाबदारी व्यंकटराव नागणे, व्यासाचार्य संदीकर यांच्या निगराणीखाली करण्यात आलेली होती. मात्र याविषयी गावकऱ्यांना याची सविस्तरपणे माहिती देण्यात आलेली होती. आपली बायकामुले आणि जनावरे यांची विशेष काळजी घेण्याविषयी काही सूचना देण्यात आल्या.

उस्मानाबाद जिल्ह्यातील सर्व स्वातंत्र्य सैनिकांच्या हालचाली या प्रशासक म्हणून फुलचंद गांधीच्या नेतृत्वाखाली सुरू होत्या. तर मुक्तापूर स्वराज्याचे प्रशासक म्हणून कॅप्टन व्यंकटराव जोशी यांची नियुक्ती करण्यात आली. हिंदुस्थान स्वतंत्र झाल्यानंतर पहिले सरकार ज्याप्रमाणे नियुक्त करण्यात आले होते, त्याच धर्तीवर हे शासन कारभार करायला निघाल होते. आता राज्य

प्रमुखाची नियुक्ती झाल्यानंतर त्यांना मदत करण्यासाठी मंत्रिमंडळाची आवश्यकता होती. म्हणून मंत्रिमंडळाची रीतसर स्थापना करण्यात आली. सारे काही आता लोकशाही मार्गाने चालले होते.

फुलचंद गांधीच्या मार्गदर्शनाखाली कॅप्टन व्यंकटराव जोशींनी आपले सहकारी अनुभवाच्या कसोटीतून निवडले.

**मुक्तापूर स्वराज्याचे मंत्रिमंडळ पुढीलप्रमाणे नेमण्यात आले होते. मंत्री आणि त्यांची खाती याप्रमाणे होती.**

मुख्य प्रशासक कॅप्टन व्यंकटराव जोशीं

संरक्षण खाते ,श्री राजेंद्र देशमुख. त्यांच्या मदतीला शेषेराव वाघमारे ( उगरगा ), रामचंद्र मंत्री यांची नियुक्ती केली.

पुरवठा खाते, श्री.रामभाऊ जाधव. सोबत श्री. विठ्ठलराव पाटील, जामगावकर.

अर्थखाते, श्री. नरहरराव मालखरे. सोबत श्री. विनायकराव कुलकर्णी.

न्यायखाते, श्री. वसंतराव देशमुख (सुर्डी ). सोबत नानासाहेब चिंचोलीकर.

आरोग्य खाते , श्री. आचार्य व्यासाचार्य संदीकर.

शिक्षण खाते , श्री. शिवरकरगुरुजी.

सामान्य प्रशासन, श्री. चंद्रशेखर बाजपेयी.

हेर खाते , श्री. भगवान तोडकरी आणि श्री. मनोहर टापरे.

टपाल खात, श्री. जयकुमार अजमेरा आणि श्री. दत्तात्रय गणेश.

प्रसिद्धी खाते , श्री.वसंतराव देशमुख आणि श्री. प्रभाकर जाधव.

अशा रितीने सर्व मंत्रिमंडळाची सर्वानुमते नियुक्ती करण्यात आली. या ठिकाणी मंत्र्याची नियुक्त करताना त्यांनी स्वातंत्र्यासाठी केलेल्या कामाचा आढावा घेण्यात आलेला होता. मुक्तापूर स्वराज्याचे मंत्री होणे ही अभिमानाची गोष्ट असलीतरी तो एक काटेरी मुकूट होता. निजाम राजवटीला उलथून टाकून लोकांना लोकाभिमुख शासन करण्याची जबाबदारी यांच्यावर होती. मुख्य प्रशासक आणि त्यांच्या मंत्र्यांना आपल्या भागात फि रण्यासाठी घोडे किंवा सायकली देण्यात आल्या. याशिवाय अन्य कुठलीही सवलत देण्याचा प्रश्नच

नव्हता. याउलट या मंत्र्यांना इतरापेक्षा जास्तीची कामे करावी लागत होती.

जामगावकर पाटलांच्या वाड्यावर भारताचा तिरंगा फडकाविण्यात आला. तिरंग्याला स्मरून आपल्या मंत्रिमंडळाने शपथ घेतली. जामगाव आणि पाटलांचा वाडा हैद्राबाद मुक्तिचा साक्षीदार ठरले. राजधानीचे गाव म्हणून गावावर आक्रमणाची टांगती तलवार कायम झाली. तरीपण गावातील कुठल्या माणसाने कुरकुर केले नाही. याउलट प्रत्येक माणूस देशासाठी आपणाला काय करता येईल का म्हणून संधी मागायला लागला होता. पाहतापाहता मुक्तापूर स्वराज्यात १००० ते १५०० स्वातंत्र्य सेनानींची भरती करण्यात आली. जिथं लवकर जेवणाचा पत्ता नव्हता तिथं मानधनाचा प्रश्नच नव्हता.

शपथविधीचा कार्यक्रम फारच देखणा होता. उस्मानाबाद परिसरातील हजारो स्वातंत्र्य सैनिक, गावकरी, स्टेट काँग्रेसचे पदाधिकारी, बायकामुले यासारख्या अनेकांनी मोठ्या कौतुकाने तिरंग्याच्या ध्वजारोहणाचा आनंद लुटला. मुक्तापूर स्वराज्याचे लष्कर आणि पोलीस प्रमुखाने मंत्रिमंडळास मानवंदना दिली. स्वातंत्र्याचा बिगुल वाजला आणि वंदे मातरम म्हटल्यानंतर कार्यक्रमाची सांगता झाली. मराठवाड्यात प्रथमच एवढ्या निडरपणे स्वातंत्र्यगीत म्हणायला मिळाल्याचा आनंद सर्वांच्याच चेहऱ्यावर स्पष्टपणे दिसत होता. मुक्तीचा आनंदच वेगळा असतो.

या मंत्रिमंडळात संरक्षण खात्याची जबाबदारी सर्वांत मोठी होती. रझाकार आणि निजामी पालिसांच्या आक्रमणापासून मराठी जनतेला वाचविण्याचे काम आता स्वतंत्रपणे करावे लागणार होते. याकरिता सरहद्दीवर गुप्तहेरांची पथके कार्यरत होती तर अंतर्गत संरक्षणासाठी २५ तरुणांचे एक घोडदळ पथक तयार करण्यात आले. जागोजागी भुईसुरुंग पेरल्याने लोकांना विश्वासात घेऊन काम करावे लागणार होते. संरक्षणाकरिता रात्रीची गस्त घालण्याचे काम मोठ्या धाडसाने चालू करण्यात आले. आपले शासन म्हणून लोकांचा या कार्याला उस्फूर्तपणे पाठिंबा मिळत होता.

हत्यारांची आता कमरता राहिली नव्हती. निजामाच्या करोडगिरी नाक्यावरून आणि भारतीय लष्कराकडून आवश्यक हत्यारे प्राप्त झालेली होती. त्यामुळे मुक्तापूर स्वराज्य शस्त्रास्त्र साठ्याने सज्ज झालेले होते. त्यांच्या शस्त्रागारात पुढीलप्रमाणे हत्यारे असल्याची नोंद सापडते.

१. इटालियन रायफली आणि ३०३ बंदुका – १७० नग

२. एल. एम. जी. स्टेनगण –  १० नग

३. फुलदार भरमार बंदुका  –  ८० नग

४. रिव्हाल्वर   – २० नग

५. पिन बाँब आणि गावठी बाँब – ३००० नग.

यासोबतच या लष्कराकडे दूरपर्यंत रेंज असणाऱ्या काही दुर्बिणी होत्या. अशा प्रकारे शत्रूचा सामना करण्यासाठी आता सर्वजण तत्पर झाले होते.

कुठल्याही शासनाला जेवढी भीती शत्रूची असते तेवढीच भीती अंतर्गत शत्रूची असते. आपल्या परिसरातील देशमुख, कुलकर्णी, गुंड, सावकार आणि लोभाने फितुर होणाऱ्या लोकांपासून स्वराज्याला धोका पोहोचणार होता. याकरिता आपले गृह खाते सज्ज झालेले होते. मुक्तापूर स्वराज्याचे ६ प्रशासकीय विभाग पाडण्यात आले. आणि प्रत्येक भागात स्वतंत्र पोलीस ठाणे नेमण्यात आले. मुक्तापूर स्वराज्याची ठाणी सोईनुसार पुढील गावात ठेवण्यात आली. १. मसला चौधरी ( ता. उत्तर सोलापूर ), २. वाळूज ( उत्तर सोलापूर ), ३. भोयरे ( मोहोळ ), ४. मानेगाव ( माढा ), ५. कारंबा ( उत्तर सोलापूर ), ६. सासुरे ( ता. बार्शी ).

प्रत्येक पोलीस ठाण्याला एक पोलीस निरीक्षक आणि महसुलीसाठी एक महसुली अधिकारी देण्यात आला. पोलीस निरीक्षकाच्या हाताखाली १५ पोलिसांचे पथक देण्यात आले. यातही तीन पोलिसांचा एक गट असून यातही पुन्हा एक हत्यारी आणि दोन बिन हत्यारी पोलीस नेमण्यात आले. या गटाने दररोज दोन गावांत जाऊन तिथल्या संरक्षण व्यवस्थेचा आढावा घेऊन तिसऱ्या गावात आपला मुक्काम ठेवायचा होता. या गावातील बंदोबस्ताचा अहवाल त्यांनी पोलीस ठाण्याला कळविणे बंधनकारक होते. तेथून तो अहवाल पुढे राजधानी जामगावला पाठविला जायचा. पोलीस खात्याला खाकी वर्दी आणि आवश्यक ती हत्यारे पुरविण्यात आली होती.

पूर्वीचे पोलीस पाटील, कुलकर्णी जे विरोध करत असतील त्यांची बरखास्ती करण्यात येऊन नवीन नियुक्त्या करण्यात आल्या. याचबरोबर पोलिसांना मदत करण्यासाठी प्रत्येक गावातून स्वयंसेवक नेमण्यात आले. याकरिता प्रत्येक गावातून स्वयंस्फूर्तीने लोक या उपक्रमात दाखल झाले. या लोकांवर आपल्या गावात रात्रीची गस्त घालण्याचे काम देण्यात आले.

स्थानिक गुंड, जबरदस्ती करणारे सावकार यांना पोलीस ठाण्यात बोलावून समज देण्यात आली. सुधरायचे नसेल तर गाव सोडून जाण्याचे आदेश देण्यात आले. गुन्हेगारीला इथे कडक शिक्षा दिली जायची आणि त्याची अंमलबजावणी त्वरित केली जायची.

त्या काळी जमीनीचे खटले मोठ्या प्रमाणावर चालायचे. याकरिता आपल्यापुढे केस आल्यानंतर महसुली अधिकारी एका आठवड्याच्या आत संबंधितांना बोलावून त्याची माहिती घेत आणि त्यानंतर लागलीच शेतावर जाऊन चार पंचाच्या साक्षीने त्यांचा निकाल जागेवरच देत असत. विशेष म्हणजे त्यांनी दिलेल्या निकालाची त्वरित अंमलबजावणी होत असे. या परिसरातील सर्व अवैद्य धंदे बंद करण्यात आले. चोर, डाकू आणि जनतेला लुबाडणारे गावातील सावकार अशा सर्वांपासून संरक्षण देण्यात आल्याने मुक्तापूर स्वराज्य म्हणजे रामराज्यच होते. साहजिकच लोकांचा पाठिंबा वाढत चालला होता. त्यामुळे या भागात कुठेही खून, मारामाऱ्या, बलात्कार यासारख्या घटना घडल्याची नोंद झाली नाही.

मुक्तापूर स्वराज्यात मोडणाऱ्या गावात पोलिसांचा जबरदस्त वचक होता. या भागात राहायचे असेलतर गुण्यागोविंदाने राहावे नसेल तर हद्दीबाहेर निघून जाण्याची तंबी देण्यात आली होती. बऱ्याच लोकांनी याला प्रतिसाद दिला. परंतु आपण निजामाला जुमानले नाही मग मुक्तापूरची काय कथा? या भावनेतही बरीच मंडळी होती. अशांपैकी एकजण आष्टीचा तायप्पा पाटील असून दारू, गुंडगिरी आणि सावकारीच्या जोरावर तायप्पाने मोहोळ ते वैराग परिसरात आपली दहशत बसविलेली होती. तायप्पाला काय माहीत या स्वराज्यातील सैनिकांनी जिथं जंगलातल्या हत्तीसारख्या निजाम राजवटीला ललकारलं तिथं काळे धंदे करणाऱ्या लांडग्याची काय कथा? दोनतीन वेळा तायप्पाला इशारा दिला. परंतु तो स्वत:च्याच मस्तीत होता. तेव्हा मुक्तापूर स्वराज्याकडून तायप्पाची फाईल तयार करण्यात आली. पोलिसांचे पकड वॉरंट निघाले. प्रभाकर जाधव आणि त्यांचे पाचसहा सहकारी आष्टीला पाहोचले. तायप्पा पाटील ऐकत नाही म्हटल्यानंतर मुक्तापूर पोलिसांनी त्याला बेड्या ठोकल्या. पोलिसांनी तायप्पाला देगाव या ठिकाणीच्या न्यायालयात हजर केले. त्याला माहित होते इथली शिक्षा कडक आहे. तेव्हा कुठे तायप्पा सरळ होऊन गयावया करायला. यापुढे आपले सर्व काळे धंदे बंद करणार आणि कुणालाही

धमकावणार नाही अशा प्रकारची लेखी हमी घेऊन तायप्पाला सोडून देण्यात आले. या प्रकारच्या अनेक केसेस या पोलीसांनी हाताळल्या.

पुरवठा विभागाने आपल्या कामात तत्परता दाखविली होती. अनेक लोकांनी जो आर्थिक सहभाग दिला होता, त्यातून रोख स्वरूपात वस्तूंची खरेदी केली जात होती. स्वराज्यात काम करणाऱ्यांना दोन वेळचे जेवण आणि सकाळी ग्लास भरून दूध वेळेवर पुरविण्याची जबाबदारी व्यवस्थितपणे पार पाडली जात होती. लोकांनी स्वत:हून धान्य आणि दूध देण्याची तयार दर्शविली. परंतु या सरकारने याकरिता नम्रपणे नकार दिला. वेळेवर आणि तेही सकस अन्न देण्याची जबाबदारी पुरवठा विभागाने व्यवस्थितपणे पार पाडली. विशेष म्हणजे खर्चाची नोंद शासन दरबारी व्यवस्थितपणे नोंदविली जायची. प्रत्येक बाबीचा हिशोब देऊन त्याची तपासणी केली जायची.

व्यासाचार्य संदीकर हे आरोग्य विभागाची जबाबदारी सांभाळायचे. विशेष म्हणजे ते स्वत: यात पारंगत असल्याने ते आपल्या औषधी सामानांसह सर्व ठिकाणी दौरा करत निघायचे. एखादा आरोग्यमंत्री स्वत: औषधोपचार करत असल्याचे हे उदाहरण तसे दुर्मीळच म्हणावे लागेल. त्या वेळी कॉलरा आणि पटकीच्या साथी मोठ्या प्रमाणावर यायच्या. त्यांना लागलीच औषध मिळाल्यास त्यांचा पुनर्जन्म व्हायचा. त्यामुळे या भागात व्यासाचार्य संदीकर हे जणू देवदूतच झाले होते. विशेष म्हणजे मोठ्या आजाराकरिता त्यांनी बार्शीच्या डॉ. हिरेमठ यांच्याशी संपर्क ठेवल्याने तातडीने पुढील व्यवस्था केली जायची. आरोग्यमंत्री संदीकर औषधाची पिशवी सावरत कसे यायचे हे आजही म्हातारी माणसे वर्णन करून सांगतात.

निजाम राजवटीत उर्दूतून शिक्षण घेण्याची सक्ती होती. त्याचबरोबर शाळा भरल्यानंतर पहिल्या तासाला निजामाला दुवा मागण्यासाठी प्रार्थना म्हणावी लागायची. ९० % जनता मराठी बोलणारी असलीतरी त्यांना उर्दूची सक्ती अन्यायकारक होती. त्यामुळे मुक्तापूर स्वराज्याने यात बदल करून स्वयंस्फूर्तीने काम करणारे शिक्षक नेमले. या शिक्षकांनी आपला इतिहास, भूगोल, मराठी, गणिताबरोबच नीतिमत्तेचे धडे देणारे शिक्षण द्यायला सुरुवात केली. शाळेत भारताची प्रार्थना, स्वातंत्र्यगीत म्हणायला सुरुवात केली. हैद्राबाद संस्थानातील लोकांना स्वतंत्रपणे वंदेमातरम् म्हणायला उस्मानाबादच्या स्वातंत्र्य सैनिकांनी शिकविले. या शाळेत मुलीही यायला लागल्या. हा विश्वास

मुक्तापूर स्वराज्याने मिळविला होता.

स्वराज्याची स्थापनातर झाली आता याची माहिती सर्वसामांन्यापर्यंत पोहोचवून त्यांच्या मनात विश्वास निर्माण करणे गरजेचे होते. कारण काही फितुर, दुखावलेले आणि सत्तेला चटावलेले काही देशमुख आणि कुलकर्णी यांनी बदनामी सुरू केली होती. आपण केलेले काम आणि पुढील कार्यक्रम याविषयी सविस्तर माहिती देण्यासाठी वेळोवेळी पत्रके काढणे गरजेचे होते. त्याचबरोबर केलेल्या कामाचा अहवाल सादर प्रसिद्ध करून तो जनतेसमोर मांडणे गरजेचे होते. याकरिता मंत्रिमंडळातील प्रसिद्धी विभाग काम करत होता. याप्रमाणे आझाद मुक्तापूर स्वराज्य हे देशातील आदर्श सरकार होते.

हैद्राबाद संस्थानातून स्वतंत्र होण्यासाठी सर्वत्र आंदोलन चालू होते. आंदोलक ज्याप्रमाणे आक्रमक होऊन आपल्या मागण्यावर ठाम होते, त्याप्रमाणे निजामाची फौज स्वातंत्र्यसेनानींना चिरडून टाकण्यासाठी सज्ज झालेली होती. त्यामुळे जागोजागी दडपशाहीचे धोरण चालू होते. उस्मानाबाद जिल्ह्यात तर महंमद हैदरसारखा कलेक्टर दर्जाचा माणूस आता हैवानासारखा वागायला लागला होता. त्याने चिलवडी, देवधानोरा आणि नंदगावसारखी गाव जाळून टाकली होती. पोलीस आणि रझाकारांचे अत्याचार तर वर्णनापलीकडचे आहेत. अशा वेळी दाबदडपशाहीची पर्वा न करता उस्मानाबाद जिल्ह्यातील ६५ गावांनी स्वत:ला स्वतंत्र करत मुक्तापूर स्वराज्याची स्थापना केली होती. आजच्या सोलापूर जिल्ह्यातील जवळपास ५३ गावांचा समावेश यात होता.

या ५२ गावाचा आढावा घेतल्यास उस्मानाबाद जिल्ह्यातील ही गावे आता माढा, परंडा, मोहोळ, उत्तर सोलापूर आणि मोहोळ तालुक्यात मोडतात. यामध्ये आजच्या उस्मानाबाद तालुक्यातील बार्शीकडील गावांसह परंड्यापासून ते मोहोळपर्यंतची गावे या मुक्तापूर स्वराज्यात होती. यामध्ये माढा तालुक्यातील जामगावसह मानेगाव, सासुरे, इर्ले, उंडगाव, वाळूज, देगाव, भोयरे, नान्नज, मसले चौधरी, चिलवडी, कौडगाव, काटी, सावरगाव, आपसिंगा, राघुची वाडी, जुनोनी, झरेगाव, वरवंटी, गावसूद, पिंपरी, सुर्डी, बेगडा, कामठा, इत्यादी गावांचा समावेश होता. त्यामुळे हैद्राबाद संस्थानच्या अगोदरच या लोकांनी स्वत:ला स्वतंत्र करून हैद्राबाद संस्थानात रामराज्याची कल्पना राबविली ही अभिमानाची गोष्ट आहे.

उस्मानाबाद जिल्ह्याचे काँग्रेसचे प्रमुख श्री. फुलचंद गांधी, बाबासाहेब

पराजंपे यांनी स्वत: मुक्तापूर स्वराज्यातील प्रत्येक गावांना भेटी देऊन तिथल्या परिस्थितीचा आढावा घेतला. गावांगावांत आपापसांत भांडणे व्हायची तेव्हा मुक्तापूर स्वराज्यातील लोक त्या गावाला भेट देऊन सर्वांना समजावून सांगायचे बाबांनो ! आपापसांत भांडून कसे भागेल ? आपला शत्रू वेगळा आहे. आपली शक्ती अशा किरकोळ बाबीवर खर्चू नका. अशा प्रकारच्या हृदयस्पर्शी बोलण्यामुळे लोकांचे गैरसमज दूर होऊन कोर्टकचेऱ्या न करता जागेवरच खटले निकाली निघायचे.

जूनमध्ये स्थापन झालेल्या या सरकारला आता तीन महिने झाले होते. तर भारताच्या स्वातंत्र्याला एक वर्ष पूर्ण झाले होते. हैद्राबाद संस्थानच्या स्वातंत्र्याचा घोळ चालूच होता. परंतु मुक्तापूर स्वराज्य हा भाग स्वतंत्र होता. त्यामुळे निजामाची पर्वा न करता या लोकांनी १५ ऑगस्टचा दिवस मोठ्या दिमाखात साजरा केला. जामगाव या आपल्या राजधानीच्या ठिकाणी स्वातंत्र्यानिमित्ताने मोठ्या संमारंभाचे आयोजन करण्यात आले होते. मुख्य प्रशासकांनी झेंडा फडकावल्यानंतर आपल्या पोलिसांकडून सलामी घेतली. या कार्यक्रमासाठी उस्मानाबाद जिल्ह्यातील स्वातंत्र्य सैनिक, नागरिक मोठ्या प्रमाणावर हजर होते.

मनोहर टापरे आणि भगवान तोडकरी यांसारख्या गुप्तहेरामुळे जागोजागच्या बातम्या आता वेळेवर मिळायला लागल्या होत्या. स्वातंत्र्य सैनिकांनाही आता शस्त्रास्त्र आणि दारूगोळा मोठ्या प्रमाणावर मिळायला लागला होत्या. त्यामुळे ते निजामाच्या पोलिसांशी आणि दुबळ्या रझाकारांशी दोन हात करायला तयार झाले होते. मुक्तापूरची राजधानीतर सर्व बाजूंनी सज्ज झाल्याने त्याकडे वाकड्या नजरेने पाहण्याची कुणाची हिंमत होत नव्हती. विशेष म्हणजे शेवटपर्यंत जामगावावर येऊन रझाकार किंवा पोलिसांनी हल्ला केल्याचे उदाहरण सापडत नाही. एकट्याने रझाकारांचे धाडसतर कधी होतच नव्हते.

मुक्तापूर स्वराज्याचा कारभार करत असताना लोकसहभाग महत्त्वाचा होता. स्वातंत्र्यसैनिक आणि स्टेट कॉंग्रेसविषयी लोकांमध्ये विश्वास निर्माण करणे गरजेचे असल्याने प्रसिद्धी विभागाने चोखपणे आपले काम केले. त्यामुळे मुक्तापूर स्वराज्याची कल्पना लोकांमध्ये रुजल्याने स्थानिकांचा पाठिंबा वाढायला लागला. साहजिकच स्वत:हून लोक यात सामील व्हायला लागले.

मोठ्या जमिनदारांनी देणग्या आणि सर्वसामान्य लोक अन्नधान्य देण्यासाठी पुढे यायला लागले. परंतु आता कुठे निजाम राजवटीपासून मुक्त होत असताना पुन्हा त्यांच्यावर भार नको म्हणून लोकांनी देऊ केलेल्या मदतीला त्यांनी नम्रपणे नकार दिला.

याशिवाय लोकांच्या मनात विश्वास निर्माण झाल्याने उत्साही लोकांनी आता स्वत:हून प्रभातफेरी, झेंडावंदन, राष्ट्रीय शिक्षण यात भाग घ्यायला सुरुवात केली. अनेक पंचायतींनी आपल्या गावात स्वत:हून तिरंगा झेंडा फडकाविला. लोकांच्या घरावरही जोमाने तिरंगा फडकायला लागला. त्या काळात बार्शी सोलापूर या ठिकाणी सहजपणे झेंडे उपलब्ध व्हायचे. निजामाच्या प्रार्थनेऐवजी आता वंदेमातरम आणि रघुपती राघव राजाराम म्हणताना मुलांच्या आवाजाने जोर धरला. गाव आणि शाळा प्रभातफेऱ्यांतून निघालेल्या घोषणांनी दुमदुमून गेली. कॅप्टन व्यंकटराव जोशी, रामभाऊ जाधव, बाबसाहेब परांजपे, राजेंद्र देशमुख, नानासाहेब चिंचोलीकर, शेषराव निलंगेकर, चंद्रशेखर बाजपेयी, नरहरराव मालखरे, वसंतराव देशमुख, अण्णाराव पाटील, विठ्ठलराव पाटील जामगावकर, जट्टेगुरूजी, मनोहरराव टापरे, भगवानराव तोडकरी, रामचंद्रजी मंत्री, गोपाळ देव अशा कितीतरी लोकांना अहोरात्र झोप नव्हती. मनोहर टापरे आणि भगवानराव तोडकरीसारखी माणसे तर स्वातंत्र्याशिवाय लग्नच करायचे नाही म्हणून नवस करून बसली होती. मला सवड नाही म्हणायलाही आता कुणाला सवड नव्हती. कारण त्यांना माहित होते की, आवड असली की सवड मिळते आणि सवड मिळाली की कुठलेही काम अवघड नाही.

स्वातंत्र्याला पोषक वातावरण आणि ध्येयवेडी माणसं मिळाली होती. आज भावाला भाऊ खपत नाही परंतु त्या काळी जामगावच्या विठ्ठलरावांनी आपल्यातला खराखुरा पाटील जिवंत ठेवला. किल्ल्यासारखा वाडा स्वराज्यासाठी बहाल केला. शेतीबाडीच नाहीतर बायकामुलांचा त्याग करून अनेक स्वातंत्र सैनिकांनी जगाच्या प्रपंच्यात उडी घेतली. सातवीपर्यंतचे शिक्षण आणि गावची मालेपाटीलकी असूनही या बहाद्दर माणसाने स्वत:ला स्वातंत्र्य संग्रामात झोकून देणे म्हणजे स्वार्थी लोकांच्या दृष्टीने पायावर दगड मारून घेण्यासारखे होते. परंतु खऱ्या देशभक्ताला याची चिंता नसते. त्यानुसार जामगावच्या विठ्ठलराव  पाटलांनी हैद्राबादच्या स्वातंत्र्य संग्रामात आजच्या

सोलापूर जिल्ह्यातील ५२ गावांत सर्वांत उठावदार काम केले आहे. गावचे गावकुलकर्णी गोविंदराव नरहरी कुलकर्णी यांनीही पाटलाच्या खांद्याला खांदा लावून यात भाग घेतला. पाटलांनी वाडा दिला तर गोविंदरावांनी आपली ओसरी स्वातंत्र्य संग्रामातील सैनिकांसाठी खुली केली. त्यामुळे कुलकर्णी यांच्या वाड्यात आझाद मुक्तापूरचे सैनिक राहायचे.

आझाद मुक्तापूर स्वराज्याच्या राजधानीला स्वत: भेट देऊन पाहणी करताना विठ्ठलराव पाटलांचा वाडा आजही तेवढ्याच जोमाने उभा असलेला दिसला. त्यामुळे स्वातंत्र्याचे बिगुल आणि भारताचा तिरंगा आजही जामगावच्या वाड्यावर फडकत असल्याचा भास मला झाला. निजामाची पाटीलकी असताना समाजाची गावकी करणे सोपे नसते. त्यामुळे निजामाचा परंड्याचा तहसीलदार बसप्पा पाटलांना सांगायचा, बाबारे ! हे काम करू नकोस, आपले वतन जाईल. जुलमी सरकारचे बूट चाटण्यापेक्षा आपल्या गोरगरिबांचे अश्रू पुसण्यात त्यांना धन्यता वाटायला लागली. म्हणून ते कुठल्याही मोहाला बळी पडले नाहीत. निजामाने वाड्याला सिल ठोकले. परंतु निजाम राजवटीलाच आता हे लोक बुच ठोकायला निघाले होते. त्यांना याची पर्वा थोडीच राहणार होती. विठ्ठलरावांना सर्वजण अण्णा म्हणत. अण्णांच्यामागे आता पालिसांचा ससेमिरा सुरू झाला. कुठल्याही क्षणी अटक होण्याची भीती असल्याने त्यांनी गाव सोडून आपले कुटुंब मानेगाव आणि त्यानंतर शेंद्रीला हलविले. या कामी त्यांना आपल्या पत्नीने मोलाची साथ दिली. इर्ल्याचे ज्ञानेश्वर पाटील, शेंद्रीला गणपतराव पाटील आणि गावातील अब्दुल अमिरभाई शेख आणि गोंदिरावांनी अण्णांच्या खांदा लावून काम केले. अब्दुलभाई स्वातंत्र्यासाठी उस्मानाबादच्या जेलमध्ये शिक्षा भोगत असताना ते सहज पळून आले असते. परंतु आपण गेलो तर पोलीस गणपतराव पाटलांचे हाल करतील म्हणून स्वातंत्र्यापर्यंत अब्दुलभाईंनी शिक्षा भोगली. स्वातंत्र्यासाठी लढणारा सच्चा देशभक्त म्हणून सरकारने त्यांना पेन्शन मंजूर केली होती. आज वाडा सुस्थितीत आहे आणि स्वातंत्र्याच्या वेळी आणलेले हातबॉम्ब अधूनमधून कुणाच्यातरी शेतात किंवा घराच्या भिंतीत सापडले म्हणजे जुन्या आठवणी जाग्या होतात. अण्णांची चार मुलं दादासाहेब, प्रतापराव, मोहनराव आणि रमेश आपल्या देशभक्त आण्णांचा वारसा घेऊन अभिमानाने जगत आहेत. आझाद मुक्तापूरची राजधानी जामगावच्या वाड्यात येणार हे कदाचित विधिलिखित

असावं कारण अण्णांनी वाडा बांधताना वाड्याच्या दरवाजावर अगोदरच 'वंदेमातरम्' कोरून ठेवलेले होते. आजही सुस्थितीत असलेल्या वाड्यावरील वंदेमातरम् बघितल्यावर सलाम ठोकायला कुठल्याही देशभक्ताचा हात आपोआप वर उचलतो.

स्वातंत्र्य संग्रामाच्या गोष्टी आज आपण सहजपणे ऐकतो, हे वाटते तेवढे सोपे नाही. आज लोकशाही असूनही न पटणाऱ्या गोष्टी बोलायची चोरी असते आणि आपले धाडसही होत नाही. मग त्या वेळी तर चोर, कोतवाल, पोलीस सर्व काही आपल्याच हातात ठेवणाऱ्या निजाम राजवटीच्या विरोधात ज्यांनी धाडस केले खरेच त्यांच्यापुढे नतमस्तक झालेतरी कमीच आहे. एक वेळ इंग्रजासारख्या लोकशाहीवाद्यांच्या विरोधात आंदोलन करणे सोपे होते. परंतु बळाच्या जोरावर ज्यांनी जनतेच्या भावना चिरडून टाकल्या त्यांच्याविरोधात अहिंसक आंदोलन करून भागणारे नव्हते. गांधीजींची भाषा निजाम राजवटीच्या पचनी पडणारी नव्हती. त्यांना भगतसिंहासारखे तोडीचे उत्तर हवे होते.

त्यामुळे हैद्राबाद मुक्तिसंग्रामाचा लढा हा सशस्त्र क्रांतीचा लढा म्हणूनच लढला गेला. इथं मिठाचा सत्यागृह झाला नाही तर जनताच आता निजाम राजवटीला मीठ घालून पुरायला निघाली होती. बरं ! आता आपण मुक्त झालोत ही भावना लोकांच्या मनात रुजवायची होती. मग शासनाची विश्वासार्हता तेवढीच महत्त्वाची होती. नाही म्हटलेतरी निजाम शासनाचा जरब होती. परंतु आता मुक्त झालोत म्हणून उपद्रवींचा त्रास होणे स्वाभाविक होते. म्हणून गावागावांत किसान दलाची स्थापना करण्यात येऊन या युवकांनी आपल्या हद्दी ठरवून रात्रंदिवस जागता पाहरा ठेवला. याकरिता जबाबदार लोकांनी आपल्या भागाचा आढावा घेऊन त्याचा अवहाल केंद्रीय समितीकडे पाठविणे बंधनकारक होते.

मुक्तापूर स्वराज्याची स्थापना झाली असलीतरी त्यांचा कारभार हा स्टेट काँग्रेसच्या मार्गदर्शनाखाली सुरू होता. त्यामुळे रोजचा रोज हिशोब लिहिणे आणि इतरही हालचालींची माहिती केंद्राकडे पाठविणे बंधनकारक होते. यात सुसूत्रता यावी म्हणून प्रत्येक जिल्ह्याकरिता एक प्रशाकीय कार्यालय नेमण्यात आले. उस्मानाबादकरिता फुलचंद गांधी हे मुख्य प्रशासक म्हणून काम पाहत होते. कारभार करताना प्रशासनाने ठरवून दिलेल्या सूचनांचे पालन करणे गरजेचे होते. याकरिता स्टेट काँग्रेसने काही नियम घालून दिले होते. सर्वांनी याचे

पालन करणे बंधनकारक होते. कारभाराची संहिता पुढीलप्रमाणे होती.

जिल्हयाचा प्रमुख आपल्यातून एकाला गटप्रमुख म्हणून नियुक्त करेल. त्याने ग्रांमपंचायत आणि किसानदलाची स्थापना करून कारभार करण्याची जबाबदारी त्याच्यावर सोपविण्यात आली.आपल्या भागात कोणत्याही प्रकारचे समाजविघातक कार्य घडणार नाही आणि आपल्या लोकांकडूनही तशी चूक होणार नाही याची गटप्रमुखाने विशेष काळजी घ्यावी. कुठल्याही प्रकारचा निधी सक्तीने वसूल करणार नाही. याविषयी तंबी देण्यात यावी. स्वतंत्र होण्यापूर्वी रझाकारांनी किंवा अन्य कोणी जबरदस्तीने कुठल्या शेतकऱ्यांच्या जमिनी वा इतर स्थावर हिरावून घेतले असेल तर शेतकऱ्यांना ते परत करून द्यावे.

आपल्या भागात फंदफितुरी करणारे लोक राहणार नाहीत याची काळजी घ्यावी आणि त्यांचा योग्य तो बंदोबस्त करावा.

निजामाची यंत्रणा तशी काय झोपलेली नव्हती. पोलीस आणि गुप्तचर यंत्रणा रात्रंदिवस कामाला लागलेली होती. मुबंईच्या नॅशनल स्टँडर्ड या इंग्रजी नियतकालिकाने प्रति सरकारच्या कामकाजाची सविस्तर बातमी प्रसिद्ध केलेली होती. त्यामुळे वरिष्ठ पातळीपर्यंत याचा अहवाल पाठविला गेला आणि त्यात मुक्तापूर स्वराज्य स्थापनच केले गेले नाही. अशा प्रकारचे खोटे अहवाल सादर केले गेले. अशा स्तुतिपाठकांमुळेच वरून डौलदार दिसणारे शासन आतून किती पोकळ असते याची प्रचिती येते. ज्या औरंगजेबाला मराठ्यांच्या गनिमी काव्यातील इंगीत उमजले नाही तिथं असफजाही घराण्याची काय कथा ?

नाही म्हटलेतरी निजाम राजवटीतल्या १६ जिल्ह्यांपैकी उस्मानाबादचा कलेक्टर महंमद हैदर हा सर्वांत कडक आणि क्रूर होता. त्यामुळे हैद्राबाद मुक्ति-संग्रामात सर्वाधिक नुकसान हे उस्मानाबाद जिल्ह्याचे झाले आहे. किरकोळ कारणासाठी बुंदकीची गोळी घालणारा आणि गावच्या गाव पेटवून देणारा हा कर्तबगार कलेक्टर मुक्तापूर स्वराज्याकडे का फिरकला नाही? हा प्रश्न विचारल्यास त्याच्यात किती धमक होती हे स्पष्ट होते. कारण त्याला माहीत होते की, मराठा एकदा पेटत नाही आणि पेटला तर लवकर विझत नाही. आग लावणाऱ्याला आगीची धग माहिती नसते काय ?

मुक्तापूर स्वराज्याची कल्पनाच मुळी वेगळी आहे. मंत्रिमंडळ लोकाकडून निवडले नसलेतरी लोकांसाठी काम करणारे होते. आणि जिथं स्वत:ला लाज वाटते तिथं जनतेच्या काळजीला सुरुवात होत असते. या

स्वराज्यातील प्रत्येक माणूस हा छत्रपती शिवरायांच्या स्वराज्याशी बांधील होता. गांधींजीच्या रामराज्याचा एक साक्षीदार होता. शिवरायांनी ज्याप्रमाणे रयतेच्या कांद्याच्या पातीला हात लावणेही धर्मबाह्य ठरविले त्याप्रमाणे या स्वराज्यातील राज्यकर्त्यांनी लोकांनी देऊ केलेली मदत नाकारली. खरं तर आजच्या राज्यकर्त्यांना हा एक धडा आहे.

आजारी पडले तर थेट डॉक्टरमंत्री आपल्या दारात. अन्याय झाला तर फक्त तक्रार करा, न्याय आपल्या दारात. कुण्या बहिणीला भाऊ नाही म्हणून कोसत बसण्याची आता गरज नव्हती. कारण किसान दलाचा प्रत्येक स्वयंसेवक आता तिच्यामागे भावासारखा उभा होता. म्हणून शेकडो वर्षांनंतर पुन्हा एकदा गाडीला तट्ट्या लावून नवी नवरी माहेरहून सासरला आणि सासरहून माहेरला बिनधास्तपणे जायला लागली. रझाकार असो की, रझाकारी वृत्ती असो इथं दोघांनाही थारा नव्हता. बैलगाडीच्या धुराळ्याप्रमाणे हे केव्हाच हवेत उडून गेले होते. जिथं वाईट विचारांचा सफाया झाला तिथं वाईट माणसंतरी कुठून भेटणार?

स्वातंत्र्याच्या वेळी जनतेच्या सरकारकडून अपेक्षा तर काय होत्या? वीज, पाणी, रस्ते अशा ऐतखाऊ कल्पना आणखी यायच्या होत्या. त्यांना हवे होते बिनधास्तपणे श्वास घेऊ देणारे आपले शासन. आपली माणसं जी आपली काळजी करतील. चोर, दरोडेखोरांपासून संरक्षण आणि रझाकार, सावकार, पाटील आणि कुलकर्ण्यांच्या जाचापासून मुक्तता. हेच तर दिले मुक्तापूर स्वराज्याने! म्हणूनच दिवसेंदिवस या शासनाची लोकप्रियता वाढायला लागली. रात्रीबेरात्री लोक बाहेर यायचे धाडस करायला लागले. तर झोपल्यानंतर आता बिनधास्त झोपायला लागले.

वाळूजला फुलचंद गांधीच्या पाहुण्यांच्या वाड्यात मुक्तापूर स्वराज्याच्या कोर्टाचे कामकाज सुरू झाले. न्यायदानाचे कामकाज चोखपणे आणि नि:पक्षपाती असल्यामुळे लोकांची गर्दी वाढायला लागली. मुक्तापूर स्वराज्याचा न्यायाधीश हा कोर्टात बसून न्यायदान करत नव्हता तर तो जागेवर जाऊन न्यायदान करायचा. कुठलाही खटला एका आठवड्यात निकाली निघायचा. त्यामुळे वाळूजच्या न्यायालयात गर्दी व्हायला लागली. खऱ्या अर्थाने आज दिसणारे लोकन्यायालय हे मुक्तापूर स्वराज्याने केव्हाच राबविले होते. हे वाचल्यावर आश्चर्य वाटायला नको.

जुलमी सत्तेपासून सुटका, लोकहितकारी प्रशासन, योग्य न्यायदान,

संरक्षणाची हमी अशा कितीतरी गोष्टींने, मुक्तापूर स्वराज्यातील लोकांच्या मनात घर केले होते. कोतवालच नाहीतर बड्याबड्या पाटलांनी स्वत:हून यात सामील व्हायला सुरूवात केली होती. गुंडांनी गाव सोडले तर सावकारांनी महिन्यांची गणती सरळ भाषेत करायला सुरुवात केली. साक्षात रामराज्य अवतरल्याची भावना निर्माण झाल्याने सुरुवातीला परके वाटणारे स्टेट कॉँग्रसचे कार्यकर्ते आता जनतेच्या गळ्यातील ताईत बनले होते. त्या वर्षीचे सर्व सणसमारंभ प्रथमच मोठ्या थाटामाटात साजरे करण्यात आले.

बार्शी भागातील कॅंप बंद करून या लोकांनाही आता मुक्तापुरच्या स्वराज्यात सामील करून घेण्यात आले होते. त्यामुळे खर्चात कपात तर झालीच शिवाय स्वराज्याच्या दृष्टिने हे एक पुढचे पाऊल होते. विश्वंभरराव हराळकरांसारखी माणसं आता या स्वराज्याला लागणारी शस्त्रास्त्र पुरविण्याचे काम करू लागली. खरंतर आता तयारी एवढी भक्कम झाली होती की, निजामाचे लष्करजरी आलेतरी दोन हात करायला उस्मानाबाद जिल्ह्यातला स्वातंत्र्य सैनिक आसुसलेला होता. जिंकू किंवा मरू या घोषणेऐवजी आता फ क्त जिंकूच एवढी ऊर्मी त्यांच्यात निर्माण झाली होती.

दोनशे वर्षांतर आता कुठे रामराज्याचा आनंद उपभोगायला मिळाला होता. सुखद अनुभव असला की, दिवस पुरत नाहीत म्हणतात. असेच काहीसे मुक्तापूर स्वराज्याच्याबाबतीत झाले. जुलमी राजवटीला झुगारून आता स्वशासन निर्माण झाले. पाहतापाहता सर्वत्र याचा अंमल सुरू झाला. स्वराज्याची कदरकरत लोकांनी स्वत:हून यात सहभाग घेतल्याने कारभार करताना अनेक सुखद अनुभव पाहायला मिळाले. तसे पाहिले तर हे हंगामी सरकार होते. त्यामुळे त्याचा कालावधीही थोडाच असणार हे माहित होते. बघता बघता दिवस कसे निघून गेले कळालेसुद्धा नाही. १७ सप्टेंबर, १९४८, हैद्राबाद संस्थान विलीन झाले.

हैद्राबाद राज्याचा कारभार करण्यासाठी मेजर जनरल ज्योयंथीनाथ चौधरी यांची लष्करी प्रशासक म्हणून नियुक्ती करण्यात आली. आता हैद्राबादचा कारभार हा अखिल हिंदुस्थानच्यावतीने सुरू होणार होता. त्यामुळे पर्यायी व्यवस्थेसाठी निर्माण झालेल्या मुक्तापूर स्वराज्याने आपला कारभार आहे त्या परिस्थितीत बंद करून आपल्या जिल्हाप्रमुखाकडे रिपोर्ट करावा असा आदेश आला. स्टेट कॉँग्रेसच्या आदेशानुसार सर्व मंत्रिमंडळाला तातडीचा

आदेश पारित करण्यात आला की, आपण आहात तेथून त्वरित राजधानी जामगावाकडे कूच करावे. आदेशाची त्वरित अंमलबजावणी झाली. मिळेल त्या साधनाने सर्व स्वातंत्र्य सैनिक जामगावच्या दिशेने मार्गक्रमण करते झाले.

निजामाचा अमिन आणि आपला फौजदार यातला फरक या चार महिन्यांत लोकांना दिसला होता. एरवी पोलीस म्हटल्यानंतर नाक वाकडे करणाऱ्यांना आता पोलिसांचा जणू लळा लागला होता. तिकडे पोलीस ॲक्शन चालू असले तरी आपले सैनिक बेसावध राहायला तयार नव्हते. रात्रंदिवस चाललेल्या धावपळीत हैद्राबाद मुक्त झाल्याचा संदेशही या लोकांनी आकाशवाणीवरच ऐकला होता. त्यामुळे वाळूज, देगाव, सासुरे, मसले अशा कितीतरी गावांतून मुक्तापूरचे हंगामी सरकार माघारी फिरायला लागले. यांचा थाट तर काय म्हणाल, जणू युनोच्यावतीने एखाद्या देशात शांतता प्रस्थापित करायला गेले होते.

जीव लावला की, दूर जाणाऱ्याला निरोप देताना जीव गेलाच म्हणून समजा. तीच अवस्था आता या स्वातंत्र्य सैनिक आणि जनता यांची झाली होती. त्या त्या गावात या लोकांच्या जंगी मिरवणुका निघाल्या. वाजंत्री, हलग्या, टाळकरी आणि सुवासिनीचे ओवाळणे यामुळे संपूर्ण वातावरण बदलून गेले. गावात आता फक्त पाण्याचाच सडा नव्हता तर लोकांच्या अश्रूंनीही सडा घालायला सुरुवात केली होती. म्हातारीकोतारी संदीकर डॉक्टरच्या गळ्यात पडून जाऊ नका म्हणून विनवायला लागली तर टापरे, तोडकरीसारख्यांना तरणी पोरं आम्हाला सोडून जाऊ नका म्हणून हात धरायला लागली. बायाबापड्यांनी तर ओक्साबोक्सी रडून सारा गाव गोळा केला. लहान पोरांना हा काय प्रकार ते कळेनासे झाले. आईबाप रडताहेत म्हणून त्यांनीही सूर धरला.

अशा रितीने प्रत्येक गावातून वाजतगागत आपले वीर जामगावला एकत्र जमा झाले. फुलचंद गांधींनी सोलापूरातून पाचसहा ट्रकची व्यवस्था केलेली होती. राजधानीच्याभोवती लावलेले भूसुरूंग निकामी करण्यात आले. सर्व शस्त्रांची आणि माणसांची पुन्हा एकवार गणती झाली. राजधानी ए मुक्तापूर स्वराज्य, मौजे जामगावच्या विठ्ठलराव पाटलांच्या गढीवर भारताचा तिरंगा आणखी जोमाने फडकायला लागला. निघण्याची वेळ जवळ आली. मुख्य प्रशासक फुलचंद गांधी, कॅप्टन व्यंकटराव जोशी यांनी पुन्हा एकवार आणि कदाचित शेवटची सलामी स्वीकारली. बिगुल जोरजोराने वाजायला लागले.

राष्ट्रगीत संपले आणि पुन्हा एकदा झेंड्याला सॅल्यूट ठोकून जामगावच्या राजधानीवरचा झेंडा उतरला गेला.

खरं तर हा आनंदाचा दिवस. परंतु सर्वांना दु:ख होते ते आपण आता एकमेकांना कधी भेटणार याचेच. जामगाव आणि पंचक्रोशीतून हजारो लोक या निरोपसमारंभाला उपस्थित होते. सामान गाडीत भरले, गाडीला तिरंगा लावला आणि ड्रायव्हरने गाडीचे स्टार्टर मारले. त्याक्षणी गाडया चालू झाल्या. परंतु तेथे आवाज गाड्याचा नाही तर माणसाच्या रडण्याचा यायला लागला. जो तो धायमोकलून रडायला लागले. कोण कोणाच्या गळयात पडतय हे समजायला तयार नव्हते. बिचारे ड्रायव्हर ! लग्नाच्या अनेक सुपाऱ्या घेतल्या परंतु काठेही असे वातावरण पाहिले नाही. म्हणून अलगदपणे त्यांनीही आपल्या बाहीने आपले डोळे पुसले. भारत माता की जय म्हणत सर्वांनी जड अंतकरणाने उस्मानाबादकडे मार्गक्रमण सुरू केले.

जामगाव, सुर्डी, इर्लेवैराग, बार्शी, येडशीमार्गे ही मंडळी उस्मानाबादमध्ये दाखल झाली. आपल्याकडे असणाऱ्या हत्याराची सविस्तर यादी बनविण्यात आली. निजामाने शरणागती स्विकारताच उस्मानाबादचे कलेक्टर महंमद हैदर बेंबळीमार्गे हैद्राबादकडे पळून गेला होता. त्यामुळे प्रभारी व्यवस्थापक आणि पोलीस प्रमुखाची भेट घेऊन सर्व हत्यारे सरकारकडे जमा करण्यात आली. कालपर्यंत खुलेआम बंदुकीचा पट्टा अडकिवणाऱ्यांना आता यावर बंधन घालण्यात आले. भगवान तोडकरी आणि निलंग्याचे शेषराव वाघमारे यांच्या खांद्यावरचा पट्टा तर केवळ आंघोळीपुरताच निघायचा.

गेल्या कित्येक दिवसात घराचे तोंडही न पाहिलेल्या स्वातंत्र्यवीरांना स्वातंत्र्याचा आनंद आपल्या आप्तजनांसोबत स्वतंत्रपणे साजरा करायचा होता. परंतु स्टेट कॉंग्रेसचा आदेश आला, कुणीही विचारल्याशिवाय आपले गाव सोडू नये. रझाकारांनी केलेल्या अत्याचारामुळे सर्व सामान्यांच्या मनात आता सुडाची भावना निर्माण झाली. खुलेआम मुस्लिमांच्या कत्तली सुरू झाल्या. जे खरेच दोषी होते त्यांनी हैद्राबादच्या दिशेने पळ काढला होता. परंतु त्याची शिक्षा साध्याभोळ्या मुसलमानाला मिळू नये म्हणून स्वातंत्र्य सैनिक पुढे आले. याचाही सविस्तर कार्यक्रम तयार करण्यात आला.

मुक्तापूरच्या राजधानीकरिता ज्याप्रमाणे जामगावच्या पाटलांनी आपला वाडा रिकामा केला, त्याप्रमाणे उस्मानाबाद परिसरातल्या मुसलमानाला आश्रय

देण्याकरिता फुलचंद गांधींचा वाडा सज्ज झाला. प्रत्येकांची जबाबदारी निश्चित करण्यात आली. उस्मानाबाद आणि परिसरातील मुस्लिम मोहोल्ल्यात फिरून धीर द्यायला सुरूवात केली. जिवाच्या भीतीने गड्यामाणसांनी घरे सोडलीतर बायकांपोरांना कोण सांभाळणार ? यासाठी गल्लीबोळात फिरून दिवसांकाठी बायकामुले गांधीच्या वाड्यात आणली जायची. रात्र झाली की, त्यांना त्यांच्या घरापर्यंत पोहोचविण्याची जबाबदारी त्याचीच राहायची. विश्वासाने बायकामुली या स्वातंत्र्य सैनिकांसोबत घरी जायच्या. यादरम्यान कुठलीही तक्रार आल्याचे कुणाच्याही ऐकिवात नाही.

एकरभर पसरलेला फुलचंद गांधीचा वाडा अशा निर्वासितांना कमी पडायला लागला. काहीजणींच्या नवऱ्याचा पत्ताच लागत नव्हता. अशांना रात्रंदिवस तेथेच आश्रय दिला तर दोन मुस्लिम बायकांचे बाळंतपण गांधीच्या वाड्यातच झाले. यातून हा लढा हिंदु मुस्लीम नव्हतातर प्रवृत्तीविरोधात होता हे स्पष्ट होते. कोणाचे डोके कोठे चालेल हे कधी सांगता येत नसते. फुलचंद गांधी आता मुस्लिमांना वाचवायला निघाले म्हणत काही कर्मठवाद्यांनी त्यांच्या घरावर हल्ला केला. परंतु रामभाऊ जाधव, भगवान तोडकरी, मनोहर तोडकरी यांच्यापुढे अशा लोकांचे काही चालले नाही.

अशा रितीने मुक्तापूर स्वराज्याची कल्पना राबवून आपल्या लोकांनी राज्यकारभार कसा करावा याचाही आदर्श घालून दिला. आता आपण त्यातला फक्त आदर्श एवढाच शब्द घेतो आहोत की काय? असा प्रश्न पडतो. परंतु ज्यांनी आपल्या संसाराची फिकीर न करता राष्ट्राची काळजी वाहिली त्यांचे बलिदान विसरता कामा नये. कारण अशा महान विभुतीमुळेच पुढे १७ सप्टेबर, १९४८ ला हैद्राबाद संस्थान निजामाच्या तावडीतून मुक्त होऊन आजचा एकसंघ भारत तयार झाला.

खरं तर सोलापूर जिल्ह्यातील ५२ गावे हैद्राबाद संस्थानात होती त्यामुळे त्यांना १७ सप्टेंबरला स्वातंत्र्य मिळाले आहे. मुक्तापुर स्वराज्याची राजधानी बरेच दिवस माढा तालुक्यातील जामगांवला होती. परंतू स्वातंत्र्यानंतर पुढच्या पिढीला याचा विसर पडला आहे. खरंतर या ५२ गावांनी हैद्रबाद मुक्ति– संग्रामदिन मोठ्या दिमाखात साजरा करून आपल्या पराक्रमी पुर्वजांना श्रंध्दाजली दिल्यास त्यांच्या आत्म्यास खरी शांती मिळेल.

***

माढा, मोहोळ, बार्शी, उत्तर सोलापुरातील ५३ गावे मुक्त

# निजामशाहीच्या अस्ताला ६५ वर्षे पूर्ण

सोलापूर / शरीफ सय्यद

सोलापूर जिल्ह्यातील माढा, उत्तर सोलापूर, मोहोळ आणि बार्शी तालुक्यातील ५३ गावांचा समावेश हैद्राबादच्या निजाम राजवटीत होता. १७ सप्टेंबर १९४८ रोजी स्वतंत्र भारताचे गृहमंत्री सरदार वल्लभभाई पटेल यांच्या धाडसी कारवाईने ही गावे निजाम राजवटीतून मुक्त होऊन भारतात समाविष्ट झाली. या घटनेला उद्या ६५ वर्ष पूर्ण होत आहेत.



निजाम राजवटीतून मुक्ती मिळावी यासाठी अनेकांनी आपल्या प्राणाची आहुती दिली. अनेकांनी आपले रक्त सांडले. त्या हुतात्म्यांच्या आठवणी, त्यांचा त्याग स्मरणात राहावा यासाठी १७ सप्टेंबर हा दिवस भारताच्या स्वातंत्र्यदिनाप्रमाणे साजरा करण्यात यावा, अशी अपेक्षा हैद्राबाद मुक्ती संग्रामाचे अभ्यासक तथा इतिहास संशोधक डॉ. सतीश कदम यांनी व्यक्त केली.

स्वातंत्र्याच्यावेळी भारतात एकूण ५६५ संस्थाने होती. संस्थानातील राजांचा कारभार हा स्वतंत्र देशासारखा चालायचा. स्वातंत्र्य प्राप्तीनंतर देशाचे पहिले गृहमंत्री सरदार वल्लभभाई पटेल यांच्या धाडसी निर्णयाने सर्व संस्थाने भारतात विलीन झाली. तरी जुनागढ, काश्मीर आणि हैद्राबाद ही संस्थाने स्वतंत्र राहून राज्यकारभार करण्याच्या मानसिकेत होती. त्यातच हैद्राबादचा राजा उस्मानअली निजाम हा जगातील सर्वात श्रीमंत माणूस होता. त्याच्या ताब्यात सध्याच्या सोलापूर जिल्ह्यातील माढा, उत्तर सोलापूर, मोहोळ आणि बार्शी तालुक्यातील ५३ गावे होती. १७ सप्टेंबर १९४८ साली भारत सरकारने निजामाच्या विरोधात पोलीस कारवाई करुन हैद्राबाद संस्थानचा भारतात समावेश करुन घेतला. त्यामुळे सोलापूर जिल्ह्यातील निजाम राजवटीच्या ताब्यात असणारी ही गावे १७ सप्टेंबर १९४८ रोजी स्वतंत्र झाली. १५ ऑगस्ट १९४७ रोजी भारत स्वतंत्र झाला. मात्र हैद्राबादचा निजाम हा भारतापुढे झुकायला तयार नव्हता. २२५ वर्षे अखंडपणे हैद्राबाद शहरातून निजाम घराणे आपली राजवट चालवित होते. त्यांच्या ताब्यात १६ जिल्ह्यातील ५३ गावांचा समावेश होता. निजाम राजवटीत नात्रजला निजाम लष्कराचा तळ होता. नात्रज हे स्वतंत्र भारताची आणि निजामशाहीची सीमा होती. त्यामुळे या परिसराला वाघा बॉर्डरचे

▸▸ पान ६ वर

- भोगावती आणि सीना नदी काठावरील सोलापूर जिल्ह्यातील जवळपास ५३ गावे १९६० पर्यंत हैद्राबाद राज्यात होती.
- जामगाव (ता. माढा) येथील विठ्ठल पाटलांच्या वाड्यात आझाद मुक्तापूर नावाच्या प्रतिसरकारच्या राजधानीचे ठिकाण होते.
- धामणगावचे लाला वाघमारे हैद्राबादच्या स्वातंत्र्यासाठी शहीद झालेले आहेत.
- काटीला जाण्यापूर्वी हिंदुस्थानच्या सैन्याचा मुक्काम बरेच दिवस गावडी दारफळमध्ये पडलेला होता.

सौजन्य: दै.पुण्यनगरी



आझाद मुक्तापूरची राजधानी विठ्ठलराव पाटील जामगांव यांचा वाडा

# २१.रझाकारी कासिम रझवी

हैद्राबाद मुक्तिसंग्रामाचे नाव निघाले की रझाकार हा शब्द सहजपणे तोंडात आल्याशिवाय राहत नाही. तर रझाकारांचे जन्मस्थान असणाऱ्या मजलिसे इत्तेहादूल मुसलमीन या संघटनेचा इतिहास काढल्याशिवाय रझाकारांचा इतिहास पूर्ण होणार नाही. मुळातच हैद्राबादची निजाम राजवट ही एका मुस्लिम सरदाराने स्थापन केलेली राजवट होती. त्यानंतर स्वातंत्र्यापर्यंत त्यांच्याच वंशजांनी राज्यकारभार केला. एका बाजूला भारतदेश स्वतंत्र होत असतानाच देशाची फाळणी होऊन हिंदुस्थान आणि पाकिस्तान अशा दोन स्वतंत्र राष्ट्रांची निर्मीती झाली. परंतू भारतातील जुनागढ, काश्मीर आणि हैद्राबाद ही तीन संस्थाने आणखी समाविष्ट झालेली नव्हती. जुनागढने तर पाकिस्तानात विलीन होण्याची घोषणा केली परंतु सरदार पटेलांनी कारवाई करताच जुनागडचा नबाब मुलाबाळांना इथेच ठेवून दोन कुत्रे घेऊन पाकिस्तानला पळाला.तर हैद्राबाद स्वतंत्र राष्ट्र म्हणून मिरविण्याच्या धुंदीत होते. काश्मीरचा तोडगा आजतागायत आपण भोगतोय.

तूर्त आपण या ठिकाणी हैद्राबाद संस्थानाविषयी माहिती घेत असताना असे दिसून येते की, निजाम राजवट वरचेवर धर्मांधाच्या हातात गेल्याने त्याच्यापुढील अडचणी वाढत गेल्या. अखंड भारताच्या स्वप्नाने प्रेरित झालेल्या हिंदू समाजाने ज्याप्रमाणे आर्यसमाज, हिंदु महासभा, किसान दल अशा वेगवेगळ्या संघटना काढून निजाम शासनावर दबाव टाकण्याच्या प्रयत्न केला. त्याचप्रमाणे दुसऱ्या बाजूला हैद्राबादसारख्या शहरात अनेक वर्षापासून रोहिले, पठाण, अरब यांच्यासारखे स्वत:ला कट्टर समजणारे अनेक मुस्लिम आजही आपण राज्यकर्तेच आहोत या तोऱ्यात वावरत होते. यातून मुस्लिमाविषयी काहीतरी विधायक कार्य करावे म्हणून १९२७ साली उस्मानिया विद्यापीठातील प्राध्यापक मेहेउद्दीन कादरी आणि हबिब उर रहेमान यांच्या

संकल्पनेतून मजलिसे इत्तेहादूल मुसलमीन या संघटनेची स्थापना झाली. सुरूवातीच्या कालखंडात बहाद्दूरयार जंग यांनी या संघटनेच्या अध्यक्षपदाची जबाबदारी सांभाळली होती.

पडद्यामागून इत्तेहादचा कर्ताधर्ता हा खऱ्याअर्थाने सातवा निजाम मिर उस्मानअली हाच होता. त्यामुळे हैद्राबाद संस्थानात नेहमी एक चर्चेचा विषय राहिला की, इत्तेहादला निजामाने वापरले की, इत्तेहादने निजामाला वापरले? परंतु कितीही जोर लावला तरी निजामशाहीची टक्कर ही अखंड हिंदुस्थानशी होती. त्यामुळे जेव्हा स्वातंत्र्य संग्रामाची वेळ आली तेव्हा निजामाने आपली धन, दौलत, कुटुंब सर्व काही सुरक्षित ठेवून आपल्याला पाठिंबा देणाऱ्या अशा संघटनांना व त्यांच्या म्होरक्यांना वाऱ्यावर सोडले.

सुरुवातीच्या कालखंडात या संघटनेचे कार्य आणि त्यांचा हेतू हा पूर्णपणे धार्मिक आणि सामाजिक असून तो आपल्या धर्मापुरता मर्यादित होता. बहादुरयार जंगनी या संघटनेची सूत्रे हाती घेतल्यानंतर संस्थानातील जिल्हावार कार्यकारिणी घोषित केली. त्यात लातूरची जबाबदारी मौलाना कासिम रझवीकडे तर उस्मानाबादला इकरामुल्ला वकील यांनी इत्तेहादूलचा कारभार सुरू केला. १९३८ पर्यंत इत्तेहादूलच्या ५० शाखा आणि ५० हजारांवर सभासद होते. त्यामुळे संघटनेच्या माध्यमातून त्या लोकांनी सरकारवर दबाव टाकण्याची एकही संधी सोडली नाही. एकदातर मंत्रिमंडळावर दबाव टाकण्यासाठी इत्तेहादने हैदाबादमध्ये गाढवांची जंगी मिरवणूक काढली. याप्रमाणे मजलिसच्यारूपाने जातियवादाचे नवीन भूत हैद्राबादच्या मानगुटीवर बसायले लागले. खरं तर १९३५ पर्यंत म्हणजे रझाकराची निर्मिती होईपर्यंत निजाम राजवटीत जातीय दंगल काय असते याची कल्पनाही कोणाला नव्हती. राजा मुस्लीम असलातरी त्याचे वर्तन जातीयवादाचे नसल्याने पूर्वी राजाला हटविण्याचे प्रयत्न राज्यकारभारातून झाले होते जातीयवादातून नाही.

अशा रितीने विविध माध्यमातून कारभार करत असताना इत्तेहादूल संघटनेच्या माध्यमातून स्वयंसेवक म्हणून काम करण्याकरिता सय्यद महंमद यांच्या नेतृत्वाखाली रझाकारांची निर्मीती झाली. त्यामुळे रझाकार म्हणजे स्वयंसेवक असा याचा होतो. रझाकार संघटनेचे अफसरे अला (मजलिसे इत्तेहादूल मुसलमीनचा प्रमुख) नेमण्यात आले. रझाकार संघटनेची बांधणी करण्याकरिता प्रत्येक गावात, शहरातील प्रत्येक गल्लीत शाखा काढण्यात

आल्या. शाखेच्या प्रमुखाला सालार म्हणत तर अशा सालारमध्ये ३० रझाकार असून त्यांना जैश म्हणत. याप्रमाणे तालुक्याच्या प्रमुखाला सालारे सगीर व जिल्ह्याच्या प्रमुखाला सालारे कबीर म्हणत. हैद्रबाद शहरातील शाखांना मरकज म्हणत. याच मरकजवर आफसरा अलाने निवडलेल्या रझाकारांना लष्करी शिक्षणाची जबाबदारी देण्यात आलेली होती. मुस्लीमबहुल गावांत रझाकरांचे अड्डे असायचे. गावात प्रचंड दहशत निर्माण करून आपणाला पाहिजे त्या गोष्टी करून घेण्यावर त्यांचा कटाक्ष असे. यावेळी लष्करी आदेश देताना उर्दू भाषेचा वापर करण्यात येत होता. 'उस्मान के कदमों पे नेहरू पटले को झुकवा देंगे' हे रझाकारांच्या परेडचे मार्चिंग साँग होते. मजलिसे इत्तेहादूल मुसलमीन या संघटनेचे घोषवाक्यच मुळी विचित्र होते. 'ममलकते आसफिया इस्लामिया' याचा अर्थ होतो, हैद्राबाद हे सार्वभौम, स्वायत्त इस्लामी राज्य आहे. पुढील विनाशास याच गोष्टी मोठ्या प्रमाणावर कारणीभूत ठरल्या.

रझाकारांचा गणवेष खाकी शर्ट, खाकी पँट, कमरेला पट्टा व डोक्यावर काळी रूमी टोपी असून अधिकाऱ्यांना मात्र खाकी रंगाचा कोट होता. त्यांच्या छातीवर विविध प्रकारचे बिल्ले आणि पदकेही लटकावलेली असायची. प्रत्येक स्वयंसेवकाजवळ तलवार आणि जंबिया तर अधिकाऱ्यांना यासोबतच पिस्तुल आणि संगीनधारी बंदूक वापरण्याची मुभा होती. बंदुकामध्ये गावठी बंदुका, भरमार, कराबीन बंदुका, उखळी तोफा, ३ नॉट ३, १२ बोअर बंदुक आणि स्टेनगन यांचा समावेश होता. सोबतच काही रझाकाराजवळ कुदळ आणि फावडे असायचे. ते खांद्यावर टाकून रझाकार सर्वत्र फिरायचे. इत्तेहाद हा शब्द असलेला आसफिया ध्वज रझाकारांचे निशान होते. वरचेवर रझाकारांची संख्या वाढत गेली. दरमहा त्यांना ६० रूपया तनखा आणि प्रवासभत्ता मिळायचा. शेवटपर्यंत आपला या संघटनेशी संबंध नाही, म्हणणाऱ्या निजामाच्या पाठिंब्याशिवाय एवढा मोठा डोलारा चालूच शकत नाही, हे वेगळे सांगण्याची गरज नाही.

अशा प्रकारची उभारणी झालेली संघटना कासिम रझवीच्या हातात आली आणि बघताबघता इत्तेहादूलऐवजी आता सर्वत्र एकच शब्द ऐकायला येऊ लागला रझाकार! १९४६ साली गुलबर्गा या ठिकाणी इत्तेहादूलचे अधिवेशन भरले होते. त्या अधिवेशनात लातूरची जबाबदारी सांभाळणारा कासिम रझवी प्रथमच धूमकेतूसारखा प्रकाशझोतात आला. त्याने

आपल्याकडील सारी संपत्ती, मालमत्ता, दागदागिने सर्व काही इत्तेहादूलला अर्पण करून पुर्णवेळ काम करण्याची घोषणा केली. या वेळी कासिम रझवीला 'सिद्दीके दख्खन' नावाचा किताब देण्यात आला. एका बाजूला तो दख्खनचा सम्राट तर दुसऱ्या बाजूला आपल्याकडील सर्व संपत्तीचा त्याग करून त्याने अंगावरच्या वस्त्रानिशी नवे आयुष्य सुरू केले होते.

लातूर येथील सध्याच्या तहसील कार्यालयाच्याजवळ जी रिकामी जागा दिसते आहे. याच ठिकाणी त्याचे वडिलोपार्जित घर असून कासिम रझवीचा जन्म ३१ मे, १९०० रोजी एका सर्व सामान्य कुटुंबात झालेला असून मामा फौजदार असल्याने शिक्षणासाठी अलीगढला जाऊन एल. एल. बी. पर्यंतचे शिक्षण घेऊन परत आल्यानंतर कासिमने लातूरात वकिलीचा व्यवसाय चालू केला. लातूर तालुक्यातील हरंगुळ आणि पाखर सांगवीला कासिम रझवीची वडिलार्जित जमीन होती. अतिशय किरकोळ प्रकृती असुन कपडेही अतिशय साधे असलेतरी नीटनेटके असायचे. प्रसंग कुठलाही असलातरी हातातील सिगारेट कधी बंद पडली नाही. रझवी हा मूळचा शाकाहारी असून रात्र-रात्र जागून तो पत्ते खेळायचा. या वेळी कितीही पैसे जिंकलेतरी जुगारातले पैसे घरात वापरू नये म्हणून ते पैसे तिथेच कोणालातरी वाटून टाकायचा असा वेगळा स्वभावही त्याच्यात होता. गुंडांना हाताशी धरून वेगवेगळया प्रकारचे गुन्हे करायचे आणि त्यांची कायदेशीर बाजू सांभाळायची ही नीती त्याने सुरूवातीपासूनच अवलंबलेली होती. त्यामुळे एकदा लातुरातील इसाक नावाच्या गुंडाच्या टोळीने मालाचा ट्रक लुटला. पोलिसांनी टोळीवाल्यांना अटक करताच रझवीच्या गुंडांनी थेट पोलीस ठाण्यावरच हल्ला चढविला. यात इसाक ठार झाला. मात्र या प्रकरणापासून कासिम रझवीला प्रचंड लोकप्रियता मिळाली. वकिली करताना त्याने कधीही जात पाहिली नाही. किंबहुना हिंदूंचेही बरेच खटले त्याने स्वत:हून चालवून त्यात विजय मिळविला. वकिलीत त्याचा अभ्यास आणि बाहेर दहशत असल्याने त्याच्याविरूद्ध खटले चालवायला कुटलाही वकील घाबरायचा. त्याही अवस्थेत स्वातंत्र्य सेनानी चंद्रशेखर बाजपेयी यांनी शेवटपर्यंत त्याच्याविरूध्द खटले चालविले.

साध्या वकिलीचा माणूस परंतु लोक रझवीला बॅरिस्टरसाब या नावाने ओळखायचे. डोळ्यात जरब असल्याने पुढच्याचा वेध घेण्याची त्यात ताकत होती. अस्सल उर्दूतून बोलणी आणि आपल्या भडक भाषणाने कासिम रझवीला

समाजात प्रचंड लोकप्रियता मिळालेली होती. हाती घेतलेले काम कुठल्याली अवस्थेत पूर्ण करण्याची त्याची तयारी असायची. रस्त्यावरून फिरताना सोबत शंभरदीडशे रझाकारांची फौज सोबत असायची. यात बलदंड रोहिले, पठाण आणि रझाकारांचा भरणा असायचा. त्यांच्या हातात नंग्या तलवारी, बंदुका तर काहीच्या खांदूयावर फावडे याप्रमाणे रझाकारची फौज निघाली म्हणजे सर्वसामान्य घाबरून जायचा. दिवसभर व्यस्त असल्याने बहुतेक वेळा रात्रीची प्रार्थना कधी चुकली नाही. त्या वेळी हजारो लोक सोबत असायचे. व्यक्तिमत्वात पुढच्यावर पकड ठेवण्याची जरब असलीतरी त्यात तत्त्वज्ञानाचा अभाव होता. भाषणामध्ये गरीब हिंदूचा उल्लेख जरूर असायचा. जर हिंदू गरीब आहेतर त्याचा शेजारी मुसलमानही गरीब असल्याची जाणीव करून दिली जायची. काश्मिरमध्ये जर मुस्लिम बहुसंख्य असताना हिंदूंचा राजा राज्य करु शकतो तर हैद्राबादमध्ये याउलट का होऊ शकत नाही? असा प्रश्न जाहीर सभेत मांडला जायचा. २०० वर्षांपासून सत्तेवर असलेल्या असफ जाही घराण्याचा झेंडा दिल्लीच्या लाल किल्ल्यावर फडकविण्याचे स्वप्न त्याने शेवटपर्यंत कायम ठेवले. भाषेवर प्रभुत्व आणि बोलण्याची लकब असल्याने हजोरोची सभा तो सहज जिंकायचा.

रझवीच्या घरात एका कोपऱ्यात चाबकाचा ढीग पडलेला असून बॅरिस्टरसाबने बोलाविले म्हटल्यानंतर सारी गल्ली तिकडे जाणाऱ्या माणसासाठी रडायला सुरुवात करायची. एका बाजूला त्याची मोठी जरब असलीतरी खाजगीत तो सुसंस्कृतपणे बोलायचा. त्यामुळे त्याच्या स्वभावाचा कोणाला अंदाज आला नाही. लातूरच्या शाळेत एकदा त्याच्या मोठ्या मुलाने आपल्या गुरुजींच्या डोक्यावर त्यांचाच जोडा ठेवला. तेव्हा त्या वर्गासमोरून अणदूरचे रामराव बऱ्हाणपूरकर नावाचे शिक्षक जात होते. त्यांनी हा प्रकार पाहिला आणि वर्गात येऊन रझवीच्या पोराला रु ळाने सडकून काढले. काय आश्चर्य ! अगदी पाच मिनिटांत शाळा रिकामी झाली. जोतो रामरावगुरुजींना दोष द्यायला लागला. बॅरिस्टरसाबच्या मुलाला शिक्षा म्हणजे खुद्द यमाला आमंत्रणच. हेडमास्तरसह सारे पळाले, मात्र कंदलेगुरुजींनी त्यांना धीर दिला.

थोड्याच वेळात बॅरिस्टरसाहेबाचे दोन पठाण रामरावगुरूंजीच्या दारात! त्यातला एकजण बोलला, आपको बॅसिस्टरसाब ने बुलाया है. बस ! गुरूजीसह साऱ्या गल्लीत माणूस मेल्यागत रडारड सुरू झाली. काहीजणांनी त्यांना पळून

जाण्याचा सल्ला दिला. गुरुजी म्हणाले, त्याला मला मारायचेच असेल तर तो कुठल्याही गुंडाकडून मारू शकेल. मग आज मेलो काय? अन् उद्या मेलो काय. रामरावगुरुजी ताडताड चालायला लागले. बॅरिस्टर वाटच बघत होते. गुरूजी बैठकीत जाऊन उभा राहिले. तोच बॅरिस्टरसाब म्हणाले, आपके बारे में घर वाले कुछ बोल रहे है! गुरूजी? क्या बॅरिस्टरसाब? वही, आपने हमारे बच्चे को मारा है? मग गुरुजींनी धाडस करून सारा किस्सा सांगताच बॅरिस्टरचा चेहरामोहरा बदलून गेला. त्यांनी मुलाला बोलावले आणि गुरुजींनी आदेश दिला, मास्टरजी ! इस नालायक को पचास जूते मारो ! गुरुजींनी सांगितले, मैं तो उसे सजा दे चुका हूँ. तेव्हा त्याने स्वत: मुलाला मारायला सुरूवात केली. गुरुजींनी मुलाला मारू दिले नाही. तेव्हा बॅरिस्टरला गुरूजींची द्या आली आणि चहा पाजवून स्वत:ची माणसे पाठवून गुरूजीला घरी पोहोचविले असा एक वेगळा माणूसही कासिम रझवीच्यामध्ये दडलेला होता.

मजलिसे इत्तेहाद मुसलमीन ही धर्मकार्यासाठी काम करणारी संघटना तर रझाकार ही इत्तेहादची स्वयंसेवी कार्यकर्त्यांची फ ळी होती. याचा नेता नबाब बहाद्दूर यारजंग हा सुरुवातीला मवाळ असून त्यांची ध्येय धोरण वेगळी होती. निजामाच्या अप्रत्यक्ष पाठींब्यावर बहाद्दूरयार जंगने मजलिसचा कारभार मोठ्या प्रमाणावर वाढवायला सुरूवात केली होती. यातच आता धर्मवादाने परिसीमा गाठलेली होती. तेव्हा बहाद्दूर यारजंगाचा गूढपणे मृत्यू घडविण्यात आला. १९४६ साली मजलिसे इत्तेहादूलचे अधिवेशन गुलबर्गा याठिकाणी आयोजित करण्यात आले होते. या वेळी लातूरचा जिल्हाध्यक्ष असणाऱ्या कासिम रझवीने आपल्या भाषणाने सर्वांनाच आचंबित करुन सोडले. २०० वर्षाचे मुस्लीम शासन आता फक्त टिकवायचेच नाही तर निजामशाहीचा झेंडा दिल्लीच्या लाल किल्ल्यावर फडकावयाची अशी हाक रझवीने दिली. स्वत:चे आयुष्य संघटनेकरिता खर्ची घालणार असल्याचे कासिम रझवीने घोषित केल्याने सर्वांचे लक्ष आपल्याकडे वेधून घेतले. त्यानुसार या दिवसापासून त्याने आपला मुक्काम हैद्राबादला हलविला. पाकिस्तानचे पंतप्रधान बॅ.महमदअली जीना एकदा हैद्राबादला आले तेव्हा त्यांनी भरसभेत रझवीला सांगितले की, आपला लढा हिंदूंशी नसून हिंदूस्थानशी आहे. त्यामुळे सर्वसामान्यावर अत्याचार करणे योग्य नाही. बरेच दिवस रझवी या तत्त्वानुसार वागला परंतु रझाकारांचा पसारा वाढत गेला तसा त्याचाही प्रवास उलट्या दिशेने सुरू झाला.

कासिम रझवीने इत्तेहादूलची सूत्रे हाती घेतली आणि रझाकारांचा बोलबाला सुरू झाला. सोबतीला रेडिओ केंद्र, १० दैनिक आणि ७ साप्ताहिके सज्ज असून त्यातून जहरीला प्रसार उघडपणे सुरू झाला. भारत सरकारवर दबाव टाकण्यासाठी निजामाने इत्तेहादूलचे भूत उभे केले. इत्तेहादूलपेक्षा रझाकारांचे वर्चस्व दिवसेंदिवस वाढायला लागले. दुसऱ्या बाजूला भारत सरकारकडून विलीनीकरणासाठी दबाव वाढत चालला होता. अशा वेळी चर्चेच्या फैरी झडवत ठेवून दुसऱ्या बाजूला रझाकारांच्या माध्यमातून सामाजिक वातावरण तापवत ठेवायचे अशी दुहेरी भूमिका निजामाने घेतलेली होती. २३ आक्टोबर, १९४७ ला छतारीचे नवाब, सर सुलतान अहमद यांच्या नेतृत्वाखालील शिष्टमंडळाने भारत सरकारशी चर्चा करून जैसे थे करारावर एकमत घडवून आणले. हे शिष्टमंडळ दुसऱ्या दिवशी सकाळी निजामाची सही घेऊन ते दिल्लीला जाणार होते. तेव्हा पहाटे ३ च्या सुमारास हजारो रझाकार शिष्टमंडळाच्या निवासस्थानासमोर जमा झाले. या लोकांनी अतिशय अर्वाच्य भाषेत त्यांना शिव्या दिल्या. साहजिकच या लोकांनी रात्रीतून निजामाच्या घरी जाऊन कासिम रझवीच्या प्रवृत्तीविषयी तक्रार केली. परत सकाळी ठरलेल्या वेळी हे शिष्टमंडळ जेव्हा अधिकृतपणे चर्चा करण्यासाठी निजामाकडे पोहोचले त्या वेळी निजामाच्या अगदी बाजूला बसून कासिम रझवीने फक्त बैठकीत भाग घेतला असे नाही तर शिष्टमंडळाला काही सूचनादेखील केल्या. साहजिकच दिल्लीचा दौरा रद्द करून जैसे थे करार आणखी काही दिवस पुढे ढकलला. अशा प्रकारे दिवसेंदिवस कारिम रझवीची ताकद वाढत चालली होती.

इत्तेहादूल ही स्वतंत्र सामाजिक संघटना असलीतरी थेट मंत्रिमंडळाच्या बैठकीतीही कासिम रझवीची भूमिका महत्त्वाची होती. अखंड भारताबरोबर हैद्राबाद संस्थानची फौज सामना करू शकेल का? असा प्रश्न ज्या वेळी जनलर अॅड्रयूस यांना विचारण्यात आला, तेव्हा त्यांनी स्पष्टपणे हे शक्य नसल्याचे नमूद करताच शेजारी बसलेले रझवीसाब भडकले आणि रागातच उद्‌गारले, गधा है, हकाल दो, साले को ! सर्वत्र शांतता पसरली. सर्वसामान्य माणूस खुद्द राजासमोर देशाच्या सेनापतीला तो कुठली भाषा वापरतोय यावरून त्याचा दबाव ध्यानात येऊ शकतो. यामुळे आत्ता सैन्यापेक्षा रझाकाराचे महत्त्व वाढायला लागले.

भारतदेश स्वतंत्र झाल्यानंतर हैद्राबादवर विलीन होण्यासाठी दबाव

वाढत गेला. तसंतसं उस्मानअली जंगबहाद्दूरवर सर्वच बाजूंनी दबाब आला, तेव्हा रझवीने हैद्राबादमधील दारू ए सलाम (शांतिभवन) या आपल्या कार्यालयातून घोषणा केली की, जमत नसेल तर सत्ता इत्तेहादूलच्या हाती सोपवा. यावरून रझाकारांची दिशा आणि तयारी ध्यानात येऊ शकते. इत्तेहादूल संघटनेच्या हातून रझाकारांनी आपली सत्ता कधी काबिज केली ते कळालेसुद्धा नाही. हैद्राबाद संस्थानला स्वतंत्र इस्लामिक राष्ट्र बनविण्यासाठी सरकारी यंत्रणेवर दबाव टाकायचा आणि जर सरकारलाच जमत नसेल किंवा निजामाने शरणागती पत्करली तर याकरिता रझाकारांची फौज तयारी ठेवण्यात आली होती. रझाकारांच्या मुख्य कार्यालयातून नोव्हेंबर, १९४७ला खालीलप्रमाणे आदेश जारी करण्यात आले.

१. प्रत्येक सरकारी कार्यालयाचा ताबा घेणे.

२. कार्यालयातील सर्व कागदपत्रे जाळून टाकणे.

३. याकरिता अरबांची मदत घेण्यात यावी.

४. सर्व काँग्रेसजणांच्या घरावर सक्त पहारा ठेवण्यात यावा, त्यांना घरातून पळून जाऊ देऊ नये. विरोध केला तर त्यांना ठार मारण्यात यावे, मात्र त्यांच्या स्त्रियांचा उपमर्द करू नये.

५. राज्यातील सर्व कचेऱ्या एकदम जाळून टाकाव्यात.

६. सत्ता हस्तांतर झालीच तर मंत्रिमंडळाला खुर्चीतून ओढून बाहेर काढावे आणि याकरिता पोलीस आणि लष्कर यांची मदत घेण्यात यावी.

७. हिंदू धनिक आणि जे लोक सरदार पटेलांना जाऊन मिळाले आहेत त्यांची घरे जाळून टाकावीत.

८. या कामाकरिता जे मुसलमान विरोध करतील त्यांना बंदी बनवावे.

९. या कामाकरिता बाहेरून निर्वासित मुस्लिम बोलावून घेऊन त्यांना गावोगावी फिरविण्यात यावे.

१०. रझाकारांनी रात्रीची गस्त घालून सर्व हालचालींवर नजर ठेवावी. आणि याची माहिती आपल्या वरिष्ठांना देण्यात यावी.

११. दलित आणि जे हिंदू रझकारांच्या अंकित आहेत त्यांना चंद्रांकित हिरवे कार्ड देण्यात येऊन त्यांच्या संरक्षणी हमी देण्यात आली.

१२. जे इत्तेहादचे लोक जोशाने कुठल्याही हिंदूंची घरे जाळतील तर अशा

लोकांना आपल्या पुढाऱ्यांनी रोखावे.

१३. सर्व व्यवस्था झाल्यानंतर इत्तेहादने निजामाच्या किंग कोठीवर जावे आणि त्यांच्याकडून सत्ता इत्तेहादच्या हाती सोपविण्यास सांगावी.

१४. हैद्राबाद संस्थानातील रझाकारांचा जयघोषांचा नारा ठरलेला होता. 'शाहे उस्मानअली जिंदाबाद, हुकूमते हाफिया मुर्दाबाद'.

रझाकारांच्या वल्गना मोठ्या असल्यातरी त्याचेच मायबाप सरकार भारतीय फौजेपुढे टिकले नाही तिथे अशा बडबड्यांचे काय चालणार? रझाकारांच्या आदेशाचा आपण बारकाईने अभ्यास केल्यास त्यात त्यांना स्त्रिया किंवा सर्वसामान्याविषयी विशेष सूचना देण्यात आल्याचे दिसून येते. मात्र समाजकंटक ही जातच वेगळी असते त्यातूनच त्यांनी पाहतापाहता संपूर्ण परिसरात हैदोस घालून माणुसकीला काळिमा फासणारी दुष्कृत्ये केली. स्वातंत्र्यानंतर पन्नास वर्षांनंतरही रझाकार म्हटले की, अन्याय हे समीकरण तयार झाले. त्यामागे अशा घटनांचा अतिरेकच कारणीभूत आहे.

आपली गरळ ओकत रझवीचा विषारी प्रचार चालूच होता. एकदा कासिम रझवीने सरदार पटेलांना सांगितले की, हैद्रबाद हे आझाद आणि सार्वभौम मुस्लीम राष्ट्र आहे. तेव्हा सरदार पटेलांचे वाक्य फारच महत्वाचे आहे, ते एवढेच म्हणाले की, अगर कोई आत्महत्या करना चाहते हो, तो उसे हम कैसा रोक सकेंगे ? या वेळी रझवी निरुत्तर झाला असलातरी त्याची चुळबूळ कायम होती. तो गर्जना करायचा, हिंदुस्थानला मिळालेले स्वातंत्र्य हे फाटक्या वस्त्रासारखे आहे. दुबळ्यांनी आमच्यावर आक्रमणाचे धाडस करू नये. केलेच तर आमचे अडीच लाख रझाकार त्याचा मुकाबला करिती. एकदा हैद्रबादेवर घट्ट पाय रोवल्यानंतर मी दिल्लीच्या लाल किल्ल्यावर निजामाचा आसिफजाही झेंडा फडकावेन. हवेत राजवाडे उभे करण्याची रझवीची मनोवृत्ती असलीतरी त्याच्या चिथावणीमुळे रझाकाराच्या वेशातल्या पोटभरूनी आपल्या अस्तन्या बाहेर काढून सर्वसामान्यांच्या स्वप्नांची राखरांगोळी केली.

गावोगाव रझाकारांची दररोज परेड व्हायची. लष्करातील एखादा पेन्शनर यासाठी नेमलेला असून त्याला सालारसाब म्हणत. परेडसाठी गावठाण किंवा गावाच्या मुख्य रस्त्यावर हा खेळ चालू असायचा. त्यातून दहशत बसावी असाही हेतू होता. एकत्र आल्यावर गवताच्या काडयाही मजबूत वाटतात. परंतु आग लावणारी काडीपेटी भेटली ना मग त्यांची काय गत होते हे वेगळे

सांगण्याची आवश्यकता नाही. तीच अवस्था डरकाळ्या फोडणाऱ्या रझाकारांची होती. प्रसंग मोठा विचित्र आहे.

उमरगा तालुक्यातील आष्टा कासार या ठिकाणी रस्त्याच्या मध्यभागी रझाकारांची परेड जोरदारपणे चालू होती. त्यांच्या भितीने लोकांनी आपापली घरे बंद करून घेतलेली, तेवढ्यात बाहेर गावावरून आलेला कासाराचा नागा पाटील भर रस्त्यातून चालायला लागला. दाराच्या फटीतून बघणाऱ्या लोकांनी स्वत:ची खात्री करून घेतली की, आता नागाचं काय खरं नाय. तेवढ्यात एका बोळकांडातून आवाज आला, नागा पाटील ऽऽ बस्स ! काय गम्मत झाली. गावच्या उरावर बसून दिमाखात परेड करणारे रझाकार ढोपराला पाय लावून सुसाट पळत सुटले. सर्वांच्यापुढे होते जोशात आदेश देणारे सालारसाब.

हत्यारबंद रझाकाराला पळायला काय झालं? माहीत हाय ? त्यांना वाटलं, नाना पाटील. नागाचे नाना ऐकले हा कानाचा दोष. मात्र दोन मिनीटात रस्ता रिकामा. कारण काय ? तर म्हणे, भागो ऽऽ भागो ऽऽ क्रांतिसिंह नाना पाटील आया है, पकड के वो पांव में पत्रा मारता है. कुठ गेल्या तुमच्या बंदुका, तलवारी, फावडे खोरे? यावरून रझाकारांच्यात किती दम होता हे कळते. परंतु लांडगा नेहमी भिणाऱ्या शेळीचीच शिकार करतो हे ध्यानात घेता सर्वसामान्य लोक सुरुवातीला रझाकारांना दबकले आणि त्यांनी डाव साधायला सुरूवात केली. स्वातंत्र्य सेनानींमध्ये फक्त पुरुषच होते असे नाही तर स्त्रियांचाही समावेश असायचा. देशासाठी लढणाऱ्या स्वातंत्र्यवीराला भाकरी भाजण्याचे काम अशा अनेक आयाबहिणींनी केले. यासाठी पहाटेपासून जात्यावर दळण चालू व्हायचं. शेकडोंच्या तोंडात घास घालायचा म्हटल्यावर पीठ काय थोडं लागणार ? त्यांच्यात जोश आला होता, क्रांतीच्या पुढील शब्दानी.

पहिली माझी ओवी गं, क्रांतिसिंह नानाला।
धाक देऊनी पळविला तांबड्या गं सायबाला।
दुसरी माझी ओवी गं, वल्लभभाई पटेलांना।
आया बाया विनविती, धडा दे रे रझवीला ।।

समाजातील कुठलीही जात खराब नसते तर जातीआडचा माणूस खराब असतो. जातीच्या बुरख्याआडून केलेली कुठलीही कृती ही वाईटच. सुरुवातीला गोरगरिबांवर अत्याचार करू नका म्हणणारी इत्तेहादूल पुढे रझाकारांच्या हाती जाताच सारे कायदेकानू, नीतिमत्ता गहाण टाकून

माणुसकीला काळिमा फासणारे प्रकार व्हायला लागले. याच वेळी दबावाने म्हणा किंवा आपली जहागिरी साबूत राहावी म्हणून पदाच्या तुकड्यावर लाळ गाळत बसणारे अनेक बहाद्दर होते. अशा वफादार व लाचार हिंदूनी भारत सरकारला तारा पाठवून सांगितले की, आम्ही सर्व हिंदू निजामाच्या राज्यात सुखी आहोत. अशांची संख्या किती होती म्हणाल तर, ती होती तब्बल १० हजार ! असेच बहाद्दर लोक पुढे सत्तेवर आले.

शासनानेही पहिल्यापासून निधर्मीवादाचा बुरखा पांघरल्यामुळे हैद्राबाद मुक्तिसंग्रामातील रझाकारांचे कारनामे पुढे यायला फारच उशीर झाला. १९४८ मध्ये भारत सरकारने एक श्वेतपत्रिका काढली. त्यातील काही घटना वाचल्यानंतर आजही अंगाचा थरकाप उडतो. परभणी जिल्ह्यातील गुंडा नावाचे गाव. अचानक गिधाडांची धाड पडावी त्याप्रमाणे शेकडो रझाकार गुंडा गावावर तुटून पडले. गावातील अबालवृद्ध, स्त्रिया यांना गावातून मारत आणून गावाबाहेरच्या एका विहीरीत टाकून त्यावर कडबा टाकला आणि काडी ओढली. काही वेळातच माणसाचा कोळसा झाला. बाहेरगावी गेलेले चार पाचजण तेवढेच वाचले.

बिदर जिल्ह्यातील एक गाव. या गावावर रझाकारांनी अचानकपणे हल्ला केला. गावातील म्हाताऱ्या आणि लहान मुली सोडून जवळपास सव्वीस बायकांना नागडे करून गावातून त्यांची धिंड काढण्यात आली. याच वेळी पुरुषांना त्यांच्यासमोर आणून सर्वच लोकांना त्यानंतर गोळ्या घालून ठार करण्यात आले. केवळ इज्जत या साडेतीन शब्दासाठी जोहार करून स्वत:ला आगीच्या हवाली करणाऱ्या अबलांवर ही पाळी यावी, तीही स्वत:च्याच गावात यापेक्षा दुर्भाग्य ते कोणते? बरं झालं, रझाकारांनी त्यांना गोळ्या घालण्याचे उपकारच केले म्हणायचे. नाहीतर बेअब्रू होऊन आयुष्यभर रडत बसण्यापेक्षा एकदाचे मेलेले बरे म्हणणाऱ्या बाणीवृत्तीच्या होत्या त्या. कितीही संकटे आलीतरी हिंदूंनी कधी अब्रू सोडली नाही.

अशा अनेक घटनांचा पुढे सविस्तरपणे उल्लेख येणारच आहे. तरीपण इत्तेहादूलच्या नावाखाली रझाकारांनी नंगानाचा लावला होता. सिंदी, अफू, दारू पिऊन करोडगिरी नाक्यावर टोळया बसलेल्या असायच्या. मालाच्या बैलगाडया लुटायच्या, एकट्यादुकट्या स्त्रियांच्या अब्रूचे धिंडवडे काढायचे, हे उद्योग सर्रास चालायचे. सरकारी आकडेवारीनुसार मराठवाड्यातील ४८५

खेड्यांतून ४ कोटी २ लाख ३३९ रुपयांची लूट केली गेली. १३३३ खेडयांतून ८७८८ घरे जाळण्यात आली, ९२१ खून पाडण्यात आले तर ११५९ प्रकरणे ही बलत्काराची होती. यात उस्मानाबाद जिल्ह्यातील ६९ खेडयांतून ३ कोटी २९ लाख ७७ हजार १२६ रुपयांचा समावेश होता. निजामाच्या फौजेची संख्या२२ हजार ३९३ तर रझाकारांची संख्या होती २ लाख.या सर्वांचा म्होरक्या कासिम रझवीने स्वत:ला फिल्ड मार्शलची पदवी लावून घेतली होती. यावरून निजामाच्या आणि कासिम रझवीच्या धोरणाचा अंदाज येऊ शकतो.

रझाकाराला पोलीसही सामील झालेले होते. परंतु सर्वच सरकारी अधिकारी वाईट होते असे म्हणता येणार नाही. नांदेडजवळील लोहा या गावावर रझाकारांचा नांगर फिरला. पठाण, रोहिले आणि पोलीस मिळून त्यांनी गावातील सावकार आणि देशमुखांचे मुडदे पाडले व अनेकांच्या दुकानाला आगी लावून देण्यात आल्या. त्या वेळी लोह्याचे तहसीलदार फरीद मिर्झा होते. मिर्झा साहेबांनी आपला अवहाल सरकारला सादर केला. त्या वेळी ते म्हणतात, मी नमूद केलेले पाशवी प्रकार एखाद्या जातीला काळिमा फासण्यास पुरेसे आहेत. मी आपल्या सर्वसामान्य बांधवांना आवाहान करतो की, हे असले प्रकार चालू राहिले तर आपला विनाश आपणच ओढावून घेणार आहोत. निदान माणुसकीच्या नात्यानेतरी असले प्रकार थांबविले पाहिजेत. या घटनेच्या निषेधार्थ त्यांनी सरळ आपला राजीनामा दिला.

रोजच मरण भोगणाऱ्या माणसाला मरणाची भीती वाटत नसते. त्यामुळे सर्व जनताच रझाकाराला घाबरत होती अशातला भाग नाही. मायभूमीच्या रक्षणासाठी आपला जीव देणारे हजारो तरुणही त्या वेळी होते. माझ्या जीवापेक्षा माझा देश आणि देशाचा झेंडा महत्त्वाचा, या ध्येयाने प्रेरित झालेला एक माणूस म्हणजे अणदूरचे विरभद्र स्वामी. वाघाचं काळीज, त्यावर चिलखत, खांद्यावर बंदूक अन् घरावर तिरंगी झेंडा लावून निजामशाहीचा खातमा करण्याकरिता हा बहाद्दर भूमिगत अवस्थेत फिरायचा. विरभद्र स्वामीचा वचक एवढा भयानक होता की, घरावरचा झेंडा काढण्याची रझाकारांची कधी ताकत झाली नाही. भूमिगत असूनही या पठ्ठयाचा किती धाक ? सि. ना. आलुरे गुरुजी त्यांना भाकरी देण्याकरिता जायचे. त्यांनी सांगितलेल्या गोष्टीने आजही अंगावर शहारे येतात.

वाघाचं कातडं पांघरून लोकांना डरकावणं सोपं असतं. पण एकदा का

लोकांना कळालं की, तो साधा माणूस आहे, मग त्याचं खेळणं बनतं. तीच अवस्था रझाकारांची झालेली होती. रझाकारांचा बंदोबस्त करण्याकरिता गावोगावी आता स्वयंसेवक तयार झाले होते. सध्या रस्त्यावर न उतरणारा मारवाडी, जैन आणि ब्राह्मण समाज स्वातंत्र्यासाठी बलिदान दयायला तयार झालेला होता. ही जादू आहे स्वातंत्र्यदेवतेची. ती प्रसन्न झाल्याशिवाय तिच्यासाठी अंगात आलेल्या माणसाचा इलाजच होत नाही.

रझाकारांनी हैदोस घालून सर्वसामान्य बांधवांना अडचणीत आणून ठेवले. यातच दुर्दैवाची गोष्ट म्हणजे रझाकारांच्या नादाला लागून हैद्राबाद संस्थानातील काही दलित नेत्यांनी 'पोस्ताकोम' नावाची स्वतंत्र संघटनाही संस्थानातील आपल्या हिंदू बांधवांच्या नरडीचा घोट घ्यायला काढली होती. याच वेळी लोहाऱ्याजवळील नागूर येथील इराप्पा नावाच्या दलित समाजातील पोराला बाटवून रझवीने त्याला आपल्या घरी कामाला ठेवले होते. स्वातंत्र्याचा रणसंग्राम पाहून या बहाद्दराने शामराव किल्लारीकर, भानुदास पैलवान, रघुवीर शिंदे, काशीनाथ भोई, गुरबसप्पा स्वामी या सहकाऱ्यांना हाताशी धरून कासिम रझवीच्या खुनाचा कट रचला होता. त्यात त्याला यश आले नाही. याचा पोलीस तपास झाला. त्यात इराप्पा ऊर्फ लड्डू दोषी ठरला. रझवी मोठा धुर्त, त्याने चेहऱ्यावर काहीच दाखविले नाही. मात्र एकदिवस घराच्या कोपऱ्यात मोठा खड्डा घेऊन त्यात लड्डूला जिवंत गाडण्याची तयारी चालू झाली. परंतु सकाळीच घरातील कामवाल्या बाईने लड्डूला याची खबर दिल्याने तो केव्हाच पसार झाला होता. अशा कितीतरी घटना आहेत,ज्याचा प्रत्येक ठिकाणी आपण परामर्श घेऊ शकत नाही.

कासिम रझवीच्या वल्गना आणि त्याच्या हातीखाली मस्तवाल झालेले गुंड त्याच्या भडकावू भाषणाने जास्तच आक्रमक व्हायचे. पुढेपुढे तर निजामाची शासकीय फौज बाजूलाच राहिली. आणि रझाकारांनी संपूर्ण परिसराचा ताबा घेतला. दिवसेंदिवस अत्याचाराने परिसिमा गाठली. नेत्याच्या चिथवणीमुळे आगीत तेल ओतले गेले. संपूर्ण हैद्राबाद संस्थान वर्ष ते दीड वर्ष या आगीत जळत होते. आगीच्या ज्वाला सोसून रखरखत्या निखाऱ्यावर चालून जायची सवय झालेल्या माणसाला अंगाऱ्याचं काहीच वाटत नाही. त्याप्रमाणे कित्येक दिवस खेडयापाड्यांतील सर्वसामान्य माणसांनी रझाकाराला टक्कर दिली. भारतीय सेना शेवटच्या टप्प्यात म्हणजे १९४८ ला आली. त्याच्यापूर्वी

निजामशाहीशी लढणारा सैनिक कोण होता?

मनात एकदा ऊर्मी आली की गरमी आपोआप येते आणि एकदा ही गर्मी पेटली ना, मग भल्याभल्यांनाही भस्मसात करून टाकते. तीच गत आपल्या लोकांची झालेली होती. शेतातील काठी आता बंदुकीचा दस्ता झाला तर कोयता अन् विळयाने तलवारीचे काम केले, ही वास्तविकता आहे. उस्मानाबाद जिल्ह्यातील कोंडच्या एका लोहारने शेतातील लोखंडी पहारेपासून बंदुका तयार करून गावाला पुरविल्या होत्या. त्यामुळे स्वातंत्र्यसंग्रामाचा लढा अमिरखानच्या 'लगान' पिक्चरप्रमाणे एकतर्फी वाटत होता.

स्वप्न बघणं आणि वास्तवात येणं सारं काही कठीण असतं. तीच अवस्था कासिम साहेबांची झालेली होती. दिल्लीच्या लाल किल्ल्यावर झेंडा फडकवायला निघालेल्या या माणसाने निजामाशाहीचे मात्र कपडे उतरवले. भारतीय सेना ज्या वेळी चालून आली तेव्हा किती वेळ लागला यांना वठणीवर आणायला तर फक्त १०९ तास. केवढी ती डरकाळी? हैद्राबाद संस्थानने माफी मागितल्यानंतर कासिम रझवी पिक्चरटाईप खोपडीला पिस्तूल लावून आपल्या मेव्हण्याच्या घरी येरझरा घालत होते. २३ सप्टेंबर, १९४८ रोजी अगदी सर्वसामान्य आरोपीप्रमाणे रझवीला पकडले. हिरो होऊ नये म्हणून त्याला वेगळी वागणूक अजिबात दिली नाही. त्याच्यावर वेगवेगळया प्रकारचे अनेक खटले दाखल झाले होते. त्यात तीन फौजदारी आणि इतर सहा गुन्ह्याची नोंद करण्यात आलेली होती.

तीन मुख्य फौजदारी गुन्ह्यांत १. आळंदमधील शंकर मुगळे खून खटला २. हैद्राबादमधील हिंमतवान पत्रकार 'इमरोज'चे संपादक शोएबउल्ला खान यांची त्यांच्या मेव्हण्यासह हत्या आणि बीबी नगर दरोडा प्रकरण ( १० जानेवारी, १९४८ ) यांचा समावेश करण्यात आला होता. कासिम रझवीचा खटला नि:पक्षपातीपणे चालवावा म्हणून हिंदू, मुस्लिम आणि ख्रिश्चन अशा तीन न्यायाधीशांची नियुक्ती करण्यात आलेली होती. खरं तर कासिम रझवी स्वत: खटला चालविण्यास इच्छुक होता. यासाठी त्याचा मित्र झायिदअली कमील नावाच्या एका वकिलाने मोठी मदत केली. आळंदची केस सबळ पुराव्याअभावी सरकारने माघारी घेतली तर ३. बीबीनगर दरोडा प्रकरणात त्याला १० सप्टेंबर, १९५० ला ७ वर्षे सक्त मजुरीची (Hard Labour ) शिक्षा सुनावण्यात आली.

शोयबउल्ला प्रकरणात त्याला जन्मठेपेची शिक्षा सुनावण्यात आली. परंतु पुढे उच्च न्यायालयात ही शिक्षा रद्द झाली तर ७ वर्षांची शिक्षा कायम करण्यात आली. शिक्षा भोगण्याकरिता रझवी हैद्राबादमधील चंचलगुडा कारागृहात गेला. या ठिकाणी कासिम रझवीचा कैदी नंबर होता २००६३. तेव्हा सर्वसामान्य कैद्यासारखी वागणूक पाहून तो वैतागून गेला. तेथे त्याला संरक्षक भिंतीच्या बाजूचे गवत काढण्याचे काम देण्यात आले. छोट्याछोट्या गोष्टींवरून त्याची सारखी कुरकुर चालूच होती. आपणाला चांगली वागणूक मिळत नाही म्हणून त्याने थेट पंतप्रधान जवाहरलाल नेहरूकडे तक्रार केली. दिल्ली के बदमाश म्हणून शिव्या घातलेल्या माणसाकडे त्याला आपली याचना करावी लागली हे त्याचे दुर्दैव. अर्थात नेहरूंनी त्याच्या तक्रारीकडे लक्ष देण्याचा प्रश्नच नव्हता. सर्वच इलाज खुंटल्यामुळे शेवटी त्याने आमरण उपोषण सुरू केले. उपोषणातून त्याला आता गांधी कळाले. खरच जेलमुळे त्याला नेहरू आणि गांधी दोन्ही समजले हेही नसे थोडके.

स्वतंत्र भारतात आता उपोषणाला किंमत होती. त्यामुळे १९५४ ला रझवीच्या अर्जाचा विचार होऊन त्याला पुण्याच्या येरवडा जेलमध्ये हलविण्यात आले. तेथे शांतपणे त्याने आपली शिक्षा भोगली आणि ११ सप्टेंबर, १९५७ साली तो शिक्षा भोगून बाहेर आला. पोलीस ॲक्शन दरम्यान ऑस्ट्रेलियातील शस्त्राचा माफिया सिडने कॉटनच्या विमानातून त्याने आपली बायकामुले अगोदरच कराचीला पाठवून दिली होती. त्यामुळे जेलच्याबाहेर घरातले कोणीही नसलेतरी बाहेरचेसुद्धा कोणी आले नाही हीच गोष्ट अधोरेखित करण्यासारखी आहे. कोणी कोणाचे नसते हेच खरे. त्याचा एक तरुण वकील मित्र कमील तेवढा त्याच्यासाठी गाडी घेऊन आला होता.

हैद्राबादला गेल्यानंतर रझवीने आपल्या इत्तेहादूल मुसलमीन या संघटनेची बैठक बोलावली. आश्चर्य म्हणजे १४० पैकी फक्त ४० सदस्य या वेळी उपस्थित होते. आपण आता संघटनेची जबाबदारी सांभाळू शकत नसल्याने एखाद्या १२ वर्षांवरील तरूणाने यासाठी पुढे यावे अशा प्रकारचे मत त्याने मांडले. परंतु त्यासाठी कोणीही रस दाखविला नाही. त्यामुळे तो कमालीचा नाराज झाला. आपणाला हवा असणारा मुसलमान आता भारतात राहिला नसल्याचे सांगत कासिम रझवीने भारत सोडण्याचा निर्णय घेतला. लातूरचे चंद्रशेखर बाजपेयी हे रझवीच्या चांगले परिचयाचे असल्याने ते

रझवीला भेटण्याकरिता हैद्राबादला गेले होते. तेव्हा बोलताना त्याच्यातील उदासी सहजपणे जाणवत असल्याचे मत बाजपेयींनी व्यक्त केले आहे.

कासिम रझवीने आता भारत सोडून पाकीस्तानात जाण्याचा निर्णय घेतला होता. त्यानुसार आपला मित्र कमिलसोबत तो मुंबईला जायला निघाला तेव्हासुद्धा हैद्राबादमधल्या कुठल्याही साध्या माणसानेसुद्धा कासिम रझवीला विचारले नाही की त्याच्याकडे पाहिले नाही.१८ सप्टेबर,१९५७ ला कासिम रझवी हिंदुस्थान सोडून पाकिस्तानात कायमचा निघून गेला. जी गत हिंदुस्तानातली तीच पाकिस्तानातली. कराची हवाई अड्ड्यावर एक माणूस त्याच्या स्वागतासाठी आला नाही की, कोण म्हणून त्याची साधी चौकशीसुद्धा केली नाही. २ लाख फौजेचा प्रमुख राहिलेला कासिम रझवी यामुळे बैचेन असणे स्वाभाविक होते. परंतु हा तर नियतीचा खेळ असतो ना ! पाकिस्तानात राहात असताना उपजीविकेसाठी त्याने भारतातून फाळणीच्या वेळी आलेल्या लोकांची कराची कोर्टात वकिली केली. शेवटी १५ जानेवारी १९७० ला पाकिस्तानासारख्या परक्या भूमीत तो मरण पावला. दिल्लीवर आसिफजाही झेंडा फडकाविण्याचे स्वप्न बाळगणाऱ्या खेळिया उस्मानअली जंगबहाद्दूरचा तो शिकार बनला. तो गेला परंतु त्याच्या जखमा कायम होत्या.

आजतागायत लातूरमधल्या कासिम रझवीच्या जागेवर काहीही बांधकाम झालेले नाही. शिवाजी चौकातून गोलाईकडे निघाले म्हणजे उड्डान पूल संपल्यानंतर लगेच डाव्या हाताला स्मशान शांततेची काटयाकुपाट्याची जी जागा दिसते तेच सय्यद कासिम रझवींचे राहते घर, जिथं पुर्वी त्यांच्यातला साधाभोळा वकील राहत होता. लातूरजवळील पाखरसांगवीला रझवीची पाच एकर जमीन पुढे सरकारजमा करण्यात आली. इकरा नावाच्या या जमिनीचा लातूर तहसीलच्या वतीने दरवर्षी लिलाव केला जातो, व त्याची रक्कम सरकार दरबारी जमा होते. राहते घर तर आजतागायत पडून आहे. पाच मुले व चार मुली एवढा मोठा परिवार सांभाळत तो कराचीत शांततेचे जीवन जगला. पाशवी महत्वाकांक्षा माणसाला कुठे घेऊन जाते. कासीम रझवी याचे उत्तम उदाहरण आहे.

***



रझाकारांचा मोरक्या
कासिम रझवी

# २२. पोलीस ॲक्शन

निजाम राजवटीतील कुठलाही म्हाताऱ्या माणसाला ॲक्शन हा शब्द विचारला की तो आपल्यापुढे रझाकारांच्या अत्याचारांची एक मालिकाच उभी करतो. इ.स.१७२० साली स्थापन झालेली निजामशाही भारतदेश स्वातंत्र्य झाला तरी चालूच होती. भारतातील ५६५ संस्थानांत हैद्राबादचा निजाम मीर उस्मानअली जंग बहादूर हा सर्वांत श्रीमंत माणूस स्वातंत्र्यानंतर अन्य संस्थानांप्रमाणे भारतात सामील व्हायचे सोडून पाकिस्तानच्या नादी लागून तो स्वतंत्र देशाचे स्वप्न बाळगून होता. रझाकारांसारख्या बेताल संघटनेला पाठिंबा दिल्याने सामान्य जनतेवरील अत्याचार वाढले होते. स्वातंत्र्याच्या वेळी भारताने पाकिस्तानच्यारुपाने एक भूभाग अगोदरच गमावला होता. आता हैद्राबादचा प्रश्न ऐरणीवर आला होता. आपल्याच लोकांविरुद्ध सहसा लष्कराचा वापर होत नसतो. तरी भारताने आपले लष्कर हैद्राबाद संस्थानात घुसवून १७ सप्टेंबर, १९४८ ला हैद्राबाद संस्थानला भारतात विलीन करून टाकले. लष्करी भाषेत याची नावे भिन्न असली तरी सर्वसाधारणपणे या कारवाईला 'पोलीस ॲक्शन' म्हटले जाते.

१९४७ साली जगातील श्रीमंतांच्या यादीत हैद्राबादच्या निजामाचे नाव सर्वात अग्रभागी होते. गादीवर बसलेला सातवा निज़ाम हा जगातील सर्वांत श्रीमंतांच्या यादीत वरच्या नंबरवर असलातरी त्याचे राज्य हे इंग्रजांच्या आधिपत्याखालील राज्य होते. स्वातंत्र्यानंतर भारताची घटनात्मक रचना करण्याकरिता ज्याप्रमाणे लॉर्ड माऊंटबॅटन होते त्याप्रमाणे हैद्राबादमध्ये वॉल्टर मॉक्टन हे निज़ामाचे घटनात्मक सल्लागार होते. दुसऱ्या महायुद्धानंतर जागतिक स्तरावर युनोने सैन्यवाढीवर अनेक कडक निर्बंध घातलेले होते. त्यामुळे युनो, भारत आणि इंग्रज यांच्या रेट्यापुढे निजामाची अवस्था हिरवा चारा टाकून वाघापुढे बांधलेल्या शेळीसारखी झालेली होती. इच्छा आणि पैसा असूनही

लष्कराच्या उभारणीवर कडक निर्बंध होते. निजामाच्या राजवटीतील प्रगत हैद्राबाद हे जगातील प्रगत शहर म्हणून लौकिकास पावलेले एक शहर असून, शाळा, कॉलेज, दवाखाना, ग्रंथालये, संग्रहालये, स्थापत्य, कला आणि संस्कृतीत तेवढेच तोलामोलाचे होते. स्वत:चे स्वतंत्र चलन, रेल्वे, बस, रेडिओ यांसारख्या सुविधा निजामाने भारताच्या तोडीने उभा केल्या असल्यातरी लष्करी ताकदीच्या बाबत मात्र हैद्राबाद संस्थान फारच कमकुवत राहिले.

१९४५ नंतर जगाची विभागणी साम्यवादी आणि लोकशाहीवादी गटांत झालेली होती. दुसऱ्या महायुद्धात इंग्लंडच्या पंतप्रधानपदी असलेल्या विस्टन चर्चिलने अतुलनीय कामगिरी केली असलीतरी लोकशाहीत चर्चिलचा पराभव झाला होता. जगातील लोकांच्या विचाराचे वारे हे कोणत्या दिशेला वाहत होते याचे हे उत्तम उदाहरण होते. अशा वेळी १.८६ कोटीच्यांवर लोकसंख्या असलेल्या हैद्राबाद संस्थानात हिंदूंची संख्या ८६% तर मुस्लीम १२.५% याप्रमाणे असून यात आंध्रप्रदेश आणि मराठवाडा हा मोठा भूभाग मोडत होता. त्यात ७० लाख तेलगु, ४० लाख मराठी, २० लाख कन्नड भाषिक लोक राहत होते. यामध्ये ऊर्दु बोलणाऱ्यांची संख्या नगण्य होती. तरीपण राज्य मुस्लीम शासकाचे आणि ऊर्दु भाषेचे होते. या बहुभाषिक संस्थानात घटनात्मक भाषा ऊर्दुच होती,हे विशेष आहे.

सातवा निज़ाम उस्मानअली हा वंशपरंपरेतून हैद्राबाद संस्थानचा राजा असून, चलन आणि फर्मान हे सरकारअलीच्या नावाने चालायचे. इंग्रजांच्या रेट्यामुळे लोकशाहीचा एक टप्पा म्हणून पंतप्रधान आणि मंत्रिमंडळाची नियुक्ती केलेली होती. एखादी व्यक्ती आपल्या लायक नसली की कुठल्याही थराला जाऊन तिला संपविण्यासाठी कुठलेही कसब वापरण्याची निजामाची तयारी होती. त्यातूनच अकबर हैदरीला काढून आपल्याला लायक असणाऱ्या लायक अलीला त्याने पंतप्रधानपदी नेमले होते. खरं तर लायक अली हा हैद्राबाद संस्थानातील फार मोठा उद्योगपती होता. उद्योग आणि राजकारण यांचा कधीच मेळ बसत नसतो. तीच अवस्था लायकअलीची झालेली होती त्यामुळे ते अयशस्वी ठरले.

१९४७ ला संपूर्ण भारत आता स्वतंत्र झालातरी निजामाची स्वातंत्र्याची चळवळ चालूच होती. भारताकडून दबाव वाढायला लागला तेव्हा मंत्रिमंडळाची नियुक्ती करून लोकाभिमुख सरकार दाखविण्याचा प्रयत्न केला.

**निजामाच्या मंत्रिमंडळाचा कारभार पुढीलप्रमाणे होता.**

पंतप्रधान – मीर लायकअली

उपपंतप्रधान – पिंगल व्यंकटराम रेड्डी

अर्थ आणि परराष्ट्र – नवाब मोईन नवाजजंग

महसूल – नवाब फजल नवाजजंग

विधी – राजा मोहनलाल

पोलीस आणि कस्टम – अब्दुल हमीद खान

रेल्वे –अब्दुल रहिम

नियोजन व विकास – इकरामुल्ला (उस्मानाबाद)

शिक्षण – बी.एस. व्यंकटराव (मागासवर्ग प्रतिनिधी)

वैद्यक आणि सार्वजनिक आरोग्य – मल्लीकार्जून आप्पा तोडकरी (उस्मानाबाद)

व्यापार आणि उद्योग – जे. व्ही. जोशी

यामध्ये एकतर नवाबांचा भरणा अधिक असून, इतर जातींतून काही प्रतिनिधी घेऊन जातीय सलोखा राखण्याचे काम केल्याचे दिसून येते. याच वेळी या मंत्रिमंडळात इत्तेहाद संघटनेचे चार मंत्री असल्याने कासिम रझवीचे महत्व किती वाढले होते हे यावरून दिसून येते. इकरायुल्ला हा उस्मानाबादच्या रझाकारांचा म्होरक्या असून, खुद्द कासिम रझवीसुद्धा इकरामुल्लाला मानत होता. उस्मानाबाद जनता बँकेच्या अगोदर असणाऱ्या पतपेढीवर इकरामुल्ला संचालक होते हे विशेष आहे. पुढे ते पाकिस्तानला स्थायिक झाले. जर लांडगेच शेळीची राखण करायला लागले तर तक्रार करायची कोणाकडे? हीच अवस्था लायकअलीच्या मंत्रिमंडळाची होती. रेल्वे, बांधकाम, महसूल या खात्याचा कारभार खरंच समाधानकारक असलातरी पोलीस, कायदा,न्याय या खात्याने संस्थानात मनमानी चालविली होती. पोलीस आणि चोर मिळून गुन्हा करून त्यांना सामील असणाऱ्या न्यायाधीशापुढे गेले तर न्यायाची अपेक्षा ती काय ?

निजाम राजवटीतील ५ वर्षांच्या महसुलाकडे नजर मारल्यास निज़ामाची आर्थिक परिस्थिती कशी वाढत गेली हे सहजपणे ध्यानात येऊ शकते.

**वर्ष महसूल जमा खर्च (करोडमध्ये)**

१९४४ - ४५,१८,१८ १४,०४

१९४५ - ४६,२०,८६ १६,३५

१९४६ - ४७ २०,७२ २०,१७

१९४७ - ४८,२०,९९ ३४,७२

१९४८ - ४९,३०,११ ३०,५४

या व्यतिरिक्त हैद्राबाद संस्थानातील एकूण जमिनीपैकी ४०% जमिन ही निज़ामाच्या वैयक्तिक जहागिरीत मोडत असून, वर्षाकाठी मिळणारे उत्पन्न हे जवळपास १५ करोड होते.

सातवा निज़ाम किती लोभी आणि संधिसाधू होता हे निज़ामाच्या स्वतंत्र प्रकरणात अनुभवास मिळेलच. जो स्वत:साठी खात नाही तो दुसऱ्याला काय देणार? त्याप्रमाणे निज़ामाची वृत्ती ही फक्त धनसंचयाची होती. त्यामुळे नवाबाच्या बढाईखोर मंत्रिमंडळाने निज़ाम हवेत राहिला. कायदा आणि सुव्यवस्था म्हणजे काय ? याचा गंध नसलेल्या निज़ामाला तो सावरण्याकरिता रझाकाराचा म्होरक्या कासिम रझवीची भर पडली. सर्कशीतल्या विदूषकाने कसलेल्या कसरतपटूंची नक्कल करावी त्याप्रमाणे कासिम रझवी भारताला आवाहन देत होता. कल्पना आणि वास्तव यामध्ये फार मोठे अंतर असते याची जाणीव फार थोड्या लोकांना असते.

राजकारणात धर्म घुसला की दुबळ्यांचे मरण पीडाजनक ठरते. रामायण, महाभारत, दुसरे महायुद्धयाची आदर्श उदाहरणे आहेत. जर्मनीतील ज्यू धर्मीयांचा काटा काढून जगावर साम्राज्य गाजविण्याची भाषा करणारा ॲडॉल्फ हिटलर आपल्या अति महत्त्वकांक्षेने कुठल्या मरणाने मेला हे उदाहरण ताजे असतानाच सिद्दीकी-ए-दख्खन ॲड. सय्यद कासिक रझवी हा दार-उ-सलाम या आपल्या हैद्राबादेतील कार्यालयातून मजलिसे-इत्तेहाद-मुसलमीन या संघटनेच्या घोषवाक्यातून 'ममलकते-आसफिया इस्लामिया' म्हणजे हैद्राबाद संस्थान हे सार्वभौम, स्वायत्त राज्य राहील याची गरळ ओकत होता. शेखचिल्लीसारखी स्वप्ने बघत आपण फार मोठे झाड तोडणार असल्याची घोषणा करणारा शेखचिल्ली ज्याप्रमाणे स्वत: बसलेली फांदी तोडत होता,

त्याप्रमाणे कासिम रझवीने दिल्लीच्या लाल किल्ल्यावर निजमाचा झेंडा फडकाविण्याचे स्वप्न पाहिले आणि दाखविले. या अचाट स्वप्नात हैद्राबाद संस्थानला बुडवून तो पाकिस्तानला पळाला.

हैद्राबाद संस्थानात स्वत: निज़ाम हा धनसंचय करण्यात गुंतला होता तर घटनात्मक सल्लागार वॉल्टर मॉक्टन याला भारत आणि हैद्राबाद अशा दोघांना झुलवत ठेवायचे होते. कासिम रझवीची स्वप्ननगरी तर वेगळीच, तो हिंदुस्थान हैद्राबाद मध्ये विलीन करण्यास आतुर झालेला होता. त्यामुळे आर्थिक सुबत्ता असलीतरी निज़ामाची लष्करी ताकद त्यामानाने अतिशय तोकडी होती. निजामाचा सेनापती सय्यद अहमद अल ॲड्रुयस हा मूळचा अरब असून गत ३२ वर्षांपासून तो निज़ाम फौजेत कार्यरत होता. पोलीस कारवाईच्या दरम्यान तोच निज़ामाचा लष्कर प्रमुख होता. निज़ाम फौजेत अरब, रोहिले, पठाण आणि उत्तर भारतीय मुस्लिमांचा भरणा अधिक होता. एप्रिल, १९४८ च्या आकडेवारीनुसार निज़ामाचे नियमित लष्कर २२,३९३ आणि शिकाऊ ७००० सैन्य होते तर राखीव सैन्य ४८७० असून, पुढे यात वाढ होऊन एकूण सैन्यांची संख्या ३८००० झाली होती. पैकी १५००० सैन्य हे हैद्राबादमध्ये तैनात करण्यात आलेले होते.

जनरलच्या मदतीला १ लेफ्टनंट जनरल आणि ३ मेजर जनरल नियुक्त करण्यात आले होते. इतर प्रशासकीय सेवेप्रमाणेच सैन्यातही ७५% सैन्य हे मुस्लीम होते. एकूण १७६५ अधिकाऱ्यांपैकी १२६८ अधिकारी मुस्लीम असून, हिंदू अधिकाऱ्यांची संख्या ४२१ तर ख्रिश्चन पारशी आणि शिखांसह इतर अधिकाऱ्यांची संख्या १२१ होती. त्या वेळी जिल्ह्याच्या कलेक्टरचा मासिक पगार केवळ ११०० होता. त्यानुसार निज़ाम प्रशासनात ६०० ते १२०० रुपये पगार घेणाऱ्या अधिकाऱ्यांत मुस्लीम अधिकाऱ्यांची संख्या ५९ तर हिंदू अधिकारी फक्त ५ तर इतरांची संख्या ३८ होती. निज़ामाच्या एकूण ३८००० फौजेची रचना पुढीलप्रमाणे करण्यात आलेली होती.

१. नियमित फौज – आर्मर्ड रेजिमेंट ३
हॉर्स कॅवॅलरी – १
इन्फेन्ट्री बटालियन – ११
२. अनियमित फौज – हॉर्स कॅवलरी रेजिमेंट–१

इन्फेट्री बटालियन – ४

ग्रेनेडिअर बटालियन – १

३. होमगार्ड आणि रझाकार –२ लाख

बाहेरच्या दबावामुळे निजामाला आपली लष्करी ताकद वाढवायला बंधने यायला लागली. तेव्हा कासिम रझवीच्या माध्यमातून २ लाख रझाकारांची भरती करण्यात आली. सत्तेच्या जोरावर संपूर्ण संस्थानात हातात दंडा घेऊन रझाकारांनी दहशत माजविली होती. तरीपण त्यांना योग्य प्रमाणात लष्करी प्रशिक्षण देण्यात आलेले नव्हते. जागतिक पातळीवरील यद्ध हे तलवार आणि काठीने लढता येणार नव्हते. कोल्ह्याच्या चतुराईने सर्वसामान्यांना धमकावणाऱ्या रझाकारांची गाठ जेव्हा भारतीय सैन्यातील वाघांशी पडली तेव्हा ते समोरही आले नाहीत.

हैद्राबाद पोलीस कारवाईत एकाही हैद्राबादी अधिकाऱ्याने पराक्रम गाजविल्याचे आढळून आले नाही. नाही म्हणायला निज़ाम फौजेची रचना ४ भागांत करून त्यावर विविध अधिकारी नियुक्त करण्यात आले होते.

१. उत्तर विभाग– औरंगाबाद, परभणी, नांदेड आदीलाबाद आणि निजामाबाद. अधिकारी, ब्रिगेडीयर तौफीक अली.

२. पूर्व विभाग– नलगोंडा, वरंगल, करीमनगर. अधिकारी–ब्रिग्रेडीयर महंमद हुसेन खान

३. दक्षिण विभाग– गुलबर्गा, रायचूर, महबुबनगर. अधिकारी– लेफ्टनंट कर्नल अली

४. पश्चिम विभाग– बीदर, उस्मानाबाद आणि बीड. अधिकारी– सईदी हमीब अहमद

१९४७ नंतर अखिल हिंदुस्थानात अस्थिरतेचे वातावरण असताना निजामाचे सुरक्षेच्याबाबतीत दुर्लक्षच होते असे म्हटल्यास वावगे ठरू नये. त्यातच कासिम रझवीच्या २ लाख रझाकारांवर निजामाची भिस्त होती. निजामाच्या सैन्यातील ही आडहत्यारी सेना म्हणजे पानिपत युद्धातील बाजारबुणगेच ठरले. कारण वर्षभर मोठमोठ्या डरकाळ्या फोडणाऱ्या कासिम रझवीने किंवा त्याच्या रझाकारी सैन्याने पोलीस ॲक्शनमध्ये प्राणांची बाजी का लावली नाही? हे कटुसत्य आहे. पायदळाला युद्धाचा सराव नव्हता तर

निजामाकडे हवाईदल नव्हते. जी हत्यारे होती ती बरीच जुनाट झालेली होती. निजामाला शस्त्रे देण्यासाठी पाकिस्तान आणि पोर्तुगीजांकडून ती चोरून आणण्याकरिता ऑस्ट्रेलियाचा तस्कर सिडने कॉटन हा स्वत:च्या विमानाचा वापर करत होता. रात्रीच्या वेळी बिदर हवाई अड्ड्यावर ही शस्त्रे उतरवली जात होती. मांजर चोरून दूध पीत असलेतरी ते डोळे झाकून पिते. तेव्हा कुणाचेही लक्ष त्याच्यावर जाणारच असते. ६ जुलै, १९४८ ला भारताचे सेक्रेटरी जनरल गिरजाशंकर बाजपेयी यांनी भारतीय उच्चायुक्त यांना पत्र लिहून सिडने कॉटनकडून कराचीमार्गे शस्त्रे भारतात येत असल्याची माहिती दिली होती.

पाकिस्तानचा जन्मच मुळी १९४७ सालचा. नुकतेच त्याचे वय फक्त एक वर्षाचे असल्यामुळे जागतिक राजकारणात आता कुठे रांगायला लागलेल्या एखाद्या बाळाने दुसऱ्याला चालण्यासाठी आधार देण्याची भाषा करावी, असा प्रकार पाकिस्तानने याबाबतीत केला. युरोपियन हत्यारे चालवायला प्रशिक्षणाची आवश्यकता असते. तेवढा वेळ आणि समयसूचकता निजाम सरकारकडे नव्हती. त्याचाही परिणाम युद्धादरम्यान झाल्याचे दिसून येतो. एवढेच नाही तर बुद्धीच्या जोरावर उच्च पदावर पोहोचलेला हैद्राबादचा सरसेनापती अल ॲड्रूयस हा इंग्लंडमध्ये प्रशिक्षण घेऊन आलेला एक सैनिक असलातरी रायंदरछाप रझाकारांचा म्होरक्या कासिम रझवीपेक्षा त्याची किंमत नगण्य होती. एकदा संरक्षण व्यवस्थेवर चर्चा करण्याकरिता निजामाच्या अध्यक्षतेखाली भरलेल्या बैठकीसाठी मंत्रिमंडळ, कासिम रझवी, सेनापती ॲड्रयुसह अनेक वरिष्ठ अधिकारी उपस्थित होते. या वेळी निजामाने आपली सेना भारतीय सैन्यास कसा लढा देईल? असा प्रश्न विचारल्यावर परिस्थितीची जाण असलेल्या ॲड्रयुसने भारतापुढे आपला चार दिवस सुद्धा टिकाव लागणार नसल्याचे वास्तववादी उत्तर दिले. हे उत्तर ऐकून कासिम रझवीचे डोके भडकले. त्याने त्याच स्वरात वाक्य उच्चारले, गधा है साला ! इसे हकाल दो । संपूर्ण वातावरण स्तब्ध झाले परंतु कोणीही रझवीला विरोध केला नाही.

एका बाजूला भारताला चर्चेत गुंतवत राहायचे आणि दुसऱ्या बाजूला गुपचूप शस्त्रवाढ करण्याचा निजामाचा झपाटा कायम होता. सिडने कॉटनच्या माध्यमातून हैद्राबादने ३० लक्ष पौंडाची शस्त्रास्त्रे चेकोस्लोव्हाकियाकडून घेतलेली होती. स्वातंत्र्यानंतर याविषयीची बरीच माहिती समोर आली. हैद्राबादचे लष्करी प्रशासक मेजर जनरल जयंतोनाथ चोधरींनी सिडने कॉटनने

कोणकोणत्या प्रकारची हत्यारे पुरविली होती याची यादी सादर केली आहे.

१) रणगाडा भेदक भूसूरुंग- १०००

२) मोर २ इंचेस -८

३) मोर ३ इंचेस- १०

४) बॉम्ब मोर २ इंच - २५०००

५) ५० ब्रॉडनिंग दारुगोळा- ५०००

६) अति स्फोटक शेल -५००

७) विमान भेदक गन- २

८) रणगाडाभेदक गन-६

९) थॉमस कंपनीच्या मशीनगन-१०००

१०) मशीनगनचा दारुगोळा-५००,००० नग

११) ३०३ रायफल-१०,००० नग

१२) रायफलची काडतुसे- ५००,००० नग

१३) स्टेनगन (बेरेटा) -३००० नग

१४) स्टेनगनची काडतुसे - १०,०१,००० नग

भरमार, कराबीन, फुलछाप बंदुकीची सवय असणाऱ्या निजामसेनेला पाश्चात्य शास्त्रास्त्रांचे प्रशिक्षण मिळू शकले नाही. त्याचाही परिणाम प्रत्यक्ष युद्धभूमीवर झाला.

१९४७ नंतर भारत आणि हैद्राबाद यांच्यातील संबंध वरचेवर ताणले जात होते. पाकिस्तानसह इतर मुस्लीम राष्ट्रांचा आपणाला पाठिंबा मिळेल या कपोलकल्पित आशेवर हैद्राबादच्या शिडात हवा भरली जात होती. निजामावर रझाकारांचा दबाव वरचेवर वाढत चालला होता. जैसे थे करारावर चर्चा करण्यासाठी नवाब छतारी, वॉल्टर मॉक्टन आणि अलीयावरजंग दिल्लीला जाणार होते. त्याच रात्री कासिम रझवीच्या २५ हजार रझाकारांनी त्यांच्या घराबाहेर उभे राहून त्यांना राजिनामा देण्यास भाग पाडले. यावरून रझाकारांचा वरचढपणा ध्यानात येऊ शकतो. त्यामुळे रझाकारांचा मुजोरपणा एवढा विकोपाला गेला होता की, संपूर्ण संस्थानात त्यांनी अक्षरशः नंगानाच सुरू केला

होता. नांदेड जिल्ह्यात कंधारचे तहसीलदार फरिद मिर्झा यांनी 'कदिम' नावाच्या साप्ताहिकात लेख लिहून आपल्यादेखत पोलीस आणि रझाकारांनी मिळून निरपराधांना कापून काढत लूटमार, बलात्कार, जाळपोळ केल्याचे विदारक चित्र जनतेसमोर आणले. शेवटी त्यांनी आपल्या पदाचा राजिनामा दिला.

फरिद मिर्झासारखी माणसं होती किती? १९४७-४८ या एक वर्षातील रझाकारांच्या अत्याचारांचा पाढा वाचलातर आजही आपल्या डोळ्याला पाणी आल्याशिवाय राहत नाही. या ठिकाणी आपण फक्त उस्मानाबाद जिल्ह्यातील काही निवडक प्रसंगाचा ओझरता उल्लेख केला आहे.

१. २२, फेब्रुवारी १९४७ - ॲड. बाबुराव बोरगावकर वकील आणि निलय्या स्वामी यांची नळदुर्ग येथील किल्ल्यासमोर रझाकारांकडून क्रूरपणे हत्या करण्यात आली.

२. २० जानेवारी, १९४८ - किल्लारी येथील १२ घरांची जाळपोळ आणि लूट केल्यानंतर ६ लोकांना गोळ्या घालून पुलाखाली टाकून देण्यात आले.

३. २० ते २२ मार्च, १९४८- उस्मानाबादचे कलेक्टर महंमद हैदर व रझाकारांनी मिळून चिलवडी गाव जाळून टाकले आणि एका बाळंतिणीसह दोघांना ठार करण्यात आले.

४. ५ एप्रिल, १९४८- कौडगाव ता. उस्मानाबाद येथे ज्ञानोबा तात्या नाईकवाडी हे आपल्या शेतात काम करत असताना रझाकारांनी त्यांना गोळ्या घालून ठार मारले.

५. १४ एप्रिल, १९४८- सारोळा- काजळा येथील कँपवर हल्ला करून २ भारतीय पोलीस आणि ८ गावकरी ठार केले.

६. १८ एप्रिल १९४८- देव धानोरा ता. कळंब याठिकाणी गुंडूपाशा नावाच्या रझाकाराने गावच्या बाजारात घुसून १७ लोकांना गोळ्या घालून ठार केले.

७. २६ एप्रिल, १९४८- रझाकार आणि गुंडांनी ढेकरी ता. तुळजापूर येथील गावावर हल्ला करून दोन अल्पवयीन मुले आणि एका स्त्रिची जाळून हत्या केली. त्या वेळी गावातील लोक आळजापूर येथे पळून गेल्यानंतर २७ एप्रिलला आळजापूरवर हल्ला केला. सकाळी आठच्या दरम्यान रझाकारांनी हिंदूंच्या घरावर हल्ला करून त्यात लक्ष्मण नारायण वनवे, देवीप्रसाद रामचंद्र चांदणे, सदा तुळशीदास महार, हरी रामचंद्र घुगे या चौघांची गोळ्या घालून हत्या केली तर

रामचंद्र घुगे, भानुदास मेसु वनवे, भानुदास रामचंद्र (आडनाव मिळाले नाही) आणि सुरूबाई नारायण वनवे हे गंभीर जखमी झाले.

८. २९ एप्रिल, १९४८– माकडाचे उपळे येथील लोक बैलगाडीत शेंगा घेऊन बार्शीच्या बाजाराला निघाले असता गडदेवधरी येथे कस्टमच्या पठाणांनी त्यांना पकडून यातील १२ लोकांची हत्या केली.

९. ६ मे, १९४८–ईट, ता.भूम येथे किसनराव टेके आणि त्यांच्या पत्नी गोदावरीबाई यांना गोळ्या घालून जिवंत जाळण्यात आले. विशेष म्हणजे या खटल्यात उस्मानाबादचा तत्कालीन कलेक्टर महंमद हैदर याला गुलबर्गा उच्च न्यायालयाने फाशीची शिक्षा सुनावली होती.

१०. २२ मे १९४८– नंदगाव, ता.तुळजापूर येथे रझाकारांनी गावावर हल्ला चढवून संपूर्ण गाव जाळून एका बाईसह पाच लोकांची हत्या केली.

११. २४ जून, १९४८– भगवान डांगे, सिद्राम बोके, गना गुरू आणि गुंड गुरू या अपसिंग्याच्या लोकांना नाहक पकडून तुरुंगात टाकले. अपसिंग्याची जाळपोळ करून लुट केल्यानंतर वकील अहमद या रझाकाराने गावातील ६ लोकांची हत्या केली होती.

गृहमंत्री सरदार वल्लभभाई पटेल यांच्या नेतृत्वाखाली संरक्षणमंत्री बलदेवसिंग, संरक्षण सचिव व्ही.पी. मेनन, एच.एम. पटेल, भारताचे हैद्राबादमधील राजकीय सल्लागार कन्हैय्यालाल मानेकलाल मुन्शी, पायदळाचे सेनापती रॉय बुचर हे हैद्राबाद संस्थानातील लष्करी हालचालीवर बारकाईने लक्ष ठेवून होते. याविषयी व्ही.पी. मेनन यांनी गृहमंत्र्याला एक अहवाल पाठवून त्यात लिहिले होते, हैद्राबाद संस्थानात दहशतीचे वातावरण असून परभणी आणि नांदेड जिल्ह्यात पोलीस रझाकाराला सामील झाले असून, मी पाहिले की, ब्राह्मणांचे डोळे काढून त्यांना ठार करण्यात आले आहे. त्यांची घरे जाळून टाकण्यात आली आहेत. अनेक बायकांवर बलात्कार झाले आहेत. त्यामुळे खरं तर निजाम सरकार शक्तिहीन झाले आहे. भारत सरकार आणि हैद्राबाद संस्थान यांच्यातील संबंध बिघडू नयेत म्हणून तीन आठवड्याला एक बैठक भरायची. हैद्राबादच्यावतीने नवाब झैनयार जंग हे दिल्लीत राजदूत होते. त्यामुळे दिल्लीत काय चालले आहे याचीही खबरबात हैद्राबादमध्ये नियमितपणे जात होती.

दिवसेंदिवस दोघांतील संबंध बिघडत चालल्याने कुठल्याही क्षणी ठिणगी उडण्याची शक्यता निर्माण झाली होती. ८ ऑगस्ट, १९४८ ला माजी

पंतप्रधान सर मिर्झा इस्माईलने निजामाला भारताशी जुळवून घेण्याचा सल्ला दिला होता परंतु चांगले सल्ले निजामाने कधी ऐकले नाहीत. इत्तेहादुलचा जोर आता वाढला होता. त्यामुळे त्यांच्याकडून अत्याचारात वाढ व्हायला लागली होती. त्यांची मुजोरी शेवटी एवढी वाढली की त्यांनी आता भारतीय फौजेवरही हल्ला करण्यास सुरूवात केली. २४ जुलै, १९४८ ला बार्शी–सोलापूर रोडवर नान्नज या ठिकाणी रझाकारांनी भारतीय लष्कराच्या गाडीवर हल्ला केला. त्यात चार जवानांची गोळ्या घालून हत्या झाली तर ६ सप्टेंबर, १९४८ ला हैद्राबादनजिक चिलाकबु गावाजवळ असलेल्या भारतीय पोलीस चौकीवर रझाकारांनी हल्ला केहा. तेव्हा सीमावर्ती भागात तैनात असलेल्या १७ पुना हॉर्स आणि २/१५ गुरखा रायफलची एक तुकडी अभयसिंहच्या नेतृत्वाखाली रझाकारांचा शोध घेण्यासाठी हैद्रबाद संस्थानच्या हद्दीत घुसली. भारतीय सेना कोदारपर्यंत गेल्यानंतर तेथे हैद्राबाद लांसर्सच्या तुकडीने त्यांना विरोध केला. आपल्या सेनेने त्यांचा पराभव करून कोदार ताब्यात घेतले आणि इथूनच पहिली ठिणगी पडली.

निजाम प्रशासनाला भारतीय हमल्याची भीती होतीच. तरीपण हैद्राबादला आधार पाकिस्तान आणि युनोचा होता. घटनेचे सल्लागार म्हणून काम करणारे वॉल्टर मॉक्टनला दररोज एक हजार पगार दिला जात होता. ज्या वेळी कलेक्टरला मासिक पगार ११०० रुपये होता. त्या वेळी हे वेतन म्हणजे इंग्रजाच्या पडद्यामागे लपण्याची जणू फीच होती. १७ ऑगस्ट, १९४८ ला पंतप्रधान लायक अली यांनी हैद्राबादचा प्रश्न युनोत नेणार असल्याचे सांगितले. भारताने युनोला हा प्रश्न भारताचा अंतर्गत प्रश्न असल्याचे अगोदरच कळवून टाकल्याने हैद्राबादच्या आशा मावळल्या होत्या. तरीपण परराष्ट्रमंत्री नवाब मोईन नवाज़ जंग हे पाकिस्तानमार्गे पॅरिसला जाऊन सुरक्षा परिषदेच्या बैठकीत हा प्रश्न मांडण्याचा प्रयत्न केला. त्यात त्यांना अपयश आले. परंतु हैद्राबादचा हा शेवटचा उपायही संपला. सेनापती अड्रयूसने स्वत:चे भविष्य ओळखायला सुरुवात केलेली असल्याने त्याने १९४७ साली आपल्या मुलाला पाकिस्तानला पाठवून तेथील हवाईदलात पायलट म्हणून नोकरीस लावले होते. जिथं सैन्याच्या सेनापतीला स्वत:च्या मुलाचे भवितव्य स्वत:च्या राज्यात अंधकारमय वाटते तिथे इतरांचे काय? आणि यातून सेनापतीचे मनोबलही ध्यानात येते.

भारतीय स्टेट काँग्रेसच्या रूपाने १९४७ पासून इथले स्वातंत्र्य सैनिक

कामाला लागलेले होते. पंतप्रधान पंडीत जवाहरलाल नेहरू, उपपंतप्रधान सरदार वल्लभभाई पटेल, संरक्षण मंत्री बलदेवसिंग यांच्या बैठकीतून हैद्राबादवर कारवाईचा सूर उमटू लागला. प्रशासकीय पातळीवरून सैन्याची रचना होणारच होती परंतु स्टेट कॉंग्रेसचीही एक कृतिसमिती डॉ. मेलकोटे यांच्या अध्यक्षतेखाली बनविण्यात आली. मेलकोटे यांनी याकरिता तीन विभाग पाडून प्रत्येक जिल्ह्यात १५० लोकांचे एक पथक नेमले. उस्मानाबाद जिल्ह्यात याचे प्रमुख माजीमंत्री फुलचंद गांधी हे होते. या लोकांची ओळखपत्रे तयार करून ती गृहमंत्रालयाला पाठविण्यात आली होती. बळकट प्रशासनासोबतच या लोकांनी पोलीस कारवाई आणि त्यानंतर केलेले काम अतिशय उत्कृष्ट होते.

निज़ामाला सर्व निर्वाणीचे इशारे देऊनही कासिम रझवीच्या उधळलेल्या घोड्यावर स्वार झालेल्या निजाम प्रशासनाला आपला कायदा आणि सुव्यवस्था कधी हाताबाहेर गेली हे कळलेसुद्धा नाही. नेहरूजींनी आपल्या भाषणातून निजामाला चेतावणी द्यायला सुरुवात केली होती. पोलादी पुरूष गृहमंत्री सरदार वल्लभभाई पटेलांचे वय जवळपास ७३ वर्षांचे असून, दुर्दैवाने त्यांच्यावर हृदयाची शस्त्रक्रिया झाली होती. डेहराडूनला विश्रांतीसाठी गेले खरे, मात्र याच ठिकाणी मेजर जनरल जोयंतीनाथ चौधरी भेटले आणि हैद्राबादवर कारवाईविषयी चर्चा झाली असता, सरदारांनी चौधरींना विचारले, हैद्राबाद घेण्याकरिता किती काळ लागेल? चौधरींनी आत्मविश्वासपूर्वक सांगितले फक्त एक आठवडा!! जगाची काळजी करणाऱ्या पटेलांच्या हृदयाला हे जणू टॉनिकच मिळाले. त्यांनी आदेश दिला कामाला लागा. लागलीच ते दिल्लीला जाण्याकरिता विमानतळावर निघाले असता त्यांना निरोप देण्याकरिता चौधरी सोबत यायला लागले तेव्हा पटेलांनी सांगितले त्याची आवश्यकता नाही, तो वेळ तुम्ही तुमच्या तयारीकरिता घालवा. वल्लभभाई पटेलांना सरदार ही पदवी का दिली होती त्याचे हे उदाहरण होते.

हैद्राबादचा निजाम हा पूर्णपणे रझाकारांच्या दबावाखाली गेला होता. वारंवार चर्चेच्या फेरी घडूनही त्यात फरक पडत नव्हता. हैद्राबाद संस्थानात फिरताना रझवीची डरकाळी असायची, गत सातशे वर्षापासून आम्ही सत्ताधारी असून बंगालच्या उपसागराने निज़ामाचे पाय धुवू आणि आसिफजाही घराण्याचा झेंडा दिल्लीच्या लाल किल्ल्यावर फडकवू. त्यामुळे जैसे थे करारावर विशेष चर्चा झाली नाही. दिल्लीमध्ये एका बैठकीत कासिम रझवीने धमकी

दिली की, हैद्रबादवर कारवाई केल्यास हिंदुंच्या रक्ताचे पाट वाहतील. त्या वेळी सरदार पटेलांनी त्याच्याकडे दुर्लक्ष करत एकच वाक्य उच्चारले, 'भला कोई आत्महत्या करना चाहे तो हम उसे कैसा रोख सकते हैं । आणि हळूहळू हैद्राबादच्या गळ्याभोवती फास आवळायला लागले. जगात कुठल्याही लष्कराला एखादी कारवाई करायची असली की लष्करी सरावाची घोषणा करून त्या त्या भागाकडे सैन्य वळविले जाते.

२६ जानेवारी, १९४८ ला त्यात्या लष्करी विभागाला आदेश जारी करण्यात येऊन त्यांनी तातडीने हैद्राबादकडे रवाना होण्याच्या सूचना देण्यात आल्या. त्यानुसार ९ डोगरा रेजिमेंट नगरला पोहोचली. पंजाब रेजिमेंट, आर्मड डिव्हीजनने सोलापूरच्या दयानंद कॉलेजच्या जागेवर तळ ठोकला. याप्रमाणे हैद्राबादच्या चारही बाजुंनी मद्रास, विजयवाडा, नागपूर यानुसार तळ ठोकला. २१ जून, १९४८ या तुकड्यांना पहिला अध्यादेश आला की, त्यांनी त्रास देणाऱ्या रझाकार, कस्टमचे पठाण किंवा पोलिसांना त्यांच्या सीमेत घुसून त्यांचा बंदोबस्त करावा. यात भारतीय सेनेचे नुकसान होता कामा नये. त्यामुळे ही सूचना म्हणजे कबड्डीच्या खेळाप्रमाणेच होती. कबड्डीच्या खेळात कबड्डी घालत जाणाऱ्या गड्याने पुढील संघातील शक्य तेवढे गडी बाद करावेत. त्याप्रमाणे भारतीय सेनेने हैद्राबाद संस्थानालगतच्या गावांमध्ये सराव करावा असे अपेक्षित होते. साहजिकच या लष्करी सरावाला नाव दिले, 'ऑपरेशन कबड्डी'. यालाच पुढे लष्करी कारवाई म्हटले गेले. भारतीय सेनेच्या कबड्डीमुळे हैद्राबादभोवती सैन्याच्या हालचालींचा गोंगाट सुरू झाला. कबड्डीची चिंता हैद्राबादी सेनेपेक्षा रझाकार फौजेलाच अधिक होती. त्यामुळेच रझाकार आणि कस्टमच्या पठाणांनी बार्शी–सोलापूर रस्त्यावरील नान्नज गावातून पंजाब रेजिमेंटचे जवान पुढे जात असताना त्यांच्यावर हल्ला चढविला. त्यात भारतीय जवान शहीद झाले. परंतु आपल्या फौजेने नान्नजमध्ये घुसून रझाकारांच्या मुसक्या आवळत नान्नज ताब्यात घेऊन तेथे तिरंगा फडकाविला. ११ जुलैला, १९४८ ला ऑपरेशन कबड्डी संपले. पहिल्या झटक्यात आपल्या जवानांनी नान्नज आणि कोदार जिंकून घेतले.

१९६० च्या भाषावार प्रांत रचनेमुळे नान्नज हे सोलापूर जिल्ह्यात समाविष्ट करण्यात आले. त्यामुळे पुढील पिढीला हैद्राबाद संस्थानचा इतिहास माहीतच नाही. शाळेपासून महाविद्यालयापर्यंत त्यांना फक्त अखिल

हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याचा इतिहास शिकविला जातो. ज्यामध्ये नान्नजचा संबंधच येत नाही. कारण १९४८ पर्यंत नान्नज हे हैद्राबाद संस्थानात होते. नान्नजच्या जुन्या जाणकार मंडळींनां विचारले असता ते निजाम राजवटीच्या आठवणी सांगताना गहिवरतात. नान्नजमार्डी रस्त्यावर आजच्या ग्रामपंचायत कार्यालयाच्याबाजूला निजामाची एक मोठी दोन मजली इमारत असून त्यात करोडगिरी नाका,पोलीस ठाणे व रझाकारांचा अड्डा होता.

नान्नजमधील श्री.गंगाराम बाजीराव घोडके, महादेव मोरे आणि पंडित चौगुले यांनी हैद्राबाद मुक्तिसंग्रामात मोठे योगदान दिले आहे. एवढेच नाही तर स्वातंत्र्यानंतर माननीय शरद पवारांचे जवळचे मित्र बनलेले श्री.गंगाराम बाजीराव घोडके ( सावकार) यांना रझाकाराशी झालेल्या झटपटीत दंडाला गोळी लागलेली होती.

नान्नज येथील रझाकारांविषयी ते फारच आवेशात बोलायचे. तीन-चार रझाकराची नावेही त्यांनी सांगितली. त्यातील एक रझाकार तर एवढा नेमबाज होता की, बंदा रुपया हवेत भिरकावून तो बंदुकीच्या गोळीने त्यावर निशाना साधायचा. भारतीय लष्करावर रझाकाराने हल्ला केल्यानंतर लष्कराच्या हेलीकॉप्टरने या दोन मजली इतारतीवर हल्ला करून अनेक रझाकारांना यमदानास पाठवले.

निजाम लष्कराने याबाबत कुठलीही प्रतिक्रिया दिली नाही मात्र कासिम रझवीने हैद्राबादमध्ये सभा घेऊन हा दिवस 'नान्नज डे' म्हणून पाळला. आणि नान्नज परत घेण्याची घोषणा केली. निज़ामाची सारी भिस्त सुरक्षा परिषद आणि पाकिस्तानवर होती. १५ ऑगस्ट, १९४८ भारतमातेच्या सुपुत्रांनी आपला पहिल्या स्वातंत्र्याचा वाढदिवस उत्साहात साजरा केला. अखंड भारताच्या वर्तुळात आता हैद्राबादच्या विलीनीकरणाची गरज होती. त्यामुळे गृहमंत्रालयाची नजर आता हैद्राबादवर पडली आणि त्या दृष्टीने लष्कराच्या हालचाली वाढल्या. हैद्राबादने आपले देव पाण्यात घातले आणि सुरक्षा परिषदेच्या हस्तक्षेपाची मागणी केली. या विषयावर चर्चा करण्यासाठी युनोने २० सप्टेंबर, १९४८ ही पुढील तारीख दिली. आणि यामुळे हैद्राबादच्या मनोरथाचा पहिला चिरा पडला. त्यातच भारताची दुसरी फाळणी करायला निघालेले पाकिस्तानचे पंतप्रधान बॅरिस्टर महंमदअली जीना निजामशाहीला टेकू देण्याचा प्रयत्न करत होते. मात्र दोघांचेही दुर्देव आडवे आले आणि ११ सप्टेंबर

१९४८ च्या रात्री ११ वाजता जीनांचे निधन झाले. हैद्राबादचे उरलेसुरले अवसान गळाले. सेनापती अल ॲड्रुसचा एडीसी मेजर कृष्णा रेड्डी हा भारताचे राजदूत कन्हैय्यालाल मुन्शी यांना गुपचूपपणे हैद्राबादच्या हालचाली पुरवत होता. विशेष म्हणजे कृष्णा हा उप पंतप्रधान राजा बहादूर व्यंकट रेड्डींचा नातू होता.

जवान हैद्राबादच्या सीमेवरून आता फक्त आदेशाची वाट पाहत होते. पंतप्रधान जवाहरलाल नेहरू आणि भारतीय स्थलसेनेचे प्रमुख रॉयबुचर यांच्या मनात काही प्रमाणात किंतुपरंतु होते. त्यातच रॉय बुचर यांनी भारतीय सेना एकाच वेळी पाकिस्तान आणि हैद्राबादशी लढण्यासाठी असमर्थ असल्याचे मत व्यक्त केले. ज्यांचे काळीज पोलादी होते त्या सरदार पटेलांना आता वेळ वाया घालविणे धोक्याचे वाटत होते. त्यामुळे सरदारांनी आपल्या सेनापतींना आदेश दिला. लष्कराचे सर्व म्होरके एकत्रित जमले. सारा अभ्यास झाला. हैद्राबादमध्ये जवळपास १७ पोलोची मैदाने होती. हॉकीप्रमाणेच पोलोच्या खेळात हातात काठी घेऊन चेंडूला टोलवत गोल करतात. म्हणूनच १९ जुलै, १९४८ ला या कारवाईला नाव देण्यात आले 'ऑपरेशन पोलो'. त्यानुसार चारी बाजूंनी हैद्राबादला घेरण्याची योजना आखण्यात आली. भारतीय सेना ४ नाही तर ५ दिवसांनी हैद्राबादवर चढाई करणार होती.

ऑपरेशन पोलो या लष्करी कारवाईची संपूर्ण तयारी दक्षिण कमांडचे प्रमुख लेफ्टनंट जनरल ई.एन. गोद्दार्ड यांनी तयार केलेल्या योजनेनुसार पूर्ण झाली होती. भारतीय सेना सोलापूर आणि विजयवाडा अशा दोन भागात स्थिरावलेली होती. या लष्करी कारवाईचे मुख्य संचालन लेफ्टनंट जनरल महाराज राजेंद्रसिंहजी यांच्या नेतृत्वाखाली होणार होते. ५ लष्करी विभाग आणि ९ संस्थानाचे लष्कर या कारवाईमध्ये सहभागी झाले होते. ठरल्याप्रमाणे १ ग्वाल्हेर लॉन्सर्स, म्हैसुर लाँसर्स, मेवाड पायदळ, ४ ग्वाल्हेर पायदळ, राजाराम रायफल (शाहू संस्थान कोल्हापूर) या फौजांनी यात प्रत्यक्ष भाग घेतला. तर १ बडोदा संस्थानचे पायदळ, १ त्रावणकोर पायदळ आणि २ जोधपूर पायदळ हे राखीवमध्ये ठेवण्यात आले होते.

लष्कराची रचना स्टाईक फोर्स, स्मॅश फोर्स, किल फोर्स, वीर फोर्स आणि राखीव फोर्स याप्रमाणे होऊन यामध्ये मेजर जनरल ज्योयंतीनाथ चौधरी, ब्रिगेडीअर के.एन. वर्मा, ब्रिगेडीयर आपजी रणधीरसिंग, मेजर जनरल धार

आणि ब्रिगेडीयर रुद्र यांनी पुढील कारवाई करायची होती. हवाईदलाचे प्रमुख एअर कमांडर ए. एन. मुखर्जी यांच्या मार्गदर्शनाखाली भारतीय विमानं पुण्याच्या धावपट्टीवरून तयारीत होती. तर तोफखान्याच्या जवानांनी रणगाड्यांसह हैद्राबादकडे जाण्यासाठी तयारी ठेवली होती. विविध भागांत जमा झालेली भारतीय फौज आता पश्चिम भागातून सोलापूरहून, वायव्यकडून औरंगाबाद, ईशान्येकडून आदिलाबाद, दक्षिणेकडून कर्नुल आणि आग्येयेकडून विजयवाडा येथून हैद्राबादच्या दिशेने हमला करण्याच्या तयारीत होती.

भारतीय हैद्राबाद संस्थानला आपल्यात विलीन करून घेण्यासाठी जी मोहीम राबविली त्याला नाव देण्यात आले ऑपरेशन पोलो, प्रत्यक्षात मोहीम सुरू होईपर्यंत याविषयी बाहेर बरीच चर्चा करून झाली होती. त्यामुळे पोलो हे नाव बदलून मोहिमेला नाव दिले कॅटपिलर.

पोलो असो की कॅटपिलर शेवटी ही दोन्ही नावे ही एकाच लष्करी मोहिमेची होती. खरंतर युनोच्या मार्गदर्शक तत्त्वानुसार देशांतर्गत लष्कराचा वापर हा फारच आणीबाणीच्या परिस्थितीत करायचा असतो त्यातल्या त्यात स्वकियांवर तर अजिबात नाही. हैद्राबाद हे जर हिंदुस्थानचा एक अविभाज्य भाग असेल तर मानवी हक्कांची पायमल्ली केल्याचा आरोप होणार होता. त्यातच हैद्राबादच्या विलीनीकरणाचा प्रश्न युनोपुढे होता. अशा वेळी भारतीयांनी फार सावधपणे पावले उचलायला सुरुवात केली होती. त्यातलाच एक भाग म्हणून भारतीयांनी या मोहिमेला नाव दिले 'पोलीस ॲक्शन'. हा शब्द सर्वसामान्य जनतेत पसरविण्यात भारताला यशही आले. नावात पोलीस हा शब्द असला तरी यात भारतीय लष्कराची कारवाई महत्त्वाची होती. पोलिसांचा वापर नगण्य होता.

पोलोच्या खेळात ज्याप्रमाणे चेंडू टोलवत-टोलवत नेऊन गोलपोस्टमध्ये घातल्याशिवाय विजय मिळत नाही. त्याप्रमाणे हैद्राबादवर विजय मिळविण्यासाठी भारतीय जवानांचे सेनापती पाच दिशांनी हैद्राबादच्या दिशेने निघणार होते. उस्मानाबाद जिल्हा सोलापूर विभागातून मोडत असल्याने पश्चिम भागातून हल्ला करण्याची जबाबदारी मेजर जनरल ज्योयंतीनाथ चौधरी यांच्या नेतृत्वाखाली पार पाडली जाणार होती. त्यांच्यासोबत लेफ्टनंट कर्नल रामसिंग, ब्रिगेडीयर वर्मा, ब्रिगेडियर गुरू बचनसिंग आणि आपजी रणधीरसिंग हे नेमून दिलेल्या आघाड्यांवर काम करणार होते.

११ तारखेला जीनांचे निधन झाल्यामुळे पाकिस्तान आता स्वत:च्या अंतर्गत प्रश्नांत अडकून पडणार होते. भारताच्या दृष्टीने हा मुद्दा महत्त्वाचा ठरणार होता. निजाम उस्मानअली द्विधा मन:स्थितीत गुंतले होते. तर परिस्थितीचा फायदा घेण्याकरिता रझाकार लांडग्यासारखे सर्वसामान्यांवर तुटून पडले. रझाकारांच्या अत्याचारांची एका वर्षातील काळ्या कर्तृत्वाची यादी वाचली तर आजही आपल्या मुठी आवळतील. फक्त उस्मानाबाद जिल्ह्यातील ६९ खेड्यांत मिळून ३ कोटी २९ लाख ७७,१२६ रुपयांची लूट, २०४ खून आणि ६७ हिंदू स्त्रियांवर बलात्कार करण्यात आले. हीच परिस्थिती सर्व हैद्रबाद संस्थानात होती. पोलीस ॲक्शनचे प्रमुख लेफ्टनंट जनरल महाराज राजेंद्रसिंगजी यांनी संस्थानातील जनतेला उद्देशून एक पत्र काढले. त्यात त्यांनी 'हैद्राबादमधील परिस्थितीची जाणीव करून देत आपली फौज संस्थानात कायदा आणि सुव्यवस्था निर्माण करण्याकरिता येत असून, सर्व परिस्थिती नियंत्रणाखाली येताच हैद्राबादचा कारभार जनतेच्या हाती सोपविणार असल्याने सर्वांनी सहकार्य करण्याचे आवाहन केले'.

१२ सप्टेंबर, १९४८ ला भारतीय लष्कराला हैद्राबादच्या दिशेने निघण्याचे आदेश देण्यात आले. रात्री ८ ची वेळ असेल सोलापूर विभागात नेमलेल्या ३ कॅवलरी, १८ किंग एडवर्ड कॅवलरी, ९ फिल्ड रेजिमेंट, १० फिल्ड इंजिनिअर, ३/२ पंजाब रेजिमेंट, ३/११ गुरखा रायफल, ९ डोगरा रेजिमेंट, १ मेवाड इन्फ्रंन्ट्री, ॲन्सलरी यांनी आपापले मोर्चे सांभाळायला सुरुवात केली.

सोलापूर विभागातील फौज नळदुर्ग, तुळजापूर, बार्शी, येरमाळा, उस्मानाबाद अशा विविध भागांतून हैद्राबाद हद्दीत घुसायला निघाली. हैद्राबादच्या सीमेवरील गावे गावडी दारफळ, वैराग, पांगरी, गौडगाव अशा प्रत्येक गावात लष्कराचे तळ पडले. तर मुख्य तुकड्या ले. कर्नल रामसिंगच्या नेतृत्वाखाली नळदुर्गमार्गे हैद्राबादकडे निघाल्या.

हैद्राबाद संस्थान वर प्रत्यक्ष हल्ल्याची सुरूवात १३ सप्टेंबर, १९४८ ला सकाळी सूर्योदयापूर्वीच झाली. ११ तारखेला जीनांचे निधन झाल्याने हिंदूस्थान एवढ्यात हल्ला करील याची निजामशाहीला कल्पना नव्हती. तर रझाकारांनी आता निजामाच्या आदेशाची वाट न पाहता ' कत्ले आम' ची घोषणा केली होती. त्यामुळे गावोगाव रझाकारांच्या अत्याचाराने परिसीमा गाठली.

हैद्राबाद गुप्तचर यंत्रणेने १५ सप्टेंबरला भारतीय हल्ल्याची शक्यता वर्तविली होती. त्यामुळे हैद्राबादची सेना जरा निवांतच होती. तरीपण नळदुर्ग महामार्गावरून भारतीय सेनेला पुढे येऊ न देण्याची जबाबदारी इंग्रज कॅप्टन टी.टी. मूर यांच्यावर सोपविण्यात आली होती. १९३० साली तेजा नावाच्या गुत्तेदाराने नळदुर्ग किल्ल्याच्या खालच्या बाजूला बोरी नदीवरील पूल हा हैद्राबादमुंबई महामार्गावरचा महत्वाचा दुवा होता. बाजूने खोल दऱ्या आणि सप्टेंबर महिन्यात सर्वत्र नद्यांना पाणी असल्याने नळदुर्गचा पूल महत्त्वाचा होता. त्यामुळे भारतीय लष्कराचा शक्य तो प्रतिकार करायचा आणि नाहीच जमले तर शेवटी नळदुर्ग पूल उडवून द्यायचा ही निजाम सेनेची योजना होती. कॅप्टन मूर दारुगोळा घेऊन एका जीपमध्ये अगदी तयारीतच होता. सकाळी ७ ते ९ च्या दरम्यान भारतीय फौजेने अक्कलकोट, बोरामणी, अणदूर या मार्गाने नळदुर्गवर आक्रमण केले. अशात आक्रमण होणार नाही अशा बेतात बसलेला मूर पकडला गेला. फक्त दोन तासांत नळदुर्ग भारतीय सेनेने काबीज करून टाकले. रामसिंग तसेच पुढे जळकोट, उमरगा घेत पुढे सरकले. तलमोड येथे रझाकारांनी थोडाफार प्रतिकार करण्याचा प्रयत्न केला परंतु रझाकारांचा प्रयत्न म्हणजे हिंद केसरी सोबत गल्लीतल्या पहिलवानाने कुस्ती खेळण्याची भाषा करण्यासारखे होते. भारतीय सेना विजयवाडा, कर्नूल घेत हैद्राबादकडे निघाली. रस्त्यात फार मोठा विरोध झाला असे कुठे दिसत नव्हते.

आपण येथे फक्त उस्मानाबाद हद्दीचा विचार केल्यास १३ सप्टेबरला ३ कॅवलरी, ९ पॅरा फिल्ड रेजिमेंट, ३/२ पंजाब रेजिमेंट, ३/२ पंजाब रेजिमेंट, १० फिल्ड कंपनी २/१ गोरखा रायफल, १ मेवाड इन्फेन्ट्री आणि ऑन्सिलरीच्या जवानांनी तुळजापूरवर चढाई केली. भारतीय सेना अगोदरच गौडगावच्या भडाच्या शेतात थांबलेली होती. तेथून ती पुढे आली. दुसरी तुकडी तामलवाडीकडून पुढे सरकली. भारतीय रणगाड्यांनी तुळजापूर, बार्शी, रस्त्यावरील खंडोबाच्या माळावरून तुळजापूरवर  तोफा रोखून धरल्या. या ठिकाणी निजामाची हैद्राबाद इन्फ्रेन्ट्री २०० रझाकारांसोबत प्रतिकार करायला निघाली. तुळजापूरचे तहसीलदार सय्यद महमंद कादरी आणि फौजदार अब्दुल गफुर हे परिस्थितीवर लक्ष ठेवून होते.

उंचवट्यामुळे निजामसेनेची बाजू बळकट होती. पोलिसांना होमगार्डचा आधार होता.निजामाचे लष्कर, पोलीस आणि कस्टमच्या जोडीला

रझाकारांची तुकडी कार्यरत होती. मजलिसे इत्तेहादूल मुसलमीन या सामाजिक संघटनेत स्वयंसेवक म्हणजे रझाकारांचे एक जाळे तयार झाले. पाहता पाहता त्यांनी सर्व सत्ता आपल्या धाकाखाली घेतली. कासिम रझवीच्या प्रक्षोभक भाषणामुळे रझाकारांत उसने आवसान भरपूर होते. ज्यांनी कधी बंदूक पाहिली नाही ते कसलेल्या भारतीय सेनेच्या समोर लढण्यासाठी उभे राहिले. भारतीय जवानांनी संदेश पाठवून निजाम सेनेला शरण येण्याचा इशारा दिला तर शत्रूने आता घाटशीळेवर असणाऱ्या मंदिराचा आधार घेतला होता.

तुळजापूरमध्ये श्री तुळजाभवानी इतकेच महत्त्व घाटशिळेला आहे. इ.स.१७५२ साली इंग्रजांचा एक अधिकारी कोलीन मेकेंझी याने घाटशिळेचे एक रेखाचित्र काढले होते. त्यानुसान घाटशिळेवरील मंदिराचे बांधकाम फारच टुमदार असल्याचे चित्रात स्पष्टपणे दिसून येते. याच शिखराचा आधार रझाकारांनी घेतला. त्यांच्यामते हिंदुस्थानी सैनिक मंदिरामुळे हल्ला करणार नाहीत. निज़ामी सेनेने काही काळ प्रतिकार करण्याचा प्रयत्न केला. परंतु ज्या वेळी हिंदी सैनिकांना सत्यपरिस्थिती ध्यानात आली तेव्हा त्यांनी स्वत:चा धर्म बाजूला ठेवत मानवधर्माचा विचार करत एक तोफेचा गोळा डागला. तो सरळ घाटशिळेच्या शिखराला भेदून गेला. निजामी सेनेने अगोदरच शिखरावर स्वत:चा दारुगोळा आणि छोट्या तोफा ठेवलेल्या असल्याने तेथे फार मोठा स्फोट घडून आला. अनेक रझाकार आणि निजामी सैनिक ठार झाल्याचे पाहून त्यांनी काढता पाय घेतला.भारतीय सेनेला पहिल्या दिवशी प्रचंड यश मिळाले. नळदुर्गप्रमाणेच तुळजापूर ताब्यात घेण्यासाठी फक्त एक तासाचा वेळ लागला. आपजी रणधीरसिंग यांनी १३ तारखेला वरिष्ठांना कळवून टाकले की, आम्ही तुळजापूर ताब्यात घेतले असून 'श्री तुळजाभवानी मंदिर' अणि परिसर सुरक्षित आहे.

हैद्राबाद सेनेचा प्रतिकार संपल्याचे दिसताच भारतीय सेनेतील ३ कॅवलरी, ३/२ पंजाब रेजिमेंटसह इतर सर्वजण पुढे निघाले. तुळजापूर घाट पूर्वी फारच अरुंद असल्याने रणगाडा वरच्या बाजूला यायला थोड्या अडचणी निर्माण झाल्या. भारतीय सेनेला फक्त तुळजापूर घेऊन भागणारे नव्हते. त्यांना नेमून दिलेल्या मार्गावरून आता पुढे जायचे होते. ३ कॅवलरीचा एक रणगाडा पुढे सरकत असताना त्यात काहीतरी अडचण निर्माण झाली असावी. आपल्या कामात नेहमी चुस्त असणाऱ्या जमादार मांगेराम आणि जमादार हरिसिंग या

वीरांनी रणगाड्यातून खाली उडी घेतली. समोरासमोर लढण्याची ताकद हरविलेल्या रझाकारांनी डोंगरावर खोदलेल्या मोर्चात आश्रय घेतला होता. त्यातील एकाने बेसावध असलेल्या भारतीय वीरांवर पाठीमागून गोळ्या झाडल्या. सुभाना रोहतक येथील रहिवाशी असलेला जमादार मांगेराम आणि हरियानाचा रहिवाशी जमादार हरिसिंग शहीद झाले. पंजाबच्या या विरांनी तुळजाभवानीचरणी आपल्या प्राणांची आहुती दिली.

तळहातावर मरण घेऊन निघालेल्या वीरांना मरणाची भीती वाटत नसते. त्यामुळे त्यांच्या प्रेताची सन्मानाने विल्हेवाट लावल्यानंतर आपली फौज पुढे लोहारा, येणेगुर काबीज करत हैद्राबादच्या दिशेने रवाना झाली. पाच दिवशांनी हल्ला करणाऱ्या पाचही सेनापतींना निश्चित उद्दिष्ट देऊन जो हैद्राबादमध्ये सर्वात अगोदर पोहोचल त्यांना हैद्राबादचा प्रशासक म्हणून नेमण्यात येणार होते. या मोहिमेचा पहिला दिवस म्हणजे १३ सप्टेंबर, १९४८ भारतीय फौजांनी एकतर्फी विजय मिळवून गाजविला. अर्थातच याचे श्रेय सोलापूर विभागाचे प्रमुख मेजर जनरल चौधरी यांना जाते.

१४ सप्टेंबर, १९४८ ला बार्शीवरून निघालेले ३/११ गुरखा रायफल, ८ कॅवलरीचे जवान येडशीमार्गे उस्मानाबादच्या सीमेवर दाखल झाले. काही महिन्यापूर्वी उपळ्याच्या निरपराध मुलांना मारणारे गड आणि आळणीच्या कस्टम नाक्यावरील पठाण, रोहिले आणि रझाकार भारतीयांचे फक्त रणगाडे पाहून पळून गेले. सध्याचे जेलचे ठिकाण म्हणजे गावापासून फारच दूरवर असणारे ठिकाण होते. उस्मानाबादमध्ये हिमायत बेगच्या नेतृत्वाखालील निजामाची सेना कार्यरत होती. तर उस्मानाबाद म्हणजे रझाकारांचा गड होता. परंतु येडशीपासून उस्मानाबादपर्यंत कुणाचाही विरोध झाला नाही. रणगाडे उस्मानाबाद जेलसमोरून गावात जात असताना जेलच्या रखवालदाराने फायरिंग करण्यास सुरुवात केली. तेव्हा आपल्या जवानांनी त्याची चाळणी करून सोडली. साहजिकच जेलमधील अनेक पोलीस कुठे पळाले माहीत नाही.

आजच्या कलेक्टरचा बंगला तोच पूर्वीपासून कलेक्टरसाठी कायम असून, आजच्या न.प.च्या बाजूला निजाम बनावटीची टाऊन हॉल नावाची इमारत होती. त्यामध्ये बसून रझाकार विरोध करायला लागले होते. दरम्यान १५ तारीख उजाडली. रणगाडे जेव्हा कलेक्टरच्या घरासमोर आले तेव्हा अचानकपणे रझाकारांनी फायरिंग सुरू केली तेव्हा भारतीय तोफखान्याने फक्त

एक गोळा टाऊन हॉलवर डागला. घुमटासारखे छत पत्त्यासारखे कोसळून यात जवळपास ७५ रझाकार ठार झाले. पळून जाणाऱ्या १८४ रझाकारांना पकडण्यात आले. उस्मानाबादचे पोलीस मुख्यालय त्या काळी लष्कराची वसाहत होती. त्यामुळे तेथील जुन्या इमारतीला कॅप्टन बंगला म्हटले जायचे. त्या ठिकाणी निजाम सेनेचे शस्त्रांचे भांडार होते. जमिनीखाली एक भुयार करून त्यात शस्त्रे, दारुगोळा ठेवलेला असायचा. त्याला हवा लागावी म्हणून जमिनीवर एक चिमणी काढलेली होती. हे बांधकाम आजही सुस्थितीत आहे. या ठिकाणी हैद्राबाद संस्थानाचे अनेक लष्करी अधिकारी राहिले होते. एवढे सर्व काही सुव्यवस्थित असताना कुणीही भारतीय सेनेला विरोध केला नाही.

कर्नल वॉटसन, हिमायत बेग, भाटीया हे सैन्याचे अधिकारी कुठं पळाले समजलेसुद्धा नाही तर निजामाचा एक इमानदार अधिकारी मेजर मोहसीनखान हा फक्त महत्वाची कागदपत्रे जाळत होता. त्यामुळे स्वातंत्र्य संग्रामाचा इतिहास लिहिताना अस्सल कागदपत्रे उपलब्ध होऊ शकत नाहीत. १४ आणि १५ सप्टेंबरला आपल्या सैन्याने उस्मानाबादमधील हैद्राबाद शासनाचा बंदोबस्त करत उस्मानाबादवर कब्जा केला. उस्मानाबादचा एस.पी. अबुल हसन उस्मानाबादहून पळाला तो थेट पाकिस्तानामध्ये गेला. तर कलेक्टर महमद हैदरने कोषागारातील सर्व रक्कम आपल्या जीपमध्ये टाकली आणि हैद्राबादकडे पळून गेली. ज्याच्या नावाने धाराशिवचे नाव उस्मानाबाद करण्यात आले त्या उस्मान अली जंग बहादूर या सातव्या निजामाची सत्ता आता कायमची संपुष्टात आली होती.

१५ सप्टेंबरला मेजर जनरल डी.एस. ब्रार यांनी औरंगाबाद घेतले तर गुरखा रायफलने जालना घेतल्यानंतर लातूरवर चढाई केली. त्या ठिकाणी निजाम सेनेच्या गोवळकोंडा लांसर्सने थोडाफार प्रतिकार करण्याचा प्रयत्न केला. लातूर हे रझाकारांचा प्रमुख कासिम रझवीचे गाव असल्याने रझाकारांत थोडासा जोश होता. त्यामुळे १९४७-४८ला रझाकारांनी माणुसकीच्या सर्व सीमा पार केल्या होत्या. आता सर्वसामान्य जनतेची बारी होती. सैन्याच्या मदतीने तेथील जनतेने घंटे नावाच्या रझाकाराला रस्त्यावर आणून रणगाड्याखाली चिरडून टाकले. अशा रितीने लातूर घेतल्यानंतर येडशी, मुरूड करत अन्य सैन्याने बार्शी-लातूरची रेल्वे ताब्यात घेऊन जवळपास संपूर्ण उस्मानाबाद जिल्हा निजामाच्या तावडीतून मुक्त केला.

उस्मानाबाद पडल्यानंतर हैद्राबादमध्ये जाऊन पोहोचलेले उस्मानाबादचे कलेक्टर महंमद हैदरने पंतप्रधान लायकअली, सैन्याचा प्रमुख अल ॲड्रुस, कासिम रझवीसह सर्व महत्त्वाच्या लोकांची भेट घेऊन सीमा भागातील परिस्थितीची संपूर्ण माहिती देऊन भारतीय लष्कर हैद्राबादच्या अत्यंत जवळ आल्याची सूचना दिली होती. तरीपण स्वत:च स्वत:ची पाठ थापटायची सवय लागलेल्या निजाम प्रशासनाने आता थोडा धडा घेणे गरजेचे होते, परंतु धडा घेईल तर शहाणा कसला? हैद्राबाद आकाशवाणीने नेमक्या उलट्या बातम्या द्यायला सुरुवात केली. निजाम फौजेने हिंदुस्थान सेनेवर बऱ्याच ठिकाणी विजय मिळविल्याचे सांगताना अनेक मजेदार किस्से समोर आले. हैद्राबादचे आकाशवाणी केंद्र म्हणजे दख्खन रेडिओला निजाम सेनेच्या एका कॅप्टनने फोन करून सांगितले की, आम्ही भारतीय लष्करी अधिकाऱ्याला पकडून ठेवले आहे. या घटनेची बातमी करावी म्हणून रेडिओ केंद्राचे सहाय्यक संचालक मिर्झा जफरुल हसन हातात माईक घेऊन फतेह मैदानावर पोहोचले. तेव्हा त्यांच्या ध्यानात आले की आपल्याच फौजेचा एक अधिकारी भारतीय अधिकाऱ्याची नक्कल करत होता. अशी नाटकं किती दिवस टिकणार?

'निजाम गॅझेट' सारखे बढाईखोर वर्तमानपत्र अशा प्रकारे चुकीच्या बातम्या पसरवून लोकांची दिशाभूल करत होते. त्याने हिंदुस्थानचा उल्लेख 'हिंदू अस्थान' असा करायला सुरुवात केली होती. हैद्राबादमध्ये बसून लेखन करणाऱ्याला बाहेरची काय माहिती आहे? आता भारतीय फौज संपूर्ण निजामाचे बस्तान उठवायला अगदी टप्प्यात येऊन पोहोचलेली आहे. इत्तेहादचा पेपर 'रहेबार-ए-दख्खन' अशीच गरळ ओकत होता. बोलणाऱ्याचे ठीक आहे परंतु प्रत्यक्ष लढणाऱ्याला देव आठवायला लागला होता. वरचढ तसा समजदार माणूस होता. त्याला आपल्या असली ताकदीचा अंदाज आलेला होता. त्यामुळे त्याने आपल्या सेनेला संदेश दिला होता की, भारतीय फौज़ सर्वच बाबतीत आपल्यापेक्षा वरचढ असून, त्यांच्याशी संघर्ष न करता सरळ परत निघाला. त्यामुळे संपूर्ण पोलीस कारवाई दरम्यान निजाम लष्कराने फार मोठी लढत दिल्याचे दिसत नाही. पुढे तर अशा बातम्या पसरल्या की, जनरल ॲड्रयुस भारतीय फौजांना अंत:स्थ मिळालेला आहे. त्यामुळे त्याला बदलण्याच्या हालचाली सुरू झाल्या होत्या परंतु तोपर्यंत फार उशीर झाला होता.

दि. १३ सप्टेंबर, १९४८ पाच दिवसांनी पाच सेनापती हैद्रबादच्या

दिशेने निघाले होते. १६ तारखेला म्हणजे सर्वांत अगोदर हैद्राबादला पोहोचण्याचा मान अर्थातच सोलापूर विभागाचे प्रमुख मेजर जनरल ज्योयंतीनाथ चौधरी यांना मिळाला. या तीन दिवसांत हैद्राबादमध्ये अनेक चालचाली सुरू होत्या. लष्कराच्या मुख्य कार्यालयातून जनरल ॲड्रयुस सैन्यावर नियंत्रण करत होता तर पंतप्रधान लायकअली रोज सकाळी निजामाचे निवासस्थान किंग कोठीवर जाऊन माहिती देत होते. एवढ्यान गुप्तचर विभागाकडून एक बातमी आली की, भारतीय सेना बिदर, कल्याणी रोडवरून पुढे येत आहे. तेव्हा लायक अली धावत धावत सैन्याच्या कंट्रोलरुमवर पोहोचले आणि लष्कराच्या नकाशातून बिदरचा रस्ता पाहू लागले. तेव्हा त्या ठिकाणी रस्ताच नसल्याचे नकाशात दिसत होते. तरी खात्री करण्यासाठी लायकअलीने सार्वजनिक बांधकाम विभागाच्या मुख्य अभियंत्याला फोन करून विचारले तेव्हा तिकडून उत्तर आले की, हा रस्ता सहा महिन्यापूर्वीच तयार करण्यात आलेला आहे. परंतु पुन्हा एकदा नकाशाकडे पाहिल्यानंतर ध्यानात आले की, नकाशा शाळकरी मुलासाठी बनविण्यात आलेला आहे. ही अवस्था होती निजाम सैन्याची आणि त्याच्या अधिकाऱ्यांची. पंतप्रधानाची तर पाचावर धारण बसली आणि छाती बडवतच लायकअलीने एक वाक्य उच्चारले, 'आता फक्त चमत्कारच आपणाला वाचवू शकतो'.

१७ सप्टेंबर, १९४८ मेजर जनरल चौधरींची तुकडी हैद्राबादपासून फक्त पाच मैलावर म्हणजे अगदी टप्प्यात येऊन थांबली होती. आता भारतीय सेना शहरात पोहोचल्यास मोठ्या प्रमाणात जीवित हानी होण्याची शक्यता होती. त्यातच निजामाच्या कमकुवत सेनेचा अंदाज आलेला होता. पोलीस कारवाईचे प्रमुख ले. जनरल महाराज राजेंद्र सिंहजी यांनी जनरल अल ॲड्रयुस शरण येण्याचा सल्ला देण्यासाठी रेडिओवरून भाषण करताना म्हटले की, 'माझ्या फौजेने चहुबाजूंनी हैद्राबादला घेरले असून, निजाम सेनेचा कमकुवतपणा आमच्या ध्यानात आलेला आहे'. त्यामुळे जीवित आणि वित्त हानी टाळण्यासाठी आपण शरणागती स्वीकारावी हा एकमेव मार्ग आपल्यापुढे शिल्लक आहे. याविषयी माझ्याशी संपर्क करण्यासाठी ६६०० किलोहर्टस या फ्रिक्वेन्सीचा वापर करावा.

आता सेनापती, पंतप्रधान आणि खुद्द निजामाचेही धाबे दणाणले. निजामाने पंतप्रधान लायक अलीला बोलावून या घटनेस पंतप्रधानच जबाबदार

असल्याचे सांगत त्याला आपल्या मंत्रिमंडळाचा राजीनामा द्यायला लावला. पंतप्रधानाच्या आडून लोकशाहीच्या माध्यमातून पुन्हा एकदा सत्ता घेण्याचा निजामाचा डाव होता. यामागे कन्हैय्यालाल मुन्शीचा हात असल्याचा संशय होता. लायकअलीने रेडिओवरून भाषण करताना प्रथम लोकांना शांततेचे आवाहन केले आणि रझाकारावर बंदी घातल्याची आणि सायंकाळी ५ वाजल्यापासून यद्धबंदीची घोषणा केली.

तरीपण निजामाची घालमेल चालूच होती. त्यांनी भारताचे राजकीय प्रतिनिधी मुन्शींना बोलावून युध्दबंदीसाठी काय करावे लागेल म्हणून विनंती केली. मुन्शीने त्यांना सांगितले की, तुम्ही आकाशवाणी केंद्रावर जाऊन रेडिओच्या माध्यमातून युद्धबंदीची घोषणा करावी. रेडिओवर बोलण्यासाठी त्यात जाऊन बसावे लागते काय? अशी विचारणा निजामाने केली त्या वेळी मुन्शीने त्याला सांगितले की तुमच्यासमोर एक दांडके उभे धरले की, त्याच्यासमोर उभे राहून बोलायचे की आपले काम झाले.

पंतप्रधान लायकअलीनंतर निजाम लष्कराचा प्रमुख सय्यद अहमद अल ॲड्रयुस यानेही शरणागतीची घोषणा केलेली होती. त्यामुळे स्वतंत्र भारताच्या घोषणा देत जनता आता रस्त्यावर उतरली होती. हैद्राबाद संस्थानचा राजा मीर उस्मान अली हा आता सर्वसामान्य माणूस झाला होता. तो ज्या वेळी आकाशवाणी केंद्रावर गेला तेव्हा तेथे तोफांची सलामी नाही की साधा शिपाई उठून उभा राहिला नाही. हा काळाचा महिमा असतो. निजामाने स्वत: युद्धबंदीची घोषणा केली होती. राजापासून पंतप्रधान ते सेनापतीपर्यंत सर्वांनीच शरणागतीची घोषणा केलेली असली तरी बंदी घातलेल्या रझाकार संघटनेचा प्रमुख ‘सिद्दीके-ए-दख्खन’ सय्यद कासिम रझवीचा पिळ कायम होता. त्याच दिवशी सकाळी १०.३० वाजता तो पण आकाशवाणीवर बोलण्यासाठी आला होता. त्याने आपल्या लोकांना आश्वासन देताना म्हटले की, मीसुद्धा या वातावरणात पाकिस्तानला पळून जाऊ शकलो असतो परंतु माझ्या शरीरातील रक्ताच्या शेवटच्या थेंबापर्यंत मी तुमच्यासोबत आहे. आता सर्वस्व संपलेले असताना या डरकाळ्यांचा काही उपयोग नव्हता. त्यामुळे रझवीचे भाषण संपताच दख्खन रेडीओचा निवेदक रिझवानने साकिब लखनवीच्या प्रसिद्ध ओळी डिस्कवर टाकल्या. त्याक्षणी आवाज आला.

जमाना बडे शौक से सुन रहा था ।

